॥ श्री राम समर्थ ॥

# सद्गुरु श्री ब्रह्मानंद महाराज बेलधडिकर यांचे चरित्र



लेखक - गुरुभक्त भास्कर अनंत लिमये

॥ श्रीरामसमर्थ ॥

# सद्गुरु श्रीब्रह्मानंदमहाराज

## बेलधडीकर

# यांचे चरित्र

लेखक
**गु. भ. भास्कर अनंत लिमये** (बी.ए.)
सावित्री निवास, १०३, खणभाग, सांगली.

**प्रथमावृत्ति : शके १८९०, दत्तजयंती (डिसेंबर १९६८)**
**द्वितीयावृत्ति : शके १९२५, अक्षय्यतृतीया**
**(दि. ४ मे २००३)**

**किंमत : रु. १५०/–**

प्रकाशक :

**प्रा. मो. भा. लिमये**

२१, मॉडेल कॉलनी,

कॉलेज रोड, नाशिक.

ग्रंथवितरण :

**सौ. मानसी लक्ष्मीकांत जोशी**

फ्लॅट क्र. ६, बिल्डिंग क्र. ५,

श्रीचैतन्यनगर, गंगापूर रोड, नाशिक ४२२ ००५.

दूरध्वनी : २५७८२७४

**द्वितीयावृत्ति : ४ मे २००३ (शके १९२५)**

**प्रती : १०००**



विशेष साहाय्य :

**श्री. लक्ष्मीकांत म. जोशी**

फ्लॅट क्र. ६, बिल्डिंग क्र. ५,

श्रीचैतन्यनगर, गंगापूर रोड, नाशिक ४२२ ००५.

दूरध्वनी : २५७८२७४

मुद्रक :

**आदित्य ऑफसेट,**

१६१७, नगरकर लेन, नाशिक.

दूरध्वनी : ०२५३-२५०६३३६

# अनुक्रमणिका

पृष्ठ



**परिशिष्ट**

# लेखकाचा परिचय



**लेखक - कै. भास्कर अनंत लिमये**
**१४-०८-१९०४ ते ३०-११-१९७४**

या चरित्रग्रंथाचे लेखक कै. भास्कर अनंत लिमये तथा बाळासाहेब लिमये यांचा थोडक्यात परिचय, मी त्यांचा मोठा मुलगा, प्रा. मोरेश्वर भास्कर लिमये करुन देत आहे.

आमच्या घरातील वातावरण सुसंस्कृत, मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबाचे होते. स्नानसंध्या, सडासंमार्जन, रांगोळी, तुळस, निरनिराळे सण,व्रतवैकल्ये, श्रावणी, श्राद्धपक्ष, आरती, परवचा म्हणणे, संकष्टीला गणपती अथर्वशीर्षाची आवर्तने, रोजची माधुकरी आणि वार लावून जेवणारे विद्यार्थी हे सर्व तर होतेच परंतु इष्ट-मित्र, नातेवाईक, पाहुणे-रावळे यांनी घर भरलेले असावयाचे. राहणी मात्र अगदी साधी होती.

कै. भास्कर अनंत लिमये यांचे शिक्षण पुण्यात फर्ग्युसन महाविद्यालयात व सांगली येथे विलिंग्डन महाविद्यालयातून झाले. त्यांनी बी.ए. ला संस्कृत आणि इंग्लिश हे विषय घेतले होते. विद्यार्थीदशेत हॉकी, फुटबॉल व टेनिस या खेळात त्यांनी भाग घेतला होता. महाविद्यालयात ते जनरल सेक्रेटरी होते.

१९२८-२९ च्या सुमारास बी.ए. झाल्यानंतर आर्थिक मंदीच्या काळात सांगली संस्थानात सबइन्स्पेक्टर (फौजदार) म्हणून त्यांनी नोकरी धरली. १९३२ ते १९५२ या काळात मंगळवेढे, शिरहट्टी, कवठे महांकाळ आणि सांगली या तालुक्यात फौजदार म्हणून काम केले. एक धडाडीचे, कर्तबगार आणि शिस्तप्रिय फौजदार म्हणून त्यांचा लौकिक होता.

संस्थानाच्या विलीनीकरणानंतर त्यांनी मुदतपूर्व सेवानिवृत्ती स्वीकारली आणि चरितार्थासाठी शिक्षकी पेशा स्वीकारण्याचे ठरविले. सुरुवातीच्या काळात पोलीस खात्यात काम केलेल्या व्यक्तीस शिक्षकी पेशात त्या काळात अडचणी आल्या. परंतु त्या काळात संस्कृत व इंग्रजी शिकविणाऱ्या शिक्षकांची वाण असल्यामुळे कोकणात प्रथम खारेपाटण व नंतर वाडा (विजयदुर्ग) येथे शिक्षक म्हणून नोकरी केली.

१९६४ च्या सुमारास वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्यानंतर शिक्षकी पेशातून निवृत्त होऊन ते सांगलीला स्वगृही स्थायिक झाले. त्यानंतर त्यांनी धार्मिक ग्रंथांचे वाचन, मनन व पाठांतर आणि कागवाड येथील श्रीसद्गुरु ब्रह्मानंद महाराज संस्थान याचे कार्यात रस घेऊन मदत व पुढाकार घेण्यास सुरुवात केली. शिक्षक म्हणून काम केलेले

असल्यामुळे सांगली येथील गरजू, परिस्थितीनें नाडलेल्या विद्यार्थ्यांना विनामोबदला शिकविण्याचे व्रत त्यांनी घेतले. सांगली येथील मित्रमंडळी व नात्यागोत्यातील १० वीच्या वर्गातील मुले-मुली त्यांच्याकडे रोज २-३ तास शिकावयास येत. त्याचप्रमाणे सांगलीच्या बाहेर असलेल्या नातेवाइकांची मुले सांगलीला आपल्या घरी ठेवून घेऊन त्यांना शिकविण्याची व त्यांचे १० वीचे वर्ष पूर्ण करून त्यांना यशस्वी करून त्यांच्या आई-वडिलांकडे पाठवण्याचा उपक्रम त्यांनी चालू केला. या सर्व कामात त्यांची पत्नी, सौ. राधाबाई यांचे संपूर्ण सहकार्य आणि पाठिंबा होता.

श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंद महाराज संस्थान कागवाडचे पंच आणि अखेर सरपंच म्हणून काम करत असताना त्यांनी संस्थानासाठी वर्गणी व देणग्या जमविण्यासाठी अत्यंत परिश्रम घेतले. अनेक बऱ्यावाईट अनुभवातदेखील हे महाराजांचे काम समजून ते निष्ठेने पार पाडले. त्याच निष्ठेच्या जोरावर श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंद महाराजांचे चरित्र लिहिण्याचे काम त्यांनी हाती घेतले व मोठ्या शिस्तीने व वेळेचे काटेकोर बंधन पाळून ते पूर्ण केले.

अंत्यसमयी इतर कोणत्याही ऐहिक गोष्टींचा विचार न करता त्यांनी आपली दृष्टी तेथे ठेवलेल्या महाराजांच्या फोटोकडे वळवली आणि आपले मन रामनामात गुंतवले. ३०-११-१९७४ रोजी रामनामाचा अखंड जप करीत त्यांनी इहलोकीची यात्रा संपविली.

बरेच दिवसांपासून या चरित्राची आवृत्ती प्रकाशित करण्याचा प्रयत्न होता. परंतु श्रीब्रह्मानंद गुरुंच्या [illegible] योग आजवर आला नाही. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज आणि श्रीब्रह्मानंद गुरुंच्या प्रेरणेने आणि इच्छेने श्रीमहाराजांचे अनुग्रहित शिष्य श्री. लक्ष्मीकांत मधुसूदन जोशी यांचा संपर्क घडून आला. चरित्र प्रकाशनास ते यथाशक्ति सहकार्य देतो असे त्यांनी निःसंकोचपणे मनोगत व्यक्त केले. मूळ चरित्राची सुधारित आवृत्ती करणे, सध्याच्या प्रचलित मराठी भाषेनुरूप काही बदल करणे, प्रूफ तपासून छपाईयोग्य सर्व कामे श्री. लक्ष्मीकांत म. जोशी यांनी आनंदाने अल्पावधीत केली. तसेच त्यांच्या पत्नी सौ. मानसी लक्ष्मीकांत जोशी यांनी ग्रंथ वितरणाचे संदर्भातही सर्व सहकार्य दिले. नवबाग येथील श्रीगुरुंच्या संस्थानचे एक पंच श्री. विनायक दामोदर कानेटकर यांनी संस्थानविषयक माहिती, काही फोटो पाठवून सहकार्य केले. या पुस्तकातील तसेच कव्हर २ व कव्हर ३ यातील फोटो श्रीब्रह्मानंद महाराज संस्थान, नवबाग, कागवाड यांनी ऑक्टोबर १९९३ मध्ये प्रकाशित केलेल्या स्मरणिकेतून घेतले आहेत. तसेच श्री. मिलिंद दातार आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी उत्कृष्ट छपाई करून दिली. श्री. ब्रह्मानंद गुरुंच्या ठिकाणी असणाऱ्या अत्यंत श्रद्धेय भावातून या सर्वांनी आपले योगदान या प्रसंगी दिलेले आहे. या सर्वांचे आभार मानणे योग्य होणार नाही. त्यांना ते आवडणार नाही. तरी श्रीब्रह्मचैतन्य महाराज आणि श्रीब्रह्मानंद महाराज या उभयतांचे या सर्वांना उत्तम आशीर्वाद प्राप्त होवोत आणि सत्कार्याने त्यांचे उर्वरित जीवन उजळून निघो ही या उभय महापुरुषांच्या चरणी प्रार्थना करतो. अशुद्ध लेखन आणि अन्य चुका चाणाक्ष वाचकांनी कृपया लक्षात आणून द्याव्यात. यापुढील छपाईप्रसंगी त्याप्रमाणे सुधारणा करता येईल.

॥ श्रीब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

**- प्रा. मो. भा. लिमये**
२१, मॉडेल कॉलनी,
कॉलेज रोड, नाशिक.

# प्रस्तावना

तेही प्राणापरौतें । मज आवडती हें निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती॥ ज्ञा. अ. १२ ओवी २२७

जे भक्तांच्या चरित्राची वाखाणणी करतात, ते मला माझ्या प्राणापलीकडे आवडतात, असे ज्ञानोबा माऊली सांगते.

प्रस्तुत चरित्र श्रीब्रह्मानंद महाराजांचे, कीं जे श्रीब्रह्मचैतन्यांचे केवळ 'कल्याण' म्हणून शोभले, अशा एका गुरुनिष्ठ साधूचे आहे.

श्री. भास्कर अनंत लिमये रि.पो. सब्. इ. ह्यांनी केलेलें हें वाङ्मय श्राद्धच होय. वास्तविक माझ्यापेक्षां अधिकारी व्यक्तीकडून ही प्रस्तावना लिहिली गेली असती तर अधिक बरें झाले असते. परंतु श्री. लिमये यांनी प्रस्तावना तुम्हीच लिहा अशी इच्छा तीव्रतेने दर्शविली. म्हणून मला नाहीं म्हणणेची सोयच उरली नाहीं. मात्र त्यामुळे असें झाले कीं, संपूर्ण चरित्र यथासांग अवलोकन करणेची जबाबदारी माझेवर येऊन पडली. तेव्हां मी श्री. लिमये यांना विनंति केली कीं, तुम्हीच चरित्र वाचा. मी श्रोत्याचें काम करतो. तेव्हा त्यांनी असे सुचविलें की दररोज ५-६ तास एकाग्र मनानें एकें ठिकाणी बसून चरित्र वाचण्यास योग्य ठिकाण म्हणजे श्रीमहाराजांचे समाधिस्थानच होय. मलाही ती कल्पना एकदम पटली. व आम्ही नवबागेंत जाऊन तीन दिवस मुक्काम केला. श्री. लिमये यांनी मोठ्या प्रेमाने दररोज सकाळी चार तास व दुपारी तीन तास याप्रमाणें दोन दिवस चरित्राचे पारायण करून ते ऐकण्याची सुसंधि मला प्राप्त करून दिली. एका साधूचें चरित्र तपशीलवार ऐकून असें वाटले कीं लेखक हा आठ वर्षाचा असतांनाच अनुग्रह पावला व पुढें थोड्याच म्हणजे अवघ्या सहा वर्षांत श्रीमहाराजांनी देह ठेवला. अशा स्थितींत लेखकाने जणूं कांही श्रीमहाराजांच्या जन्मापासून अखेरपर्यंत त्यांच्याजवळ राहून सर्व गोष्टींचे चरित्र लेखनासाठीं बारकाईनें निरीक्षण करून परिश्रमानें माहिती गोळा करून, त्याचा उपयोग करून, ते सुरस वठविले याचेंच अभूतपूर्व आश्चर्य वाटले.

पण आश्चर्याचे कारण लगेच मनांतून निघून गेले व वाटले कीं, मनाची तळमळ अंतरंगाशी भिडल्याविना, ती विषयाशीं तादात्म्य पावल्यावांचून असलें कार्य कोणाच्याही हातून पार पडणें वा तडीस जाणें शक्य नाहीं. आणि म्हणून खुद्द भगवंतांनी वरील ज्ञानेश्वरीच्या 'ओवींत जे भक्तांच्या चरित्राची वाखाणणी करतात, ते मला प्राणापलीकडे आवडतात' असा निर्वाळा दिला आहे. आणि त्यांतून लेखक जर देवास प्राणापलीकडे मानतो असें मानले तर आपल्या सद्गुरूंचे चरित्र लिहितांना तो कशाचीही वाण पडूं देणार नाही हें निश्चित. आणि नेमकें तेंच या चरित्र लेखनांत घडलें आहे.

आतां या चरित्रांत एक मुख्य गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, आधाराशिवाय एकही गोष्ट सांगितलेली नाहीं. पुरावा जितका गोळा करतां येईल तितका केला आहे व त्याची छाननी अशी केली आहे कीं, कोणतीही गोष्ट नुसत्या भावनेवर न सोंपविता चिकित्सक बुद्धीला सुलभतेनें पटेल अशा तऱ्हेनें ती मांडली आहे. याचे कारण एकच असावेसें वाटते व ते म्हणजे श्रीगुरूचरित्राचा अभ्यास करतांना आपल्याला येणारी शंका दुसऱ्यासही येऊं शकेल याची खबरदारी घेऊन त्याचा उहापोहही शक्यतोंवर मार्मिकपणें केला आहे.

वास्तविक साधूचे चरित्र म्हटले कीं, मग ते कोणत्याही देशांतील, कोणत्याही धर्मातील व कोणत्याही भाषेंतील असो, चमत्कारांवांचून त्यांत रंगच भरत नसतो असे म्हटले तरी चालेल. तसे याही चरित्रांत कांही चमत्कार वर्णिले आहेत. पण ते वस्तुस्थितीला मोडून मात्र नाहींत. जीव जसा आत्म्याचे कक्षेंत जातो, तसतसें लोहास लोहचुंबक ज्याप्रमाणें चुंबकत्व देतो त्याप्रमाणें त्याचे अंगीं सामर्थ्य येते व मगच त्याचे हातून सामान्य मनुष्याच्या कक्षेच्या बाहेरील गोष्टी सहजत्वाने होतात. यांत आश्चर्य मानण्याचें कांहींच कारण नाहीं. आतां श्रीमहाराजांचें अंगीं अमानुषत्व व सद्गुरुप्रेम इतके होते कीं, आपले तन, मन, धन त्यांनी आपल्या गुरूंचा मोठेपणा वाढविण्यांत खर्च केले. या बाबतची प्रस्तुत चरित्रांतील प्रकरणें वाचतांना श्रीज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायांत 'आचार्योपास्ती' व्याख्यान करतांना गुरुपुत्रांचे जें वर्णन केलें आहे तें यथार्थ पुरेपूर येथें लागू पडत असल्याचें दिसून येते. त्याचा ओव्यासकट विस्तार न करतां नमुना म्हणून दोन ओव्या नमूद करतो.

गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मनासीं।
विरहिणी कां जैशी। वल्लभातें।। ज्ञा. अ. १३ ओ. ३७५

नाना वेंटाळुनी जीवितें । गुणागुण उखितें।
प्राणनाथ उचितें। दिधलें प्रिया।। ज्ञा. अ. १३ ओ. ३७३

ज्या प्रमाणें विरहिणीचें चित्तांत नेहमीं प्रियकरच असतो त्याप्रमाणें ज्या देशांत गुरूचे घर असते तो देश सदैव त्याच्या मनांत घोळत असतो. अथवा पतिव्रता स्त्री आपलें जीवित व गुणावगुण ज्याप्रमाणें पतीस अर्पण करते तद्वत् गुरुपुत्राची अवस्था असते. आतां या गोष्टींच्या महत्वाचें इंगित, आचार, विचार व उच्चारांच्या मार्फत अंगांत मुरणेस संत तुकोबारायानीं म्हटल्याप्रमाणे ज्याचें पूर्वपुण्य शुद्ध त्यालाच कळणार.

तुका म्हणे ज्याचें पूर्वपुण्य शुद्ध। तयासीच बोध होईल बापा ।।१।।

म्हणून सत्पुरुष जरी देहानें अदृश्य झाले तरी साधकाची जर तीव्र तळमळ असेल तर त्याचे पुरतें दर्शन, स्पर्शन व संभाषण याचा लाभ साधकाला होऊं शकतो. असा आजच्या काळांत देखील अनुभव येतो. म्हणून ज्ञानोबांनी म्हटले आहे -

तैसें हरपलें आपणपें पावे। तै संतांतें पाहतां गिंवसावें।
म्हणोनि वानावे ऐकावे। तेचि सदा।। ज्ञा. अ. १८ ओ. ४००

आपला हरवलेला आत्मभाव आपल्याला प्राप्त व्हावा, अशी जर इच्छा असेल तर संतांशी विचार विनिमय केला असतां तो आपल्याला शोधीत येतो, म्हणून नेहमींच संतांचे वर्णन करावें व संत चरित्र ऐकत जावें. कारण अशा साधूंची दिनचर्या म्हणजे प्रापंचिक जीवांनी आपले प्रतिबिंब पहाण्याचा जणू आरसाच होय.

प्रारंभी श्रीमहाराजांना ' कल्याण' म्हणून जी मी उपमा दिली आहे त्याचे कारण चरित्रांतील एक प्रसंग होय. तो असा. एकदां श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी श्रीब्रह्मानंदांना विचारलें कीं, लोक मला समर्थ म्हणून संबोधितात तेंव्हां माझे अंगीं कोणते बरें समर्थांचे गुण आहेत ? त्यावर श्रीब्रह्मानंद महाराज उद्गारले आपले सर्वच गुण श्रीसमर्थांप्रमाणें आहेत. फक्त त्यांत उणीव जर कोणती असेल तर ती फक्त कल्याणाची. तसा शिष्य मात्र आपणांजवळ नाहीं. या बोलण्यांतील इंगित असें आहे कीं, गुरुसेवा कितीही केली तरी श्रीब्रह्मानंदांस ती अपुरी वाटत होती आणि हेच तर सत्शिष्याचें लक्षण आहे. यासंबंधीची श्रीज्ञानोबांच्या प्रशस्तिपत्राची अल्पशी उक्ति खालीलप्रमाणें.

जो गुरुदास्यें कृशु। जो गुरु प्रेमें सपोषु।
जो गुरु आज्ञे निवासु। आपणचि जो।। ज्ञा. अ. १३ ओ. ४४३
जो गुरुकुळे सुकुलीनु। जो गुरुबंधु सौजन्ये सुजनु।
जो गुरुसेवा व्यसनें सव्यसनु। निरंतर ।। १३/४४४
जो गुरुसंप्रदायधर्म। तेचि जयाचे वर्णाश्रम।
गुरुपरिचर्या नित्यकर्म। जगाचें गा।। १३/४४५
श्रीगुरूंचे द्वार । तें जयाचें सर्वस्व सार।
गुरु सेवकां सहोदर। प्रेमें भजे। १३/४४७
तो तत्वज्ञानाचा ठावो। ज्ञाना तेणेंचि आवो।
हें असो तो देवो । ज्ञानभक्तु।। १३/४५४

जो गुरुसेवेनें कृश झाला, गुरुप्रेमानें पुष्ट झाला व गुरु आज्ञेचे स्थान असतो वा राहण्याचे ठिकाण असतो, तो गुरूच्या कुलानें कुलीन असतो व नेहेमीं गुरुबंधूंवरील स्नेह हाच ज्याचा छंद असतो व जो गुरुसेवारूप व्यसनानें व्यसनी बनतो, गुरुसंप्रदाय व धर्म हेच ज्याचे वर्णाश्रम धर्म, गुरूंची सेवा हेच ज्याचे नित्य नैमित्तिक कर्म, गुरूचें द्वार हेंच ज्याचे सर्वस्व सार आहे व जो गुरुसेवकांना सख्ख्या भावाप्रमाणें समजतो असा पुरुष तत्वज्ञानाचे (ब्रम्हज्ञानाचे) माहेरघर असून ज्ञानाला त्याच्याच योगानें इभ्रत येते. असो. पण थोडक्यांत गुरूची सेवा करणारा देवच आहे व ज्ञान त्याचा भक्त आहे.

हे वर्णन वाचले म्हणजे श्रीमहाराजांच्या सर्व चरित्राचा गाभा यांतच आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं एवढेंच नव्हे तर थोडक्यांत त्यांचे हृग्दतच यानें सुस्पष्ट होईल. श्रीमारुतिरायांनी श्रीरामचंद्रप्रभूंची अनन्य सेवा करण्यांत जसें आपलें सर्वस्व वेचले तसेंच श्रीमहाराजांनी श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांकरता आपले पंचप्राण वेंचले. अशा तऱ्हेच्या कथाभागामुळे हें चरित्र सर्वांग सुंदर झाले असून सर्वांसच वाचनीय झालें आहे.

तेव्हां या चरित्राचें श्रवण, मनन करून चरित्रनायकाच्या अत्युच्च मनोभूमिकेचा परिचय करून घेण्याची सुसंधी वाचकवृंदास लेखकाने आणून दिली, व मराठी वाङ्मयात उत्कृष्ट भर घातली हे त्याला फार भूषणावह आहे. श्रीमहाराजांचा पुण्यप्रद सहवास घडलेली मंडळी आतां थोडी उरली असली तरी चरित्ररूपानें श्रीमहाराजांचे जीवन जणुं काहीं सिनेमांतील चित्रें वा प्रसंग रुपेरी पडद्यावर पाहतांना प्रेक्षक जसा रंगून जातो तद्वत् गुरुप्रेमी सांप्रदायिकांना आदर्श गुरुनिष्ठेनें ओतप्रोत भरलेलें चरित्र प्रत्यक्षांत पुस्तकरूपानें दाखवून त्यांत त्यांना रंगविण्याचें श्रेयच लेखकाने पदरांत घेतले आहे.

अशा महात्म्याचे चरित्राची प्रस्तावना लिहिण्याचे भाग्य मला मिळवून देऊन श्रीमहाराजानींच माझ्याकडून अल्पशी सेवा करवून घेतली त्याबद्दल सहृदयता व्यक्त करून मी हे प्रस्तावनेचे चार शब्द श्रीमहाराजांचे चरणी अर्पण करतो.

**- वासुदेवराव जोशी (गारवडेकर)**

माधव नगर
श्रावण व १२ शके १८९०
ता. २०/८/१९६८

|| श्रीरामसमर्थ ||

# चार शब्द

श्रीगुरुभक्तिपरायण रा. रा. भास्कर अनंत लिमये यांनी लिहिलेलें हें चरित्र वाचून त्याबद्दल चार ओळी लिहिण्यास मला फार आनंद वाटतो. श्रीब्रह्मानंदमहाराज हे अलीकडच्या काळांतील थोर ब्रह्मज्ञानी पुरुष होऊन गेले. महाराष्ट्राशीं त्यांचा निकट संबंध आला तरी त्यांचे कार्यक्षेत्र उत्तर कर्नाटकांत व्यापल्यानें इकडच्या लोकांना त्यांच्या थोरपणाची व समाजसेवेची असावी तितकी कल्पना नाही. त्यांनीं देह ठेवून पन्नास वर्षे होऊन गेलीं. मराठींतच काय पण कानडीमध्येदेखील सर्व बाजूंनी संपन्न असें त्यांचें चरित्र हवें होतें. सुवर्णमहोत्सवाच्या निमित्तानें मराठींत असें चरित्र प्रसिद्ध होत आहे. त्याबद्दल श्री. लिमये यांना श्रीब्रह्मानंदभक्त खात्रीनें धन्यवाद देतील.

श्रीब्रह्मानंदमहाराजांचा थोरपणा कशांत सांठवलेला होता याचा विचार केला तर पुढील तीन गोष्टी मनापुढे उभ्या राहातात - १. परस्त्री, पैसा आणि मान या तिन्हींबद्दल कमालीची अलिप्तता. - २. श्रीसद्‌गुरुवचनावर विलक्षण विश्वास. - ३. आणि श्रीरामनामाचा अखंड अभ्यास. त्यांच्या विरक्तपणाबद्दल सांगावें तितकें थोडेंच आहे. परिचित स्त्रिया, मुलें व मोठी माणसें या सर्वांबरोबर त्यांचे वागणें नेहमीं मोकळेपणाचे व आपलेपणाचें असें. तरीपण त्यांनीं स्त्रियांना आपल्या पायालादेखील स्पर्श करूं दिला नाही. ''मी आजन्म ब्रह्मचारी आहे, स्त्रीला स्पर्श करणें म्हणजे आश्रमधर्माचा भंग करणें होय, म्हणून तुम्ही मायबहिणींनी कोणी मला स्पर्श करूं नका.'' असें ते बजावीत. त्यांतून कोणी एकादी धीट बाई नमस्काराला पुढें गेली तर कानडीमध्ये शेलक्या शिव्या देत व तिला हाकलून लावीत. पैशाच्या बाबतींत त्यांची वृत्ति फारच निस्पृह होती. बेलधडी येथील श्रीराममंदिर त्यांना फार आवडे तरीपण येथील इनामदारांनी एकदा पैशाच्या बाबतींत थोडासा उर्मटपणा दाखविल्याबरोबर श्रीब्रह्मानंदमहाराजांनीं तात्काळ तेथून प्रयाण केलें. पुढें श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांनी रदबदली केल्यावर बऱ्याच काळानें ते पुन्हां तेथें आले. लौकिक आणि मानसन्मान याविषयींदेखील ते मोठ्या कटाक्षानें सांभाळून वागत. श्रीगोंदवल्यास असतांना कोणी नमस्कार करु लागला तर उग्रपणें त्याचा निषेध करीत आणि व्यंकटापूर किंवा बेलधडी येथे देखील लोक आले असतां ''अरे देवाच्या पाया पडा, मी साधु का आहे, नमस्काराचा अधिकार फक्त श्रीमहाराजांना आहे'' असें वारंवार सांगत.

त्यांच्या त्यागवृत्तीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. पण हा त्याग अट्टाहासानें किंवा मोठा वेदांतविचार करून त्यांनीं केलेला नव्हता. श्रीमहाराजांवर म्हणजे श्रीसद्‌गुरुवर त्यांचे इतकें विलक्षण प्रेम होतें आणि त्यांच्या वचनावर त्यांचा इतका बेहद्द विश्वास होता कीं सद्‌गुरूसाठीं त्यांनीं सर्वस्व देण्यास मागेंपुढे पाहिलें नाही. मोठ्या कष्टाने मिळविलेली आपली सगळी विद्या त्यांनीं गुरुचरणीं वाहून टाकली. श्रीव्यंकटापुरला एवढें प्रचंड मंदिर बांधलें खरें पण तेथें प्रत्येक बाजूला ''श्रीब्रह्मचैतन्यमहाराज प्रसन्न'' असें खोदून ठेवले आहे. श्री. भाऊसाहेब केतकरांनी त्यांना एकदां प्रश्न केला कीं '' अहो, तुम्ही खरे मोठे आहात. मग लोकांनी तुम्हांला मोठं म्हटलं तर तुम्ही असं टाळता कां ?'' श्रीब्रह्मानंदमहाराजांनी उत्तर दिलें कीं ''भाऊसाहेब, तुम्हांला माहीत नाही. मी मोठा नाही. श्रीमहाराजांनी मला मोठं म्हटलं म्हणून लोक मला मोठा म्हणतात. श्रीमहाराज म्हणतील तें घडून येतं. आपण करूं म्हटल्यानें कांही होत नाही. श्रीमहाराज मला बुवा (साधु) म्हणतात म्हणून लोक मला साधु समजतात.'' अशी त्यांची सद्‌गुरुवचनावर निष्ठा होती.

अनुग्रह देताना अगदीं सामान्य माणसाला श्रीब्रह्मचैतन्यमहाराज जो त्रयोदशाक्षरी मंत्र देत असत तोच मंत्र त्यांनी ब्रह्मानंदांना दिला होता. पण एकदा मंत्र मिळाल्यानंतर त्यापरतें जगांत सत्य नाही अशी घट्ट धारणा धरून त्यांनीं त्या मंत्राचा मोठ्या चिकाटीने जप केला. १९१६ साली श्री. भय्यासाहेब मोडक बेलधडीस रामनवमीच्या उत्सवासाठी गेले होते. अष्टमीच्या दिवशीं संध्याकाळी त्यांच्या मनांत असा विचार आला की ''खरें म्हणजे आपण ह्यांना (श्रीब्रह्मानंदांना) श्रीमहाराजांकडे आणलें. ते मात्र तयार झाले, आत्मज्ञानी बनले आणि आपण होतो तसेंच राहिलो.'' या विचारानें त्यांना उदास करून टाकले. तिन्हींसांजाची वेळ झाल्यामुळे अंधार पडू लागला होता. इतक्यांत त्यांच्या खोलीत श्रीब्रह्मानंद आले आणि ''चल काढ चंची'' असे बोलले. पांच मिनिटापूर्वी भय्यासाहेबांनी आपली चंची कोनाड्यांत ठेवली होती. ती कांही केल्या अंधारांत सापडेना. तेवढ्यांत कोणीतरी कंदिल आणला तो समोरच चंची सापडली. तेव्हा श्रीब्रह्मानंद बोलले ''हें बघ असें आहे. आपले आपल्याजवळच असतें, पण अंधारांत सापडत नाही. गुरुकृपेचा दिवा आला की ते चटकन सापडतें. माझें यांत कांहींच नाही.'' त्यादिवशी आपण श्रीरामनामाचा अभ्यास कसा मनापासून केला, जातांयेतां आपल्याला नामाचा ध्यास कसा लागला आणि मग नामाशिवाय दुसरें कांही कसें सुचेनासें झालें व अशी अवस्था आल्यावर श्रीमहाराजांनी कशी कृपा करून आत्मज्योति दाखविली याचें सविस्तर वर्णन त्यांनीं केलें. ज्या हिरीरीनें त्यांनीं पूर्वायुष्यांत शास्त्रांचा अभ्यास केला त्याच हिरीरीनें त्यांनीं नामाचा अभ्यास केला ही आपण शिकण्यासारखी गोष्ट आहे.

श्रीब्रह्मानंदमहाराज पूर्णत्वाला पोंचलेला ब्रह्मज्ञानी पुरुष होते. सद्गुरुवरील एका अभंगात ते म्हणतात ''गुरुराव माझे रामचि केवळ। वासनेचें मूळ दूर केलें।'' याचा स्पष्ट अर्थ असा कीं श्रीमहाराजांच्या कृपेनें ते पूर्ण निर्वासन बनले आणि त्यामुळेंच त्यांना आत्मसाक्षात्कार घडला. ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या चरित्रांत साधनकालांतील अनुसंधानाचा अभ्यास जसा अत्यंत महत्वाचा असतो तसाच त्यानें ज्ञानोत्तर केलेला लोकसंग्रहदेखील फार अभ्यसनीय असतो. श्रीब्रह्मानंदमहाराजांनी अक्षरश: हजारो लोक भगवंताच्या नामाला लावले म्हणजेच त्यांना आत्मज्ञानाच्या मार्गावर नेऊन सोडलें. सत्पुरुषाचें चरित्र लिहिण्यास अध्यात्मिक तयारी लागते ती श्री. लिमये यांच्यापाशीं आहे असें म्हणावयास हरकत नाही. नामामध्यें राहून जो सद्गुरुवर प्रेम करील त्यालाच त्यांच्या चरित्राचें मर्म ध्यानांत येईल.

श्रीब्रह्मानंदमहाराजांच्या जीवनक्रमांत ज्ञान आणि भक्ति यांचा फारच सुरेख संगम दृष्टीस पडतो. बहुधा विद्येनें संपन्न असलेली माणसें अध्यात्मसाधनेसाठीं आपल्या विद्येचा त्याग करण्यास तयार होत नाहींत. तो करण्याचें जबर सामर्थ्य श्रीब्रह्मानंदमहाराजांनी दाखवले. उपनिषदादि शास्त्रांत वर्णन केलेल्या अवस्था केवळ पुराणप्रवचनाकरतां नसून स्वत: अनुभवण्यासाठीं आहेत ही दृष्टी आल्याबरोबर त्यांनीं आपलें जीवन श्रीरामनामाला वाहून टाकले. भगवंताच्या नामाचा अखंड सहवास घडल्यानें त्यांची योग्यता इतकी वाढली कीं ते आपल्या गुरुसमान झालें. त्यांचे चरित्र वाचून व त्यांचे मनन करून आपणदेखील नामाचा सहवास ठेवण्याचा अभ्यास केला तर त्यांना आलेले अनुभव आपल्यालादेखील येतील यांत कोणीहि शंका घेण्याचें कारण नाहीं. त्या थोर पुरुषाच्या चरणीं माझे शतश: प्रमाण असोत.

मालाड  
दि. २/१२/६८

**- के. वि. बेलसरे**

# श्री ब्रह्मानंदमहाराजांची वंशावळ




# श्रीब्रह्मानंद महाराजांची संभाव्य कुंडली

जन्म : माघ कृ. १० शके १७८० मृत्यू : भाद्रपद कृ. ३० शके १८४०



# लेखकाचे हृद्गत

वाचकहो प्रथम मला प्रांजलपणे हें नमूद केले पाहिजे कीं, जरी लेखक थोडासा शिकलेला असला तरी तो यथार्थानें सुविद्य नाहीं. श्रीगुरूंच्या चरित्रासारख्या गहन व अध्यात्मिक विषयावर लिहिण्याची माझी पात्रता नाहीं. मग मी हे धाडस कां केलें असा साहजीकच प्रश्न उपस्थित होतो. त्याचेच या हृद्गतांत निराकरण करण्याचा विचार आहे.

माझे वडील सांगली संस्थानांत पोलीस सब्इन्स्पेक्टर होते. ते १९०९/१९१० सालीं सांगली संस्थानांतील शिरहट्टी तालुक्यास कामावर असतांना श्रीब्रह्मानंदगुरूंचा मुक्काम वेंकटापुरास होता. श्रीवेंकटेश देवालयाच्या जीर्णोद्धाराचें काम चालू होते. श्रीब्रह्मानंदगुरूंच्या महिम्याच्या प्रभावानें आकर्षिले जाऊन वडिलांनीं त्यांचा अनुग्रह घेतला. त्यावेळी श्रीब्रह्मानंदगुरु शिरहट्टीस आमचे रहाते बिऱ्हाडीं आले होते. त्यावेळीं मला त्यांचे प्रथम दर्शन घडले व मी त्यांची पूजा केल्याचेंही मला आठवतें. तेव्हा माझे वय ६ असल्यानें जरी मला फारसें कळत नव्हते तरी मला त्यांची ओढ तेव्हांपासून लागली.

पुढें १९१२ सालीं वडील सांगली संस्थानच्या मंगळवेढे तालुक्यास कामावर असतांना श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचा मुक्काम चार महिने पंढरपुरांत होता. श्रीगुरूंही त्यावेळीं तेथेंच होते. पंढरपूर मंगळवेढे यामध्ये १४ मैलाचे अंतर आहे. जरी त्यावेळीं भाडोत्री मोटार वाहनाची सोय नव्हती तरी आम्ही दर शनिवारी बैलगाडीनें तेथें मुक्कामास जात असू व सोमवारीं मंगळवेढ्यास परत जात असू. म्हणजे आठवड्यांतून तीन दिवस आम्हांस श्रीमन्महाराजांच्या व श्रीगुरूंच्या दर्शनाचा लाभ सतत चार महिने मिळत होता.

या वेळपर्यंत माझें उपनयन झाले होतें. एके दिवशीं श्रीमन्महाराजांचे दर्शन घेऊन मी त्यांचे पुढे उभा असतां श्रीमन्ममहाराजांनी मला माझे नांव विचारुन 'तुला एक पुस्तक दिलें तर तूं पाठ करशील कां' असा प्रश्न केला. मी होय म्हणतांच त्यांनी आपल्या शिष्याकडून एक छोटेसें पुस्तक आणविलें व ते आपल्या हातानें मला दिलें. मी तें घेतलें, त्यांस नमस्कार केला व ते उघडून पाहिलें. ती रामहृदयाची पोथी होती. पण भाषा संस्कृत असल्यानें मी महाराजांस 'महाराज, हें संस्कृत आहे. मला कसें येईल' म्हणून विचारलें. त्यावर त्यांनी त्यांच्या पाठीमागच्या बाजूस असलेल्या एका खोलीकडे बोट केलें व 'त्या खोलींत ब्रह्मानंद बसला आहे, त्याच्याकडे जा. तो तुला सांगेल' असें सांगितले.

लागलीच मी त्यांच्याकडे गेलो. ब्रह्मानंदगुरूंना मुलें फार प्रिय असत. त्यांनीं मला आंत बोलावून आपल्या जवळ बसवून घेतलें व काय म्हणून विचारलें. मी त्यांना तें पुस्तक दाखवून श्रीमन्महाराजांनी तुमचेकडे जाण्यास सांगितलें आहे वगैरे सांगताच त्यांनी स्वत: मला त्या पोथीची संथा दिली. एकंदर त्यांनी तीनदां संथा दिली. नंतर माझेकडून वाचून घेतले व जा आतां तुला ते येईल म्हणून सांगितले. अशा तऱ्हेनें श्रीब्रह्मानंदगुरूंचा तेव्हांपासून मी शिष्य बनलो. मी आपल्याला त्यांचा अनुग्रहीत असें मानूं लागलो. त्या खेपेस गांवीं परत जाताच मी त्या पुस्तकाचा पिच्छा पुरविला व तें पाठ करुन टाकले.

आठ दिवसांनी पुन्हा पंढरपूरी गेल्यावेळी श्रीमन्महाराजांचे दर्शनास गेलो. पायावर डोके ठेवून उभा राहिलों तोंच श्रीमन्महाराजांनी 'बाळ, मागल्या खेपेस दिलेलें पुस्तक पाठ केलेस कां' म्हणून मला विचारले. मी होय म्हणतांच त्यांनी म्हणून दाखविण्यास सांगितले. मी न अडखळतां म्हणून दाखविले. श्रीमन्महाराजांनी हें आंघोळ करतांच रोज म्हणत जा म्हणून मला सांगितले. व आतां आणखी एक पुस्तक देतो. तेंही पाठ कर म्हणून सांगितले व मला आणखी एक पुस्तक दिले. ती पोथी विष्णुसहस्रनामाची होती. तीही संस्कृत होती. पण श्रीगुरूंकडे जाऊन त्याची संथा मी घेतली नाहीं. कां घेतली नाहीं हे समजत नाहीं. अभागी म्हणून घेतली नाहीं कीं ही पाठ होतांच पुन्हां दुसरे कांहीं पाठ करावयास सांगतील या भीतीनें घेतली नाहीं सांगतां येत नाहीं. घेतली नाहीं हे खरें. व ते पदरांत पडावयाचें नव्हते म्हणूनच कीं काय श्रीमन्महाराजांनींही विष्णुसहस्रनाम तुझे पाठ झाले कां ? म्हणत असतोस कीं नाहीं ? हे कधीं विचारले नाहीं व मीही ते १९६२ सालापर्यंत म्हणजें पुरीं ५० वर्षे होईपर्यंत ते पाठ केलें नाहीं. हीच माझी व श्रीमन्महाराजांनी अखेरची भेट.

मात्र विष्णुसहस्रनाम पाठ व्हावयाचे आहे याची जाणीव वरचेवर होत असे. मधून मधून मी ते पाठ करण्यास सुरवात करीत असे. चार आठ दिवसाच्या प्रयत्नानंतर ते जे मागें पडे ते पुन्हां कित्येक वर्षे मागें पडे. पण १९६२ सालीं ती वेळ आली व रोज एकदां पोथीवरून वाचावयाचा मी परिपाठ ठेवला. या योगें ते आपोआप पाठ झाले. त्याच वर्षी गोंदावलेस जाऊन श्रीमन्महाराजांच्या समाधीपुढे बसून मी त्यांस ते म्हणून दाखविलें. त्यावेळीं मला मानसिक समाधान किती झालें तें माझें मलाच ठाऊक.

१९१६ सालीं व १९१७ सालीं श्रीगुरूंनी तेरदाळांत श्रीदत्तमंदिरांत जे रामनामाचे सप्ताह केले त्यावेळीं जमखंडीहून त्यांचे दर्शनास मी गेलो होतो. त्यांच्या व्यक्तिमत्वाचा, त्यावेळीं मला जरा कळूं लागले असल्यानें माझ्यावर प्रभाव पडला व मी अनुग्रह न घेतांच माळ घेऊन जपही करूं लागलो.

१९१८ सालीं मी सांगली हायस्कूलमध्यें शिकत असतांना टायफॉईडनें ४२ दिवस आजारी होतो. माझ्या जीविताची सर्वांनी आशा सोडली होती. वडिलांनी मनानें गुरूंवर सांकडे घातले. मुलगा आजारांतून उठला तर मी रामनामाचा सप्ताह करीन असें मागून घेतलें. श्रीगुरूंनी सांकडे निवारण केले. मी बरा झालो तर तत्प्रीत्यर्थ आमचे घरीं पहिला सप्ताह झाला व तेव्हांपासून १९३३ अखेर, वडील हयात असेंपर्यंत, दरसाल आमचे घरीं रामनाम सप्ताह अत्यंत थाटानें होत असे.

श्रीगुरूंनी मला वांचविले या विश्वासानें श्रीगुरूंवर माझी दृढ श्रद्धा बसली. मी आषाढी एकादशीस आजारी पडलो तो श्रावण अखेर बरा झालो. श्रीगुरूंच्या दर्शनाची ओढ लागली होती. पण शिरहट्टीस जाण्यासारखी अंगांत ताकद नव्हती. ते या भागांत येतील तेव्हां जावयाचे असें ठरविले. भाद्रपद मासीं ते कागवाडास आल्याचें कळलेंच नाहीं. कळलें ते एकदम त्यांनी समाधी घेतल्याचेंच कळले. इच्छा मनांतच राहून गेली.

पुढें समाधिस्थांवर वडिलांनी घुमटी बांधली व सभा मंडपावर पत्रे घातले हे त्यांच्या व इतरांच्या तोंडून जेव्हां ऐकले, तेव्हांपासून श्रीगुरूंच्या बाबतींत आपल्याला काय करतां येईल ? कांही तरी करावे, असें सारखें

मनात येई पण काय करावे ते मात्र समजत नसे. प्रत्येक आराधनोत्सवास वडील नवबागेंत अगर व्यंकटापुरास जात असत. अखेर वडिलांच्या पश्चात तीच प्रथा मी चालू ठेविली.

पुढें १९५२ सालीं ऐच्छिक पेन्शन घेतल्यावर श्रीमंत आप्पासाहेब पटवर्धन निवर्तल्यानंतर नवें पंचमण्डळ जेव्हां अनधिकृतपणें निवडण्यांत आले त्यांत माझीही नियुक्ति झाली. त्यामुळें आराधनोत्सवास मला सुरवातीपासून शेवटपर्यंत रहावें लागूं लागले व मी राहूंही लागलो. एकदां अनंत आत्माराम कुलकर्णी यांचे 'मी कित्येक वर्षे झाली, हजार रुपये देण्यास तयार आहे. माझ्या नांवची खोली बांधवून देण्याचे कोणीच मनावर घेत नाहीं' असे उद्‌गार कानावर आले. तें आवाहन मी स्वीकारलें व दोन महिने नवबागेंत मुक्काम टाकून एक प्रशस्त, हवेशीर, सर्व सोयींनी युक्त अशी खोली तयार करुन घेतली व अनंत आत्माराम यांस ती दाखविली. त्यांस अत्यंत समाधान झाले. याचा परिणाम असा झाला कीं ही नवी पंच मंडळी अंगावर घेऊन काम करतात. पैसे दिले कीं काम पूर्ण होते असा विश्वास निर्माण झाला व भक्त मंडळी पुढें येऊं लागली. त्यानंतर आतां तेथे चार खोल्या झाल्या आहेत. विश्वास निर्माण झाला म्हणण्याचें कारण एवढेंच की, २५०-३०० रुपयांत खोल्या ज्यावेळी होत होत्या त्यावेळी कांही लोकांनी पैसे देऊं करून देखील खोल्या झाल्या नाहीत.

१९५८ सालीं कै. तात्यासाहेब केतकर यांनीं माझी अधिकृत पंच म्हणून निवड केल्यानें माझे वरचेवर नवबागेंत जाणे होऊं लागल्यानें व श्रीगुरूंच्या सान्निध्यांत मुक्काम होऊं लागल्यानें श्रीगुरूंची इत्थंभूत माहिती करून घ्यावी हा छंद लागला. त्यांच्या विषयीं माहिती मिळेल तेवढी हृदयसंपुटांत सांठवावी असें वाटून त्या दृष्टीनें प्रारंभ झाला. त्या माहितींतून पुढें श्रीगुरूंचे चरित्र लिहावें हा विचार मात्र चुकूनसुद्धां मनास शिवला नव्हता.

सन १९६३ साल उजाडले. गोंदवल्यास श्रीब्रह्मचैतन्यांच्या समाधिस्थानीं सुवर्णमहोत्सव झाला. श्रीगोंदवलेकरांचे प्रा. बेलसरे यांनी लिहिलेले चरित्र वाचण्यांत आलें व असें एखादे श्रीगुरूंचे चरित्र आपण लिहावें असा विचार मनांत मूळ धरूं लागला. तरी पण आपणांस हे कसे जमेल ही भीति भेडसावीतच होती. चरित्र लिहिणें हें सोपें काम नव्हे. त्यांस पुष्कळ हिंडावें लागतें. ज्या महात्म्याचे चरित्र लिहावयाचें त्याच्याशी संबंध आलेल्या व्यक्तींची गाठ भेट घेऊन अव्वल दर्जाची माहिती मिळवावी लागते. श्रीब्रह्मानंदगुरूंचा वास कर्नाटकांत. त्यांचा संचार कर्नाटकांत. त्यांच्याशीं निकट संबंध आलेल्या व्यक्ति कर्नाटकांत. श्रीगुरूंचा इकडच्या टापूंत संचारही कमी, वासही कमी व त्या मानानें संबंध आलेल्या व्यक्तीही कमी. अशा परिस्थितींत हें आपल्याला कसें जमेल अशीच भीति वाटत असे. शिवाय श्रीगुरूंनी देह ठेवल्यास ५० वर्षाचा कालावधि होऊन गेलेला. या भागांतील त्यावेळच्या निकट संबंधी व्यक्तीही बहुधा दिवंगत झालेल्या, अशा स्थितींत मनाचा निश्चय होईना. मात्र असें कांहीं तरी करून त्या रुपानें आपण श्रीगुरूंची सेवा करावी असें फार वाटत होते.

अशा मनाच्या दोलायमान स्थितींत पूर्णपणें ३ वर्षे गेली. पुन्हां १९६६ सालीं मनानें उचल खाल्ली. श्रीगुरूंची कानडी चरित्रें तरी मिळतात कां याच्या शोधास सुरवात झाली. फक्त ८० पानाचे बंगलोरला छापलेलें

व दुसरें एक ४० पानाचें छापलेले अशी दोन पुस्तकें मिळाली. पण ती वाचावयाची कशी ? हा प्रश्न उभा राहिला. १९३८/३९ सालीं मी स्वत: शिरहट्टीस पोलीस सब्इन्स्पेक्टर असतांना सांगली संस्थानच्या विधान परिषदेनें वरच्याजागींच्या तालुकाधिकाऱ्यांनी कानडी परीक्षा दिली पाहिजे, न दिल्यास त्यांची पगारवाढ खुंटविण्यांत येईल असें गॅझेट केल्यानें, मी कानडीचा अभ्यास करुन पास झालो. पण ती तयारी तात्पुरती होती. त्यानंतर २५ वर्षांनीं जेव्हां मी कानडी चरित्रें वाचू लागलो तेव्हा लवकर अक्षरें कळनात. कळली तरी ती वाचून वाक्याचा अर्थ नीट समजेना. कारण त्यांत असे असंख्य शब्द असत कीं त्याचा अर्थ मला माहीत असणें सुतराम् शक्य नव्हते. त्यामुळें पुन:विचार डळमळूं लागला.

१९६७ सालच्या जानेवारी महिन्यांत कै. तात्यासाहेब केतकर धनुर्मास नैवेद्यास नवबागेंत आले होते. त्यांचा दोन दिवस तेथें मुक्काम होता अर्थात् मीही दोन दिवस तेथें होतो. मी जरी जप करीत असे तरी त्रयोदशाक्षरी मंत्र गुरुमुखांतून आपल्याला मिळालेला नाहीं हीं रुखरुख मनांत कायम होती. बरेचवेळां रामहृदय श्रीगुरुमुखांतून आपल्यास प्राप्त झालेंच आहे. तोंच अनुग्रह. वेगळ्या अनुग्रहाची गरज नाहीं असें मी स्वत:चे समाधान करीत असे तरी देखील मनाची तळमळ नाहिंशी होत नव्हती. अखेरीस धीर करुन कै. कैतकर महाराजांस मला त्रयोदशाक्षरी मंत्राचा उपदेश द्यावा अशी मी विनंति केली. त्यांनी ती आनंदानें मान्य केली. समाधिस्थानाच्या गाभाऱ्यांत पेटीवर बसून त्यांनी मला अनुग्रह दिला. मात्र उपदेश देतांना त्यांनीं जे मला बजावले ते पक्कें ध्यानांत आहे. ते म्हणाले ' मी अनुग्रह देतोय असें समजू नको बरे बाळ. प्रत्यक्ष ब्रह्मानंदबुवाच तुला अनुग्रह देत आहेत.' हे ऐकतांच मला गहिवरून आले व धन्यताही वाटली.

१९६७ सालच्या आराधनोत्सवानंतर मी व माझे स्नेही व श्रीब्रह्मानंदसंस्थानचे सरपंच गुंडो चिंतामण सहस्त्रबुद्धे बोलत असतांना सुवर्ण महोत्सवाचेवेळीं श्रीब्रह्मानंदगुरूंचे चरित्र प्रसिद्ध करतां आले तर बरें होईल असा विषय निघाला. त्यावेळीं मीही त्यास "आज बरेच वर्षे हा विचार माझ्या मनांत घोळत आहे पण धाडस होत नाहीं" असें म्हटले. "बरेच हिंडले पाहिजे. माहिती कशी गोळा होणार" असें मी म्हणतांच "त्याची काळजी करु नका. तुम्ही लिहावयास घ्या. मी तुम्हांस मदत करतो" असें म्हणून त्यांनी उभारणी दिल्याने मी चरित्र लिहिण्याचे कबूल केले. बेलधडी येथील पुजारी वेंकणभट्ट रघुनाथभट्ट अर्चक यांनी लिहिलेले श्रीब्रह्मानंदगुरूंचे कानडी चरित्र उपलब्ध झाले, तेव्हा लगेच कानडीतज्ञ हुडकण्यास सुरवात झाली. सांगलीस सरकारी नोकरींत असलेले बिंदुमाधव गोविंद सक्री यांना गाठून विनंति केली. त्यांनीं तत्काळ मान्य केल्यानें त्यांचेकडे जाऊन एक पुस्तक वाचून त्याची टिपणें तयार केली. तें पुस्तक लहान होते तरी १०-१२ दिवस लागले. त्यानंतर त्यांना सवड नसल्यानें दुसऱ्या पुस्तकासाठी सांगली संस्थानांत सेशन कोर्टात कारकून असलेले शिरहट्टीचे राहणारे हणमंत व्यकोपराय ऊर्फ तम्मय्या हुलगेरी यांना विनंति केली. त्यांनींही ती आनंदाने मान्य केली. त्यांच्या मदतीनें दुसऱ्या पुस्तकाची टांचणें केली. एवढ्यावरच सुरवात करणार तोंच तोपिनकट्टीस श्रीब्रह्मचैतन्यांचे भक्त रामराव पाटील हे श्रीगुरूंचे मराठींतून चरित्र प्रसिद्ध करणार असल्याचें समजल्यानें त्यांचेशी पत्रव्यवहार करुन मी व श्री. सहस्त्रबुद्धे यांनी त्यांची बेळगांवात भेट घेतली. त्यांच्याशी चर्चा केली. त्यांचे लिखाण परत करण्याचे अटीवर वाचणेस मागून घेतले. त्याचे परिशीलन करून टांचणें घेऊन त्यांचें

लिखाण परत केले. नंतर श्री. हुलगेरी यांचे मदतीनें अर्चकांनी लिहिलेलें कानडी चरित्र समग्र वाचून टिपणें काढली. चरित्र मोठें असल्यानें त्यास तब्बल दोन महिने लागले. इतकी जमवाजमव झाली तरीपण यास श्रीब्रह्मानंदगुरूंचा आशीर्वाद पाहिजे. त्याशिवाय माझे हातून पूर्तता होणार नाही असें मला वाटल्यानें मी सहस्त्रबुद्धे यांस माझा अभिप्राय कळविला. त्यांना ती गोष्ट पटून त्यांनी व गु.भ. देवस्थानचे सध्याचे पुजारी श्री. वामनराव जोशी उर्फ वामन मास्तर यांनी हातांत श्रीफल घेऊन समाधिस्थानी जाऊन पूजेचे वेळीं श्रीगुरूंची प्रार्थना करुन श्रीफल आशीर्वाद म्हणून माझे ओंजळीत दिले. तें स्वीकारून, श्रीगुरूंस मी नमस्कार केला व तेव्हांपासून माझे हांतून हें कार्य तडीस जाणार असा विश्वास माझ्या मनात उत्पन्न झाला. मग एक सुमुहूर्त पाहून चरित्र लेखनास प्रारंभ केला. १९१६ सालापासूनच श्रीगुरूंसंबंधी जी माहिती मिळेल त्याची टांचणे ठेवण्यास मी सुरवात केली होती. १९३८ ते ४० तीन वर्षे व त्यानंतर १९४९ सालीं एक वर्ष मी शिरहट्टीस नोकरीस असतांना खूपच बारीक सारीक माहितींची टांचणे केली होती. त्या सर्वांचा व वेंकटापूरचे व्यवस्थापक श्रीपादभटजी यांचेकडून खूपशा मिळविलेल्या माहितीचा यावेळीं मला फारच उपयोग झाला व सतत प्रयत्नांची चिकाटी धरून मी ते चार महिन्यांत लिहून पुरे केले.

एवढा खटाटोप करण्याचे कारण म्हणजे आपल्या हांतून श्रीगुरूंची कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत सेवा व्हावी हा होता. हा झाला परमार्थ. पण याच्या बरोबर सद्‌गुरूंची अगदीं जवळून ओळख व्हावी. त्यांच्या संबंधीचें शक्य तोंवर सखोल ज्ञान व्हावे हाही होता. तसेंच 'जें जें आपणासि ठावें तें तें सर्वांसि शिकवावें ! शहाणे करूनि सोडावे सकळजन' या श्रीसमर्थांच्या उक्तीप्रमाणे त्या सखोल ज्ञानाचा प्रसार श्रीगुरूंच्या भक्तांत व ईश्वरप्रेमी लोकांत करावा हाही एक उद्देश होता व आहे. श्रीगुरूंनी समाधी येथें घेतल्यापासून आज गेली पन्नास वर्षे आराधनोत्सव होत आला आहे. श्रीगुरूंना प्रत्यक्ष पाहिलेले, त्यांच्या सहवासाचा लाभ घेतलेले लोक दिवसेंदिवस कालमानाप्रमाणें घटूं लागले आहेत. नव्या पिढींतील लोक जरी उत्सवांत सहभागी होत असले तरी श्रीगुरूंच्याबद्दलच्या माहितीच्या अभावीं त्यांच्यांत आस्थेचा भाव कमीच आढळतो. हा भाग मराठी भाषा प्रामुख्यानें जाणणाऱ्यांचा असल्यानें मराठी भाषेंत श्रीगुरूंचे चरित्र लिहून त्यांचे हातीं दिल्यास ते कुतुहलानें एकदां तरी वाचतील व ते तसें त्यांनी वाचावे हा हें चरित्र लिहिण्याचा उद्देश आहे. ते वाचल्यानंतर जर त्यांत काही अनुकरणीय त्यांस वाटल्यास व त्यांनीं त्याचे अनुकरण केल्यास त्यांचे कल्याण होईलच. त्याचबरोबर मी घेतलेल्या परिश्रमाचें सार्थक होऊन मला धन्यता वाटेल.

आतां गुरु कां असावा ? त्याचेवर विश्वास कां असावा व त्यापासून फायदा काय ? असे प्रश्न मनात येतात. श्री ब्रह्मानंदगुरु निर्गुण स्वरूपांत जरी असले तरी त्यांचा फायदा आजदेखील लोकांस कसा घेतां येईल याचे आतां माझ्या अल्पमतीप्रमाणें थोडेसें दिग्दर्शन करतो.

व्यवहारांत आपण पहातो कीं शाळेंत जाणारा मुलगा व घरीं पुस्तकें वाचून अभ्यास करणारा मुलगा यांत महदंतर असते. घरांत अभ्यास करणाऱ्या मुलाने, मार्गदर्शन करणाऱ्या कितीही वेगवेगळ्या ग्रंथावरून अभ्यास केला तरी अभ्यासाच्या पुस्तकांतील सर्व भागाचे त्यास यथार्थ ज्ञान होत नाहीं. कारण आधारग्रंथांत जे लिहिले

असेल त्यावर त्याला अंधपणानें विसंबून रहावें लागतें. ते तसें कां अशी जर त्याला शंका आली तर त्याचें निराकरण होऊं शकत नाहीं. त्याची जिज्ञासा अतृप्त रहाते. शाळेंत जाणाऱ्या मुलांस गुरुजी ते तसेंच कां याचे स्पष्टीकरण करुन त्याचे मनांत बिंबवितात. त्याच्या सर्व शंकांचे त्यास निरसन करून घेण्यास संधी मिळते. म्हणून गुरु हा पाहिजेच.

साध्या गोष्टींत जर गुरूची अवश्यकता आहे हें आपणांस पटते तर परमार्थसाधनासारख्या, ज्याची आपणांस तोंडओळखही नसते, अशा विषयांत गुरुशिवाय कसें चालणार ? नुसते ग्रंथ वाचून त्याप्रमाणें जर एखादा परमार्थी वाट चालूं लागेल तर त्यांतील अनेकानेक अवघड प्रश्नांचा वा मार्गांच्या आचरणाचा त्यास सम्यग् बोध झालेला नसल्यानें हिताच्या ऐवजीं त्याचे अनहितच होण्याचा संभव जास्त. गुरु प्रत्येक गोष्ट सुलभ करून शिष्याच्या मगदुराप्रमाणें त्यास झेपेल अशा तऱ्हेनें समजावून सांगतात. एवढेंच नव्हे तर आपल्या आचरणाच्या प्रात्यक्षिकानें शिष्यापुढें आदर्श उभा करतात.

केवळ गुरु हा एकच शब्द गूढ विद्येचे सम्यग्ज्ञान, जगांतील मायेची उकल व देहांतील अज्ञानाचा नाश करण्यास समर्थ ठरतो. गुरूच्या पादोदकाच्या सेवनानें पापाचे क्षालन होते, ज्ञानाचे तेज वृद्धिंगत होते, संसारसमुद्रांतून तारते. अज्ञान नाहींसे होण्यासाठी व ज्ञान व वैराग्य प्राप्त होण्यासांठी गुरूंच्या पायाच्या तीर्थाचे सेवन करावे. गुरुपादोदक म्हणजे तीर्थराज प्रयागतीर्थच होय. विद्येचा लाभ होतो पण तो फुकट होत नसतो. त्याला गुरुभक्तीचे पाठबळ अवश्य लागते.

गुरु या शब्दांत 'गु' आणि 'रु' हे जे दोन वर्ण आहेत त्यांतला गुकार म्हणजे अंधार आणि रुकार म्हणजे मायेचे तेज, असें असल्याने गुरु म्हणजे अज्ञानाला ग्रासून टाकणारे ब्रह्मच होय. गुकार म्हणजे मायेचे आवरण व रुकार म्हणजे मायेचा नाश करणारे जणूं दुसरे ब्रह्मच. गुरु संसाररूपी वृक्षावर चढून नरकांत पडूं पाहणाऱ्यांचा उद्धारकर्ता असतो. गुरु हा अज्ञानानें अंध झालेल्यांच्या नेत्रांत ज्ञानाचे अंजन घालून त्यांना डोळस बनवितो. गुकार म्हणजे गुणातीत व रुकार म्हणजे रुपरहित. गुरु हा स्वत: तसा असतो व दुसऱ्यासही बनवितो. गुरूंचे परम पवित्र रूप हे विवेकी चक्षूंना अमृताप्रमाणें भासते. परंतु आंधळा जसा सूर्योदय पाहू शकत नाहीं तसे अभागी लोक ते गुरूंचे रूप पाहण्यास असमर्थ असतात.

गुरु हेही चराचर सृष्टी ज्यानें सर्वत: व्यापली आहे अशा परमात्म्याची भेट घडवून आणतात. गुरूच्या केवल स्मरणानें ज्ञानोद्भव होऊं शकतो. गुरु हा चैतन्यरुप असतो. स्थावर, जंगम सर्व व्यापलेला असतो. गुरु मुक्ति प्रदाना असतो. अनेकानेक जन्मांत संचित झालेल्या सर्व दुष्कृतापराधांपासून सोडविणारा असतो. गुरुमूर्तीचे सदैव ध्यान करावे. गुरुचरणांची नित्य पूजा करावी. गुरूचे वाक्य म्हणजे वेदमंत्रच अशी भावना ठेवावी. इतके केल्यानंतर होणारी गुरुकृपा ही मोक्षाप्रत नेते. प्रत्यक्ष परमेश्वर जरी कोपला तरी गुरु तारण्यास समर्थ असतो. पण जर का गुरु कोपला तर मात्र आपला वाली कोणी नसतो. अत एव श्रीगुरुला अनन्यभावें शरण जावे.

गुरु म्हणजेच अखिल सृष्टि. गुरुभक्तीनें ज्ञानाचा, विज्ञानाचा सर्वाचा लाभ पदरीं पडतो. गुरूची सेवा कशी करावयाची याचे सम्यक् ज्ञान देवादिकांनाही नसते. आणि जे गुरुसेवापराङ्मुख असतील त्यांनी मुक्तीची

आशाच सोडावी. गुरु हा मूर्तिमंत आनंद असून त्याचा लाभ दुसऱ्याला करून देणारा आहे. गुरु हा सत्यबोध करून ज्ञान देतो. गुरु हा भवरोगावर औषध देणारा वैद्य आहे. गुरुपेक्षां या जगांत श्रेष्ठ काहींच नाहीं.

म्हणून गुरूंने सांगितलेल्या मार्गानेंच जावें. मनाची शुद्धि त्या योगें करून घ्यावी. गुरुपुढें कधींही टेंभा मिरवूं नये. जीवनभर गुरूच्या स्मरणाचा लोप होऊं देऊं नये. गुरूची कधींही निंदा करूं नये. गुरुसमोर कधींही असत्य भाषण करूं नये. गुरुच्या कृपाप्रसादानें आत्मारामाचा शोध घ्यावा. त्यामुळे आत्मज्ञान होते. गुरु म्हणजे आपले शरीर, गुरु म्हणजे आपली इंद्रिये, गुरु म्हणजे प्राण, गुरु म्हणजे वित्त, गुरु म्हणजे स्वजन, गुरु म्हणजेच आपले कूल यांत शंका नाहीं. तरी तसा एकात्मभाव निर्माण झाला पाहिजे. जप, व्रतें, वैकल्यें, तपाचरण हें गुरूंच्या संतोषानें सफल होत असतें. गुरूवरील अचलभक्ति हेच श्रेष्ठ तीर्थ आहे कारण गुरूंच्या पायाच्या आंगठ्यांत सर्व तीर्थांचा वास असतो.

एवंगुणविशिष्ठ श्रीगुरूंनी महाराष्ट्रांत कृष्णातटाकीं जो वास केला तो केवळ आपल्यासारख्या मुमुक्षूंचा उद्धार व्हावा म्हणूनच ना ! मग त्याचा आपण जास्तींत जास्त लाभ घ्यावयास नको काय ? दिवसें न दिवस या भावनेचा लोप होत असल्याचे दिसून आल्यानें, त्या भावनेस चालना द्यावी, उजळा द्यावा या सद्हेतूनेंच मी हा सगळा खटाटोप केला आहे. समाधिस्थानाकडे उत्तरोत्तर जास्त स्त्रीपुरुष आकर्षिले जावे. त्यांच्या मनांत गुरुभक्तींचे बीज रुजावें. त्या पोटीं श्रीगुरूंच्या गुणांचे निरीक्षण करून, त्यांची शिकवण समजून घेऊन ती आचरणांत आणण्याचा प्रयत्न करावा व आपले पारमार्थिक हित साधावे हाच या चरित्र लेखनाचा उद्देश आहे. श्रीगुरूंची पूजा अर्चा व्यवस्थित चालावी. आराधनोत्सव व इतर उत्सव थाटानें व्हावेत. मात्र या कामात निरलस बुद्धीनें व निरपेक्षपणानें वाहून घेणारे लोक मिळतील, तरच ती सुव्यवस्थित पार पडतील. त्यादृष्टीनें लोकमानसाची घडण बनावी व त्या कामीं या चरित्र वाचनाचा उपयोग व्हावा या हेतूनेंच हा चरित्र लेखनाचा उपक्रम आहे.

वाचक हो ! तुम्ही म्हणाल कीं हे सर्व ठीक आहे. ज्यांना उध्दार करून घ्यावयाचा असेल ते चरित्र वाचून त्यापासून योग्य तो बोध घेऊन आपले उद्दिष्ट साधतील. ज्याला शक्यता आहे तो पूजेअर्चेसाठी हल्लीं श्री. वामनराव जोशी येऊन राहिले आहेत त्याप्रमाणें आत्मोद्धारासाठीं कदाचित् येऊन 'राहण्यास तयारही होईल. पण त्याच्या चरितार्थाची वाट काय ? श्रीब्रह्मानंद संस्थानाला असलेले उत्पन्न अगदीं तुटपुंजे आहे. त्यांतून दैनंदिन पूजेअर्चेचा व नैवेद्याचा खर्चही पूर्णपणें भागत नाहीं. आराधनोत्सव तर लोकाश्रयावर चालत असतात. इतर उत्सव बहुधा पंचाचे खिशावर भार टाकूनच पार पाडले जातात. तेव्हां या संबंधाने जर एक कायम निधि उभारला गेला तर त्याच्या व्याजांतून हें कार्य करणें सुकर होईल व ती व्यवस्था चिरंतनची होईल. त्याबाबत मला सुचलेली कल्पना मी येथें नमूद करूं इच्छितो. त्याचा सर्वांनी सहानुभूतीनें विचार केल्यास ती कार्यवाहींत येईल व सर्व व्यवस्थित पार पडूं शकेल. ती अशी.

श्रीगुरूंना, आपल्या आराध्य दैवताला, वर्षांतून एकदां तरी यथासांग नैवेद्य व्हावा अशी इच्छा वा तळमळ कोणास बरे होणार नाहीं. प्रत्येक दिवशीं श्रीगुरूंना सुग्रास भोजन (नैवेद्य) मिळावें असेंही सर्वास वाटणारच.

वर्षाचे ३६० दिवस असतात. असे जर ३६० भक्त उभे राहिले, अगर उभे करतां आले, तर प्रत्येकाच्या नांवचा वर्षांतून एक दिवस यथास्थित नैवेद्य करतां येईल. या संबंधी आंखलेली घटना अशी. नैवेद्यानिमित्य येथें राहणाऱ्या व परगांवी राहणाऱ्या माणसांकडे त्या त्या वेळी पैसे मागणें जसे जिकिरीचे तसेंच त्यावेळी मागणी येतांच पैसे देणेंही त्या त्या माणसास त्रासाचे होईल. म्हणून प्रत्येक व्यक्तीनें एकदांच रोखीनें १०० रुपयांचा निधी पंचाकडे द्यावा. व कोणत्या महिन्यांतील कोणत्या तिर्थास आपला नैवेद्य व्हावा असें वाटते ते कळवावे. तशी नोंद ठेवण्यांत येईल. अशा रीतीने ३६००० रुपयांचा निधी जमेल. ही रक्क कायमची व्याजांत गुंतविण्यांत येईल. त्याचे व्याजही किमान शेकडा ६ टक्क्यानें धरले तरी २१६० रु. होईल म्हणजे दरमहा १८० रु. व्याज येईल. दररोज ४ रुपये नैवेद्याकडे खर्च केले तरी श्रीगुरूंस दररोज भात, वरण, पोळी, भाजी, आमटी, तूप, दही, लिंबू असा नैवेद्य होईल. हें सर्व व्यवस्थित करण्यासाठी एक मनुष्यही नेमतां येईल व त्याला मेहेनताना म्हणून राहिलेल्या रुपयांतून काहीं रक्कम देता येईल. व राहणेस जागाही मोफत देतां येईल. जादा व्याज आल्यास व एकदम धान्य घेण्यांत जी रकमेची बचत होईल त्यांतून आल्यागेल्यांचा थोडाबहूत परामर्ष घेतां येईल. ज्या व्यक्तीचा ज्या दिवशीं नैवेद्य होईल त्याच्याकडे त्याच दिवशी पोष्टानें अंगाऱ्याची एक पुडी व प्रसाद म्हणून साखरेची एक पुडी पाठवण्यांत येईल. तरी ही योजना भाविक भक्तांनी मनावर घ्यावी, भराभर या योजनेंत आपली नांवे नोंदवावी व तितक्याच त्वरेनें रक्कम पंचांचे स्वाधीन करून पावती घ्यावी व श्रीब्रह्मानंद संस्थानास चिरस्थायित्व लाभेल अशी व्यवस्था करावी अशी सविनय प्रार्थना आहे. तसेंच प्रत्येक भाविकानें श्रीब्रह्मानंदगुरूंचे प्रसिद्ध होत असलेले चरित्र खरेदी करून ते वाचावें. त्याची पारायणें करावी. त्यांतून श्रीगुरूंचे गुण व त्यांची शिकवण समजावून घ्यावी. त्याप्रमाणें ते गुण व ती शिकवण आचरणांत आणण्याचा तळमळीनें आटोकाट प्रयत्न करावा. श्रीराम प्रभू त्यांचे कल्याण केल्याशिवाय राहणार नाहीं ही खात्री बाळगावी.

माझी कुवत नसतांना हें कार्य मी अंगावर घेतले त्यास कारणीभूत झालेले व वेळोवेळी मला प्रोत्साहन देणारे माझे स्नेही व श्रीब्रह्मानंद संस्थानचे सरपंच श्री. गुंडो चिंतामण सहस्त्रबुद्धे यांचा मी खरोखरच ऋणी आहे. त्यांच्या प्रोत्साहनानेंच हें कार्य माझ्या हांतून पार पडले. त्यांचे आभार मानणें हे माझे आद्य कर्तव्य आहे.

मला कानडी पुस्तकें वाचून दाखवून त्यांतील अर्थाचे मार्गदर्शन करून टांचणे काढण्याचे कामीं आपापले उद्योग संभाळून पण माझ्या भिडेखातर वेळांत वेळ काढून ज्या (१) श्री. बिंदुमाधव गोविंद सक्री व (२) श्री. हणमंत व्यंकोपराय उर्फ तम्मय्या हुलगेरी यांनीं आत्मीयतेने सहाय्य केलें त्यांचेही आभार मानणें माझे कर्तव्य आहे. तेंव्हा त्यांचे आभार मानून त्यांच्या कार्याबद्दल मी धन्यता प्रदर्शित करतो.

तसेंच तोपिनकट्टीहून आमच्या विनंतीस मान देऊन, बेळगांवास येऊन श्री. रामराव पाटील यांनी आपले श्रीगुरूंच्या चरित्रावरील लिखाण आमच्या स्वाधीन करून तें वाचण्याची संधी दिली व बऱ्याच प्रसंगांवर समक्षांत चर्चा करून उपकृत केले, याबद्दलही त्यांचे आभार मानणें वाजवी असल्यानें मी त्यांचे आभार मानतो. व त्यांनी आपण स्वत: ते छापण्यास असमर्थ असलेनें तुम्ही स्वतंत्र रीतीनें लिहून प्रसिद्ध करा असें प्रांजलपणें

सांगितल्याने मी हें काम अंगिकारले हेंही प्रांजलपणे कबूल करतो. श्री. रामरावांनी चरित्र छापणार आहे असें म्हटले असते तर मी या उसाभरींत कदापि पडलो नसतो हें त्रिवार सत्य.

गोंदावलेहून श्रीगुरु तेरदाळास एकदम कसे गेले. कोणाकडे व कोणाचे मार्फत गेले हे कोडे उलगडत नव्हते. इतर कोणत्याही चरित्रांत त्याचा उलगडा नाहीं. पण ते कोडे उकलण्यास तेरदाळचे पण हल्लीं सांगली येथील श्रीगजाननाचे देवळाभोंवतीच्या पंचायतनातील श्रीचिंतामणेश्वराचे पुजारी वे. केशवराव बंक भटजी यांनीं आपुलकीनें मदत केली व माझें समाधान केले त्याबद्दल मी त्यांचे आभार मानतो.

श्रीसद्गुरु ब्रह्मानंद सेवा मंडळ बेलधडी यांनीं प्रकाशित केलेल्या कानडी पुस्तकाचे लेखक यांनी माझ्या मराठी चरित्र लेखनाचे कामीं आपल्या पुस्तकाचा खुशाल आधारग्रंथ म्हणून उपयोग करण्यास मुक्तकंठानें परवानगी दिली. त्यांतील कांही पत्रें वगैरेचा अनुवाद करण्यासही परवानगी दिली. तसेच पुस्तक छापण्याचें कामीं अनाठायीं खर्च होऊं नये म्हणून आम्हांस पाहिजे असलेल्या फोटोचे ब्लॉक आढेवेढे न घेतां आनंदानें दिले, याबद्दल मी त्यांचे मन:पूर्वक आभार मानतो. कर्नाटक व महाराष्ट्र द्वेष उफाळत असतां ती अढी मनांत न धरतां गुरुबंधू या नात्यानें त्यांनीं केलेली मदत कौस्तुकास्पद वाटते. यावरून श्रीगुरूंच्या शिकवणीचा त्यांच्या मनावर प्रभाव खास पडला आहे अशी खात्री वाटते.

हे सर्व जरी असले तरी श्रीगुरूंनी जो प्रसादरूपीं आशिर्वाद दिला त्यामुळेंच हे कार्य तडीस गेले असें मी मानतो. त्यांच्या पाठबळाशिवाय हें होतेंच ना. या यशाचा निम्मा वांटा माझ्या प्रेमळ पत्नीकडे जातो. कारण चरित्र मुदतींत लिहून होण्याबाबत सारखे तिचे माझ्यामागे टुमणे असें. अखेर प्रार्थना एवढीच कीं, वाचकांस या चरित्रांत जर कांही ग्राह्यांश वाटत असेल तर त्याचें श्रेय सर्वस्वी श्रीगुरूंच्या प्रेरणेला आहे व चुका असतील तर त्याचा धनी मी असें वाचकांनीं मानावें व त्यांनी हंसक्षीर न्यायानें चरित्रांत अवगाहन करून आपले कल्याण साधावे हीच प्रार्थना.

मार्गशीर्ष शु. १५ दत्तजयंती
शके १८९०

**- गु. भ. भास्कर अनंत लिमये**

**॥ श्री सद्गुरु ब्रह्मानंदर्पणमस्तु ॥**

# मंगलाचरण

।। श्रीगणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः ।। श्रीसीतारामचंद्राय नमः ।। श्रीब्रह्मचैतन्यमहाराजाय नमः ।। श्रीब्रह्मानंदसद्गुरवे नमः ।।

कोणताही ग्रंथ लिहावयाचा झाल्यास प्रथम मंगलाचरण करावें असा शास्त्राचा नियम आहे कीं नाहीं हें जरी मला माहीत नसले तरी तसा प्रघात मात्र आहे. श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं, श्रीज्ञानेश्वरमाऊलींनीं, श्रीएकनाथमहाराजांनीं, आपाआपल्या ग्रंथांचे आरंभी मंगलाचरण केलें आहे. कविकुलगुरू कालिदासानेंही मंगलाचरण केलें आहे. आपल्या आराध्य देवतेचा उल्लेख त्यांत यावयास जरी पाहिजे असला तरी आरंभी श्रीगजाननाचें स्तवन, नंतर श्रीसरस्वतीचे स्तवन व मग आराध्य दैवत असा तो क्रम येतो.

श्रीगजाननाचे स्तवन एवढ्याचसाठीं कीं, जो बुद्धिदाता असून सर्व सिद्धिफलदाता आहे, जो विघ्नहर्ता आहे, जो चौदा विद्यांचा स्वामी आहे, सर्व विद्येची खाण आहे, त्यानें प्रस्तुत चरित्र लेखनाचे कामीं मला बुद्धि द्यावी, सिद्धि द्यावी, सर्व विघ्नांचे हरण करावें म्हणून माझा त्याला साष्टांग नमस्कार असो. कारण श्रीगजाननाचे स्मरण करुन त्यास नमस्कार करुन आरंभिलेलें कोणतेहि कार्य निविघ्नपणें सिद्धीस जाते असा अनुभव आहे.

श्रीसरस्वतीस वंदन एवढ्याचसाठीं कीं, ती वेदांची जननी आहे. शब्दब्रह्माचे ती मूळ आहे. ती वाणीची देवता आहे. शब्दांचे अंकुर उत्पन्न करणारी तीच आहे व अपरंपार वाणी बोलविणारीही तीच आहे. अशा शारदेनें प्रस्तुत चरित्र लेखनाचें कामीं अर्थपूर्ण असे रसाळ शब्द मला सुचवावें व आरंभिलेल्या कार्यात कसलीही उणीव भासूं देऊं नये म्हणून मी तिला साष्टांग प्रणिपात करतो.

प्रभू रामचंद्रास वंदन एवढ्याचसाठीं कीं, त्याच्यात भक्तीनें ओतप्रोत भरलेल्या एका अधिकारी पुरुषाचे, श्रीरामभक्तीचा पुसट कां होईना अंतरी ओलावा असलेल्या माझ्यासारख्या साध्या भक्तांकडून लिहिल्या जाणाऱ्या चरित्र लेखनाचें कामीं कृपादृष्टीनें पाहून सर्वतोपरी मला सहाय्य करावें म्हणून मी श्रीरामप्रभूसही साष्टांग नमस्कार करतो.

श्रीब्रह्मचैतन्य महाराजांस वंदन एवढ्यासाठींच कीं, जे सद्गुरुनाथ जन्म आणि मृत्यू दोहोंचाही नाश करण्यास समर्थ होते, जे दीनांचे परम कनवाळू व कोमल अंत:करणाचे होते, जे अमर्याद होते, जे प्रत्यक्ष मारुतीचा अवतार होते, ज्यांना श्रीब्रह्मानंद प्रत्यक्ष रामरूप समजत होते, व त्यांचे उद्धारकर्ते होते, त्यांनीं चरित्र लेखनाचें कामीं लेखकास आशीर्वाद देऊन त्याचेकडून चरित्र लेखनाचे काम पूर्ण करवून घ्यावें म्हणून मी त्यांस साष्टांग नमस्कार करतो.

सद्गुरूंची थोरवी अवर्णनीय आहे. श्रुतीनें देखील त्या बाबतींत हात टेकले आहेत. एखादा ओढा अगर नदी गंगेला मिळेपर्यंत, तो वा तीं,ओढा वा नदीच असतें. पण गंगेस मिळतांच ती गंगारूप होते. तद्वत कोणीही मनुष्य सद्गुरूंस शरण जाऊन त्यांचा दास बनेपर्यंत साधा मनुष्य असतो व नंतर तो सद्गुरु रूपच बनतो. परिसाचा लोहास स्पर्श होतांच त्याचे सोने बनते पण त्या सोन्याचे अंगीं दुसऱ्या सोन्यास स्पर्श करून

त्याचे पुन्हा सोने बनविण्याची पात्रता येत नाहीं. म्हणजे परीस आपला गुण त्यास देत नाहीं. सद्गुरूंनीं शिष्याला हातीं धरले कीं त्याला ते गुरू बनवितात व अनेकांना उपदेश करण्याची त्याच्या अंगी पात्रता येते. म्हणजेच ते आपला गुण त्याला देतात. सद्गुरूंच्या सहवासानें परमदुर्लभ असें जे परब्रह्म त्याचा लाभ सुलभपणें होऊं शकतो. जे परब्रह्म दिव्याच्या सहाय्यानें दिसत नाहीं, चंद्रसूर्यांना देखील दाखवितां येत नाहीं, अग्नीलाही दाखवितां येत नाहीं, इतकेंच काय पण मान प्रकट करणाऱ्या वेदालाही दाखवितां आले नाहीं, असें ते परब्रह्म सद्गुरूंच्या सहवासानें स्वानुभवानेंच प्राप्त होते. माया सर्वगामी खरी पण तिच्यानें सुद्धां परब्रह्माची ओळख सांगवत नाहीं. कारण परब्रह्म मायातीत आहे. सद्गुरु मात्र परब्रह्माचा मार्ग दाखवून देतात. ते आनंदाचे मंदिर व सुखाची मूर्ति होत. मोक्षसंपत्तीचे अलंकार धारण करणारे सद्गुरु श्रीमंत असतात त्यांच्या मुखानें आत्मज्ञानाचा विचार एकदां कर्णसंपुटांत शिरला कीं तेथून पुन्हां कधीही जात नाहीं. असा अधिकार असलेल्या ब्रह्मानंदगुरूंचे स्तवन एवढ्यासाठींच कीं, ते लेखकाचे गुरु होत. त्यांस वंदन करणें हा शिष्याचा धर्मच आहे. त्यांतून आपल्या गुरूंचे चरित्र लिहिलें जात असतां श्रीगुरूंनी शिष्यास स्फूर्ति देऊन त्यास मार्गदर्शन करावें व त्याच्या कृतीबद्दल त्याचे कौतुक करावें म्हणून मी त्यांस साष्टांग दंडवत घालतो.

चरित्र लेखनाचे हातीं घेतलेलें काम नावेंतून समुद्र पार होऊं पाहणाऱ्या माणसाप्रमाणें अवघड आहे. याची, तसेंच उंच माणसाच्या हाती येणारीं फळें मिळविण्यांत बुटक्या माणसानें यशाची हांव धरावी, तद्वत लेखनाचें कामीं यश मिळवूं पाहणारा मी उपहासास पात्र होईन, याची मला जाणीव आहे. वज्रानें भोंक पडलेल्या मण्यांत जसा दोऱ्याचा सहज प्रवेश होतो त्याप्रमाणें पूर्वीं कांहीं चरित्रें कानडींतून लिहिली गेलीं असल्यानें त्या आधारें हें मराठी भाषेंत मः लिहिण्याचें धाडस करीत आहे.

**॥ श्रीसद्गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण पहिले
## पूर्वपीठिका व जन्म

कर्नाटक प्रांतांत धारवाड जिल्ह्याच्या उत्तरेस विजापूर नांवाचा जिल्हा आहे. त्या जिल्ह्यांत बादामी नावांचा एक तालुका आहे. त्या तालुक्यांत जालिहाळ नांवाचे एक खेडें आहे. सुमारे १०० वर्षापूर्वी या खेड्यांत ब्राह्मण वस्ती पुष्कळ होती. शके १८०० च्या अखेरीस 'गाडगोळी' नांवानें ओळखला जाणारा एक ऋग्वेदी ब्राह्मणांचा वंश नांदत होता. हें घराणें आश्वलायन शाखाध्यायी, भारद्वाज गोत्री, स्मार्त ब्राह्मणांचे होते. या घराण्यांत अनेक विद्वान ब्राह्मण होऊन गेले. त्यांचेपैकी रामभट्ट एक अतिशय आचार संपन्न असे होते. ते स्वभावानें सात्विक असून वेदशास्त्र संपन्न असे होते. सत्य, दया, दान, परोपकार या गुणांनी ते मंडित असून, आपल्या धर्माचरणानें व तपोबलाच्या जोरानें त्या गांवच्या सर्व ब्रह्मवृंदांत अतिशय पूज्य व आदर्शभूत असे होते. ते ज्योतिष शास्त्रांत पारंगत होते, तसेंच धर्मशास्त्रांत निपुण होते. शिवाय ते स्वभावानें अत्यंत शांत व सात्विक आणि निरभिमानी वृत्तीचे होते. यांचे उपास्य दैवत 'रेणुका' होय.

रामभट्टांची वृत्ति कसल्याही बिकट प्रसंगांत देखील धर्म व सत्य यांची कांस न सोडतां मनोधैर्य टिकविण्याची होती. स्वत: भाविक असल्यानें त्यांची आस्तिक्य बुद्धि अवर्णनीय होती. सर्व गोष्टी परमेश्वराधीन आहेत. मानव त्याच्या हातांतील एक बाहुलें आहे या दृढविश्वासानें सर्व भार त्या भगवंतावर टाकून भक्तियुक्त अंत:करणानें ते भगवंताचें भजन करीत. घरीं आलेल्या अतिथि अभ्यागतांचे आनंदानें स्वागत करून, त्यांचा यथायोग्य परामर्श घेऊन ते गृहस्थाश्रमाचें सुयोग्यरीतीनें परिपालन करीत असत. अशा रामभट्टांच्या पोटीं तीन पुत्र जन्मले. थोरलें लक्ष्मणभट्ट, मधले बाळंभट्ट व धाकटे शिनंभट्ट. यांपैकीं मधले बाळंभट्ट हेच श्रीब्रह्मानंद गुरूंचे जन्मदाते. हे सगळेच वैदिक विद्येंत ख्यातनाम होते. ते आपल्या वडिलांप्रमाणें विद्वान व सदाचरणी होते, स्वधर्माचरणांत तत्पर होते, पितृपरायण होते. ते परमशांत स्वभावाचे होते. त्यांना ज्योतिषशास्त्राची आवड होती. बाळंभट्ट हे निस्सीम भगवद्भक्त असल्यानें ते दिवसाचा बराच काळ भगवत्पूजनांत, नामसंकीर्तनांत व पुराण सांगण्यांत घालवीत असत.

बाळंभट्टांना जिऊबाई नांवाची सुशील पत्नी लाभली होती. ती धर्मपत्नी अत्यंत पतिभक्तिपरायण होती. ती साध्वी घरची सगळी कामें पतीच्या आज्ञेनुसार करीत असे व सदासर्वदा पति सेवेंत आसक्त राहून जीवन जगत असे. गृहस्थाश्रमधर्मानुसार सतत अन्नसंतर्पण यांचें घरी होत असे. अन्नदानाचे बाबतींत त्यांची ख्याती असल्यानें त्यांचे घरीं सज्जनांचे तसेंच साधुसंतांचेही आगमन वरचेवर होत असे. आलेल्यांचें आदरातिथ्य प्रेमळपणानें यांचे घरीं होत असल्यानें अनेकांचे मनापासून यांस आशिर्वाद लाभत असत. तशा प्रसंगी त्यांचे मुखांतून तुमच्यापोटीं महान् भगवद्भक्त मुलगा जन्मास येईल. असे उद्गार बाहेर पडत असत. या दंपतीचा कल संसाराच्या फारशा जंजाळ्यांत न पडतां येणाऱ्या मिळकतींतून प्रपंच भागवून, झेपेल तितका दानधर्म करण्याकडे होता. परोपकारांत देह झिजविणें हेंच त्यांचे ध्येय होतें. अशा त्यांच्या वागणुकीमुळें त्यांना केव्हांही कोणापासूनही त्रास होत नसे. यांचे वडील रामभट्ट हे निष्णात ज्योतिषी असल्यानें त्यांनीही शास्त्राधारें

''बाळंभट्टांच्या पोटीं महान् भगवद्‌भक्त जन्माला येईल व आपल्या कुलाचा उद्धार करील'' असें भविष्य वर्तविलें होतें. यामुळे बाळंभट्ट व जिऊबाई यांना आनंदाचे भरते येत असे व ते दोघेही 'अशा पुत्रजन्माचा शुभ दिन देव लवकर दाखवूं दे' अशी मनांतल्या मनांत परमेश्वराची अहोरात्र प्रार्थना अनन्यभावानें करीत असत.

समुद्रांत असंख्य शिंपले असतात. पण त्यांतील जे शिंपले आंतील बाजूनें अत्यंत तेजस्वी असतात त्यांतच श्रेष्ठ प्रतीचे मोती सांपडतात. याच न्यायानें अत्यंत पवित्र व पुण्यतम कुलांतच थोर महात्म्यांचा जन्म होतों हे निर्विवाद होय. या जगांत असंख्य मानव जन्मास येतात व मरतात. पण अशा मानवांस या सृष्टीमध्यें कोणत्याही प्रतीची प्रतिष्ठा सहसा लाभत नाहीं. परमेश्वराने मानवाची जी निर्मिती केली आहे ती केवळ त्यानें आपली महती ओळखावी या एकमेव उद्देशानेंच केली आहे व त्याचसाठीं मानवास बुद्धी दिली आहे. अत एव जो मानव आपण कोण, कोठून आलो, आपला जन्म कशासाठीं आहे, व जन्म मरणाचा शेवट कसा साधायचा याचा विचार करतो, त्या दृष्टींने प्रयत्न करतो, व जन्म मरणाची भीति न बाळगता त्या फेऱ्यांतून मुक्त होण्याच्या उपायाने साधन करून, मुक्त होतो त्यांचाच गौरव होतो. कारण 'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति' असें शास्त्रवचन आहे. बाळंभट्ट व जिऊबाई अशा प्रकारच्या सुपुत्राच्या जन्माची मार्गप्रतीक्षा अत्यंत आतुरतेनें करीत होते. त्यांना एकंदर चार पुत्र व एक कन्या अशीं पांच अपत्यें झाली. प्रथम पुत्राचें नांव गुरुभट्ट. हे आपल्या पितामहाप्रमाणें वेदविद्यानिपुण, सदाचार संपन्न व विद्वान् लोकांना प्रिय असे जन्मले. दुसऱ्या पुत्राचें नांव वेंकनभट्ट. हे देखील विद्याव्यासंगी होते. तिसरे म्हणजेच आपले श्रीब्रह्मानंदगुरु होत. दोन पुत्र रत्नें होऊनही खरोखर या दंपत्तीस समाधान लाभले नव्हते. त्यांच्या मनांत कायमची हुरहूर लागून राहिली होती. भक्तांच्या मनकामना पूर्ण करण्याचे एका जगन्नियंत्या परमेश्वराखेरीज दुसऱ्या कोणाचेही हातीं नाहीं. त्याच्या मनांत आले कीं, तो आपली सर्व कामें बाजूस सारून धांवून येतो. चौथे पुत्ररत्न नारायणभट्ट आणि पांचवे (शेवटले) अपत्य कन्यारत्न गंगाबाई होत.

भक्तप्रिय असा भगवंत नेहमी आपल्या भक्तांच्या इच्छा पुऱ्या करणेकरितां सर्वदा बद्धपरिकर असतो. म्हणूनच सज्जन त्याला भक्ताभिमानी, भक्तकाम-कल्पद्रुम, भक्ताभीष्ट वरप्रद असें संबोधतात व त्याची स्तुती करतात. भाविक अशा या दंपतीची मनोभिलाषा पूर्ण करण्यास जगदीश्वरानें फारसा विलंब केला नाहीं. तिसऱ्या खेपेस जिऊबाई गरोदर राहिली त्यावेळीं तिच्या गर्भात दिव्य तेजाचा उदय झाला. जिऊबाईची अंगकांति दिव्य तेजानें तळपूं लागली. भगवच्चिंतनाशिवाय इतर विषय नकोसे होऊं लागले. वरचेवर तिची समाधि लागू लागलीं. 'प्रसाद चिन्हानि पुर: फलानि.' पुढें अवतरणाऱ्या दिव्य महात्म्याची ही ध्वजपताकाच जणूं होती. साध्वी जिऊबाईच्या गरोदरपणाबाबत एके दिवशीं एक विशेष दैवी चमत्काराची घटना घडली ती अशी.

बाळंभट्टांचा दररोज अरुणोदयापूर्वी उठून, प्रातर्विधि आटोपून स्नान करण्याकरतां गांवाबाहेर जलाशयावर जाण्याचा परिपाठ होता. नित्यनेमाप्रमाणें एके दिवशीं लवकर जलाशयावर जाऊन त्यांनीं आपले सर्व कपडे धुतले व स्नान करण्याच्या तयारीनें त्यांनीं गंगामातेचे आवाहन करून पुष्कर प्रयागादि पवित्र तीर्थांचे स्मरण करीत हरगंगे भागीरथी असा उच्चार करुन पाण्यांत बुडी मारली. वर येतात तो त्यांचेपुढें एक भोंपळा वहात

आला. माहजीकच त्यांनी तो उचलला तों त्याबरोबरचे रेशमी वस्त्रांत गुंडाळलेले गांठोडे सोडून पाहतां त्यांत त्यांना श्रीमदनंताचा पवित्र व मंगलप्रद दोरा दिसल्यानें ते आश्चर्यचकित झाले. भावनेनें प्रेरित होऊन त्यांनी त्याला साष्टांग नमस्कार घातला व ते शुभचिन्ह घेऊन भगवंताच्या अगाध लीलेचे कौतुक करीत त्यांनीं घरची वाट धरली. घरीं येऊन घडलेली सर्व हकीकत त्यांनी आपले वडील रामभट्ट यांस सांगितली व सांपडलेला श्रीमदनंताचा दोराही त्यांस दाखविला, तो पाहून रामभट्टदेखील संतोष पावले आणि 'बाळा, या शुभचिन्हामार्फत सत्पुरुषांची आशीर्वचनें व माझीं भविष्यवाणी थोड्याच दिवसांत खरी होणार असल्याची ही ग्वाही दिली गेली आहे. तरी या अनंत स्वरूप दोऱ्याची रोज पूजा करीत जा' असें त्यास सांगितले. व पुढें येणाऱ्या भाद्रपद शुद्ध १४ अनंत चतुर्दशीच्या दिवशीं त्या व्रताचे सपत्नीक ग्रहण करून दरसाल भक्तियुक्त अंत:करणानें विधिपूर्वक व्रत चालू ठेव म्हणजे देव तुझे कल्याण करील असेंही अत्यंत प्रेमानें सांगितले. वडिलांच्या बोलण्यावर विश्वास बाळगणारे बाळंभट्ट त्या दिवसापासून दररोज त्या दोऱ्याची पूजा करूं लागले. त्या वर्षीच्या अनंत चतुर्दशीचे दिवशीं उभयता दंपतीनीं भक्तिभावानें अनंतव्रताचे ग्रहण केले व यथाविधि व्रताचे पालन केले. पुढें एक वर्षाचे आंत जगत्कल्याणकारी असा गर्भ जिऊबाईनीं धारण केला.

या खेपेस मात्र जिऊबाईस जे डोहाळे जाणवूं लागले ते नेहमींसारखे साधे नव्हते. ते एकप्रकारे विलक्षण होते. तिचे मुखकमल पहिलटकरणीपेक्षांही तेज:पुंज दिसूं लागले. मुखकमलावर गांभीर्याची छटा विलसूं लागली. एकांतवास प्रिय वाटूं लागला व त्याची परिणति भगवंताच्या नामस्मरणांत व भजनपूजनांत वेळ घालविण्यांत होऊं लागली. भगवंताच्या लीला कथनांत व कीर्तनश्रवणांत अखंडपणे तल्लीन होण्याची अभिलाषा दिवसेंदिवस वाढूं लागली. प्रतिदिनीं वाढणाऱ्या गर्भामुळें देहास एक तऱ्हेचे जरी जडत्व प्राप्त होऊं लागले होते तरी घरीं आलेल्या अतिथि अभ्यागतांच्या आदरातिथ्यांत हयगय न करतां ती साध्वी जातीनें दक्ष रहात असे. जिऊबाईचे ते विचित्र डोहाळे व मुखावर तळपणारे ते विलक्षण तेज पाहून हिच्या पोटीं भगवद्भक्ताचा अवतार होणार अशी कुटुंबांतील सर्वांची खात्री झाली. अशा रीतीनें नऊ महिने पूर्ण होतांच यथा योग्यकालीं श्रीशालीवाहन शके १७८० कालयुक्ताक्षी नाम संवत्सरी माघमासीं कृष्णपक्षाच्या दशमी तिथीस गुरुवारीं भरणी नक्षत्रावर २७ फेब्रुवारी इ.स. १८५९ या शुभ दिवशीं मंगलमुहूर्तावर जिऊबाईनीं अद्वितीय अशा आपल्या श्रीब्रह्मानंद गुरुंना जन्म दिला.

सच्छील व सदाचारी लोकांच्या पोटींच सच्छील नररत्नें जन्मास येतात हा सृष्टिनियमच आहे. कलियुगांत या नियमालाही अपवाद मिळणार नाहींत असें नाहीं. त्याची कारणेही अनेक असूं शकतील. पण त्याचा उहापोह करण्याचे हे स्थळ नव्हे. येथें एवढेंच बजावावेसे वाटते कीं, बाळंभट्ट गाडगोळी यांच्या पिढीजात सत्वशील घराण्यांत हा सृष्टिनियम तंतोतंत पाळला गेल्याचे जगाच्या निदर्शनास पुढें लवकरच आले.

॥ श्रीसद्गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण दुसरे
## बालपण व प्राथमिक शिक्षण

शुभमुहूर्तावर जन्मास आलेल्या मुलाच्या जन्माचा वृत्तांत ऐकतांच रामभट्ट भावाविष्ट झाले व जगदोध्दार करण्यासाठी प्रत्यक्ष भगवंतच आपल्या घरीं जन्मास आला आहे असें त्यांस वाटले व न कळत त्यांचे मुखांतून 'जानकी जीवन स्मरण जयजय राम' अशी गर्जना बाहेर पडली. या बालकाच्या जन्मानें त्याच्या मातापितरांना व इतरांना झालेल्या आनंदास तर सीमास नव्हती. एवढेंच नव्हे तर ग्रामीण जनांनासुध्दां परम हर्ष झाला. बाळंभट्टांचे घराणें परम धार्मिक असल्याने त्यांनीं परंपरेला अनुसरून जातकर्म संस्कार करण्यासाठीं जलाशयावर जाऊन सचैल स्नान केलें. घरीं येऊन पवित्र वस्त्रें परिघान केली व त्यांनी वडील मंडळींच्या सांगण्याप्रमाणें विधिपूर्वक जातकर्म संस्कार केला. विव्दान ब्राह्मणांना दक्षिणा दिली. त्यांचे शुभाशीर्वाद मिळवून पुत्रमुखाचें अवलोकन केलें. रामभट्टांनीं जेव्हां आपल्या नातवाचें गोजिरें मुखकमल व त्याची दिव्य कांती अवलोकन केली तेव्हां त्यांना परमानंद झाला व त्या भरांत ते देवाची नाना प्रकारे स्तुती करूं लागले. त्यास शतश: वंदन करूं लागले. कारण त्यांच्यामतें जन्मास आलेलें बालक सामान्य नव्हतें तर भगवंताची अगाध लीला व त्याचा महिमा जगाला दाखविण्याकरितां व आपल्या कुलाचा तसाच जगाचा उध्दार करण्याकरतां म्हणून अवतरलेला तो भगवंताचा अंशच होता.

परमेश्वरी माया हें गूढच आहे. सत्यसृष्टीचें कितीही ज्ञान झालें तरी मानव मायेच्या मोहजालांत गुरफटतोच. 'मम माया दुरत्यया' हे श्रीकृष्ण परमात्म्यानें स्पष्ट सांगितलें आहे. वास्तविक या बालकाच्या चित्स्वरूपाची खूण मातापित्यांना पटली असून देखील प्रपंचाच्या मायेंत गुरफटल्यानें त्यांना पुत्रमोह अनावर झाला. बाळंभट्ट काय, जिऊबाई काय, रामभट्ट काय ही बोलून चालून प्रापंचिक माणसें. ते या व्यामोहांत गुरफटणार नाहींत असें तरी कसें संभवते ? श्रीकृष्ण परमात्म्याच्या अद्‌भुत लीला प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून देखील, त्याच्या बालपणींच्या हूडपणास कंटाळून, पुत्र व्यामोहानें वेष्टित होऊन यशोदा मातेनें नव्हते का त्यास मारले व दोरीनें उखळीस बांधून ठेवले ? त्याचप्रमाणें श्रीब्रह्मानंद गुरुंचे आईवडील, हे पण मुलाचे अंत:स्वरूप माहीत असून देखील, भगवंताच्या मायेनें मोहित होऊन मुलाच्या बाललीला पाहण्यांत व त्याचे बोबडे बोल ऐकण्यांत कालक्रमणा करीत होते. भगवंताची माया कुणाला, केव्हां व कशी भुरळ पाडील याचा नेम नसतो. त्या भगवंतालाच शरण गेल्यास मायेंतून पार पडण्याची एकवेळ शक्यता असते.

समुद्रात भरती येते ती चंद्राच्या ओढीनें येत असते त्याच न्यायानें या मुलाच्या आईबापांच्या प्रेमासहि त्याच्या पूर्ण चंद्रासारख्या मुखावलोकनानें भरती येत होती. अशा तऱ्हेनें वाढत जाऊन त्यास अकरा दिवस पूर्ण झाले. बारावे दिवशीं वैदिक विद्येंत पारंगत असलेल्या बाळंभट्टांनी अभ्यंगस्नान केलें. देवदेवतार्चनादि नित्य क्रम सारून वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार करून स्वस्तिवाचनपूर्वक विधियुक्त नामकरण विधी केला. त्याचाच भाग म्हणून ब्राह्मण सुवासिनींना भोजन घातलें. दक्षिणा देऊन त्यांना तृप्त केलें. नंतर आप्तस्वकीय सर्वांनीं भोजन केलें. सायंकाळीं सौभाग्यवती अशा वृध्द स्त्रियांनीं त्या बाळाला व माता जिऊबाईला शुभवस्त्रें व फलें

अर्पण करून जिऊबाईची ओटी भरली. मंगलारती केली. तोरण व फुलांच्या माळांनीं सजविलेल्या पाळण्यांत त्या मुलांस घातलें. अनंताच्या कृपेनेंच हा मुलगा लाभला असल्यानें यांचे नांव अनंत ठेवावें असें रामभट्टांनी सुचविल्यानें व मुलाच्या मातापितरांसहि तें आवडल्यानें त्याचें नांव अनंत असें ठेवण्यांत आलें. जमलेल्या स्त्रियांनी अश्वत्थाम्या प्रमाणें चिरंजीव हो, चक्रवर्ती बलीप्रमाणे बलशाली हो, व्यासमहर्षीप्रमाणें महान् ज्ञानी हो, मारूतीरायाप्रमाणें निष्ठावंत हो, बिभीषणाप्रमाणें भगवद्भक्त हो, मुनितनय मार्कंडेयाप्रमाणें अखंड आयुष्यमान हो, हे व अशा तऱ्हेचे आपापल्यापरीनें प्रत्येकीनें त्या बालकास आशीर्वाद दिले. प्रत्येकीनें त्या मुलास उचलून घेऊन त्याचे मुके घतले व त्या सर्वजणीं आपआपल्या घरीं परतल्या. हा बालक उत्तरोत्तर शुक्ल पक्षांतील चंद्राच्या कोरेप्रमाणे जणूकाही आपल्याला आदि व अंत नाही हे जगाला वृध्दिंगत करीत वाढू लागला.

'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात' अशी एक म्हण रूढ झाली आहे. त्याचा विचार केल्यास पाळण्यांतील बालकाच्या लीलांवरून त्याची महती, त्याचे श्रेष्ठत्व, त्याचा दर्जा आपण अजमावू शकतो असाच त्यांतून निष्कर्ष निघतो. मग या अनंताने अशा कांहीं चमत्कृतिजन्य लीला पाळण्यांतील वयांत दाखविल्या असल्या व त्यांनी घरची मंडळी भारावून जाऊन त्यास भगवंताचा अवतार मानू लागली असली तर त्यांत त्यांची व कोणाचीही काय बरें चूक. आणि सत्पुरूषांचे बाल्य तर त्यांच्या भावी महतीचे निःसंशय द्योतक असते. पूर्वीं श्रीगुरूदत्तात्रेयांनीं श्रीनृसिंहसरस्वतीरूपानें जेव्हां अवतार धारण केला होता तेव्हां जन्मताक्षणींच त्यांनी ॐकार शब्दांचा उच्चार केला. श्रीसद्गुरू ब्रह्मचैतन्यमहाराज, श्रीब्रह्मानंदाचे गुरूवर्य, हे लहान म्हणजे सुमारें तीन महिन्याचे असतांना त्यांची माता त्यांस पाळण्यांस निजवून, दरवाजा पुढें करून माणगंगेवर कपडे धुण्यास गेली होती. परत येऊन दार उघडतांच श्रीराम, श्रीराम असा स्पष्ट नामघोष तीस ऐकू येऊं लागला. त्यांनीं घरांत कोणी शिरलें नाहीं ना म्हणून चंहूकडे शोध केला. कोणीही दिसले नाही. नामघोष पाळण्यांतून निघत असल्याची खात्री झाल्याने माऊलीने पाळण्याकडे धांव घेतली. आश्चर्याची गोष्ट अशी कीं बालक पूर्वीं निजविल्या स्थितींतच निद्रिस्त असल्यांचे आढळले. पण मातेची चाहूल लागतांच बाळानें डोळे उघडून तिच्याकडे पाहिले. तें पाहून तिला किती धन्यता वाटली असेल. लगेच उत्कट भावनेंने त्याला बाहेर काढून ममतेनें छातीशीं घट्ट धरून त्यांस स्तनपान दिलें. अशाच प्रकारच्या अनंताच्या अनंत, अगाध व अगम्य बाललीला होत्या.

वयाला एक वर्ष पूर्ण होण्याचे आंतच अनंत घरभर सगळीकडे वावरू लागला. तसेंच अल्पवयांतच रूढ शब्द सहज सुलभपणें उच्चारू लागला. भगवद्भक्तींचीं लक्षणें याच्या अंगी ओतप्रोत भरली होती. बाळंभटजी देवपूजेस बसले व त्यांनीं केलेला घंटा नाद याचे कर्णरंध्रावर पडलारे पडला कीं तत्क्षणीं खेळणीं जेथील तेथें टाकून हा गडबडीनें तेथे येऊन थोड्या अंतरावर हात जोडून बसत असे व तोंडानें श्रीराम श्रीराम असा भगवन्नामाचा गजर नित्य करीत असे. सायंकाळ होतांच वडीलधाऱ्या मंडळीस बिनचूक नमस्कार करीत असे. थोडा मोठा होऊन हिंडू फिरूं लागतांच वडिलांबरोबर नित्य नेमानें ईश्वर व मारूतीच्या देवळांत दर्शनास जात असे. तेथें जातांच देवास साष्टांगनमस्कार घालून थोडा वेळ तेथें बसत असे व वडिलांबरोबर चालत घरीं परत येत असे. सायंकाळी मंगलारतीचे वेळीं तो स्वत: घंटा वाजवीत उभा रहात असे व तोंडानें अखंड श्रीराम, श्रीराम म्हणत असे. आणखी थोडा मोठा झाल्यावर मंगलारती सर्वांना देण्याचें काम तो स्वत: करीत असे.

अशा प्रकारची बाल्यावस्थेंत त्याच्या ठायीं दृग्गोचर होणारी परमेश्वर भक्ति पाहून, घरच्या व बाहेरच्या मंडळींचे मुखांतून 'हा पुढें महान् भगवद्भक्त होणार' असे उद्गार निघाल्यास त्यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. सत्पुरूषांच्या ठिकाणीं आढळणारीं सर्व लक्षणें अनंताचे ठायीं संपूर्णपणे दिसून येत होती. अनंतानंत शक्तिशाली हा बालक आपली अंत:शक्ति एकदम प्रगट न करतां सामान्य शिशूप्रमाणें रहात असे.

खोड्या करणें हा लहान मुलांचा स्वभाव धर्मच आहे. त्यासही अनंत पारखा नव्हता. घरांतील त्याच्या खोड्यांना कंटाळून जिऊबाई शेजारपाजारच्या मुलांना पाचारण करून त्यांच्याशीं खेळावयास अनंतास उद्युक्त करीत असे. होतां होतां अनंत पांच वर्षाचा होतांच त्याच्या मातापित्यांनी त्यास शाळेंत घालण्याचा विचार केला. बाळंभट्ट यांनीं सुमुहूर्त पाहून त्यास शाळेंत पाठविले. तेथेंही अनंत हा विद्याभ्यासाकडें लक्ष न देतां गुरूजींचा डोळा चुकवून गांवाबाहेर उघड्या मैदानावर खेळण्यास निघून जात असे. जातांना एकटा न जातां आपल्या सवंगड्यांनाही बरोबर नेत असे. तेथे गोट्या, चेंडू, विटीदांडू, हुतूतू वगैरे खेळ खेळस असे. खेळून कंटाळा आल्यास 'रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम' हे भजन मुलांना सांगून तालबध्द भजन करीत वेळ घालवीत असे. हा सर्व कार्यक्रम व्यवस्थित पार पाडून नेमकी शाळा सुटण्याच्यावेळी शाळेंत जाऊन पाटी दप्तर घेऊन घरीं जात असे. नित्यनेमानें अनंत हा शाळा चुकवितो म्हणून त्याचे गुरूजी त्यास रागें भरत असत व केव्हांतरी प्रसादही देत असत. तरी पण हा आपला नित्यक्रम अवैधपणे चालूच ठेवीत असे. अखेरीस कंटाळून एकदां गुरूजी त्याचे घरीं बाळंभट्टाकडे गेले. 'तुमचा अनंत व्रात्य आहे. शाळेंत तो मुळींच अभ्यास करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर शाळेंतील आपल्या सवंगड्यास बरोबर घेऊन शाळा चुकवितो व खेळून वेळ घालवितो. यामुळें शाळेंतील इतर मुलें बिघडत आहेत. शाळेच्या परीक्षेचे दिवस जवळ आले आहेत. याला ताळ्यावर आणण्याची मी पुष्कळ खटपट केली तरी तो आपला हेका सोडीत नाहीं. तरी उद्यांपासून त्याला शाळेंत पाठवूं नका. एक तर त्याच्या नादानें शाळेंतील सर्व मुलें उनाड बनतात व त्याचा परीक्षेचे निकालावर परिणाम होणार आहे.'' या व अशा तऱ्हेच्या अनेक कागाळ्या सांगून, ''तुम्ही त्यास घरींच रागावून, समजावून सांगा व त्यास घरींच शिकवा'' असा स्पष्ट सल्ला दिला. तें ऐकून बाळंभट्ट यांनीं अनंतास जवळ बसवून घेंतले व त्यास रागें भरून न चुकवितां रोज शाळेंत जा. गुरूजी सांगतील त्या प्रमाणें वागत जा. चांगला अभ्यास कर असें कळकळीनें पढवून पुन्हां शाळेंत पाठविले. बिचारे गुरूजी व बिचारे बाळंभट्ट ! त्यांना काय माहित कीं, अनंताची शाळा ती नव्हती व तेथें त्यास शिकण्यासारखेही कांहीं नव्हते. बाल अनंत पुन्हां शाळेंत जाऊं लागला खरा पण बाल स्वभावानुसार पूर्वीच्या त्याच्या वागणुकींत काडीमात्र फरक झाला नाहीं. अखेरीस हा मुलगा शाळेंत अभ्यास करणार नाहीं हें जाणून बाळंभट्टानीं परंपरागत चालत आलेल्या वैदिक विद्येचाच अभ्यास त्याच्याकडून करवावा असा विचार केला. या विवंचनेंत कांहीं काळ लोटला न लोटला तोंच अनंतानें आठव्या वर्षात पदार्पण केलें. तेव्हां त्याच्या मातापित्यांनी त्याच्या उपनयनाची मोठ्या थाटानें तयारी चालविली.

॥ श्रीसद्गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण तिसरे

## उपनयन व शास्त्राभ्यास विचार

सगळ्या संस्कारांत ब्राह्मणांना उपनयन संस्कार हाच मुख्य आहे. तो संस्कार झाल्याखेरीज त्यांना खऱ्या अर्थानें स्वत:स द्विज म्हणवून घेतां येत नाहीं. द्विज होणें म्हणजे दोनदां जन्म घेणें. योनिसंभव जन्म हा त्यांचा प्रथम जन्म होय व उपनयन हा त्यांचा दुसरा जन्म होय. या नंतरच त्यांना वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त होतो. शास्त्रांनी उपनयनाचा कालहि ठरवून दिलेला आहे. 'अष्टमें वर्षे ब्राह्मणमुपनयेत् गर्भाष्टमें वा' असा तो काल आहे. या नंतर त्या उपनींत बटूंस वेदाध्ययनासाठीं गुरुगृहीं पाठविण्याची पद्धत होती. बटूचें उपनयन झालें नसल्यास वेदाध्ययनास सुरवात करण्यापूर्वी बटूंचें उपनयन करण्याची जबाबदारी गुरूवर असे. तेथें ब्रह्मचर्याचा स्वीकार करून, गुरुसान्निध्यांत राहून गुरुसेवा करीत, मधुकरी भिक्षान्न प्रथम गुरुंस अर्पण करून, त्याच्या अनुज्ञेनें तें ग्रहण करून विद्याध्ययन पूर्ण होईपर्यंत बटूस तेथें रहावें लागत असें. हा काल बहुधा बारा वर्षांचा असे. हाच शास्त्रविहित ब्रह्मचर्याश्रम होय.

वैदिक धर्मावर दृढविश्वास असलेल्या धर्मनिष्ठ बाळंभट्टांनी शुभमुहूर्तावर आपल्या योग्यतेनुरूप, अनंताचे उपनयन मोठ्या थाटानें पार पाडलें. भगवत्कृपेस पात्र असलेल्या बटूला बाळंभट्टांनी गायत्री मंत्राचा उपदेश करून आशीर्वाद दिला. त्या गांवच्या व परगांवच्या जमलेल्या सगळ्या वयोवृद्ध व वेदाध्ययनसंपन्न ब्रह्मवृंदाने वेदोक्त मंत्रानें बटूंस आशीर्वाद दिला. उपनयन संस्काराचें तेज कांही आगळेंच आहे. त्या तेजानें व सद्ब्राह्मणाच्या शुभाशीर्वादानें अनंत हा ब्रह्मतेजानें तळपूं लागला. मौंजीबंधन होतांच मेखला, अजना, यज्ञोपवीत, दंड, कौपीन यांनी मंडित असा अनंत अधिक मनोहर असा दिसूं लागला. त्रिकाल संध्यावंदनास सुरवात झाली. माध्यान्हकाल होतांच माध्यान्हसंध्या संपवून भस्मधारी, अक्षमालाधारी, दंड कमंडलूधारी हा बटू भिक्षेला निघाला म्हणजे थेट बटूवेषधारी वामनच भूतलावर अवतरला आहे कीं काय असा लोकांस भास व्हावा इतका तो तेजस्वी दिसत असे.

अनंताची बुद्धि कुशाग्र होती. स्मरणशक्ति अद्वितीय होती. तो एकपाठी होता. दिलेला पाठ एकदां ऐकतांच तो मुखोद्‌गत म्हणून दाखवीत असे. मौंजीबंधनानंतर तीनच दिवसांत तो संध्यावंदन, अग्निकार्यादि सर्व नित्यकर्मे स्पष्टमंत्रोच्चारांसह दुसऱ्याच्या मदतीशिवाय, न अडखळतां करूं लागला. बाळंभट्टजींचा दररोज श्रीमद्‌भगवद्‌गीता, विष्णुसहस्त्रनाम, शिवकवच, रामरक्षा म्हणण्याचा परिपाठ होता. नित्य श्रवणानें ही त्याची आधींच तोंडपाठ झाली होती. अनंताचा स्पष्टोच्चार व कुशाग्रबुद्धि पाहून बाळंभट्टांनी स्वत: रोज त्यास वेदमंत्राचे पाठ देण्यास सुरवात केली. त्यांचे मनांतून लवकरच त्याचेकडून संपूर्ण वेदाध्ययन व तर्कव्याकरणादि सर्व शास्त्राध्ययन करवून घ्यावें असें होतें. अनंत हा दिलेल्या पाठाचें आपल्या बुद्धिबलानें तात्काल ग्रहण करीत असे व लगेच तोंडपाठहि म्हणून दाखवीत असे. या वरून त्याची भूमिका पूर्वीच तयार झालेली होती व त्यास या पेक्षां वेगळ्या मार्गदर्शनाची नितांत आवश्यकता होती हेंच दिसून येत नाहीं काय ?

किती झालें तरी बालबुद्धि अनंत पाठ म्हणून होतांच वडिलांचा डोळा चुकवून जो एकदां घराबाहेर निसटत असे तो दुपारीं जेवणाचे वेळींच नेमका घरीं परतत असे. तसेंच दुपारी एकदा निसटला कीं सायंकाळीच

परत येत असे. या वेळांत तो सवंगडी जमवून खेळत असे. आतांच्या त्याच्या खेळास खेळ म्हणण्यापेक्षां खोड्या म्हणणेंच जास्त संयुक्तीक होईल. कारण हा सवंगड्यांच्या मदतीनें कोठे शेजारच्या माळवदावर चढून त्यांची सहाणीच उखडून टाक, कोठें पन्हाळी मोडून टाक, असे उपद्व्याप करीत असे. घरीं कोणी नाही हे बघून केव्हां दही, दूध, लोणी चोरून खात असे. तर केव्हां मुलांबरोबर भांडणें काढीत असे. एवंच दररोज त्यानें केलेल्या कुचाळक्यांच्या तक्रारी त्याच्या पाठोपाठ त्याच्या आईबापांकडे येत असत. हें सर्व ऐकून बाळंभट्टास अतिशय मनस्ताप होत असे. प्रत्यही दुसऱ्याकडून छी: थू करून घेण्यासारखाच हा प्रकार होता. शिमग्याच्या सणांत तर असल्या खेळास ऊत येत असे. यामुळें गांवांतील लोक अनंतास उडाणटप्पू असें संबोधूं लागले.

एकदां आपली अंत: शक्ति आपल्या मित्रांस दाखविण्याची सुसंधि अनंतास प्राप्त झाली. कर्नाटक प्रांतांतील विजापूर जिल्ह्यांतील बादामी तालुक्यातील महाकूट पर्वताच्या पायथ्याच्या परिसरांत बनशंकरी नांवाचे पुराणप्रसिद्ध क्षेत्र आहे. आदिशक्तीचा तेथें वास असल्यानें तें पावन क्षेत्र मानलें जातें. त्या बनशंकरीच्या देवालयांत दरवर्षी अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत श्रीशाकंबरी देवीचा नवरात्रोत्सव त्या काळांत उत्तम रीतीनें चालत असे. त्या उत्सवासाठी आसपासचे चारी बाजूचे लोक जमत असत. सर्व लोक जगन्माता शाकंबरीस भजत असत. उत्सवाचे वेळीं रोज पुराण, कीर्तन, वेदपारायण वगैरे कार्यक्रम होत असत. पौर्णिमेच्या दिवशीं रथोत्सव होत असे. दररोज ब्राह्मण भोजन चालत असे. अद्याप देखील उत्सव पूर्वीप्रमाणेच होत असतो. पण ब्राह्मण भोजनाची व्यवस्था मात्र कमी होत आली आहे. त्याकाळी उत्सवांत दररोज देवीच्या प्रसादाकरतां म्हणून आसपासच्या पंचक्रोशीतील ब्राह्मण मंडळी येण्याची रुढी होती. जालिहाळ गांवही देवालयाच्या दक्षिणेस तीन, चार मैलांवर असल्यानें बहुश: सर्व ब्रह्मवृंद दुपारी नैवेद्याच्यावेळीं येऊन प्रसाद ग्रहण करुन जात असे. त्याप्रमाणें एका उत्सवाचे वेळीं अनंत हा आपल्या पांच सहा सोबत्यांना बरोबर घेऊन दुपारच्यावेळीं तेथें गेला. देवींचे दर्शन घेऊन सर्वांनीं सरस्वती नदींत स्नान केलें. यथेच्छ पुरुखा झोडून सर्वांसह अनंत आपल्या गांवी जाण्यास निघाला. थोडें चालून गेल्यावर त्या मित्रांपैकी एक दोघे अनंताला 'अरे, आमचे पोट जड झालें आहे. आम्हांस यापुढें पाऊल टाकवत नाहीं' असें म्हणून सडकेवर बसले. अनंतास आपल्या मित्रांस सोडून जाववेना म्हणून तो थांबला. थोड्या वेळानें मागून एक गाडी येत असलेली त्यानें पाहिली. गाडी कोठे जात आहे असें गाडीवानास विचारलें. जालीहाळास जात आहे असे त्याचेकडून उत्तर मिळतांच, आम्ही पण त्याच गांवचे, तुझ्या गाडींत बसून येतो. गाडी थांबीव असे अनंत म्हणाला. गाडीवानानें खोंडे नवीन आहेत. आजच पहिल्यांदा जुंपली आहेत, ते इकडे तिकडे ओढत पळत आहेत, वेसण कितीही ओढली तरी ऐकत नाहींत, खांच खळग्यांची पर्वा न करतां पळत आहेत, गाडी पडणेचा धोका आहे, मी जबाबदारी घेत नाहीं, तुम्ही गाडींत चढू नका असें परोपरीनें सांगितलें. तरी तिकडे लक्ष न देतां जुलमानें अनंताने सगळ्यांस गाडींत चढविले व शेवटीं आपणही चढून मधोमध बसला. नको म्हणत असतां ही मुलें गाडींत चढली म्हणून गाडीवान चिडला व त्यानें खोंडांस चाबूक दाखविला. त्यामुळें खोंड बिथरले व आणखी वेगानें पळू लागले. खोंड बेफाम उधळलेले पाहून मुलें घाबरून गेली व अनंतास आम्हांस खालीं उतरव म्हणूं लागली. अनंताने गाडीवानास गाडी थांबीव नाहींतर सावकाश हाक म्हणून सांगून पाहिलें पण उपयोग झाला नाहीं. त्यानें मुलांना घट्ट धरून बसा. धैर्यानें बसा. घटकाभरांत गांव येईल म्हणून सांगून पाहिले. पण त्याचे मित्र रडून गोंधळ करूं लागले. तेव्हा अनंतानें डोळे मिटून श्रीराम, श्रीराम असें मुलांस भजन करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मुलांनी

भजनास सुरवात करतांच लगेच जोरानें फिरत असलेल्या गाडीच्या चाकांत अनंतानें आपला पाय घालून पळत असलेली गाडी त्यानें एकदम थांबविली. एकदम गाडी थांबल्यानें जो हादरा बसला त्यानें समोरासमोर बसणाऱ्या मुलांची डोकी एकमेकांवर जोरानें आदळली. त्यांनी डोळे उघडून पाहिलें तों त्यास गाडी थांबलेली दिसली. गाडी एकाएकी कशी थांबली म्हणून गाडीवानानें मागें वळून पाहिलें तेव्हा अनंतानें आपला पाय चाकांत घातल्याचें त्यांस दिसून आलें. गाडीवान घाबरून अनंताजवळ आला व त्यानें त्यास ''बाळा तू कोणाला तरी अपकीर्ति देणार. आधीं माझ्या गाडींतून खालीं उतर'' असें म्हटलें व त्यानें सर्वांना गाडींतून खालीं उतरविले व तो गाडी घेऊन निघून गेला.

मुलांनी मात्र अनंताच्या साहसामुळेंच आपले प्राण वांचले अशी दृढ समजूत करून घेतली व गाडी वेगांत पळत असतां गरगर फिरत असणाऱ्या चाकांत पाय घालण्याचें साहस कसें केलेस व तुला यत्किंचितही इजा कशी झाली नाहीं असा त्यास कुतूहलानें प्रश्न केला. अनंतानें त्यांस ज्या करुणाघन परमेश्वराचा तुम्ही धांवा करीत होता त्याचीच ही दया. त्या परमेश्वराचें नांव दिव्य असून, त्या दिव्य नामाच्या घोषांत अद्‌भुत शक्ति सांठविलेली असते यांचे हे मूर्तिमंत उदाहरण नव्हे काय वगैरे सांगितलें. भारताचा इतिहास पाहिला असतां या नाम वैभवामुळें कष्टांचे निवारण होऊन सुखाची समृद्धि पावलेल्या प्रल्हाद, नारद आदिंच्या उदाहरणानें तो परिपूर्ण भरलेला असल्याचें दिसून येईल. ज्यावेळी अनंतानें तुम्ही सर्वांनी डोळे मिटून श्रीराम नामाचा घोष केला त्यामुळेंच आपण महासंकटातून मुक्त झालो म्हणून सांगितलें, तेव्हा त्याचा कंठ दाटून आला व नेत्रांतून भावपूर्ण अश्रू स्त्रवूं लागले. केवढी ही जबर निष्ठा व केवढा अचाट आत्मविश्वास. पूर्वसुकृताशिवाय व भूमीची तयारी असल्याशिवाय असें कृत्य घडूं शकेल काय याचा प्रत्येकानें मनाशीं विचार करावा. अशा तऱ्हेनें बोलत चालत सर्वजण गांवांतील मारुतीच्या देवळांत आले. सर्वांनीं अनन्य भावानें मारुतिरायाला साष्टांग नमस्कार घातला. क्षणभर विश्रांति घेऊन सर्वजण आपापल्या घरीं गेले.

अनंताची भगवद्‌भक्ति व अद्‌भुत शक्ति पाहून भारावून गेलेल्या सर्व सवंगड्यांनी घडलेली सर्व हकीकत घरांतील वडील मंडळींस सांगितली. त्याचप्रमाणे बाळंभट्टांना देखील सविस्तर निवेदन केली. परंतु अनंताच्या अनंत शक्तीचें आकलन न झालेल्या त्या सर्वांनीं या हकीगतीवर विश्वास तर ठेवला नाहींच उलट प्रत्येक पालकानें अनंत हा उनाड मुलगा आहे. त्याच्या नादीं तुम्ही कोणीही लागूं नका अशी आपल्या मुलास सक्त ताकीद दिली.

अनंतानें वाचन व पठण अजिबात सोडून, मुलांचे टोळके जमवून खोड्या करण्याचें व्रत स्वीकारलेले पाहून बाळंभट्टांनीं त्यास परोपरीनें उपदेश करून मार्गावर आणण्याचा प्रयत्न केला. पण त्यांना यश आलें नाहीं. दिवसेंदिवस त्याच्या खोड्या वाढू लागल्या. व कागाळ्याही घराकडे फार येऊं लागल्या. तेव्हां त्यांनीं कंटाळून एक दिवस त्यास खूप वाक्ताडन केलें. पण ते वाक्ताडन एखाद्या रागीट पित्याप्रमाणें आततायीपणाचे नव्हतें. मुलायम शब्दांनी गोंजारून त्याचे मनावर परिणाम होईल असें त्यांनीं भाषण केलें. त्यांनीं त्यास जवळ बसवून घेऊन पाठीवरून ममतेनें हात फिरवीत, ''बाळा अनंता ! हें तुझें वय विद्याभ्यासाचें आहे. या वयांत जर तूं विद्या संपादन केली नाहींस तर पुढें तुला कोणी विचारणार नाहीं. आम्हांला पुरेशीं जमीन नाहीं. वेदविद्येवरच आमची उपजिविका. आणि तीच जर तूं शिकला नाहींस तर पुढें तुझा चरितार्थ तरी कसा चालणार? आमचे गाडगोळी घराणें आमच्या आजा-पणजापासून अगाधविद्वत्ता, अपार विनय, सदाचार तत्परता, सत्यप्रियता व शुचिर्भूतपणाबद्दल प्रसिद्ध आहे.

अशा घराण्यांत तू गारगोटी कसा निपजलास. तूं तर सकाळीं उठतांच जो बाहेर जातोस तो दोनप्रहरीं जेवणाचे वेळेस येतोस व जेऊन जो पुन्हां जातोस तो संध्याकाळींच परत येतोस. बरें जातोस तो जातोस पण येतांना तंटेबखेडे करून कागाळ्या घेऊन परत येतोस. आमच्या पवित्र घराण्यांतील तुझी ही वागणूक पाहून आम्हांस अंतर्यामीं काय यातना होत असतील याचा विचार कर. गांवांतील लोकांनी तुला वाटेल तशी नांवें ठेवावी, तुला उनाड म्हणावें व तें आम्ही मुकाट्यानें ऐकून घ्यावें यांत आम्हांस खरोखर भूषण आहे काय ? लाजेनें आम्हांस तोंडे लपवावी लागतात. आमच्या उज्वल घराण्यास काळोखी आणणारें हे तुझें वर्तन सर्वथा योग्य नव्हे. यापुढें तरी सर्व उपदव्याप सोडून एकाग्रमनाने अभ्यास कर. तुझी बुद्धि कुशाग्र आहे. तुला या गांवी राहून शिकावयाचें नसल्यास तसें सांग. मेणसगी येथें धोंडभट्टदादांकडे जाऊन वैदिक विद्याभ्यास कर, तेथें तुझी सर्व प्रकारें सोय लावून देतो.'' इत्यादि प्रकारें अत्यंत तळमळीने उपदेश केला.

बाळंभट्टांच्या या हृदयस्पर्श उपदेशाचा अनंताच्या मनावर विपरीत परिणाम झाला. त्याच्या मनास ते लागले. त्या रात्रीं रोजच्याप्रमाणें विशेष जेवण न करतां आपल्या अंथरुणावर तो निजला. वडिलांच्या कानउघडणीमुळें त्याच्या मन:पटलावर तऱ्हेतऱ्हेचे विचार तरंग उठत होते. त्या गोंधळांत त्यास झोंप लागली नाहीं. आईवडिलांचे दृष्टीनें मी टाकावू ठरलो आहे. कुलाला कलंकभूत असा माझा देह आहे असें जर त्यांना वाटत असेल तर असला देह ठेऊन तरी काय उपयोग ? जीवाचा सर्वथा त्याग करावा हें बरें. जन्म देऊन पालनपोषण करणाऱ्या मातापित्यांना दु:ख देत राहण्यांत तरी काय फायदा ? असल्या विचारांनी भारावलेला चौदा वर्षे वयाचा अनंत यानें कोठें तरी जाऊन प्राणत्याग करावा असा मनांत ठाम निश्चय करून, घरीं कोणालाही कळूं न देतां उजाडण्यापूर्वीच तो घरांतून निसटला. जगदोद्धार करण्यासाठीं ज्याचा जन्म झाला त्यानें विहित कार्याची पूर्तता न करतां प्राण त्यागाचा निर्धार करावा व त्या उद्देशानें घरांतून बाहेर पडावें, हें त्या जगन्नियंत्या परमेश्वरास तरी कसें रुचावें. म्हणूनच कीं काय अनंतास आपल्या इष्टदेवतेची, श्रीशाकंबरी येथे वास्तव्य करीत असलेल्या बनशंकरीची, आठवण झाली व तो मार्ग त्यानें धरला. ही प्रेरणाही श्रीशाकंबरीदेवीचीच  असें म्हणण्यास बिलकूल प्रत्यवाय नाहीं. कारण त्या देवीनेंच दृष्टांतरूपानें अनंतास प्रत्यंतर आणून देऊन त्यास त्याच्या विचारापासून परावृत्त केले.

अनंत ज्यावेळी श्रीबनशंकरीच्या देवालयांत पोंचला. त्यावेळी पुजाऱ्यांनी देवीची पूजा मोठ्यात थाटांत संपविली होती. देवीला वस्त्रें नेसवून अलंकार घातलें होते. गंध, कुंकू, कस्तुरीचा टिळा वगैरेंचे लेपन करून सुवर्ण किरीट डोक्यावर चढविणेंत आला होता. धूप, दीप ओंवाळून नैवद्य समर्पण करून सुस्वर कंठानें पुजाऱ्यांनी व जमलेल्या भाविकांनीं आरतीस सुरवात केली होती. नेमका याचवेळी शोकमग्न अनंत तेथें पोंचला. देवीचें दर्शन होतांच अनंताचें मनांतील सर्व विषण्णता लोपली. व तें स्थान आदरयुक्त भक्तीनें घेतले. त्यानें देवीस साष्टांग नमस्कार घातला. तीर्थ घेतलें व पुजाऱ्यांनी प्रसाद घेऊन जा म्हणून सांगितल्यानें त्यानें चटदिशी स्नान आटोपलें व सर्वांसमवेत भोजन केलें. नंतर एकांतात बसून तेथील तीर्थांतच बुडी मारून प्राण त्याग करावा असें ठरवून सायंकाळी एकटाच तेथें वस्तीस राहिला.

**॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण चौथें

## गृहत्याग व कुलस्वामिनीचें मार्गदर्शन

श्रीशाकंबरी देवस्थान ही निर्जन जागा. तेथील पुजारी जवळच्या चोळजगुड्ड गांवाहून सकाळी सर्व सामुग्रीनिशीं येत व सायंकाळची आरति आटोपून सूर्यास्ताचे आंत आपले गांवी जात असत. इतर भक्त बहुधा दुपारचा प्रसाद घेऊन लगेच परतत असत. या वहिवाटीस अनुसरून त्या दिवशीं संध्याकाळीं पुजाऱ्यांनीं सायं आरति उरकून घेतली. आपले बरोबर न्यावयाचें सामान एकत्र करून बांधून घेतलें. देवालयाचे दरवाजे लावून त्यास कुलूप ठोकलें व ते जाण्यास निघाले तोंच त्यांस अनंताची आठवण झाली. एका पुजाऱ्यानें बाकीच्यांस सकाळचा मुलगा गेला कीं कोठें झोपला आहे पहा असें सांगितलें. असल्यास त्यास आपल्या बरोबर घरीं नेऊंया असें म्हटल्यानें त्यांनी शोध केला. अखेर श्रीदेवीच्या देवळाच्या मागील पवळींत एका कोपऱ्यांत बसलेला तो त्यांस आढळला. त्यांनीं त्यास ''बाळ, येथें वस्तीस कोणी रहात नाहीं. येथें रात्रीं हिंस्त्र प्राणी संचार करतात. तरी तू आपल्या गांवाकडे तरी जा, नाहींपेक्षां आमचेबरोबर आमचे घरीं चल'' म्हणून सांगून वस्तुस्थितीची जाणीव करून दिली. परंतु अनंतानें त्यांस मी जगन्माता श्रीबनशंकरीची सेवा करीत येथेंच राहणेचा निश्चय करून आलों आहे. आईच्या सान्निध्यांत मला कशाचीच भीति वाटणार नाही. माझी बिलकूल काळजी न करतां तुम्ही निश्चिंतपणे आपल्या गांवीं जा'' असे मोठ्या धैर्यानें सांगितलें. त्या लहान मुलाचें धैर्य व त्याची देवीवरील श्रद्धा पाहून पुजाऱ्यांस आश्चर्य वाटलें. त्याला एकट्याला सोडून जाण्याचें त्यांच्या जिवावर आल्यानें त्यास त्यांनीं अनेक तऱ्हेनें भीति घालून पाहिलें. त्याचा निश्चय ढळत नाहीं हें पाहून ते नाईलाजानें त्याला तेथें सोडून निघून गेले.

इकडे अनंत हा कुलस्वामिनीचा मनांत धांवा करीत तेथेंच निजला. त्यास झोंपही लागली. पण बरोबर अंथरूण पांघरूण कांहीं नसल्यानें दगडावर झोंपलेल्या अनंतास थोड्याच वेळांत जाग आली. मध्यरात्रीचा सुमार झाला होता. तो उठून बसला त्यानें चौफेरदृष्टी टाकली. आकाशापासून थेट भूमीपर्यंत आ वासून पसरलेलें अंध:काराचे साम्राज्य त्यास भुताप्रमाणें भासलें. आसपासच्या झाडींतून घूत्कार ऐकू येत होते. सरस्वती नदीच्या पाण्याचा खळखळ आवाज ऐकू येत होता. देवळाभोंवती पाकोळ्या फडफड करीत उडत होत्या. या सर्वांमुळे रात्रीच्या शांततेचा भंग होत होता. अनंत अतिशय घाबरला. त्यांस कांही सुचेना. अखेर तो तेथेंच एका कोपऱ्यांत टेकून बसला. त्याच्या डोक्यांत आपण कशासाठीं येथें आलों असे विचार हळूंच डोकावूं लागले. व त्याच क्षणीं आपल्या शरीरांत नवचैतन्याचा प्रादुर्भाव झाल्याचा त्यास भास झाला. तत्क्षणींच तो तेथून उठला व जीव देण्यासाठीं आलेल्या मला कशाची भीति असें म्हणून तो देवीच्या गाभाऱ्यासमोर येऊन उभा राहिला.

अनंताचे मनांतून देवीचे शेवटचें दर्शन घेऊन, तिला साक्षी ठेऊन आपला कार्यभाग उरकावयाचा होता. देवीचे गाभाऱ्याचें दारास कुलूप असलेनें तो बाहेर पण समोर बसला. भीतीस झुगारून तो लहान बालक अनंत भगवती आदिमायेची स्तुति करूं लागला व त्याद्वारें आपल्या उद्देशाचें निवेदन करूं लागला. ''अंबे, आज तुझ्या चरणीं हा देह समर्पून तुझ्यांत लीन होण्यासाठीं मी आलों आहे. जन्मदात्या मातापित्यांना माझा भार होऊं लागल्यानें त्यांस माझा कंटाळा आला. ग्रामजन सर्व मला दूषण देऊं लागले. विद्याविहीन बनून तुझ्या आश्रयास आलों आहे. आजपर्यंत हे जगदंबे, माझ्यासारख्या किंबहुना माझ्यापेक्षां हीन मतिमंद अशा अनेकांचे तूं संरक्षण केलें आहेस व त्यामुळेंच ''करुणासागर'' असें नामाभिधान तुला प्राप्त झालें आहे. असें असून जर तूं माझी उपेक्षा केलीस तर पुढें मी जावयाचें तरी कोठें ? अतएव हे जगन्माते माझ्या निंद्य देहाचा तुझ्या या

पुण्यतम पुष्करणींत त्याग करून निरंतर तुझ्या चरणाजवळ वास करण्याचा मी दृढनिश्चय केला आहे. हे कुलस्वामिनी माझ्या दीनाच्या या शेवटच्या प्रणामाचा स्वीकार कर'' असें म्हणून अनंतानें देवीस साष्टांग दंडवत घातले व तेथून उठून देवळाचे आवारांत असलेल्या पुष्करणीच्या कांठावर येऊन तो उभा राहिला. पुन्हां एकदां मनानें त्यानें देवीचा धांवा केला व जयजगन्माते म्हणून पुष्करणींत उडी टाकण्यास उद्युक्त झालेल्या त्याला कोणी तरी येऊन मागें ओढल्याचा भास झाला. त्यानें मागें वळून चोहोंकडे पाहिलें. जवळपास त्यास कोणीच दिसलें नाहीं. नुकत्याच गगनांत विराजमान झालेल्या चंद्राचा मंद प्रकाश पसरला होता. त्या प्रकाशांत त्याला झाडेंझुडपें, देवळें व त्यांचीं शिखरें या शिवाय कांहींच दिसलें नाहीं. तेव्हां त्यांस भ्रांति पडून तो पुन्हां पुन्हां चोहोंकडे पाहू लागला. पण खरोखर तेथें कोणी नसल्यानें हा केवळ आपल्या मनाच्या कमकुवतपणानें निर्माण झालेला भ्रम आहे असें पक्के ठरवून पुन्हां पुष्करणींत उडी टाकण्यासाठीं त्यानें कंबर कसली व तो उभा राहिला. पुन्हां एकवार मनांत देवीचें स्मरण केले व त्यानें शरीर झोंकून देण्यासाठीं झेपं घेतली तोंच मागील बाजूनें आपला हात धरून कोणी तरी आपल्यास दरदर ओढीत देवळाकडे नेत असल्याचा व देवळासमोर नेऊन सोडल्याचा त्यास भास झाला. अनंत मनोमनीं अतिशय भ्याला व निश्चेष्ट पडला. वाचकहो ! देवीचे मनांतून अनंतास वांचवून पुढें त्याचे हातून जगदोद्धाराचें काम करवून घ्यावयाचें होतें म्हणूनच घरांतून बाहेर पडतांच बनशंकरीची वाट धरून कुलस्वामिनींचे दर्शन घेण्याची जगन्मातेनें त्यांस प्रेरणा दिली. पुजाऱ्यांनी तेथें वस्ती करणें योग्य नाहीं हे पटविण्यासाठी त्यांस भीति वाटावी अशा गोष्टी सांगितल्या तरी त्यांचें न ऐकतां तेथें राहण्याचें व तसें स्पष्ट सांगून पुजाऱ्यांस घालवून देण्याचें धैर्यही त्याचे अंगी निर्माण केलें. व जगन्मातेच्या पायाजवळ सतत वास करणाऱ्या त्याच्या प्रार्थनारूपी निर्धाराचा खरा अर्थ जाणून तो जीव देऊ लागला असतां त्याचा प्रतिकार करून त्या जगन्मातेनेंच त्यास वांचविलें असें तुम्हांस नाहीं कां वाटत ? ''देव तारी त्याला कोण मारी'' ही म्हण तरी काय सुचविते.

असो. देवीच्या महाद्वाराजवळ जमिनीवर पडलेल्या अनंताला त्या निश्चेष्ट अवस्थेंत एक सुंदर स्वप्न पडलें. स्वप्नांत जगन्माता शाकंबरीदेवी, वस्त्राभरणांनी विभूषित, कोटि सूर्याच्या तेजानें तळपत, पायांतील पैंजणांचा मंजुळ निनाद करीत, मंदहास्य करीत, मंदगतीनें आपल्याकडेच येत आहे असें त्यांस दिसलें. तिनें आपला कोमलहस्त त्याच्या सर्वांगावर फिरविल्याचें त्यानें पाहिलें, व ''वत्सा, तुझ्या वडिलांनी तुझ्या हिताची गोष्ट तुला सांगितली, बालबुद्धीनें तू त्याचा विपरीत अर्थ केलास व परम दुःख पावून व्यर्थ देहत्याग करण्यास सिद्ध झालास तरी सर्वथा तसें करूं नकोस. तुझ्या हातून या जगांत अनेकानेक सत्कार्ये व्हावयाचीं आहेत. म्हणून मीच तुला तुझ्या या अघोर कृत्यापासून निवृत्त केलें आहे. प्रातःकाल होतांच तूं येथून निघून कोठें तरी जा व विद्यासंपादन कर म्हणजे तुझें कल्याण होईल. तुला माझा संपूर्ण आशीर्वाद आहे. कसलीही काळजी करूं नकोस'' असे देवी स्वप्नांत प्रत्यक्षांत सांगत असल्याचें त्यानें ऐकलें. नंतर देवीनें आपला वरदहस्त त्याच्या हातावर ठेऊन पुन्हा हळुवारपणें त्याच्या सर्वांगावर फिरवून, पहातां पहातां ती अंतर्धान पावल्याचें त्यास दिसलें. जगन्मातेची मधुर, मुलायम वाणी ऐकून व तिच्या अमृतमय हस्तस्पर्शानें अनंताची काया पुलकित झाली. फरफटत ओढीत आणतांना अनंताच्या अंगावर झालेल्या सर्व जखमा देवीच्या कर स्पर्शानें नाहींशा होऊन त्याला नवीन जोम आला होता. आतां सावध होऊन त्यानें सगळीकडे पाहिले. त्यास कोणी न दिसल्यानें उजाडण्यास एकतास अवकाश असतानांच तो दयाघन अशा त्या महामायेच्या महिम्याची स्तुति करीत महाद्वाराजवळ येऊन बसला.

**।। श्रीसद्‌गुरु ब्रम्हानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण पांचवे
## विद्याभ्यास व वैराग्यवृत्ति

देवीचे आज्ञेप्रमाणें विद्याभ्यासास जावयाचें ठरलें. पण कोठें हा प्रश्न उभा राहिला. घरीं गेल्यावर पुन्हां आपल्या मित्रांच्या घोळक्यांत सांपडून आपल्या हातून कांहीं होणार नाहीं. तेव्हां दुसरीकडेच जाणें बरें. एवढ्यांत मेणसगीस सोय करून देतो असे वडील बोलल्याचे त्यास आठवले व त्या गांवीं त्याचे यजमानही असल्यानें त्यानें तेथेंच जाण्याचें ठाम ठरविले. प्रात:काल होतांच अनंताने पवित्र तीर्थांत स्नान केले, संध्यावंदनादि आटोपून जगन्मातेच्या दर्शनासाठीं तो देवळांत आला. पुजाऱ्यांनी तोपर्यंत येऊन गाभाऱ्याचा दरवाजा उघडून केर काढण्यास सुरवात केली होती. अनंतानें भक्तिभावानें देवीचें दर्शन घेतलें, साष्टांग नमस्कार घातला आणि तिच्या आज्ञेप्रमाणें वेदाध्ययन करण्यासाठीं मलापहारी नदीच्या कांठीं असलेल्या मेणसगी गांवाची वाट धरली.

रामदुर्ग संस्थानांत होळेआलूर नांवाचें एक गांव आहे. तेथून ४/५ मैल अंतरावर मेणसगी गांव आहे. हें गांव जालिहाळ पासूनही जवळ आहे. त्या गांवांत तम्मणराव कुलकर्णी रहात असत. ते धनसंपन्न, सदाचारसंपन्न अतिथि अभ्यागतांचे योग्यतेप्रमाणे स्वागत सत्कार करणारे होते. 'धन्यो गृहस्थाश्रम:' ही म्हण त्यांनीं सार्थ करून दाखविली होती. या घराण्याचे पौरोहित्य गाडगोळी घराण्याकडे असल्यानें बाळंभट्टाचे वरचेवर येथे आगमन होत असे. या गांवीं आपल्या तप:सामर्थ्यानें प्रत्यक्षांत सूर्यनारायणाला प्रसन्न करून घेतलेले, वेदशास्त्रसंपन्न, धोंडभट्ट दादा मोडक नांवांचे एक विद्वान गृहस्थ रहात होते. आपल्याजवळ अध्ययन करीत असलेल्या शिष्यांवर ते पुत्रवत् प्रेम व ममता करीत असल्यानें नेहमीं बरेच विद्यार्थी त्यांचेपाशी वेदाध्ययन करीत असत. अनंताने तडक हें गांव गांठले. आपले यजमान तम्मणराव यांचे घरी मुक्काम ठेऊन दादांच्याजवळ वेदाध्ययनास त्यानें प्रारंभ केला.

इकडे अनंताचे घरीं दुसरे दिवशीं सकाळी अनंत घरसोडून पसार झाल्याचे नजरेस येतांच सर्वजण घाबरले. सगळीकडे शोध सुरू झाला. माता जिऊबाई अत्यंत शोकाकुल झाली. तिनें अन्नपाणी वर्ज केलें. एवढेंच नव्हे तर अनंत सापडे-पर्यंत अन्नपाणी ग्रहण न करण्याचा हट्ट तिनें घेतला. बाळंभट्ट मुलास हुडकून आणतो म्हणून सांगून घरांतून बाहेर पडले. गांवांत त्याचा कोठेंही शोध न लागल्यानें, बाळंभट्ट प्रथम बनशंकरीला गेले. तेथें चौकशी करतां पुजाऱ्यांनी "काल एक मुलगा दुपारीं येथे आला. त्यानें प्रसाद घेतला. येथेंच सेवेस राहणार म्हणाला. आम्ही त्याला आमचेबरोबर आमचे गांवीं चालण्याचा आग्रह केला. त्यानें आमचे ऐकले नाहीं. आज सकाळी देवीचें दर्शन घेऊन तो कोठे निघून गेला समजले नाहीं" असें सांगितलें. बाळंभट्टांना अनंताने पुष्करणींत जीव दिला असेल कीं काय अशी शंका वाटली व त्यांचे मन कळवळले. शोकावेगानें त्यांचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. बाळंभट्ट मुग्ध होऊन देवीपुढें हात जोडून उभे राहिले. शोकावेग ओसरल्यावर डोळे पुसून त्यांनी प्रार्थनेस सुरवात केली. "भगवती, मला खरोखर कांहीं सुचेनासे झालें आहे. सर्वस्वी तुझ्यावर मी भरंवसा ठेऊन भार टाकला आहे. शोक सागरात मी बुडालो आहे. तरी शोकाचा परिहार करून मला तार." अशा प्रकारें प्रार्थना संपवून ते जाण्यास निघालेले पाहून, प्रसाद घेऊन जा असें पुजाऱ्यांनी बाळंभट्टास

सांगितल्याने ते थांबले. पुजाऱ्यांनी फलपुष्पादींचा नैवेद्य दाखवून मंगलआरती सुरू केली. ती चालू असतांना भगवतीच्या अंगावरील उजव्या बाजूचे फूल फळावर पडल्याने पुजाऱ्यांनी बाळंभट्टास ''देवीनें उजवा कौल दिला. तुमचें कार्य सफल होणार. अनंत तुम्हास लवकर सांपडणार'' असे सांगितले व त्यांस फल प्रसादपुष्प दिले. बाळंभट्टास समाधान वाटले. श्रीशाकंबरी देवीला नमस्कार करून ते निघाले ते जवळपासच्या सर्व खेड्यांत शोध घेत घेत तिसऱ्या दिवशीं मेणसगी गांवी येतांक्षणीच रिवाजाप्रमाणे ते आपले यजमान तम्मणराव कुलकर्णी यांचे घरी सरळ गेले. त्यावेळीं दुपारचे अकरा वाजण्याचा समय असेल. तम्मणराव घरांतच होते. अकस्मात् आपल्या पुरोहितांचें आगमन झालेले पाहून, आसनावरून उठून 'या, या' असें म्हणून बाळंभट्टांचे स्वागत करून, त्यांस नमस्कार करून, तम्मणरावांनी बाळंभट्टास मृदु मृगाजिनावर बसविले. व काय बाळंभट्टजी, मुलाला पहायला आलात वाटते. तुमचा मुलगा येथें येऊन चार दिवस झाले. दादांचेकडे त्यानें वेदाध्ययनास सुरवात केली आहे. दररोज पहाटें उठून नदीवर आंघोळीस जातो. येऊन संध्या नमस्कार वगैरे आटोपून घरची देवपूजा करून गुरूजी सांगतील त्यावेळीं सकाळ, संध्याकाळ शिकण्यास जात असतो. दोन दिवसांतच त्यानें आपल्या बुध्दि चातुर्याची चमक दादांस दाखविली असे त्यांनी मला सांगितले. तेव्हां हे सर्व आपल्या तप: सामर्थ्याच्या आशीर्वादांचे फळ आहे असें मी त्यांस सांगितले. असें बोलणें चालले असतांच अनंत हा आपला पाठ संपवून घरीं आला. वडील आलेले पाहून बाळंभट्टांनीं त्यास बोलवून जवळ बसवून घेतले. वात्सल्यानें त्याचे पाठीवरून हात फिरवीत, ''कोणालाही न सांगतां तूं घरांतून निघून आलास खरें पण तुझ्या आईनें तेव्हांपासून अन्नपाणी वर्ज्य केलें असून, ती एकसारखी रडत वसली आहे. सुदैवानें तुला तपोनिष्ठ व विद्वानगुरु लाभले आहेत. आतां तरी चंचल स्वभाव सोडून एकाग्रतेनें अभ्यास करून आमच्या घराण्याची कीर्ति उज्वल कर,'' असा सद्गदित कंठानें त्यास उपदेश केला. त्यांच्या उपदेशाप्रमाणें पुढें निश्चित घडून येणार याची साद घड्याळांतील ठोक्यांनी दिली. तम्मणरावांनीं बाळंभट्टास 'पुरोहीत महाराज, वेळ होत आहे. स्नान करा. लवकर अंनुष्ठान उरकून घ्या. जेवण तयार आहे. असें सांगितल्यानें बाळभट्ट स्नानास उठले. स्नान, संध्यादि आन्हिक आटोपून सर्वांनी जेवण केलें. थोडी विश्रांति घेऊन बाळंभट्ट घरीं जाण्यास निघाले.

मेणसगीहून ही आनंदाची बातमी घेऊन बाळंभट्ट जे निघाले ते सूर्यास्तास जालिहाळ गांवीं आले. घरीं येतांच त्यांनीं पत्नीस हांक मारून श्रीशाकंबरी देवीचा प्रसाद दिला. व आपण मुलांच्या शोधार्थ घर सोडल्यापसून परत येईपर्यंतचा सर्व इत्यंभूत वृत्तांत त्यांनीं तिला सांगितला. आपला मुलगा चंचलवृत्ति सोडून विनयशाली बनून वेदाध्ययन करीत असलेली हकीकत ऐकून आईस खरोखर धन्यता वाटली. श्रीशाकंबरी देवीनेंच त्याला सुबुध्दि दिली म्हणून तिच्या अगाध महिम्याची वाखाणणी करीत तिचे पूजन करून त्या माऊलीनें अन्नग्रहण केलें. इकडे अनंतानें देखील अल्पकाळांत साध्य न होणारे शिक्षादि षडंग संहिता, ब्राह्मण, आरण्यकादि आपल्या शाखेचें अध्ययन, आपल्या कुशाग्र बुध्दिबलानें अवघ्या तीनच वर्षात मुखोद्गत केले. हे त्याचे अचाट बुध्दिसामर्थ्य पाहून त्याचे विद्यागुरू तर आश्चर्य चकित झाले. मधून मधून तम्मणराव आपल्या पाल्याच्या चौकशीस दादांकडे जात असत. असेंच एके दिवशीं वेदाध्ययन चालल्यावेळीं तम्मणराव हे दादांकडे गेले त्यांनीं अनंतभट्ट हा न चुकतां शिकण्यास येतो ना ? कारण हा फार उनाड आहे असें त्या गांवचे सर्व लोक सांगतात. म्हणून पृच्छा

करतो म्हणाले. तेव्हा धोंडभट्टदादांनी "तम्मणा, तुमचा पुरोहीत म्हणजे सामान्य व्यक्ति आहे असें समजूं नका. त्याचे बुध्दीसामर्थ्य वर्णनातीत आहे. समजावून दिलेला पाठ तो अवघ्या तीन दिवसांत तोंडपाठ करून दाखवितो" अशी त्यांनीं त्याची शिफारस केली. व "हा बालक परमेश्वरी कृपाप्रसाद-पात्र असल्यानें त्याचें बुध्दिकौशल्य माझ्या शिष्यसमुदायांतील विद्यार्थ्यांपेक्षा निखालस श्रेष्ठप्रतीचें आहे. खरें पाहूं जातां अंतच लागत नाहीं. पुढें हा एक अलौकिक व्यक्ति होणार हें नि:संशय" असेंहि त्यांस सांगितलें. तेव्हां तम्मणरावांच्या अंगावर मूठभर मांस चढल्याप्रमाणें आनंदित होऊन ते घरीं गेले. याप्रमाणें आपल्या सद्‌गुणांनीं तेथील लोकांना तोषवून थोड्याच दिवसांत सर्व वेदाध्ययन संपवून अनंत हा गुरूकृपेस पात्र झाला. पुढें शास्त्राध्ययन करण्याची त्याची मनीषा धोंडभट्टदादांनी जाणली व एके दिवशीं त्याला बोलावून त्यांनी 'अनंता, माझ्या जवळची विद्या संपली. तुला आणखी पुढें शास्त्राभ्यास करावयाचा असेल, तर तूं गदगजवळ मुळगुंद म्हणून गांव आहे तेथें जा. "असें सरळ मनानें सांगितलें. धोंडभट्टदादांची ही सरलता पाहून 'धन्य ते गुरू व धन्य तो शिष्य' असें म्हटल्यावाचून राहवत नाही. आपल्या मनांतील आशय गुरूमुखानें प्रगट झालेला पाहून अनंतानें हर्षभरानें गुरूंचे घट्ट पाय धरले व त्यांस साष्टांग नमस्कार घातला. गुरूंनीं देखील "वत्सा, सकल शास्त्र पारंगत होऊन दिगंत् कीर्ति मिळीव" असा हार्दिक अंत:स्फूर्तीनें आशीर्वाद दिला. व त्यास थाटाचा निरोप दिला.

गुरूंच्या आज्ञेप्रमाणें अनंत हा प्रथम आपल्या गांवीं गेला. तेथें तो चार दिवस राहिला व त्यानें मातापितरां तोषविले. तसेंच आपल्या विद्वत्तेनें व सद्‌गुणांनीं गांवच्या सगळ्या लोकांची मनें आकर्षून घेतलीं. तीन वर्षात अनंताच्या स्वभावांत झालेले विपरीत परिवर्तन पाहून लोक आश्चर्यचकित होऊन त्याचे कौतुक करूं लागले. ज्याची उनाड म्हणून लोक हेटाळणी करीत होते त्यासच गांवचें भूषण मानूं लागले. एवढेंच नव्हे तर गांवचे सर्व लोक त्यांस अनंतभट्ट असें म्हणूं लागले. अनंताने पुढील विद्याभ्यासास मुळगुंदला जाण्याचा आपला मनोदय वडिलांस स्पष्ट करून सांगितला. गुरु धोंडभट्टदादांचीहि आपल्यास तशी आज्ञा झाली असल्याचेंहि त्यानें वडिलांस सांगितले. बाळंभट्टासहि तें ऐकू संतोष झाला. त्यांनीं प्रेमपूर्वक आर्शीर्वादहि दिला. आपल्या मुलाच्या महत्वाकांक्षेच्या आड कोणता बरे प्रेमळ व सुबध्द पिता येणार ! अखेर अनंतभट्टांचे मुळगुंदला प्रयाण करण्याचें निश्चित झालें व पुन्हां एकदां त्यानें विद्यार्जनासाठीं प्रयाण केलें.

॥ श्रीसद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण सहावे

## विद्यार्जनासाठी मुळगुंदीं प्रयाण

मुळगुंद हे गांव धारवाड जिल्ह्यांतील गदग तालुक्यांत असून तें गदगच्या नैर्ऋत्येस बारा मैलावर आहे. तेथें पूर्वीं सुमारें तीनशेंवर ब्राह्मण घराणीं होती. त्या गांवचे बहुतेक सर्व ब्राह्मण वेदव्यासंगी होते, त्यामुळें ते फार प्रसिध्द होते त्या काळीं ब्राह्मणांची लोकसंख्याही हजार बाराशेंपर्यंत होती. ऋग्वेद व यजुर्वेद अशा दोन्ही शाखेंत पारंगत झालेले अनेक विद्वान ब्राह्मण तेथें होते. यजुर्वेदाच्या आपस्तंभ, बौध्दायन शुक्लयजुर्वेद, कण्व, माध्यंदिन वगैरे शाखेंत त्यांनीं पारंगतता मिळविलेली होती. व्याकरण शास्त्रांत निपुण, धर्मशास्त्रांत धुरीण, ज्योतिषशास्त्रांत प्रवीण, तर्कशास्त्रांत पंडित, वेदांतशास्त्रांत विशारद, संगीतशास्त्रांत निष्णात, चित्रकलेंत कुशल अशा सर्वविद्या व कलांनीं मंडित असलेल्या विव्दानांनीं ते गांव गजबजलेलें होतें. कीर्तन कलेचें तें माहेरघर होतें. पिढ्यान्‌पिढ्या त्या कलेवर उपजीविका करणारे पट्टीचे हरिदास तेथें होते. अद्यापही कीर्तन विषयाचें पांडित्यपूर्ण विवेचन करणारी कांही घराणीं तेथें आहेत. समर्थ सांप्रदायिक कीर्तन प्रसार कर्नाटकांत याच घराण्यांनी केला म्हटल्यास तें वावगें होणार नाही. या गावांत गोब्राह्मणांचा परामर्श घेणारी, अत्यंत भाविक व उदार अशी सावकार मंडळी बहुसंख्येनें होती. त्यामुळें दूर दूरहून आलेल्या विद्यार्थ्यांची जेवणाची व राहण्याची उत्तम सोय सुलभपणे होत असे व त्यांना विद्यार्जन करतां येत असे. उपलब्ध होणाऱ्या या सर्वसोयीमुळें मुळगुंदला विद्यानगरीचें स्वरूप प्राप्त झालें होतें.

अशा या मुळगुंद गांवी न्याय, वेदांतादि शास्त्रांतील जाडे विव्दान जंतली गुरूनाथशास्त्री नांवाचे, ब्रह्मवृंदाला ललामभूत, व पंडिताग्रणी महनीय रहात असत. ते सदा पाठ देत व प्रवचनें सांगत कालक्रमणा करीत असत. अनंतभट्ट हा शास्त्राभ्यासासाठीं यांच्याकडेच एके दिवशीं दाखल झाला. गुरूनाथशास्त्री हे अत्यंत सात्विक, सदाचारसंपन्न व परम ब्रह्मनिष्ठ होते. विद्यादानाबद्दल चहूंकडे त्यांची ख्याति पसरली होती. यांचा स्वभाव कमालीचा शांत होता. दंभ व मत्सर यांची त्यांना तोंड ओळखही नव्हती. ''विद्या विनयेन शोभते'' ही उक्ती जणू सार्थ करण्यासाठींच कीं काय, विद्यानिधि गुरूनाथ शास्त्र्यांना सजविण्याकरतां विनयच त्यांचें रूपानें मूर्तिमंत अवतरला आहे की काय असें वाटत असे. विद्यार्थ्यांच्या सोयीनुरूप, दिवसरात्र न म्हणतां, ते केव्हांही त्यांस शिकविण्यास तत्पर असत. सदा सर्वदा विविध शास्त्रांचे स्पष्टीकरण करण्यांत दंग असलेले ते गुरूकुलांतील ऋषीप्रमाणें शोभत असत. यांचे जवळ अध्ययन करून कित्येक शिष्यांनीं पंडित पदवी मिळविली होती. असल्या अलौकिक गुरूजवळ अध्ययन करण्यासाठी असामान्य शिष्य अनंत भट्ट आला. अशा गुरूशिष्यांची जोडी म्हणजे समसमा संयोग नव्हे तर काय ?

गुरूगृहीं अनंत हा पहाटे चार वाजतां उठत असे व अरूणोदयापर्यंत आपला अभ्यास करीत असे. नंतर मळ्यात जाऊन बेल, तुळशी, फुलें काढून ठेऊन तेथेंच विहीरींत आंघोळ करून, संध्यादि नित्यकर्म संपवीत असे. मग काढलेल्यापैकी कांहीं तुळशी व फुलें रामाचे देवळांत देऊन बाकीची गुरूगृहीं देत असे व विद्यागुरूंची सेवा करीत दुपारपर्यंत त्यांनीं दिलेल्या पाठाचे चिंतन करीत असे. माध्यान्ह होतांच ४/५ घरीं जाऊन मधुकरी

मागून त्या भिक्षान्नाचा श्रीरामाला नैवैद्य दाखवून जेवणं करीत असे. त्यानंतर थोडावेळ गुरूंच्या घरकामांत व श्रीराममंदिराच्या स्वच्छतेंत घालवून पुन: गुरूजवळ नवीन पाठ शिकण्यास येऊन बसत असे. निरर्थक वेळ दवडण्याचें त्यास कसें तें माहीतच नव्हतें. इतर विद्यार्थ्यात मिसळून तो विनोद करीत असे, पण विनय त्यानें कधीं सोडला नाहीं. गुर्वाज्ञेचें पालन तो काटेकोरपणाने करीत असें. सदाचार निरत व सदाभ्यासतत्पर अशी त्याची वृत्ति असे. धर्मनिष्ठ वागणूक व कुशाग्रबुध्दी यामुळें त्यानें थोड्याच काळांत काव्य, नाटक, अलंकारादि साहित्यशास्त्र संपविलें. नंतर तर्क व व्याकरण शिकण्यास सुरवात केली. महाबुध्दिमान अनंतानें अवघ्या तीन वर्षात न्याय व व्याकरणशास्त्रांत अव्दितीय पांडित्याचें संपादन केलें.

अनंतभट्टानें थोड्या अवधींत संपादिलेलें श्रेय पाहून त्याच्या बरोबरीच्या छात्रांस महदाश्चर्य वाटलें व ते त्याच्या बुध्दिसामर्थ्याची मनापासून प्रशंसा करूं लागले. एखादे समयीं अनंतभट्ट हा विद्यागुरूंच्या बरोबर सभास्थानीं गेल्यास, त्यांच्या बरोबर लोक यालाही अनंतशास्त्री असें संबोधून त्याचा सन्मान करूं लागले. तर मग यापुढें अनंताला अनंतशास्त्री असेंच संबोधू म्हणजे झाले. यानंतर अनंतशास्त्री यांनीं वेदांतशास्त्र शिकण्यास आरंभ केला. त्याबरोबरच शास्त्रचिंतनांतही त्यांचा वेळ जाऊं लागला. बाल्यापासूनच भगवंताची भक्ति अंगीं संचरली होती व अखंड ब्रह्मचर्यव्रत धारण केल्यानें विरक्तीही यांच्या अंगीं मुरूं लागली. त्यांतच एकांतांत वेदांततत्वाचें चिंतन, मनन व निदिध्यास करण्याची भर पडत गेल्यानें आनंदपूर्ण स्थितींत आसनावर बसल्यावर त्यांना जेवणखाण वगैरे बाह्य उपाधींचा उत्तरोत्तर विसर पडूं लागला. नेहमीं सत्संगांत राहून भगवंताविषयीं चर्चा करावी, त्याची आराधना करावी, त्याच्या लीलाकथांच्या अनुवादांतच वेळ घालवावा अशी इच्छा होऊं लागली व दिवसेदिवस तो वाढूं लागली. याप्रमाणें अनंतशास्त्र्यांच्या अंतरंगात असलेल्या भक्तीच्या अंकुराचा व तदंगभूत विरक्तीचा वृक्ष बनला व त्याचा उद्रेक अनेक तऱ्हेनें त्यांच्या वागणुकींत दिसूं लागला.

या सुमारास अनंतशास्त्र्यांचे वडील बाळंभट्ट कालवश झाल्यास दोन वर्षे होऊन गेली होती. आपला प्रिय पुत्र वेदशास्त्र पारंगत होऊन अनंतशास्त्री पदवीप्रत पोंचल्याचें ऐकून व पाहून संतुष्ट होण्याचे सुदैव बाळंभट्टजीना लाभले नाहीं. अनंतशास्त्र्यांच्या मनाचा प्रवाह भक्तियुक्त आचार, भगवत्सेवा व भगवत्तत्वप्रचाराकडे वाहत असल्याचे जंतली गुरूनाथशास्त्र्यांच्या निदर्शनास आल्यानें त्यांनी त्यास पुराण सांगण्याची आज्ञा केल्यानें गदग, बेटगिरी, बेलधडी वगैरे गावी जाऊन अनंतशास्त्र्यांनी पुराण सांगण्यास सुरूवात केली. लहानपणीं गांवीं असतांना देवळांत पुराण ऐकण्यास ते बसत असत व पुराण संपलेवर मुलें गोळा करून आपण व्यासपीठावर बसून पुराणिकाप्रमाणें आवाज काढून व हातवारे करून बरोबर नक्कल करीत असत. आतां तर ते शास्त्रसंपन्न झाले होते. श्रीमद्भागवत ग्रंथ हा त्यांचा आवडता ग्रंथ असल्याने बहुश: ते भागवतच सांगत असत. पुराण सांगणें हा त्यांचा हातखंडा होता. विषय प्रतिपादनाची शैली तर त्यास इतकी अचूक जमली होती कीं, कोणताही विद्वान असला तरी ती पाहून, ती पुढें तो आपली मान तुकवीत असे. मातोश्री जीवम्मा तर मधुर कंठानें अनंतशास्त्री सांगत असलेले मनोरंजक पुराण ऐकून संतोष सागरांत बुडून जात असे. आपला ज्येष्ठपुत्र गुरूनाथ यांस ती " गुरूनाथा, अनंत हा आमच्या घराण्यांतच अत्यंत विद्वान आहे. आपल्या विद्येनें तो घराण्याची

कीर्ति वाढवीत आहे. आतां त्याचेसाठीं अनुरूप व सुशील कन्या पाहून लवकरच त्याचा विवाह केला पाहिजें. आपल्या मुलाचे आपल्या डोळ्यादेखत दोहोचे चार हात झाल्याचें पाहण्यांतच मातेला खरें समाधान वाटत असते. जगरूढीप्रमाणें जीवम्मास तसें वाटल्यास त्यांत गैर तें काय ?

गुरूभट्टही त्याच विचारांत होते. त्यांतच मातेच्या ममत्वपूर्ण आग्रहाची भरीत भर पडली, त्यामुळें ते आतुरतेनें कन्येचा शोध करूं लागले. अनंतशास्त्री विव्दान् असल्यानें कुटूंबाचा भार त्यांना सहज पेलण्यासारखा होईल व एकंदरींने कुटुंबाचें कल्याण होईल असें संसारीदृष्टीनें मानून, अनंतशास्त्र्यांचे हितचिंतकही त्या खटपटीत लागले. असा विद्वान् जावई मिळणें दुरापास्त. यंदा कर्तव्य आहे एवढा बोभाटा होतांच मुलींचे बाप हेलपाट्यावर हेलपाटे घालूं लागले.

अशा रीतीनें आपल्या आप्तेष्टांनी चालविलेली आपल्या लग्नाची धमाल पाहून अनंतशास्त्र्यांना जर या सर्वांनी आपल्याला प्रपंचांत डांबणेचें ठरविले तर स्वकीयांच्या इच्छेविरूध्द यांतून कसें पार होतां येणार अशी विवंचना यांस लागली. विश्वकुटुंबाचा प्रपंच करण्याचा त्यांचा पिंड असल्यानें यांत त्यांचे समाधान तरी कसें होणार ? भक्तांचे सांकडे निवारणारा एकमेव परमेश्वरच. यानेंही अनंतशास्त्र्यांच्या अंगी तीव्र वैराग्य निर्माण व्हावें व त्यांचा देहाभिमान समूळ नष्ट व्हावा म्हणूनच की काय याच सुमारास त्यांच्या हातावर, पायावर श्वेतकुष्ठाचा प्रादुर्भाव निर्माण केला. अनंतशास्त्र्यांना तर आनंद झाला व त्यांनीं सुटकेचा निश्वास सोडला.

इकडे तर अनंतशास्त्र्यांच्या पांडित्य प्रतिभेवर भाळून कर्नाटकस्थ कन्यापितृवर्गात आपली कन्या त्यांना देण्याबाबत अहमहमिका लागली होती. गुरूनाथभट्टांनी एक दोन कन्या पाहिल्या व वधूवरांच्या नक्षत्रावरून गुणमेलन उत्तम प्रकारें जुळून येत असल्याचेंही दिसून आल्यानें, गुरूनाथभट्ट आतां आपले लग्न जमविल्याशिवाय रहात नाहींत असें दिसतांच, अनंतशास्यांनीं घरच्या लोकांस आपले कोड दाखविलें व आपले लग्न करूं नका अशी विनंती केली. मी रोगाचे निवारण व्हावें म्हणून कोठे तरी अनुष्ठानास जातो असें ते म्हणूं लागले, पण घरच्या लोकांनी तें ऐकलें न ऐकल्यासारखें केल्यानें अनंतशास्त्र्यांनीं मुलगी देऊं इच्छिणाऱ्या वधूपित्याकडे आपल्या मित्राबरोबर मला कोड आहे. तुम्ही मला मुलगी देऊं नका. लग्न न करण्याचा माझा संकल्प आहे असें सांगून पाठविलें. तसेच भावाकडून त्यांना बोलावून घेऊन जाण्यास आलेल्या आपल्या मित्रासही आजन्म ब्रम्हचारी रहाण्याचा आपला दृढ निश्चय झाला आहे असें सांगून टाकले. हे ऐकून मित्र आश्चर्यचकित झाला. व त्यास परोपरीनें '' हा तुझा हेका सोड. तुझी आई व भाऊ यांची तूं लग्न करून सुखांने संसार करावा अशी इच्छा आहे. वडील मंडळींच्या आज्ञेचें उल्लंघन करून त्यांना निराश करणें तुझ्यासारख्या धर्ममार्तंडास शोभत नाहीं. वृध्द मातोश्रींना व 'जेष्ठ भ्राता पितु: सम:' या न्यायानें जेष्ठ बंधूस न दुखवितां आनंदित करणें हे तुझें उचित कर्तव्य ठरते'' असा उपदेश केला. अनंतशास्त्र्यांनींही ''तुम्ही सांगता तें ठीक आहे. पण इंद्रियसुख हे मृगजळाप्रमाणें विनाशी आहे व आत्मसुख हें अविनाशी आहे. मग त्याला आंचवणे म्हणजे आत्मघातच नव्हे काय ? विषयव्यामोहाला बळी पडल्यास अनीति वाढते व कर्तव्यच्युति पदरीं येते. एकदां का या संसारचक्रांत

सांपडलो तर परमात्म्याकडे व पर्यायानें परमार्थाकडे लक्ष देण्यास बिलकूल वेळ मिळणार नाही. या जगांत बायकांमुलांपासून सुख लाभावें म्हणून मनुष्य रात्रंदिवस खटपट करतो आणि त्या आशेवर व्यर्थ राबराबून शिणतो. इतकें करून शांतिसुख लाभत नाहीं ते नाहीच. माझ्या मनानें श्रीसमर्थ रामदासांप्रमाणे अखंड ब्रम्हचर्य व्रताचे पालन करून, आत्महित साधण्याचा व सतत लोकसेवा करण्याचा मी संकल्प केला आहे. म्हणून माझ्या लग्नाच्या उसाभरीत तुम्ही कोणी पडू नका. एवढेंच नव्हे तर माझ्या घरच्या मंडळींसही तसें सांगा'' असें निक्षुन सांगितलें. याप्रमाणे सांगितलेले त्यांचे दृढनिश्चयाचें बोलणें ऐकून मित्र सर्द झाला व निरूपाय होऊन परत गेला. गुरूनाथभट्टांकडे येऊन त्यानें अनंतशास्त्र्यांचा अभिप्राय त्यांस कळविला. या पूर्वींच लोकांच्या तोंडून ऐकून अनंतशास्त्र्यांच्या वैराग्यवृत्तीची जाणीव गुरूनाथभट्टांस झालीच होती. आतां पुन्हां तीच हकीकत ऐकून ते मनांतून खिन्न झाले. तरी पण आपण स्वत: एकदां अनंतशास्त्र्यांकडे जाऊन प्रयत्न करून पहावा असा त्यांनीं निर्धार केला.

अनंतशास्त्री हे विद्यार्जनाकरतां घरांतून बाहेर पडून, आपल्या अलौकिक बुध्दिसामर्थ्यानें सकल सद्विद्या संपादन करून, '' सा विद्या विमुक्तये'' या उक्तीतील खऱ्या अर्थानें निश्चितपणे भगवंताच्या ध्यानांत मग्न होऊन, मुक्तिमार्ग अनुसरीत असल्याचें त्यांच्या आप्तेष्ठ बांधवास रूचलें नाही. गुरूनाथभट्ट तर आपला अनंत पंडित झाला असून त्यानें मानसन्मानही गांठीं बांधला आहे, उज्वल कीर्तिशाली बनून त्यानें घराण्याच्या लौकिकांतही भर घातली आहे, आतां अविलंबेकरून अनुरूप वधू पाहून त्याचें एकदां लवकर लग्न उरकले म्हणजे घराण्याचे कष्ट नाहीसें होतील, या विचारानें त्याच प्रयत्नांत गुरूनाथभट्ट गर्क झाले होते. अनंतशास्त्री हे केवळ आपल्या घराण्याची कीर्ति वाढविण्यासाठीं अवतरले नव्हते तर जगन्नियंत्या परमेश्वराच्या कीर्तीच्या पताका फडकविण्यासाठीं अवतरले होते याची त्या बिचाऱ्यांस कशी कल्पना येणार. इकडे अनंतशास्त्र्यांना आपले अग्रज गुरूनाथभट्ट हे स्वत: आपल्याकडे लग्नाबाबत येत आहेत अशी वार्ता समजली तेव्हा ते विचारमग्न झाले. कारण शास्त्री त्यांस पित्यासमान मानीत. त्यांच्यासमोर ते कधीं उभे रहात नसत. मग बोलण्याचें दूरच. आजवर शास्त्र्यांनीं त्यांची आज्ञा कधींच उल्लंघिली नव्हती. अशा स्थितीत मी लग्न करून घेणार नाही हे स्पष्टपणें त्यांच्या तोंडावर कसें सांगावयाचें असा पेच त्यांच्या पुढे उभा राहिला. मनोनिश्चयापासून ढळणें हे तर त्यांच्या बाबतींत शक्यच नव्हते. अशा रीतीनें दोन्हींकडून कात्रींत सांपडून ते काळजी करूं लागले.

वडील बंधूंच्या आग्रहाखातर जर मी एकदा विवाह बंधनात आडकलों तर माझे सगळे ईप्सित कार्य मातीत मिळेल व आमरण घर व संसाररूपीं कारागृहांत खितपत पडावें लागेल. पूर्वी देखील श्रीसमर्थ रामदास यांनीं आई व वडीलभाऊ यांच्या मोहपाशांत न अडकतां, तो झुगारून, घरातून पळून जाऊन, आपल्या अचाट तप:सामर्थ्याच्या जोरावर, प्रत्यक्ष श्रीरामप्रभूला प्रसन्न करून घेतलें. त्याच्याच कृपाप्रसादानें कर्म, भक्ति व ज्ञानप्रबोधक असा श्रीमत् दासबोधासारखा ग्रंथ त्यांनी रचला एवढेंच नव्हे तर मुसलमानी अमलाच्या काळी संध्या, अग्निकार्य, वेदाध्ययन, भिक्षा मागून पोट भरणें वगैरे ब्रह्मचर्याश्रमांतील नियमांचे विधिपूर्वक पालन करीत सर्व भरतखंडाचा पायीं प्रवास त्यांनीं केला. प्रवासांत परिस्थितीचें सम्यक्ज्ञान करून घेऊन, जनता जनार्दनास सध्दर्माचा उपदेश करून, त्यांनीं सर्व भरतखंडात जागृति निर्माण केली. त्यांना जर तें

साध्य होऊं शकलें तर मला कां तें करतां येणार नाहीं. मोहपाशांत न गुरफटणें हेंच आपलें आद्य कर्तव्य ठरतें. त्या कर्तव्याचें पालन करून आत्मकल्याण तर साधावेच व शक्य तेवढी जनसेवा करावी असें त्यांनी मनांत ठरविलें.

दुसरे दिवशीं अनंतशास्त्र्यांनी बेलधडींत राहणाऱ्या वेदमूर्ति महादेवभट्ट हरलापूर या आपल्या मित्रास बोलावून माझे पूज्य वडीलबंधू मला हुडकत येत आहेत. लग्नाची गळ घालण्यास येत आहेत. तरी तुम्ही त्यांना अनंत हा आतांच लग्न करून घेत नाहीं म्हणत आहे. कारण देहांत असह्य कुष्टरोग उत्पन्न झाला आहे. प्रथम हरप्रयत्नानें तो नाहींसा करून मग लग्नाचा विचार करीन. रोग निर्मुक्त होईपर्यंत सर्वथा लग्न करणार नाहीं. असें तो स्पष्ट म्हणतो असें तुम्ही त्यांना सांगा असें त्यांस बजावलें दुपारचे जेवण होतांच कोणालाहि न सांगतां अनंतशास्त्री तेथून निघाले ते बेलधडी जवळ असलेल्या कपत डोंगरावर आले.

तेथें त्यांनीं एक गुहा पाहून ती स्वच्छ केली व तेथें एकांतात भगवद्‌चिंतन करीत ते वास करूं लागले. इकडे गुरूनाथभट्ट कन्या पाहण्यास अनंतशास्त्र्यास समक्ष घेऊन जावें म्हणून बेलधडीस आले व शास्त्र्यांचा शोध करूं लागले. ही बातमी समजताच महादेवभट्ट हरलापूर यांनीं, गुरूनाथभट्टास भेटून शास्त्र्यांनी पढविल्याप्रमाणें सर्व हकीकत त्यांस सांगितली. अनंत कोठें गेला आहे असें त्यांनीं महादेवभट्टास विचारलें. कारण आपली समक्ष गांठ पडल्यावर तो नाही म्हणणार नाहीं अशी त्यांना फोल आशा अजून वाटत होती. महादेवभट्टांनी काल दुपारी जेवण झाल्यानंतर कोणालाहि न सांगतां अनंतशास्त्री नंतर जे निसटले ते कोठें गेले हें मात्र समजलें नाहीं असें जेव्हां सांगितलें, तेंव्हा तें ऐकून गुरूनाथभट्ट मनांत खेद करीत निरूपायानें घरीं परत गेले.

अनंतशास्त्री हे त्या घोर अरण्यांत कपत डोंगरावर अनुष्ठान करीत एक दोन महिने राहिले. ब्रह्मचर्याच्या कडकडीत पालनानें मानवांत चैतन्य, पावित्र्य, बल, शक्ति, स्वावलंबन वगैरेंचा उद्‌भव होतो, दुःखाचा व दारिद्र्याचा नाश होतो, पुण्यसंचय होऊन पापाचा नाश होतो. यामुळें आरोग्य, आनंद, चित्तशुध्दी व आत्मबल प्राप्त होते. वरील सर्व प्रवृत्तींचा समुच्चय झाल्यानें अनंतशास्त्री तेजःपुंज दिसूं लागले. असा क्रम चालला असतां एके दिवशीं पहाटे त्यांस एक स्वप्न पडलें. एक तेजःपुंज ब्रह्मचारी त्यांच्या स्वप्नांत आला व त्यांनें ''नुसती चिंता करीत येथें बसण्यापेक्षां येथून जवळ असलेल्या वेंकटापूरला तूं निघुन जा. तेथें जाऊन श्रीवेंकटपतीची सेवा कर म्हणजे तुझी सर्व अंतिम काळजी दूर होईल. तेही निर्जन व एकांतस्थळ आहे. तेथें गेल्यास तुझें कार्य होईल यांत मुळींच संशय नाहीं'' असें सांगितले. अनंतशास्त्री तत्क्षणींच उठून, आश्चर्य चकित होऊन गुहेंतून बाहेर आले. चोहोंकडे त्यांनीं दृष्टिक्षेप केला व रोजची उठावयाची वेळ झाली आहे असें जाणून, त्या कमलापतीच्या अपार कारूण्याची प्रशंसा करीत त्यांनीं प्रातःस्मरणास प्रारंभ केला. व त्याच दिवशीं वेंकटापूरला जाण्याचा त्यांनीं निश्चय केला.

अनंतशास्त्री जन्मास आले तेच मुळीं महान् भगवद्‌भक्त म्हणून जन्मास आले. मानवास मोठेपण प्राप्त करून घ्यावयाचे झाल्यास प्रथम त्यास स्वतःची भूमिका तयार करून घ्यावी लागते. यांच्याबाबतींत ती

तयारच होती. मग त्यांना संसारात पदार्पण करून जगरहाटीप्रमाणें संसार शृंखला पायात अडकवून घेऊन त्यातच जखडून राहण्यात स्वारस्य वाटलें नाहीं यांत काय नवल. आजन्म ब्रम्हचारी होऊन देहाचें सार्थक करून घेणें हेच त्यांचें उद्दिष्ट असल्यानें संसारिक बंधनाच्या कल्पनेनें त्यांस काय यातना त्यावेळीं झाल्या असतील याची यथार्थ कल्पना या दुःखद संसारात सुख मानून त्यांत रमणाऱ्या आम्हा पामरास कशी येणार. यांतील इंगित थोर महात्मेच फक्त जाणू शकतील. वैराग्य सुंदरीशीं लग्न झालेल्या अनंतशास्त्र्यास प्रापंचिक सुखाचा कंटाळा येणें व तिकडे त्यांनीं मनोनिग्रहानें पाठ फिरवणें हेंच स्वाभाविक होय. नजरे समोर राहिल्यास घरच्या लोकांना आपल्या लग्नाचा मोह आवरणार नाहीं हें पक्कें जाणून त्यांनीं गुरूनाथभट्टास गुंगारा दिला व कपत डोंगरावर ते एकांतात जाऊ राहू लागले. तेथील काळात आपण करीत आहों हें बरें कीं वाईट असें मधुन मधुन मनांत येऊन कदाचित् त्यांची मति दोलायमान होत असेल व त्यामुळें आपल्या हातून हें कसें काय निभेल अशी काळजीही त्यांचे मनांत मधून मधून डोकावत असेल. ती दूर व्हावी व मूळ विचारास पुष्टी मिळून त्याला चालना मिळावी म्हणून तर भगवंतानें ब्रह्मचारी वेषानें स्वप्नांत येऊन त्यास मार्गदर्शन करून उत्साह भरित केलें असेंच मानणें प्राप्त आहे. अखेर भगवंताचें पाठबळ मिळतांच, पूर्ण निश्चय करून ते एक दिवस वेंकटापूर क्षेत्रीं दाखल झाले.

**॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण सातवें

## वेंकटापूरचा पूर्वेतिहास

पेशव्यांच्या कालापासून महाराष्ट्रात जिकडे तिकडे देसाई व देशपांडे यांची घराणीं विखुरलेलीं आहेत. त्याच प्रमाणें ती तेव्हांपासूनच बहुधा कर्नाटकात प्रत्येक गांवींहि आहेत. त्या काळांत हे लोक राजेलोकांना आपल्या कुवतीप्रमाणें मदत तर करीतच पण सहकार्यही देत असत. या कामगिरीबद्दल राजे लोक त्यांचा गौरव करीत व त्यांस पुष्कळ जमीनही देत असत. यांच्यापैकी पुष्कळांनीं कुलकर्णी व पाटीलकी वतनेंही मिळविली होती. ते सरकारची नोकरीही बजावीत असत. अशा तऱ्हेनें स्वातंत्र्याच्या काळांत मिळविलेले अगर पूर्वापार चालत आलेले व टिकवून धरलेले हे हक्क होते. १९ व्या शतकांतील नव्या स्वातंत्र्ययुगात या लोकांस त्या हक्कांस मुकावे लागले हा केवढा दैवदुर्विलास होय.

असो. धारवाड जिल्ह्यांतील गदग तालुक्यांत डंबळ या गांवीं देसायांचें एक अत्यंत प्रसिध्द घराणें होतें. येथील देसाई सदाचार संपन्न, देवद्विजांवर निष्ठा ठेवणारे, अत्यंत धार्मिक व भाविक असे होते. तसेंच ते अत्यंत दानशूर असल्याबद्दल त्यांची ख्याती होती. तिरूपती वेंकटेश हें त्यांचे कुलदैवत असल्यानें श्रीवेंकटपतीवर त्यांची अचल भक्ति व नितांत विश्वास होता. दररोज अनन्यभक्तीनें श्रीवेंकटेशाची ते पूजा करीत असत. त्या लक्ष्मीपतीच्या कृपाकटाक्षानें त्यांच्या दुरितांचें निवारण होऊन त्यांस अपार सुखसंपत्ती प्राप्त होऊन ती स्थिरावली असल्याचा त्यांचा दृढविश्वास होता. त्यामुळें ते दरवर्षी नवरात्रोत्सवाचे वेळीं भूवैकुंठ म्हणून मानलेल्या व प्रसिध्द असलेल्या श्रीतिरूपतीच्या दर्शनास न चुकतां नेमानें जात असत. कसल्याही कठीण परिस्थितींत सुध्दां त्यांनीं आपल्या परिपाठांत खंड पडू दिला नव्हता. असें असतां कालमानानें देसाई यांस वृध्दापकाळानें घेरले. त्यामुळें त्यांचें देहस्वास्थ नाहींसे झाले. आणि याच कारणानें एके वर्षी त्यांना तिरूपतीस जातां आले नाहीं. त्या काळीं गोविंदराजपट्टणापर्यंतच बैलगाडीनें जातां येत होते. तेथून पुढे पायीं डोंगर चढून तिरूपतीस जावें लागत असें. त्यामुळें प्रवासाचे फार कष्ट सोसावे लागत असत. त्यासालीं श्रीनिवासाचें दर्शन घडले नाहीं ही गोष्ट देसायांचे मनास फार लागली. ते अस्वस्थ झाले व त्यांनीं तिरूपती श्रीवेंकटेशाचें दर्शन झाल्याखेरीज अन्नग्रहण करणार नाहीं अशी घोर प्रतिज्ञा केली. आणि सर्व जगाचे रक्षण करणाऱ्या श्रीवेंकटपतीची सेवा कांहीं एक न खाता न पिता करण्यास त्यांनीं सुरवात केली. ''देवाधिदेवा, या तुझ्या पामर भक्ताला या सालीं तूं आपल्या दर्शनापासुन कां वंचित केलेस ? या भक्तसेवकाचा असा कोणता अपराध तुझ्या दृष्टोत्पत्तीस आला कीं ज्यासाठी तूं त्याचा अव्हेर केलास, तें तरी सांग. या उप्पर तूं दर्शन देणार नसशील, तर प्रायोपवेशन करून प्राणत्याग करीन'' अशी तळमळ व्यक्त करणारी धमकीही त्यांनी वेंकटपतीस दिली. व त्याप्रमाणें ते आचरणांत आणून रात्रंदिवस त्याचे अखंड ध्यान चालूं ठेवले.

भगवंत हा भक्ताभिमानी आहे. भक्ताच्या अंतरीची तळमळ त्याला एकदां पटली म्हणजे तो त्या भक्ताची क्षणभर देखील उपेक्षा करीत नसतो. भक्तवत्सल हें त्याचें ब्रीद आहे. भक्ताचे संकट निवारण्यास तो सर्व कामें बाजूस ठेऊन उत्सुकतेनें धांव घेतो अशी ख्याति आहे. मग हे तर भक्तावर ओढवलेलें प्राणसंकटच. अशा वेळीं

कसा बरें तो न येतां राहील ! तसें झाल्यास भक्त लोकांनी त्यास दिलेली कृपानिधी, करूणासागर, वगैरें संबोधनें फोल ठरतील.

भक्तोत्तम देसाई यांची तळमळीची हांक ऐकून देसाई यांचेवर अनुग्रह करण्याकरितां तिरूपती श्रीवेंकटेशानें धांव घेऊन स्वप्नांत त्यांना दर्शन देऊन "भक्तश्रेष्ठा ! दर्शन न घडल्याबद्दल रंजीस होऊं नकोस. वार्धक्यामुळें तुला दर्शन घडू शकले नाहीं, उत्तरोत्तर तेंथवर येण्याचे परिश्रम तुला झेंपणार नाहींत हे जाणून, तुला नित्य दर्शन घडून तुझी तळमळ शांत व्हावी या उद्देशानें तुझ्याच गांवच्या उत्तरेकडील डोंगरपठारावर मी येऊन राहिलो आहे. मी अशा ठिकाणीं आहे की माझ्यावर उकिरडा माजला आहे. तरी पण माझ्यावर रोज गोक्षीराभिषेक होत असतो." असें सांगितले. तसेंच तो उकिरडा काढवून स्वच्छ केला असतां त्या ठिकाणीं वनमाला विभूषित अशा माझ्या सुंदर मूर्तीचे तुला दर्शन होईल. नंतर माझी पूजा करून नैवेद्य समर्पण कर व प्रसादाचा स्वीकार करून पारणे सोड. यापुढें तुझें कल्याण होईल" अशा तऱ्हेचे बोलून व आशीर्वाद देऊन भगवंत गुप्त झाले.

स्वप्नांत दिसलेली ही मनमोहक मूर्ती अदृश्य होतांच देसाई यांस जाग आली. आनंदातिहर्षानें त्यांचें अंग रोमांचित झालें. भगवंताच्या दयाळूपणाचें व भक्तप्रेमाचें प्रत्यंतर आल्यानें देसाई भगवंताचें गुणगान करूं लागले. गदग तालुक्यांतील सोरटूर गांवीही देसायांच्या जमिनी, घर व उत्पन्न असल्यानें केव्हां देसाई सोरटूरांतही मुक्काम करीत असत. ही घटना घडल्यावेळीं त्यांचा मुक्काम सोरटूर गांवीं होता. येथें त्यांचा एक सुंदर भव्य वाडा होता. गोशाला, घोड्यांची पागा, गाडीखाना वगैरे त्यांच्या घराण्याच्या ऐश्वर्याची प्रतीकें तेथें होतीं. देसायांच्या जमिनींची क्षेत्र सीमा डंबळपासून सोरटूरपर्यंत होती. सोरटूर येथील जमीन सुपीक असल्यानें फार करून देसाई येथेंच रहात असत. कारणपरत्वें ते डंबळला जात असत. आता भगवंताचा शोध कुठें व कसा करावयाचा या एकाच विचारानें त्यांचे मन व्यग्र झाले होते. थोड्याच वेळांत उजाडले. सहस्त्ररश्मीनें आपल्या मंगलप्रद कोमल किरणांनी पूर्व दिशा उजळून टाकली. देसायांनीं प्रातर्विधी आटोपला व श्रीनिवासाच्या शोधार्थ बाहेर पडावे असा विचार मनांत चालूं असतांनाच आणखी एक घटना घडली.

या देसायांच्या घरीं दुभत्या गाई पुष्कळ होत्या. त्यांवर देखरेखीस एक स्वतंत्र गडी होता व त्या गाईंची जोपासनाही तो उत्तम प्रकारें करीत असे. हिंदूना गाई म्हणजे देवतास्वरूप व अखिल जगाला आपल्या अमृतोपम दुग्धधारांनी तृप्त करणाऱ्या गायी मातृस्वरूप. परोपकार या एकमेव दृष्टिकोनांतून विचार केला तरी गोमातेला मानवाच्या हितासाठींच परमेश्वरानें जन्माला घातली असली पाहिजे असें दिसतें. या सुमारास शेकडों दुभत्या गाईपैकीं एक गाय नुकतीच व्याली होती. पण व्याल्या दिवसांपासून ती धारच देत नसे व वासरासही पाजीत नसे. असें कां घडते याचा उलगडा कोणासच होईना. घरची मालकीण मात्र स्त्रीस्वभावानुसार त्या गरीब बिचाऱ्या गुराखी नोकराचा संशय घेऊन त्यास बोलत असे. इतर गाईंबरोबर ती गाय रानांत गेली म्हणजे मात्र सगळ्या गाईत न मिसळतां डोंगरपठारावरील एका उकिरड्याच्या आसपास चरत असते हें त्याच्या ध्यानांत आल्यानें एक दिवस तो त्या गाईच्या पाळतीवर राहिला. त्या दिवशीं सायंकाळीं ती गाय उकिरड्यावर उभी राहून चारी स्तनांतून दुधाच्या धारा त्यावर सोडीत असलेली त्यास दिसली तें पाहून तो आश्चर्यचकित झाला. व ही हकीगत यजमानांना कळविण्याचें त्यानें ठरविले. दुसरे दिवशीं गाई चारण्यास घेऊन जाण्यापूर्वी यजमान

श्रीनिवासाच्या शोधार्थ जाण्याचा विचार करीत बसले असतां तो गडी देसायांजवळ गेला व मुजरा करून ''मालक, जी गाय व्याल्यादिवसांपासून घरीं कोणासही दूध देत नाहीं व वासरासही पाजीत नाहीं ती रानांत गेल्यावर आम्ही शेण गोळा करण्यास हिंडू लागलो कीं तेथील उकिरड्यांतील वारूळावर दुधाच्या धारा सोडीत उभी राहते असें काल दिसून आलें आहे. आजपर्यंत हा सुगावा न लागल्यानें राजे मालकीणबाईंची बोलणी मला खावी लागत असत. त्यामुळें त्याच शोधांत असलेल्या मला काल आकस्मिकपणें ही घटना दिसली. रानांत गेल्यापासून इतर गाईत न मिसळतां ती गाय उकिरड्याच्या आसपास चरत होती व सायंकाळ होतांच वारूळावर जाऊन उभी राहिली व दुधाच्या धारा सोडूं लागली. हें मी समक्ष पाहिले असल्यानें, आपल्यास कळविणेंस आलो आहे. माझ्या सांगण्यावर विश्वास बसत नसेल तर माझ्याबरोबर समक्ष रानांत येऊन स्वत: पाहून खात्री करून घ्यावी'' अशी विनंति करून पुन्हा एकवार मुजरा करून तो उभा राहिला.

स्वप्नांतील हकीकतीची सत्यता कशी पडताळून पहावयाची म्हणून चिंतामग्न झालेल्या देसायांची काळजी गुराख्याचें हें बोलणें ऐकून नष्ट झाली. त्यांना कमालीचा आनंद झाला व मी तुझ्याबरोबर रानांत येतो, जरा थांब असें त्यांनीं गुराख्यास सांगितलें. भगवंताच्या दर्शनास स्नान न करतां जाणें योग्य नव्हे असें ठरवून घाईगडबडीनें त्यांनीं स्नान उकरलें. संध्यावंदनादि आन्हिक आटोपून, नारळ, फुलें, फळें वगैरे सामुग्री बरोबर घेऊन, जनावरें हांकून नेणाऱ्या गुराख्याबरोबर ते डोंगराकडे गेले व गाईची लीला पाहण्यासाठीं म्हणून तिच्यावर पाळत ठेऊन, एका बाजूस झाडाचे सावलींत बसून राहिले. ती गाय एकसारखी वारूळाजवळ चरत होती. व वेळ होतांच वारूळावर दुधाच्या धारांच्या अभिषेक करीत उभी राहिलीं. तें पाहून भाविक देसायांना आनंदाचे भरतें आले. श्रीव्यंकटपतीनें स्वप्नांत दर्शविलेली क्षीराभिषेक होत असलेली हीच जागा अशी त्यांची खात्री झाली. लागलीच त्यांनीं गड्यास तें वारूळ व तो उकिरडा सावकाश खणण्यास व बाजूस करण्यास सांगितलें. त्या उकिरड्याच्या तळाशीं लहानसा एक काळा दगड लागतांच खणण्याचें त्यांनी बंद करविलें व तो दगड आजूबाजूनें हळुवारपणें मोकळा करवून घेतला. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, देसायांना त्या दगडावर रेखांकित श्रीनिवासाची आकृती दिसली. एवढेंच नव्हें तर त्यावर मनोहर फुलांची वनमालाहि टवटवीत स्थितींत असलेली आढळली. देसायांना परमानंद वाटला. वर खताचा एवढा ढीग असून देखील त्या खालीं टवटवीत फुलांची माला सांपडलेली पाहून देसायांच्या डोळ्यांत आनंदाश्रू डंवरले. भगवंताच्या अगाध लीलेचें कौतुक करीत ते आनंदानें नाचूं लागले. स्वयंभू मूर्तीच्या दर्शनानें देसायांचा उत्साह दुणावला. ती सगळी जागा त्यांनीं स्वच्छ करवून घेतली. आणलेल्या सामुग्रीनें श्रीवेंकटपतीची पूजा करून श्रीफळ समर्पण केले व फळांचा नैवेद्य दाखविला. नंतर कापूर आरती ओवाळून साष्टांग नमस्कार करून, हात जोडून प्रार्थना केली. ''देवा, मला तुझ्या दर्शनास येतां आलें नाहीं म्हणून जेवणखाण सोडून रात्रंदिवस तुझ्या दर्शनाचा ध्यास घेतल्यानें माझ्यासाठीं इतक्या लांबवर येऊन अशा स्थितीत मला दर्शन दिलेस हे केवढे माझ्यावर उपकार झाले. एवढेंच नव्हे तर दररोज या दीन भक्तास तुझी सेवा करतां यावी म्हणून तूं येथेंच वास्तव्य करण्याचें ठरविलेस या तुझ्या कारूण्यपूर्ण महतीची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे. खरोखर तुझ्या पुण्यतम दर्शनानें मी धन्य झालों आहे. ''अशा प्रकारें स्तुती करून, देसायांनीं तीर्थप्रसाद भक्षण केली व श्रीवेंकटपतीच्या अगाध महिम्याचें स्मरण करीत ते घरीं परतले.

देसायांनी पुढें त्या जागीं एक लहानसे घुमटीवजा देवालय बांधण्याची व्यवस्था केली. त्या वर्षाचा नवरात्रोत्सवहि विधिपूर्वक त्यांनीं तेथेंच साजरा केला. श्रीवेंकटपतीचा खर्च चालावा म्हणून तेथील आसपासच्या जमिनी त्यांनीं देवास नेमणूक करून दिल्या व त्या जमिनींची देखरेख कूडलगी मठाचे स्वामींकडे सोंपविली. बरेच दिवस त्या जमिनी त्यांचेकडे होत्या व उत्पन्नही मठाकडेच जमा होत असे.

सांगली संस्थानांत मोडणारा शिरहट्टी तालुका. त्या तालुक्याचें शिरहट्टी गांव सोरटूर पासून दोन मैलांवर आहे. सतराव्या शतकाचे अखेरीस गोविंदराव जोगळेकर नांवाचे महालकरी शिरहट्टीस होते. ते कालवश झाल्यावर त्यांची साध्वीपत्नी सखूबाई ही आपल्या एकुलत्या एक लहान कन्येस घेऊन श्री वेंकटपतीच्या सेवेसाठी श्रीवेंकटापुरास राहू लागली. तिनें स्वत:साठीं तेथें एक खोली बांधविली व त्यांत ती राहू लागली.

जरी तेथें छोटेखानी देवळाची उभारणी झाली, स्वयंभू श्रीवेंकटेशाचा बोलबाला झाला, श्रीवेंकटेशाच्या दर्शनास भक्तगण येऊं लागले तरी कोणालाही तेथें वस्ती करण्याची इच्छा होत नसे. एक तर तशी तेथें जागाही नव्हती व दुसरें म्हणजे देवस्थानाचे भोंवती भयानक अरण्य व डोंगर पसरलेले होते. आलेले भक्तगण श्रीपतीचे दर्शन घेऊन मुक्कामास जवळच्या सोरटूर, एलिसुरूंद अशा गांवीं जात असत.

देवस्थानाच्या आसपास झाडेंझुडपें असल्यामुळें भूतपिशाच्च व हिंस्त्रप्राण्यांचे जरी भय होतें तरी देखील सेवातत्पर सखूबाई मात्र मोठ्या धैर्यानें आपल्या मुलीसह आपलें उर्वरीत आयुष्य श्रीवेंकटेशाच्या सांनिध्यांत व सेवेंत घालविण्याचे ठरवून तेथें वास करूं लागली. ही साध्वी देवस्थानासाठीं गांवोगांव संचार करीत असे. व मिळालेले सर्व द्रव्य त्या भगवंतास समर्पण करीत असे. त्याचप्रमाणें श्रीपतीची सेवा करणेकरतां व दर्शन घेण्याकरतां आलेल्या भक्तांना यथाशक्ति मदतही करीत असे. अशा तऱ्हेनें साध्वी सखूबाईनें श्रीवेंकटेशाची सेवा बरीच वर्षे केली. तिची मुलगी जसजशी मोठी होऊं लागली तसतसे लोक सखूबाईस मुलीचें लग्न केव्हां, कोठें, कसें व कोणाशीं करणार असा बोचक प्रश्न विचारून भंडावीत असत. तेव्हां ती आपण आपल्या मुलीचे लग्न श्रीवेंकटपतीशींच लावणार आहे असें बेलाशक सांगून टाकून त्यांचीं तोंडे बंद करीत असे. या सखूबाईमुळेंच तेथें आलेल्या भक्तजनांना थोडा बहूत कां होईना आसरा मिळत असे. त्या देवालयाचें महाव्दार जें हल्लीं दिसत आहे, त्याला मूर्तस्वरूप देणारी सखूबाईच. तिनेंच तें बांधविलें. सखूबाई संचार करून जो निधी जमवीत असे त्यांतील कांहीं ती साठवून ठेवीत असे. तिनें तो सर्व निधी देवास समर्पण केल्यानें तिच्या अंतिम इच्छेप्रमाणें अद्यापही नंदादीपाची व्यवस्था त्या निधीच्या व्याजाच्या रकमेतूनच आजतागायत चालू आहे. सखूबाई केव्हां कालवश झाली व तिच्या मुलीचे पुढें काय झालें हा इतिहास जरी उपलब्ध होत नसला, तरी एवढें मात्र निश्चित कीं ज्यावेळीं अनंतशास्त्री दृष्टांतातील आदेशाप्रमाणें वेंकटापुरास गेले त्यावेळीं सखूबाई वारली होती व तिची मुलगी तेथें नव्हती.

**।। श्री सद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण आठवें

## श्रीव्यंकटेशसेवा व सद्‌गुरूसमागमाचा आदेश

श्रीवेंकटापूरचे अनंतशास्त्री हे एकांत प्रिय असल्यानें त्यांना परम शांत असें एकांतस्थळ पाहून खूपच आनंद झाला. तेथें पोचतांच त्या मंगलमय प्रभूचे दर्शन त्यांनीं घेतले. आपले तन, मन, धन त्यांनीं परमात्म्याचें चरणीं वाहिलें. त्याची कृपा संपादन करून घ्यावी या तळमळीनें अनन्य भक्तीनें भगवद्‌सेवा करण्यास त्यांनीं प्रारंभ केला.

प्रथमत: त्यांनी देवळाच्या आसपासची झाडे झुडपें सर्व नाहींशी करून, तेथील अितर अडगळ, दगड, काटेकुटे वगैरे आपल्या हातानीं बाजूस सारून जागा स्वच्छ केली व आराधनेस सुरवात केली. या ठिकाणी त्यांनीं केलेली तपश्चर्या घोर स्वरूपाची होती. वेंकटपतीच्या प्राप्तीसाठी त्यांनीं केलेलें तप किती उग्र होते याची थोडी बहुत कल्पना खालील विवेचनाच्या अवलोकनानें होऊं शकेल.

अनंतशास्त्री हे नित्य नेमानें पहाटें चार वाजतां उठत असत. नंतर घंटानाद करून भावनापूर्वक त्या श्रीपतीस जागृत करीत असत. त्यानंतर त्या परमेश्वराची मानसपूजा करीत असत. कारण मानस पूजेचें महत्व फार मोठें आहे. चित्त एकाग्र करण्याचे तें एक मोठें साधन आहे. नंतर पद्मासन घालून सुमारें तासभर एकाग्रता साधीत असत. त्यानंतर प्रातर्विधि उरकून पुष्करणींत स्नान करून, सूर्योदयापर्यंत जप करीत असत. सूर्योदय होतांच संध्यावंदन संपवून तांब्याच्या स्वच्छ भांड्यांत निर्मल उदक घेऊन स्वयंभू श्रीवेंकटेशाची भक्तिभावानें पूजा करीत असत. पूजा संपल्यावर थंडी, ऊन, पाऊस वगैरेंची पर्वा न करतां देवळाभोवती प्रदक्षिणा व नमस्कार घालीत असत. हा कार्यक्रम दुपारपर्यंत चालत असे. स्नान केलेल्या अंगावरील ओल्या वस्त्रानिशींच हें सर्व चालत असे. इतक्या कडक सोंवळ्याचा ते अवलंब करीत असत. दुपारपर्यंत ते वस्त्र अंगावरच वाळत असे. त्यावेळीं प्रदक्षिणेची वाट तर खडकाळ होती. अणकुचीदार दगडांनीं व काट्यांनीं भरलेली होती. त्यावेळीं सरळ चालणें देखील मुष्कील होते. आतां तेंथें फरशी झालेली आहे.

मध्यान्हीं सूर्य येतांच ते जवळच्या सोरटूर गांवीं जाऊन, मधुकरी मागत असत. ते पवित्र मधुकरी अन्न आणून पुष्करणींत बुडवून त्याचा भगवंताला नैवेद्य दाखवीत असत. त्यानंतर त्या मधुकरी अन्नाचे ते सेवन करीत असत. जेवण झाल्यावर देवळाच्या भोवतालच्या परिसराची साफसफाई करण्यांत कांहीं काल घालवून नंतर स्वच्छ हस्तपादप्रक्षालन करून श्रीनिवासासमोर बसून पुराण कथन करीत असत. भाविकपणानें सांगितलेले पुराण भावपूर्ण वठले नसते तर नवल वाटले असते. श्रीमद् भागवतपुराणावर त्यांची फार निष्ठा होती. संपूर्ण भागवत तर त्यांनीं सप्ताहाच्या रूपानें अनेक वेळां वाचले होते म्हणतात. भागवत् ग्रंथ तर त्यांचे संग्रही नेहमी असें. यावरून ते दुसरे पुराण कधींच वाचत नसत असा कोणी अर्थ करूं नये. मधून मधून ते रामायणही वाचीत असत. अनंतशास्त्री हे भक्तियुक्त अंत:करणानें जेव्हां पुराण सांगत असत तेंव्हा पक्षी देखील चिवचिवाट न करतां स्वस्थ बसत असत. यावरून अनंतशास्त्र्यांच्या मुखारविंदातून स्त्रवणाऱ्या वाक्‌सुधेचें प्रेमपान करण्याच्या उद्देशानें शुकशौनकादि ऋषीमुनीच या शुकसारिकादि पक्ष्यांच्या रूपानें तेथें येऊन बसत असल्याचा भास निर्माण झाल्यास त्यांत नवल तें काय ? हा पुराण प्रवचनाचा कार्यक्रम संध्याकाळपर्यंत चालत असे. सूर्यास्त होण्यापूर्वींच

पुन्हां पुष्करणींत स्नान करीत असत. व संध्यावंदनादि कार्यक्रम उरकून एक तासपर्यंत प्रदक्षिणा नमस्कार घालीत असत. हेंहि पुन्हा ओलेत्यानेंच चालत असें. त्यानंतर ते देवापुढें हात जोडून उभे रहात व विष्णु सहस्त्रनाम, रामहृदय, रामसहस्त्रनाम, रामगीता, ब्रह्मस्तुति, रामरक्षा वगैरे स्तोत्रें म्हणत मध्यरात्रीपर्यंत उभे रहात असत. जसजसे दिवस जाऊं लागले तसतसें त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागलें व देहभानही हरपूं लागलें. अशा रीतीनें स्तोत्रपाठ संपल्यानंतर श्रीनिवासाची पंचोपचार पूजा करून मंगलारती करीत असत. नंतर थोडेसें पाणी पिऊन झोप येईपर्यंत परमात्म्याचें पावनकर नामसंकीर्तन करीत. याप्रमाणें दिवसाकाठचा बराचसा भाग अदमासें वीस तास भगवत् सेवेंतच ते वेंचीत असत. यामुळें तसें पाहिलें तर त्यांच्या देहाला विश्रांतीच मिळत नव्हती जी मिळे ती अत्यंत अपुरी पडत असे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. होतां होतां भगवत् सेवेची आंच यास इतकी लागली कीं वेंकटापुरा पासून सोरटूर दीड मैल लांबीवर असल्यानें तेथें जाऊन मधुकरी भिक्षान्न घेऊन येण्यास जो तास, दीड तास वेळ लागतो, तेवढें तरी परमात्म्याचें सांनिध्य केवळ पोटाकरितां कां गमावावें असा विचार त्यांचे मनांत येऊ लागला. अखेर त्यांनीं मधुकरीस जाण्याचें बंद केलें व दूर्वांचा रस सेवन करून ते राहूं लागले. अशा तऱ्हेनें ते अखंड भगवत्सेवा निरत बनले. निस्सीम भगवद्‌भक्ति ती हीच. अविरत भगवत्सेवेंत रत झालेल्यांची स्थिती जलविरहीत माशांप्रमाणें होते. भगवंताचा विरह निस्सीम भक्तांच्या मनांत खळबळ निर्माण करतो.

मधुकरीस येणारे अनंतशास्त्री अलीकडे मधुकरीस येत नसल्याचें सोरटूर ग्रामवासी लोकांच्या कालांतरानें कां होईना लक्षांत आल्याशिवाय राहिले नाही. नंतर चवकशी अंतीं जेव्हां त्यांस अनंतशास्त्र्यांस श्रीवेंकटेशाचा तेवढाहि विरह सहन होत नसल्यानें ते मधुकरीस येत नाहींत असें समजलें, तेव्हां त्यांस त्यांचें कौतुक वाटलें. अशा उपवासवृत्तीनें भगवंताची सेवा करीत असलेल्या अनंतशास्त्रांना पाहून भाविक लोकांचे मन कळवळलें व ते आपण होऊन दुपारचे वेळीं सिध्दान्न त्यांचेकडे पोचवूं लागले. अनंतशास्त्री पुढें कांहीं काल अशा सिध्दान्नाचा स्वीकार करून अयाचितवृत्तीनें राहूं लागलें.

अयाचितवृत्ति म्हणजे कोणाकडूनहि, केव्हांहि कशाचीहि याचना न करतां दुपारचे वेळीं आपोआप जें कांहीं मिळेल तेवढ्याचाच स्वीकार करून रहाणें होय. ही वृत्ति अत्यंत खडतर असते. कारण दररोज दुपारचे वेळीं नित्य कांहीं मिळेल असा संभव नसतो. अनंतशास्त्र्यांनाहीं कित्येक दिवस उपोषण करून राहण्याचे प्रसंग मधून मधून वारंवार येत असत. अशा रीतीनें घडणाऱ्या उपवासाचे दिवशीं तर अनंतशास्त्री उलट अति उत्साहाने भगवत् सेवा करीत असत. अनंतशास्त्री हे स्वभावाने कोमल अंत:करणाचे असल्यानें, आपल्यासाठीं लोकांना व्यर्थ यातायात पडते हें त्यांस बरोबर वाटेना. आपल्यापासून कोणालाहि उपसर्ग पोंचूं नये म्हणून तर आपण एकांतवास पत्करला. मग आपल्यासाठीं त्यांस हा व्यर्थ त्रास कां ? लोक जे कष्ट सोसतात ते माझ्या पोटासाठीं कीं स्वार्थासाठीं ? यांत त्यांचा काय स्वार्थ असणार ? असे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले व त्यांनीं परमार्थसाधनेस ही भूक विघ्नकारी आहे असें ठरवून अयाचित वृत्तीचाहि त्याग केला व केवळ दुर्वांच्या रसाचें प्राशन करून श्रीनिवासाच्या सेवेंत ते अविश्रांतपणें मग्न होऊं लागलें.

पुढेंपुढे तर कोणाबरोबरही बोलणेंच त्यांनीं बंद करून टाकले. ते तेथें सेवेस आल्यापासून बऱ्याच लोकांशीं त्यांचा परिचय झाला होता. असे परिचित लोक केव्हां केव्हां त्यांचेकडे येत. या मौनाच्या काळांत तसा कोणी

येत असलेला दिसल्यास तें त्यास चुकवून कोठेंतरी दडी मारत असत. यांतील उद्देश एवढाच कीं, त्यांच्या मुखानें होत असलेल्या नामस्मरणांत खंड पडूं नये. अशी मौनवृत्ती धारण केलेल्या व अन्नोदक सोडून केवल साधनांत मग्न झालेल्या अनंतशास्त्र्यांना उत्तरोत्तर जनसंपर्काचा तिटकारा येऊं लागला. अनंतशात्र्यांनीं एकंदरीनें नऊ महिने घोर तपश्चर्या केली. त्यांतील शेवटच्या चार महिन्यांत तर कडुनिंबाचा रस प्रशान करून उग्र तप:साधना केली. नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रताचे परिपूर्ण पालन करून, काया, वाचा, मनानें केलेल्या अखंड सेवेमुळें श्रीवेंकटेश त्यांचेवर प्रसन्न झाला व अवघ्या नऊ महिन्यातच त्यानें त्यांचेवर अनुग्रह केला.

एके दिवशी सायंकाळी सकलसेवा संपवून, श्रीपतीसमोर बसून अनंतशास्त्र्यांनीं अत्यंत तळमळीनें करूणा भाकणेस सुरूवात केली. ''हे दयानिधे, आईचा विरह झालेले वासरूं ज्याप्रमाणें धडपडत असते त्याप्रमाणें तुझ्या दर्शनाकरतां रात्रंदिवस धडपडत असलेल्या या दीनदासाची अद्याप तुला दया येत नाही काय ? कदाचित् मी पापी असेन म्हणून तूं माझी उपेक्षा करीत असशील. मग अशा पाप्याला जन्माला तरी कां घातलेस ? अजामेळादि महापातक्यांचा तूं उध्दार केलास व पतितोध्दारक ही पदवी मिळविलीस. अशा तुला मीच एकटा एवढा जड झालों की काय ? तूं आपल्याला पतितपावन म्हणवितोस. जर तुला अनन्य शरण आलेल्या माझ्या सारख्या पतिताचा उध्दार करतां येत नसेल तर पतितपावन या पदवीला अर्थ तरी काय उरला ? सर्व लोक तुला भक्तवत्सल म्हणतात. पण माझ्यासारख्या भक्तीची अहर्निश चाललेली धडपड प्रत्यक्ष डोळ्यानें पाहून देखील तुझ्यांतील वत्सलता जागृत होत नाहीं. असें असतां मी तुला भक्तवत्सल असें कोणत्या तोंडानें म्हणावें बरें. कृपासागरा आज काय वाटेल ते झालें तरी तू मला दर्शन दिलेच पाहिजेस. जर तसे झाले नाही तर मी सर्वथा जगणार नाहीं.'' अशा प्रकारें दीनवाणीनें स्तुति करीत असतां त्याच्या भावनेचा इतका उद्रेक झाला कीं त्यांच्या मुखारविंदांतून गीर्वाण भाषेंतील स्तोत्र पंचक बाहेर पडले.

य:प्रादुरस्ति भवसागरत: स्वभक्तानुध्दर्तुमय रमयाचित वामभाग: ।
श्रीवेंकटाख्यपुरि शैलवनावकीर्णो तं वेंकटेशमनिशं हृदि भावयामि ॥१॥
यत्संनिधान महिमातियुद्यदग्रे पादुष्कृतात्मावरजा विभवा विभूति ।
श्रीस्वामितीर्थमपि विश्वपवित्र कीर्ति: तं वेंकटेशमनिशं हृदि भावयामि ॥२॥
यत्पादपंकजपरागसुबध्दचिता: ते पास्तपांसि परमेष्ठि मुखामहंती ।
देवै: प्रहृष्टमिह नोभ्युदयामि सूनं तं वेंकटेशमनिशं हृदि भावयामि ॥३॥
यत्संमुखे पिप्पलवृक्षराजो विराजते नागरिपोर्ध्वजश्च ।
व्दारे गजस्थानिलनंदसौध्दा तं वेंकटेशमनिशं हृदि भावयामि ॥४॥
लोकं समीक्ष्य कलिकालहतानुभावं श्रीशेषशैलमपि गञ्चुमशर्णुवन्तम्
श्रीविश्वमडगलवपु: प्रकटी चकार तं वेंकटैशमनिशं हृदि भावयामि ॥५॥

भावप्रेरित झालेल्या शास्त्र्यांच्या मुखांतून बाहेर पडलेले स्तोत्र इतके प्रभावी आहे कीं हे मंगलप्रद स्तोत्र जो कोणी पठण करून नित्य त्याचा भक्तियुक्त अंत:करणानें पाठ म्हणेल त्याच्यावर श्रीवेंकटेश प्रसन्न होऊन त्याच्या सकल इष्ट कामना तो पूर्ण करील यांत शंका नाहीं. अशा प्रकारें श्रीरमणाचें ठायीं चित्ताची एकाग्रता

करून स्तोत्र म्हणत असतां बसलेल्या ठिकाणींच अनंतशास्त्री निद्रेच्या आधीन झाले. शास्त्र्यांची ही करूणापूर्ण हांक ऐकून श्रीपतीला कळवळा आला व त्यांने भक्ताकडे धांव घेतली. अनंतशास्त्र्यांना स्वप्नांत दर्शन दिले. त्यावेळीं कोटिसूर्याच्या तेजानें तळपणारी, वनमाला धारण केलेली, रत्नखचित किरीट कुंडलें धारण केलेली, पीतांबरधारी, करकमलांत शंख, चक्र, गदा पद्म, वगैरे आयुधें असलेली, मुखकमलावर मंदहास्य प्रकट करीत असलेली दिव्य मूर्ति त्यांना दिसली. परम लोभनीय अशा त्या मूर्तीला पाहून अनंतशास्त्री आनंदभरित झाले व त्यांनीं स्वप्नसृष्टींतच भगवंताच्या कोमल चरणावर मस्तक ठेवून विनम्रपणें अनेकवार त्याम वंदन करून त्याचे मनसोक्त गुणगान केले.

भक्तवत्सल भगवंतानें त्यांना उद्देशून ''भक्तश्रेष्ठा, तुझ्या एकनिष्ठ अनन्य सेवेनें मी संतुष्ट झालो आहे. आतां तूं माझी सेवा पूरी कर. तुझी जी काय अिच्छा असेल ती सांग. मी खात्रीनें ती पूर्ण करीन.'' असें आश्वासन दिले व त्यांच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवला.

कुष्ठरोग निवारणाचे निमित्तकरून घराबाहेर पडलेल्या अनंतशास्त्र्यांनी काय बरें मागणें देवाजवळ मागितले असेल ? खरोखर कुष्ठरोगाचें निवारण व्हावे अशी त्यांची अिच्छा होती काय ? नि:संशय नव्हती. उलट त्यांच्यामतें ती इष्टापत्तीच होती. मागणें मागण्यास सुध्दां शहाणपण लागते. नाहींतर राजा प्रसन्न झाला व त्याच्याजवळ भक्कम चौपदरी मागितली असें व्हायचें. हा वेंकटेश तर त्रैलोक्याधिपती. येथे कसलीं कमतरता ?

ब्रह्मादि देवतांना देखील ज्याचे दर्शन परम दुर्लभ आहे अशा त्या मंगलमय व दिव्य मूर्तीच्या दर्शनानें व अति कोमल अशा करस्पर्शानें अंनतशास्त्र्यांचें हृदय भरून आले. ज्ञानज्योतीचा उदय झाला. शरीरावरील बाह्य कांति पवित्र झाल्यानें सतेज दिसूं लागली. परमात्म्याची ''तुझी अिच्छा असेल ते माग'' अशी कर्णमधुर वाणी ऐकुन अनंतशास्त्री मनांत विचार करूं लागले. रोगादि बंधनें देहालाच चिकटतात, आत्म्याला चिकटत नाहींत. आत्मा शुध्द आहे असें वेदांचे प्रतिपादन आहे. शरीर शुध्द नसते. ते प्रारब्धाधीन आहे. म्हणूनच पूर्वजन्मींच्या प्रारब्धकर्मानुसार त्याला दु:ख भोगावें लागते. माझ्या देहाला चिकटलेला हा कुष्ठरोग भगवंताच्या कृपेनें घालवितां येईल. पण मग केंव्हाना केंव्हां तरी तो भोगावा लागेलच. त्याकरितां पुन्हां जन्म घेण्याचा प्रसंग येणार. प्रारब्धभोग हा देवादिकांनाही चुकत नाहीं. ''कृतस्व कर्मणी भोगादेव क्षय:'' हें वचन खरें मानावयाचे झाल्यास प्रारब्ध भोगाचा तो भोगल्याशिवाय नाश होणेंच शक्य नाहीं. असें असतां, दुर्लभ असा साक्षात्कार मला लाभला असतां, आत्मोध्दाराची याचना न करतां देहास.प्राप्त झालेल्या क्षुद्ररोगाच्या निवारणाची मागणी करणें, म्हणजे कळून सवरून आत्मघात करून घेतल्यासारखे होईल. अतएव आत्मोध्दाराचीच विनंति करावयाची असा ठाम निश्चय करून अनंतशास्त्र्यांनीं श्रीनिवासास अनंतानंत नमस्कार करून म्हटलें 'हे करूणानिधे, या मायाजालांतून माझी मुक्तता कर. संसाररूपीं शृंखलांनीं जखडलेल्या माझी सुटका कर. जनन मरणाच्या फेऱ्यांत सांपडून तडफडणाऱ्या मला त्यांतून पार कर. तुझी चरणसेवा कदापि चुकणार नाहीं असें कर. अतिचंचल असें भ्रमराप्रमाणें सदा भटकणारे माझें मन तुझ्या पादारविंदीं सदा रममाण होईल असें कर. तुझ्या स्मरणाचा कदापि विसर पडणार नाहीं असें कर'' अशा प्रकारें सद्‌गदित अंत:करणानें त्यांनीं करूणापूर्ण याचना केली.

अनंतशास्त्री यांनी श्रीपतीकडे वरीलप्रमाणें जी मागणी केली ती आत्मोध्दाराचीच होती हे प्रिय वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. तशी मागणी होतांच श्रीपतीनें अत्यंत कळकळीनें ''हे भक्तोत्तम, सद्गुरू कृपेशिवाय आत्मोध्दार होणें शक्य नाहीं. आत्मज्योति तळपवून, सत्य वस्तूचे ज्ञान करून देऊन, सन्मार्गास लावण्याचे सामर्थ्य सद्गुरुशिवाय दुसरे कोणाचे नाहीं. सद्गुरूला नितांत शरण गेल्याशिवाय मुमूक्षूंचा उध्दार सर्वथा होणार नाहीं. गुरूकृपेला पात्र होणें हा आत्मोध्दाराचा महत्वाचा टप्पा आहे. तशी पात्रता प्राप्त करून न घेतलेल्यांचा उध्दार करणें मला साध्य नसल्यानें, तूं प्रथम सद्गुरूला शरण जा म्हणजे तुझ्या सकल कामना पूर्ण होतील'' असें सांगितलें. अशा प्रकारचें श्रीवेंकटेशाचे अभिप्राययुक्त वचन ऐकून अनंतशास्त्रींना वाईट वाटले. एवढा अनंतकोटिब्रह्यांडनायक श्रीनिवास आपल्याला सद्गुरूस शरण जा असें सांगून आपला अव्हेरच करीत आहे असा भाव अनंतशास्त्री यांच्या मनांत उमटल्याशिवाय राहिला नाही.

अनंत शास्त्री यांनी परमदीनपणानें पुन: एकवार श्रीरमणाच्या पायावर मस्तक ठेवले व ''हे दीनवत्सला, या जगाचे आदिकारण जो तूं त्या तुला सोडून मी आणखी कोणाला शरण जाऊ. हे दयानिधे, तूं च जर दुसरीकडे बोट दाखवून या दीन भक्ताची उपेक्षा करूं लागलास तर तो सद्गुरू तरी माझा स्वीकार कसा व कां करील ? मी सर्वस्वी तुझ्यावरच भरंवसा ठेवला असल्याने माझा उध्दार तूंच केला पाहिजेस,'' अशी त्राग्याची पण लडिवाळपणें विनंति केली. खिन्न होऊन दीनपणें भगवंताकडे पहाणाऱ्या अनंतशास्त्र्यांची करूणाजनक स्थिति पाहून श्रीवेंकटपतीनें आपल्या मृदमधुरवाणीनें अनंतशास्त्र्यांचे मनास शांति लाभेल व त्यांचे समाधान होईल अशा तऱ्हेनें सुरूवात केली.

''भक्तश्रेष्ठा, सद्गुरूचा महिमा अपार असतो. या जगांत सद्गुरूला दुसरी जोडच नाही. ब्रह्यादिदेव सुध्दां निरंतर सद्गुरूसेवेंत रममाण झालेले असतात. गुरू या शब्दांत गकार, रकार व उकार, यांचा अंतर्भाव आहे. 'ग' कार म्हणजेच सिध्दिदेवता, 'र' कार म्हणजे रूद्रदेवता. व 'उ' कार म्हणजे अगोचर, अगम्य अशी विष्णुदेवता. श्रीगुरू म्हणजे या तिन्ही शक्तिरूपी देवतांचा मिलाफ. गुरू हाच ईश्वर. गुरूचें सामर्थ्य एवढें असतें कीं, प्रत्यक्ष ईश्वरी जरी कोपला तरी गुरू भक्ताचे रक्षण करण्यास समर्थ असतो. उलटपक्षीं गुरू जर कोपला तर त्या भक्ताचे रक्षण ईश्वर देखील करू शकत नाही. गुरुला एकदा आपलासा केला की ईश्वर आपलासा झालाच. एवढ्याच साठीं गुरूला अनन्यभावानें शरण जा. तोच मार्ग दाखविणारा असतो. भक्तिभावानें गुरूची सेवा केली असतां सर्व ऋध्दि सिध्दी प्राप्त होतात. गुरूदेवतेच्या दर्शनानें तीर्थस्नान केल्याचें फळ मिळतें. गुरूभक्ति म्हणजे प्रत्यक्ष कामधेनुची प्राप्ती. गुरू संतुष्ट झाला कीं परमेश्वर आपोआप संतुष्ट होतो व ज्ञान विज्ञान सर्व कांहीं प्राप्त होते. भक्तिभावानें श्रीगुरूची आराधना कर. तुला नि:संशय आत्मज्ञान प्राप्त होईल. आतां अशा सद्गुरूचे तुला दर्शन कसें होईल अशी चिंता वाटेल. तरी काळजी करूं नकोस, तू येथून उत्तरेकडील काशी, गया, प्रयाग वगैरे पवित्र क्षेत्रयात्रेकरतां नीघ. लौकरच तुला सद्गुरूचें दर्शन होईल असा मी आशीर्वाद देतो. निम्म्या वाटेवरच तुला निश्चित सद्गुरूचे दर्शन होईल.'' असें सांगून गुरूची रूपरेखाही त्यांस दाखविली. भगवंताच्या मुखावाटें निघालेल्या अमृततुल्य वाणीचे कर्णपुटीने श्रवण करून संतृप्त होऊन उभ्या असलेल्या अनंताच्या मस्तकावर श्रीवेंकटपतीनें आपला वरद हस्त ठेवला व तो अंतर्धान पावला.

अनंतकोटि ब्रम्हांडनायक श्रीरमारमणाच्या सुमंगल, सगुण दर्शनानें अनंतशास्त्री आनंदसागरात पोहू लागले.

भगवंताच्या भक्तवत्सलतेचे कौतुक मनात चालू असताच त्यांच्या नेत्रावाटें अश्रू ओघळू लागले. भगवध्यान त्यास जाग आलेवेळी डोळे बाष्पाकुल झाले असल्यानें त्यांस स्पष्ट असें काहींच दिसत नव्हते. शरीर आनंदाने रोमांचित झाले होते व मन हर्षानें प्रफुल्लित झाले होते. स्वप्नांत का होईना, पाहिलेल्या त्या मनमोहक जगदीश्वराच्या दर्शनानें मोहित होऊन, त्याचें ध्यान मनांत करीत रोजच्यापेक्षां दुप्पट उत्साहानें अनंतशास्त्री कार्यप्रवण झाले. नित्याचे स्नानसंध्यादि आन्हिक त्यांनीं सारले. श्रीनिवासाची पूजा यथासांग करून दुपारपर्यंत प्रदक्षिणा, नमस्काराचा दैनंदिन कार्यक्रम चालू ठेवला. आज भगवंताला नैवैद्य दाखवून प्रसाद भक्षण करावा असा विचार करून शास्त्री सोरटूरला मधुकरीसाठी गेले. मधुकरी भिक्षान्न आणून, तें पुष्करणींत बुडवून, अत्यंत भक्तिभावानें त्यांनीं भगवंतास नैवैद्य दाखविला व त्या दिव्य प्रसादाचें भगवन्नामस्मरण करीत सेवन केले.

स्वप्नांत पाहिलेल्या भगवंताच्या त्या मनोहर मूर्तीचा त्यांस इतका ध्यास लागला कीं जागृतावस्थेंत देखील ती मूर्ति त्यांच्या मनोमंदिरांत ठाण मांडून बसली. सत्पुरूषांच्या व आम्हां पामरांच्या चित्तवृत्तींतील ठळक फरक तो हाच. आम्हां पामरांचे विषयासक्त झालेले चित्त क्षणभरसुध्दां भगवंत चरणीं स्थिर होत नाहीं व ते संसारांतील विषयाकडे धांव विनाप्रयास घेते. सत्पुरूषांची सकलेंद्रियें त्यांच्या आधीन असतात. त्यांच्यावर त्यांचा ताबा असल्याने ते आपले चित्त सदा सर्वदा सर्वेश्वराचे चरणीं सुलभपणें स्थिर करूं शकतात. इतकी चित्ताची तन्मयता त्यांस साध्य झाल्यानें सांसरिक विषयाकडे त्यांचे मन कदापि ढुंकून पहाण्यास तयार नसते. अशा रीतींने तदेकचित्त झालेले शास्त्री शिलामय मूर्तीपुढें एकाग्रतेनें टक लावून रोखून पहात, मनांतच त्याची स्तुतिस्तोत्रें गात, पुन: पुन: नमस्कार करीत बसले. अशा स्थितीतच जगचालक श्रीवेंकटेशाचे आदेशाप्रमाणें तीर्थयात्रेचे मिषानें सद्‌गुरूशोधार्थ निघण्याचा विचार त्यांनीं मुक्रर केला. व एक दिवस त्यांनीं तेथून प्रयाण केलें.

भाविकहो ! सद्‌गुरूच्या महतीचे यथार्थ स्पष्टीकरण करण्याचे या अज्ञ लेखकाच्या आंवाक्या बाहेरचे असल्यानें, त्याचे यथार्थ ज्ञान होऊन सद्‌गुरूची श्रेष्ठता समजून घेण्याचे दृष्टीनें श्रीगुरूचरित्रांतील श्रीगुरूगीतेच्या एकूणपन्नासाव्या अध्यायाचे त्यांनीं पारायण करावें अशी मी नम्र विनंति करतो व वानगीदाखल त्यांतील दोनच वचनें खालीं उद्‌धृत करतो.

शिवे क्रुध्दे गुरूस्त्राता, गुरौ क्रुध्दे शिवो न हि ।<br>
तस्मात्सर्व प्रयत्नेन, श्रीगुरूं शरणं व्रजेत् ।। १।।<br>
हरी रूष्टे गुरूस्त्राता, गुरौ रूष्टे न कश्चन ।<br>
तस्मात्सर्व प्रयत्नेन, श्रीगुरूं शरणं व्रजेत् ।। २ ।।

अशा सारखी अनेक वचनें दाखल करतां येतील. पण ही दोन सारसर्वस्व वाटल्यानें एवढीच दिली आहेत. जिज्ञासूंनीं समक्षांत त्या अध्यायाचें समजून पारायण करावे.

**।। श्रीसद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण नववे

## सद्गुरू भेटीसाठी प्रवास

मानवी शरीर, वाणी व मनाचे मालिन्य धुवून परमात्म प्राप्ति मिळवून देणारी अनेक साधनें आहेत. तीर्थयात्रा हेंही एक अशा तऱ्हेचें मुख्य साधन आहे. तीर्थयात्रा करण्यांत जशी भौगोलिक माहिती होऊन प्रेक्षणीय स्थळांचे दर्शन घडते त्याचबरोबर वेगवेगळ्या प्रांतांतील मनुष्यांशीं संबंध आल्यानें त्यांचे रीतिरिवाज व आचारविचार यांचे सम्यग्दर्शन घडतें. लोकांच्या आशा, आकांक्षांची तसेंच त्यांच्यांतील उणीवांची पूर्ण जाणीव होते. अनेक भाषा अवगत होतात. देशपर्यटन करीत असतांना वाटेंत अनेक अडचणी निर्माण होतात व त्यांस तोंड देण्याचें धैर्यही अंगीं बाणते. दुसऱ्यांच्या तशाच आपल्या चुका नजरेस येतात. दुसऱ्यांच्या चुकांकडे क्षमाशील वृत्तीनें पाहून आपल्या चुका सुधारणेस उत्तम संधि प्राप्त होते. अशा सर्व दृष्टीनें देशपर्यटन हें प्रभावी साधन असल्यानें, अध्ययन संपवून गुरूगृहांतून गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्यास परत येणाऱ्या स्नातकाला हें सर्व व्यवहारज्ञान तत्पूर्वीच प्राप्त होणें आवश्यक आहे. म्हणून तीर्थयात्रा ही विहित मानली गेली होती.

पवित्र तीर्थांत स्नान केल्यानें शरीरांतील सर्व आळस नाहींसा होऊन मन पवित्र होते. वेगवेगळ्या क्षेत्रांतील दिव्य मूर्तींचे मनसोक्त दर्शन घेऊन, त्यांस फलपुष्प समर्पण करून साष्टांग दंडवत घातल्यानें देहाचे सार्थक होते. क्षेत्रीय साधु सत्पुरूषांच्या दर्शनानें, त्यांच्या समागमानें व संभाषणानें वाणीची अपवित्रता नाहींशी होते. मनावर उत्तम प्रकारच्या संस्कारांचा ठसा उमटतो. अशा तऱ्हेचे सकलमानवकुलाला पावन करण्याचे गुण तीर्थयात्रेंत आहेत हें जाणूनच दूरदृष्टी असलेल्या अनेकानेक महर्षींनीं या तीर्थयात्रेची महती पुराणेतिहासांत विशेषत्वानें वर्णन केलेली आहे.

साधुसंतांना आत्मोध्दार करून घेऊन जर लोकोध्दार करावयाचा असेल तर प्रथम त्यांना लोकसंग्रह हा आवश्यक आहे. ते लोकसंग्रहाचें कार्य या तीर्थयात्रेंत सहज साध्य होते. श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं १२ वर्षेपर्यंत अविश्रांतपणे बैराग्याचा वेषांत पायीं हिंडून तीर्थयात्रा केली, लोकसंग्रह केला व देश कसा गांजलेला आहे याचे सखोल ज्ञान करून घेतले व स्वराज्याच्या उभारणीस चालना देऊन हातभार लावला. आपल्या चरित्रनायकांचे गुरू श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांनींही उत्तरेकडील अयोध्या, कुरूक्षेत्र, हरिद्वार, नैमिषारण्य वगैरे यात्रा गुरूंचा अनुग्रह संपादन करून नंतर पार पाडल्या व लोकोध्दाराचे काम हातीं घेतले. पुढें लोकोध्दार करण्यासाठीं लोकसंग्रहांचे कार्य सुगम व्हावें म्हणूनच श्रीपतीनें अनंतशास्त्र्यांस तुझा गुरू अमके ठिकाणीं आहे असें सांगून तीर्थयात्रेचा त्यास आदेश दिला.

वास्तविक विद्यासंपादन होतांच अनंतशास्त्री सद्गुरूच्या शोधास लागले होते. त्याशिवाय त्यांस दुसरा ध्यासच नव्हता. सर्व प्रथम ते बेटगिरींत गगनाचार्य नांवाच्या सत्पुरूषांकडे गेले होते. कांहीं दिवस तेथें राहून त्यांनीं त्यांची सेवाही केली पण मनाचे समाधान होईना म्हणून त्यांनीं तेथून हुबळीस प्रयाण केले. तेथें कृष्णानंद नांवाचे एक यति होते. त्यांच्या सेवेंत ते निमग्न झाले. तेथेंही त्यांस समाधान लाभलें नाहीं. नंतर ते बेलापूर स्वामींच्या आश्रयास कांहीं दिवस राहिले. अशा रीतीनें कितीही हिंडून मन:शांति मिळेना तेव्हां आपला

उध्दारकर्ता सद्‌गुरू आतां कसा व कोठें सांपडणार ही विवंचना त्यांस सारखी सतावीत होती. सद्‌गुरूचा शोध घेणें व तो लागणें हें अत्यंत दु:साध्य असें समजून अखेर ते श्रीवेंकटपतीस शरण गेले. घोर तपश्चयेनें तावून सुलाखून निघालेल्या त्यांना श्रीपतीनें मार्ग दाखविला.

येथें चोखंदळ लोकांकडून अशी शंका उपस्थित केली जाईल कीं सत्पुरूषाची एक निष्ठेनें सेवा केली असतां इच्छित मन कामना पूर्ण होते असें म्हंणतात. मग अनंत शास्त्र्यांना एवढा खटाटोप करूनही, तीन सत्पुरूषांची सेवा करूनही, फलप्राप्ति कां झाली नाहीं. याच्या निरसनार्थ प्रपचांतील साधे उदाहरण पुरेसे ठरेल. मुलीचा बाप विवाहास योग्य झालेल्या आपल्या मुलीस पुष्कळ ठिकाणीं दाखवितो, कंटाळतो व म्हणतो 'जसा ब्रह्मसंकल्प असेल तसें तेंव्हा होईल' तशीच येथेंही परिस्थिती असते. सत्‌शिष्याचा उध्दारकर्ता सद्‌गुरू पूर्वसंकेताप्रमाणें जन्मास आलेला असतो. त्या दोघांची गांठ पडल्याशिवाय कोणताच कार्यभाग होत नसतो. योग्य व पूर्व संकल्पित गुरूची भेट झाल्याशिवाय सत्‌शिष्याला कधींही शांति लाभत नसते व सत्‌शिष्यही ज्या महात्म्याच्या दर्शनानें मनाला पूर्ण समाधान मिळते तोच सद्‌गुरू होय असें मानत असतो.

अनंतशास्त्री तीर्थयात्रेचे मिषानें पण सद्‌गुरू शोधाच्या उद्देशानें प्रथम काशीस जावे या हेतूनें श्रीवेंकटपुराहून निघाले खरे पण ते एकदम न जातां गांवोगांवी थांबत थांबत निघाले. प्रथम ते गदगला आले. तेथे आपलें बंधू गुरूभट्ट यांचेकडे न जातां त्रिकूटेश्वराचे देवालयांत त्यांनीं मुक्काम केला. घरची हालहवाल समजावून घेतली. दुसरे दिवशीं त्रिकुटेश्वराची पूजा अर्चा करून निघाले ते बेळगांवास आले. तेथें एक दिवस राहून तेथून पुण्यास आले. पुणें हे पूर्वीपासून संस्कृत विद्येचे केंद्र होते व अद्यापही आहे. वेदवेदांतपारंगत व सकलशास्त्र निष्णात असे अनेक पंडित तेथें त्यावेळी होते व अद्यापही आहेत. पुण्यपत्तनांत एक वेदशास्त्रोत्तेजक सभा असून त्याची आचार्य पदवी संपादन करण्यासाठीं त्यांनीं एक प्रबंधही लिहिला. तेथील वेगवेगळ्या पंडितांना भेटून आपल्या सर्व शंकांचे विनयपूर्वक त्यांस प्रश्न विचारून समाधान करून घेतले. अनंतशास्त्र्यांचें विलक्षण बुध्दिचातुर्य पाहून तेथील पंडितांनी गीर्वाण वाग्वर्धिनी संस्थेमार्फत त्यांचे एक व्याख्यान आयोजित केलें. त्या व्याख्यानास महामहोपाध्याय, निरनिराळ्या शास्त्रांचे आचार्य, प्रमुख पंडित, कॉलेजांतील संस्कृत विषयाचे प्राध्यापक, विदयार्थी व उतर जन बहुसंख्येनें उपस्थित होते. हे व्याख्यान अस्खलित संस्कृत भाषेंत शास्त्र्यांनीं तब्बल तीन तास दिले. श्रोतृवृंद चित्राप्रमाणें तटस्थ होऊन ऐकत होता. चालकांनी व्याख्यानांतीं गौरवपूर्ण भाषण करून एक महावस्त्र अर्पण करून अनंतशास्त्र्यांची संभावना केली. कांहीं पंडितांनी त्यांना पुण्यांतील मीमांसा विद्यालय, वेदशास्त्रोत्तेजक सभा, आनंदाश्रम वगैरे संस्था मुद्दाम नेऊन दाखविल्या. आनंदाश्रम संस्थेंने शास्त्र्यांस ग्रंथभांडारांतील कांहीं अमोलिक ग्रंथ अर्पण केले. आतां या ग्रंथांची आपणांस काय गरज म्हणून अनंतशास्त्री ते घ्यावयास तयार नव्हते. पण प्रेमानें दिलेल्या ग्रंथांचा तुम्ही जरूर स्वीकार केला पाहिजे असा आग्रह पडल्यानें, अनंतशास्त्र्यांनीं स्वीकार केला पण परत येतेवेळीं संस्कृत विद्यालयांत वाचत बसलेल्या विद्यार्थ्यांना बरोबरच्या पंडितांच्या हातून ते देवविले. त्यांचे औदार्य व वैराग्य पाहून सर्व पंडित अत्यंत विस्मित झाले.

अनंतशास्त्र्यांनीं बिऱ्हाडीं परत येऊन भगवन्नामस्मरण केलें व दुसरे दिवशीं सकाळीं पुणे सोडण्याचा बेत करून ते झोंपले. दुसरे दिवशीं सकाळीं आन्हिक सारून ते निघण्याच्या तयारींत असतां पुण्यांतील पण्डित समुदाय त्यांचे भेटीस आला. बडोदा नरेशांनीं आपल्या गांवीं एक मोठी विद्वत्सभा भरविण्याचे ठरविले आहे.

आम्हां सर्वांस आमंत्रण आले आहे. आमच्याबरोबर तुम्हीही आले पाहिजे अशी त्यांस गळ घातली. पण अनंतशास्त्र्यांनीं निर्भीडपणे मी यात्रेस निघालो असल्यानें तुमचेबरोबर येऊं शकत नाहीं असे सांगितले. तुमच्यासारखें विव्दान जर या सभेस उपस्थित राहणार नसतील तर ती कसली विद्वत्सभा मग आम्हीही जात नाहीं असा पुण्यातील पंडितांनीं हट्ट धरल्यानें करूणाशील शास्त्र्यांनीं त्यांचा मनोभाव ओळखून अनिर्वाहपक्षीं त्यांच्याबरोबर जाण्याची तयारी दर्शविली. त्याच दिवशीं सायंकाळी ते त्यांच्याबरोबर रवानाही झाले.

तेथील विव्दत्सभेंत भाग घेण्याची त्यांची इच्छा नव्हती तरी त्यांना भाग घ्यावा लागला. न्याय, वेदांत विषयावरील त्यांचे प्रभुत्व व विषयाच्या मांडणीची अप्रतिम प्रतिभाशैली पाहून पंडित सभा थक्क झाली. सभेचें कामकाज देववाणींतच म्हणजे संस्कृत भाषेंतच चालत असल्यानें अनंतशास्त्र्यांची अस्खलित संस्कृत वाणी ऐकून बडोदा नरेश तर भारावून गेले. त्यांनीं त्यांच्या अद्‌भुत वाक्सरणीची, अगाध पांडित्याची व अनुपम वाक्चातुर्याची मनापासून प्रशंसा केली व एक जरतारी भारी शाल त्यांस अर्पण केली व महासंभावना म्हणून दोनशे रूपयांची देणगी आदरपूर्वक दिली. शिवाय राजवाड्यापर्यंत येऊन आपली पायधूळ माझ्या राजभवनांत झाडून मला पुनीत करावें अशी नम्र विनंती करून त्यांस पुष्पगुच्छ व हार अर्पण करून वंदन केलें. हे सर्व बडोदा नरेशांच्या विद्याप्रेमास साजेसेच त्यांचे वर्तन झाले. नरेशांचा तो विनय पाहून अनंतशास्त्र्यांनीं आपल्यांतील विद्याप्रेम पाहून मला परम संतोष झाला. हल्लींच्या काळांत विव्दज्जनांचा पुरस्कार करणारे राजे फार क्वचित आढळतात. सद्विद्या, सज्ज्ञन व सद्धर्म यांचे सदाकाल रक्षण करणाऱ्या तुला महाराजा ही पदवी अन्वर्थक आहे. दयामय जगदीश तुला चिरायु, आरोग्य व ऐश्वर्य देवो असा आशीर्वाद दिला. आतां मी तीर्थयात्रेस निघालो असल्यानें कांहीं दिवस येथें रहाण्याबद्दलच्या तुझ्या विनंतीचा अव्हेर करावा लागत आहे. पण पुन: आल्यावेळीं तुझी इच्छा अवश्य पूर्ण करीन असें सांगून नरेशांची समजूत घातली. अनंतशास्त्र्यांनी सर्व पंडितवृन्दाला नमस्कार केला. तुम्हांस सोडून जाण्याचे खरोखर माझ्या जिवावर येत आहे. पण नाइलाज आहे. मला जाणें भाग आहे. तरी 'अस्तु प्रेमवृध्दि' अशी सविनय प्रार्थना करून प्रयाण केलें. पण्डितवृन्दानेंहि 'शिवास्ते पंथान: सन्तु' अशी शुभेच्छा व्यक्त करून प्रेमानें त्यांस निरोप दिला.

तेथून निघून गौतमी कांठची पुण्यक्षेत्रें घेत घेत ते प्रसिध्द नाशिक क्षेत्रीं आले. श्रीरामचंद्रांनी सीता, लक्ष्मण यांचेसह मुक्काम केलेलें पंचवटी क्षेत्र तेथून जवळच गोदातटाकीं आहे. श्रीरामचंद्राच्या पदधुलीनें पवित्र झालेल्या या स्थळीं श्रीसमर्थ रामदासांनीं बारा वर्षे अविच्छिन्न तपश्चर्या केली होती. इतकी खडतर तपश्चर्या केली होती कीं, श्रीरामचंद्र प्रभूंनी त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिले. अशा परम पवित्र व रमणीय स्थानीं वास करण्याचा एकांतप्रिय अनंतशास्त्र्यांनीं निश्चय केला व प्रशांत अशा श्रीराम मंदिरांत त्यांनीं वस्ती केली. रोज गोदास्नान, अनुष्ठान, श्रीराम सेवा, रामायणाचे पारायण, मधुकरी अन्नाचे देवास समर्पण व नंतर भक्षण असा कार्यक्रम कांहीं दिवस चालू ठेऊन, एक दिवस गोदेचे उगमस्थान श्रीत्र्यंबक क्षेत्रास गेले. कुशावर्त तीर्थांत स्नान करून श्रीत्र्यंबकेश्वराची पूजा करून त्यांनीं अभिषेक केला. दुसऱ्या दिवशीं गोदेच्या उगमस्थानीं जाऊन, तेथें स्नानादि आन्हिक आटोपून, दुपारीं श्रीत्र्यंबकेश्वरला परत आले व सायंकाळीं, नाशिकला परतले. लगेच दुसरे दिवशीं नाशिकहून जे निघाले ते गंगायमुनेचा संगम असलेल्या प्रसिध्द प्रयागक्षेत्रीं दाखल झाले. तेथें तीर्थस्नान, देवदेवतांचे दर्शन वगैरे कार्यक्रम उरकून काशी क्षेत्रीं आले.

हे क्षेत्र आनंदवन नांवाने प्रसिध्द आहे. हे वरूणा व असी नदीच्या मध्यभागीं आहे. याच्या महिम्याचे काशीखंडांत विशेष वर्णन केलेले आहे. येथें अनंतशास्त्र्यांनीं वास करण्यास सुरवात केल्यापासून, नित्य त्रिकाल संध्यास्नान, धुंडिराज, विश्वेश्वर, अन्नपूर्णा, बिंदुमाधव वगैरे देवतांचे दर्शन व पूजा यात अंतर पडू दिले नाहीं. मधुकरी अन्नाचे सेवन व अंतरंगी भगवद्ध्यान असा त्यांचा कार्यक्रम होता. येथें येऊन पोचेंपर्यंत सद्गुरू शोध कदाचित् त्यांच्या नजरेआड झाला होती कीं काय कुणास ठाऊक, पण येथें मात्र सद्गुरू शोधास सुरवात झाली असावी असें वाटतें.

श्रीक्षेत्र काशी ही पुण्यनगरी व सिध्दक्षेत्राचे ठिकाण असल्यानें येथें सत्पुरूष व योगी अशा पुष्कळ लोकांचा वास होता. गुरूदर्शनाची तळमळ लागलेल्या अनंतशास्त्र्यांनीं अनेक साधू, सत्पुरूष व योगी लोकांचे दर्शन घेतले. तत्वज्ञानाविषयीं अनेकांशीं चर्चा केली. पण एवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं. या दिव्य क्षेत्रांत मुमुक्षूंचा उध्दार करण्याचें सामर्थ्य असलेले कांहीं ज्ञानीजन असतील व त्यापैकी कोणीतरी आपले सद्गुरू असावेत असा त्यांचा कयास होता. तो फोल ठरला. एक वर्षाच्या त्यांच्या तेथील मुक्कामांत त्यांचा जो तेथील विद्वज्जनांशीं सहवास घडला त्यामुळें त्यांची विद्यालालसा मात्र पूर्ण झाली. तेथें त्यांनीं वेदांताचा आणखी अभ्यास करून तो संपविला. तर्क, मीमांसा शास्त्रांत प्रगति करून प्राविण्य संपादन केले. अनेकानेक विद्वानांशीं वाद करून जयपत्रेंही त्यांनीं मिळविली. हा एक त्यांस चाळाच लागला. पण लवकरच त्यांचे डोळे उघडले व सद्गुरूचा शोध मी कसा करूं ? माझ्या मनाची तळमळ शांत करणारा सद्गुरू मला कसा भेटणार ? या तळमळीनें उचल खाल्ली व अखेर हळहळत तेथून ते गया क्षेत्रीं गेले. तेथें विष्णुपदावर आवश्यक करावा लागणारा सर्व विधि करून, श्रीरामचंद्राची जन्मभूमी अयोध्यानगरी, तेथें ते गेले. मोक्षदायक अशी जी सात पुरें आहेत, त्यांत अयोध्यापुरी अग्रेसर आहे. तेथें हनुमान गढी नांवाचे एक भव्य मंदिर असून त्यांत वीर मारूतीची मूर्ति आहे. तेथें अनंतशास्त्र्यांनीं तुलसीरामायणाचें पारायण केले व कांहीं काळ तेथेंच वास केला. रामायणाचें पारायण त्यांनीं नऊ दिवसांत संपविले. ते सुध्दां अनशनपूर्वक संपविले. शेवटीं चौदा मैल विस्तृत असलेली नगरप्रदक्षिणा केली व दुसरे दिवशीं भिक्षान्नाचें सेवन करून पारणें सोडलें.

या गांवात देवालयेंही असंख्य आहेत व येथें साधू, सत्पुरूष, संत, महंत, बैरागी यांची वस्तीही विशेष असल्यानें अनंतशास्त्र्यांनीं जारीनें येथें सद्गुरूचा शोध चालविला. रोज गांवांत फिरून साधुसंतांचे दर्शन घेण्याचा त्यांनीं सपाटा चालविला. तेथील जनता श्रीरामनामांत दंग झालेली त्यांस आढळून आल्यानें आनंदातिशयानें त्यांचे हृदय भरून आले. व त्या प्रेमाच्या भावावेगात त्यांचे मुखांतून पुढील काव्य बाहेर पडले असावे असे वाटते.

धन्याऽयोध्या दशरथनृपः साच माता च धन्या
धन्यो वंशो रघुपतिभवो यत्र रामावतारः ।
धन्या वाणी कविवरमुखे रामनाथ प्रसन्ना
धन्यो लोकः प्रतिदिनमसौ रामवृत्तं श्रृशेति ॥ १ ॥

याप्रमाणें अयोध्यानगरीचे स्तवन करून तिला नमस्कार करून ते जे तेथून निघाले ते नैमिषारण्यांत गेले. तेथें त्यांनीं चक्रतीर्थांत स्नान केले. ललितादेवी व व्यासांचे पीठ ही स्थळें पाहिली दुसरे दिवशीं तेथून निघून हरिद्वारला

आले. मोक्षदायक सप्तपुरींतील 'माया' नांवाचे हेच स्थान. ते हिमालयांतून वहात येणाऱ्या शुध्दगंगेच्या कांठी हें वसले आहे. हे अत्यंत रमणीय आहे. विशेषत: तेथील ब्रह्मघाट हा प्रशस्त व रमणीय आहे. येथें तीन दिवस राहून, ठिकठिकाणीं करावी लागणारी सर्व कर्मे करून बद्रिकेदारीं जाण्यासाठीं हृषीकेशमार्गे पण पायींच निघाले.

पादचारी अनंतशास्त्र्यांनी देवप्रयाग, रूद्रप्रयाग वगैरे पवित्र स्थळीं वास करून, तीर्थस्नानें करून, श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या मठांत ते उतरले. श्रीमदाचार्यांची पूजा केली. दुसरे दिवशीं ते जे निघाले ते हनुमानचट्टींत स्नान करून त्यांनीं थोडी विश्रांति घेतली व सायंकाळी बदरीक्षेत्री पोंचले. ती वेळ सायंकाळच्या पूजेची असल्यानें अनंतशास्त्री महाद्वारांतच मूर्तीकडे एकटक पहात उभे राहिले. त्यांचे सर्वांग पुलकित झाले. वाणी प्रेमातिशयानें सद्गदित झाली. नयनांत आनंदबाष्प उभे राहिले. बद्रिकेदारेश्वराची चाललेली सेवा पाहून ते परम संतुष्ट झाले. साष्टांग दंडवत घालून ते निवासस्थानीं परतले.

दुसऱ्या दिवशीं पहाटे उठून त्यानीं नारदकुंडांत स्नान केले, नित्य आन्हिक आटोपून श्रीबद्रिनारायणास महाभिषेक केला व सहस्त्रतुलसी वाहिल्या, भगवंतासमोर मध्यमंडपांत बसून, पवमान सूक्त, श्रीमद्‌भगवत्‌गीता, विष्णूसहस्त्रनाम आदींचे पारायण केले. अनंतशास्त्र्यांनीं त्यादिवशीं उपोषण केले. सायंकाळपर्यंत सर्व पर्वतराजी पायाखालीं घातली व सर्व सिध्दपुरूषांचे दर्शन घेतले. दुसरे दिवशीं ब्रह्मकपालाचें ठायीं करावे लागणारे पैतृक कर्म, ब्राह्मणसंतर्पण वगैरे विधि यथासांग पार पाडले. तिसरे दिवशीं सकाळीं स्नान करून, देवदर्शन घेऊन, प्रसादग्रहण केला. व तेथील बैराग्यांचे तांड्यांत मिसळून, गंगोत्री, जमनोत्री, मानसरोवरादि कठीण यात्रा केल्या व सिध्दपुरूषांचे दर्शन घेतले.

तेथून केदारेश्वरीं पोंचून केदारेश्वराचें दर्शन घेतले. त्या दर्शनानें ते अतिशय आनंदित झाले. तेथेंही त्यांनीं स्नान, पूजा, अभिषेक, बिल्वार्चन केले. आवश्यक अशी इतर कर्मे करून त्यांनीं श्रीजगद्गुरू भगवत्पादाचार्य शंकराचार्यांच्या कैलासगमन स्थानाचें दर्शन घेतले. दुसरे दिवशीं तेथून निघून गुप्त काशी, त्रिगुजीनारायण वगैरे पवित्र क्षेत्रांचे अवलोकन करून ते परत हरिव्दारला आले. तेथून निघून कुरूक्षेत्रादि पवित्र स्थळांचे दर्शन घेऊन ते मथुरेस आले.

मथुरा हे श्रीकृष्णाचे निवासस्थान होय. मोक्षप्रद सप्तपुरींतील यादींत मथुरेचा दुसरा क्रमांक आहे. हे अत्यंत रमणीय असून यमुना कांठीं आहे. यमुनेच्या चोवीस घाटांपैकी विश्रामघाट विस्तृत असून प्रसिध्द आहे. कारण कंसवधानंतर परमात्म्यानें येथेंच विश्रांति घेतली म्हणून त्या घाटास हे नांव पडले. येथें असंख्य कृष्णमंदिरें आहेत. अनंतशास्त्र्यांनीं यमुनेंत स्नान करून नित्य आन्हिक आटोपलें. मुख्य मंदिरांचे दर्शन घेतलें व विश्राम घाटावर विश्रांति घेतली. दुसरे दिवशीं ते वृंदावनीं गेले. लताकुंज व राममंडल स्थान त्यानीं पाहिले. यमुना स्नानाचे महत्व पद्मपुराणांत फार वर्णिलें आहे. यमुनेच्या स्नानानें मानवाचे पातक तर नष्ट होतेच शिवाय त्याची भक्ति उत्तरोत्तर वाढत जाते. म्हणून येथें अनंतशास्त्र्यांनी यमुना स्नान करून श्रीमद्‌भागवतांतील श्रीकृष्णलीलाप्रधान अशा दशमस्कंदाचें पारायण केले. ब्राह्मणसंतर्पण, गंगासमाराधना वगैरे उरकून, पुष्कर क्षेत्राला भेट देऊन ते परत काशीस आले.

तीर्थयात्राप्रसंगानें अनेकानेक क्षेत्रस्थ पण्डितांशीं अनंतशास्त्र्यांनीं शास्त्रविषयक चर्चा केली. त्यावेळीं दिसून

आलेली अगाध विव्दत्ता, अप्रतिम पाण्डित्य व असाधारण बुध्दिमत्ता पाहून ते पण्डित आश्चर्यचकित झाले. ठिकठिकाणीं धन, कनक, वस्त्र आदि दानानें अनंतशास्त्र्यांचा बहुमानही केला गेला. अनंतशास्त्री म्हणजे वैराग्यमूर्ति. त्यांना कशाचीच आसक्ति नव्हती. म्हणून तर त्यांनीं ते सर्व गोरगरीबांना दान करून देऊन टाकले. त्यांच्या मनाला खरी रूखरूख जर कोणती असेल तर ती सद्‌गुरूदर्शनाची व आत्मोध्दाराची होय. उतका देशसंचार करूनही अशा सद्‌गुरूचे दर्शन झाले नाही म्हणून ते अतिशय खिन्न झाले, तरी पण सद्‌गुरूदर्शनाखेरीज येथून हलावयाचे नाही असा निर्धार करून ते सद्‌गुरूशोधार्थ विश्वनाथाचे सांनिध्यांतच राहिले. सत्पुरूष, संतमहंत, ज्ञानी लोकांचे माहेरघर असलेल्या काशीक्षेत्रांत मनकामना पूर्ण होईना असें पाहून 'विश्वेश्वरा, सद्‌गुरूची लवकर भेट करीव' अशी प्रार्थना करून एके दिवशी शुध्द गंगोदकाची कावड भरून घेऊन, रामेश्वरास अभिषेक करावा म्हणून तेथून ते निघाले.

आपल्यातील पाण्डित्याचा अहंकार आपल्यास सोडीत नाहीं. तोच सद्‌गुरूदर्शनाचे आड येत असावा अशीच त्यांस शंका बाधली म्हणा अगर कांहींही म्हणा या रामेश्वराच्या प्रवासांत त्यांनीं मौन धारण केले होते व सदा सर्वकाल भगवच्चिंतनपर त्यांची वृत्ति बनली होती. प्रवासांत यांचे तेज व सदाचार निष्ठा पाहून यांस राहवून घेऊन यांचा सत्कार करावा म्हणून पुष्कळांनीं इच्छा प्रदर्शित केली. पण तें कोणाच्याच आग्रहाला बळी पडले नाहींत. तरीपण अनपेक्षितपणें शास्त्रीपण्डितांकडून बहुमान केला गेल्यास निरपेक्षपणें मिळालेले धन, कनक, वस्त्रें, वगैरे ते गोरगरीबांस वाटून टाकीत असत. सद्‌गुरूदर्शनाकांक्षी अनंतशास्त्र्यांची हे बाह्य अवडंबर निरर्थक आहे अशी बालंबाल खात्री झाली असावी. या खेपेच्या यात्रेंत साधुसत्पुरूष, योगी व महात्म्यांचा शोध करण्यावर व अशांच्या जवळ वास करण्यावर त्यांनीं भर दिला होता. अशा रीतीनें अनेक क्षेत्र व नगरें येथें त्यांनीं संचार केला व असा संचार करीत करीत ते होळकरांची राजधानी इंदूर या गांवीं आले.

इंदूरला येईपर्यंत संध्याकाळ झाल्यानें अनंतशास्त्र्यांस तेथें मुक्काम करणें भाग पडल्यानें ते गांवच्या मध्यभागी असलेल्या मारूति मंदिरांत उतरले. संध्याकाळची वेळ असल्यानें अनेक भाविक मारूति दर्शनास येत जात होते. त्या गावचे भय्यासाहेब मोडक नावाचे श्रेष्ठ ब्राह्मण मारूति दर्शनाला आले असतां त्यांनीं अनंतशास्त्र्यांना भाविकपणें नमस्कार केला व कुशल प्रश्न करून त्यांनीं त्यांची सर्व हकीकत समजून घेतली. भय्यासाहेबांनी वैराग्यनिधी अनंतशास्त्र्यांस आपल्या घरीं वास करावा अशी नम्र विनंति केली. अनंतशास्त्री यांनीं मधुकरी अन्नाखेरीज मी कांहीं सेवन नाहीं व रात्रीं तर मी कांहींच घेत नाहीं अत एव आग्रह करूं नका. एवढी रात्र मारूतीच्या सान्निध्यांत काढून सकाळीं पुढें प्रयाण करीन म्हणून सांगितले. दीनवदन झालेल्या भय्यासाहेबांनी, शास्त्रीजी,आपल्या दर्शनमात्रानेंच आपल्याला घरीं नेण्याची इच्छा मला झाली आहे. आपण न आल्यास माझ्या मनाला फार असमाधान होईल. करितां माझ्या घरीं येण्याची कृपा करावी व मला संतुष्ट करावें अशी नमस्कार करून त्यांनीं प्रार्थना केली. यांचें शुध्द प्रेम पाहून त्यांचे मन न दुखविण्याच्या इराद्यानें अनिर्वाहपक्षीं शास्त्री त्यांचे घरीं मुक्कामास गेले व रात्रीं तेथेंच राहिले.

॥ श्रीसद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण दहावें

## सद्‌गुरूप्राप्ति

भय्यासाहेब मोडकांबरोबर त्यांच्या घरीं मुक्कामास आल्यावर अनंतशास्त्र्यांनीं आपले सायंकाळचें आन्हिक आटोपले. भय्यासाहेबांनी त्यांच्याजवळ बसून भगवद्‌भक्तिसारख्या अनेक जिव्हाळ्याच्या विषयांबाबत आपल्या कांहीं कूट प्रश्नांचे निरसन करून घेतले. भय्यासाहेबांना खरोखर महदानंद झाला व त्यांचे तोंडून अकल्पितपणें ''साधु संत आले घरा, तोचि दिवाळी दसरा'' असे उद्‌गार बाहेर पडले.

याच सुमारास ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांचा मुक्काम इंदोरास असून त्यांचे वेदांतावर निरूपण चालत असे. त्या निरूपणास जाण्याची वेळ होतांच भय्यासाहेब शास्त्र्यांना तुम्ही प्रवासाच्या दगदगींने शिणला असाल तरी स्वस्थ झोपा. गांवांत गोंदवलेकर रामदासी बुवांची वेदांतावर निरूपणें दररोज चालू आहेत. तें ऐकण्यास मी जातो असे विनयपूर्वक सांगून, त्यांची परवानगी घेऊन ते गेले.

भय्यासाहेब गेल्यानंतर अनंतशास्त्र्यांना झोप येईना. त्यांचे मनात सारखा विचार घोळूं लागला. ''मी किती अविचारी, सद्‌गुरूशोधासाठीं हिंडणाऱ्या मी सत्पुरूषाचे दर्शन घेण्यास पाहिजे होते. उद्यां मी पुढें जाणार. या सत्पुरूषाचे दर्शन न घेतां गेलो आणि हेच सद्‌गुरू असले तर पुन: यांची गांठ केव्हां व कशी होणार ? वगैरे विचारानें बेचैन होऊन अखेर उदईक या महनीयांचे दर्शन घेऊनच पुढें जावे असा विचार ठाम ठरवून शास्त्री झोपीं गेले. नित्याप्रमाणें पहाटें उठून स्नान संध्यादि आन्हिक त्यांनीं आटोपले. आपण होऊन ते भय्यासाहेबांकडे गेंले व त्यांनीं त्या सत्पुरूषाची चवकशी केली आणि त्यांचे दर्शन आपणास करवितां कां अशी पृच्छा केली. भय्यासाहेबांनी त्या सत्पुरूषांस ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज म्हणतात. ते गोंदवल्यास असतात पण त्यांचा भक्तवृंद येथें फार असल्यानें ते वरचेवर येथें येतात. त्यांचे शिष्य महाराजांना मारूतीचा पूर्णांश व समर्थ रामदासस्वामींचा अवतार मानतात. तुमची अिच्छा असेल तर जरूर तुम्हांस त्यांचे दर्शन करवितो म्हणून भय्यासाहेबांनीं सांगतांच अनंतशास्त्री फलपुष्प घेऊन त्यांचेबरोबर दर्शनास जाण्यास सिध्द झाले.

ज्यावेळी हे दोघे दर्शनासाठीं तेथें जाऊन पोंचले त्यावेळीं त्रिगुणातीत व मायातीत असे ब्रह्मचैतन्य महाराज केवल कौपीन धारण करून मध्यभागीं बसले होते. सभोंवती भाविक स्त्रियांचा गराडा होता. त्यापैकीं कांहीं महाराजांच्या कोमलपादांचे संवाहन करीत असलेल्या त्यांस दिसल्या. निर्विकल्प चित्तानें महाराज सेवेचा स्वीकार करीत होते व मुखानें भक्तिबोधामृत स्त्रवत होते. भय्यासाहेबांनीं हेंच ते महाराज असें सांगतांच अनंतशास्त्र्यांच्या मनांत 'प्रथम ग्रासे मक्षिकापात:' या न्यायानें अनेक प्रकारचे विकल्पतरंग उठले. सर्वसंग परित्याग करून अरण्यांत राहून फलपर्णे खाऊन तपश्चर्या करणारे विश्वामित्र पराशरादि मुनिदेखील इंद्रिय निग्रह करूं शकले नाहींत. हे तर केवल कौपीनधारी स्त्रीसमूहांत बसून त्यांच्या सेवेचा स्वीकार करीत आहेत. अनंतशास्त्री नैष्ठिक ब्रह्मचारी. त्यांना हें कसें मानवणार ! ''बलवान् इंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति'' या मनूच्या वचनाची त्यांस आठवण होऊन त्यांचे मन विषण्ण झाले. या बाह्य दर्शनानें मनांतून ते इतके विटले कीं, ते त्यांच्या जवळ तर गेले नाहींतच पण दुरून देखील त्यांस नमस्कार न करतां घरीं निघून गेले.

भय्यासाहेब वेदांत निरूपण ऐकून परत आले. त्यांनी अनंतशास्त्री यांस निरूपण न ऐकताच निघून आला असें विचारतांच त्यांनीं असे अनेक सत्पुरूष मी पाहिले आहेत. अशांकडून आत्मज्ञान कधींही मिळणें शक्य नाहीं. स्वामी विद्यारण्यांच्या उक्तीप्रमाणें 'वंचयति किल केचन वेशै:' वाक्चातुर्यानें लोकांना फसवून द्रव्यार्जनादि कार्यसाधणारेच कार्यसाधक साधू कलियुगांत फार असें स्पष्ट सांगितले व दुपारनंतर तेथून प्रयाण केले.

तेथून निघून वाटेंत ठिकठिकाणचे क्षेत्रांस भेट देत देत ते नृसिंहवाडीस पोचले. कृष्णा व पंचगंगा यांचे संगमावर श्रीदत्तप्रभूंचे रमणीय स्थान आहे. तेथें अनंतशास्त्री यांनीं अनुष्ठानास सुरवात केली. निराहारवृत्तीनें अखंड सेवा चालू केली. दयाघन दत्तप्रभू त्यांची सात्विक निराहार वृत्ति, अखंड तपोनुष्ठान व गुरूदर्शनाची तळमळ पाहून मनोमन संतुष्ट झाले व सातव्या दिवशीं स्वप्नांत यतिरूपानें दर्शन देऊन, 'भक्तोत्तमा ! आतां तुझी सेवा पुरी कर. तुझ्यावर संतुष्ट झालो आहे व तुझे मनोरथ पूर्ण करण्यास मी आलो आहे'' असें यतिवर्यांनीं सांगतांच शास्त्र्यांनीं हर्षातिरेकानें यतिचरणावर मस्तक ठेऊन विनंती केली. ''भक्तकामकल्पद्रुमा, माझा मनोदय तुला कळला नसेल असें मी कसे मानू. कारण सर्व जग तर तुझ्या इच्छेप्रमाणें चालते. मग माझ्या इच्छेच्यामागें तुझी प्रेरणा असणारच. मग ती तुला अगोचर आहे असें कसें म्हणतां येईल. दीनोध्दारका, मला आत्मोध्दाराचा मार्ग दाखीव. सद्गुरूदर्शन लवकर घडीव'' अशी अनन्यगतिक होऊन त्यांनीं याचना केली. त्यावर दत्तप्रभूंनीं हंसून ''तुझा उध्दार करण्याचें सामर्थ्य असलेल्या सद्गुरूचें दर्शन इंदोरमध्ये यापूर्वींच मी तुला करविले आहे. तुझ्याकडून सेवा घ्यावी म्हणून तुला येथवर यावयास लावले. तरी तूं इंदूरला परत जा. अनन्यभावानें त्यांस शरण जाऊन अनुग्रह घेऊन कृतार्थ हो. माझा आशिर्वाद आहे'' म्हणून वरदहस्त शास्त्र्यांच्या मस्तकावर ठेवला व यति वेषधारी दत्तमूर्ति अंतर्धान पावली. शास्त्र्यांना जाग आली तेव्हा 'तूं इंदुरास जा' ही दिव्यवाणी कानांत घुमत असल्याचें पाहून त्यांस आश्चर्य वाटले. त्या सद्गुरूंच्याबद्दल मनांत कुकल्पनेला थारा दिल्याबद्दल शास्त्र्यांस परमखेद झाला. त्यांचे हृदय पश्चात्तापदग्ध झाले व त्यांनीं पुन: इंदोरला जाण्याचा निर्धार केला.

सकाळ होतांच पंचगंगेत स्नान करून नित्य कर्मे आटोपून, गुरूपादुकांवर रूद्राभिषेक करवून, दंपती भोजन, दक्षिणा दानादींनी दत्तसेवा परिपूर्ण करून पारणें केलें. श्रीदत्त पादुकांसमोर साष्टांग नमस्कार घातला. व पूर्वी पाहिलेल्या सदुगरूंच्या स्वरूपांचे मनांत स्मरण करीत तेथून निघुन इंदूरला येऊन पोंचले ते तडक पूर्वपरिचित भय्यासाहेबांच्या घरीं गेले व ब्रह्मचैतन्य महाराज येथें आहेत काय ? असल्यास लवकर त्यांचे दर्शन करवा म्हणून त्यांचे मागे लागले. भय्यासाहेबांनीं त्यांची आतुरता पाहून येथून गेलेले ब्रह्मचैतन्य महाराज तुमच्या सुदैवाने कालच येथें आले आहेत. सायंकाळी त्यांच्या दर्शनास जाऊं या. चिंता करूं नका असें सांगून, माध्यान्ह काल झाला असल्यानें स्नानादि आन्हिक आटोपून भोजन करा असें विनयपूर्वक त्यांस सांगून स्वत: त्यांच्या स्नानाची त्यांनीं तयारी करून दिली व त्यांचे संध्यावंदनादि सर्व आन्हिक आटोपतांच त्यांचेसह भोजन केलें. थोडी विश्रांति घेऊन जाऊं या असें सांगून भय्यासाहेब वामकुक्षी करण्यास गेले. परंतु सद्गुरूदर्शनाची आंच लागलेल्या अनंतशास्त्र्यांना कसची विश्रांति. सद्गुरू दर्शन पूर्वी झाल्यावेळीं त्यांच्या स्वरूपाची आपल्यास ओळख न झाल्यानें आपण त्यांची हेटाळणी केली या आपल्या अक्षम्य अपराधाबद्दल केव्हां एकदां त्यांच्या पायावर लोळण घेऊन, क्षमा मागून, अभय मिळवीन असें त्यांस होऊन गेले होते. म्हणून ते वरचेवर

भय्यासाहेबांना आतां दर्शनास निघूं या ना म्हणून विचारीत होते. अनंतशास्त्र्यांची पराकोटीला पोंचलेली उत्कंठा पाहून भय्यासाहेबांनी त्यांस ब्रह्मचैतन्य महाराजांकडे नेले.

अनंतशास्त्र्यांना सद्‌गुरूदर्शन कशा प्रकारें घडले याबद्दलच्या निरनिराळ्या हकीगती सांगण्यांत येतात. दुसरी हकीकत अशी कीं भय्यासाहेबांच्या घरीं मुक्काम करून दुसरे दिवशीं त्यांच्याबरोबर जेव्हां अनंतशास्त्री ब्रह्मचैतन्य महाराजांच्या दर्शनास गेले तेव्हां स्त्रीसमुदायांत स्त्रियांकडून सेवा घेत असलेली व प्राकृतभाषा वापरणारी ती मूर्ति पाहून जरी अनंतशास्त्र्यांचे मन विटले तरी ते त्यांच्या प्रवचनास थांबले होते. मनांत कांही शंकास्थाने कल्पून उभे होते. त्या प्रवचनाच्या ओघांत त्रिकालज्ञानी ब्रह्मचैतन्य महाराजांनी शास्त्र्यांच्या शंकास्थानांचे निवारण केलें. पुन: दुसरे दिवशीं अनंतशास्त्री प्रवचनास गेलें. त्या दिवशींही कांही शंकास्थानें मनांत योजून गेलें. एवढेंच नव्हेतर त्या शंकांचा विशिष्ट क्रम ठरवून गेले. त्या दिवशींही ब्रह्मचैतन्य महाराजांनी अंतर्ज्ञानानें तें सर्व जाणून अनंतशास्त्र्यांच्या सर्व शंकांचे त्यांनीं मनांत योजलेल्या क्रमाप्रमाणे निरसन केलें. तिसऱ्या दिवशींही तसेंच घडलें. वास्तविक येथे अनंतशास्त्र्यांचा अभिमान गळावयास पाहिजे होता व त्यांनीं सद्‌गुरूस शरण जावयास पाहिजे होते. पण तसें घडलें नाहीं. पूर्वी जसे बनशंकरी देवीनें त्यांस दर्शन देऊन मार्गी लावले, श्रीवेंकटपतीनें दर्शन देऊन तीर्थयात्रेस व सद्‌गुरूशोधार्थ अनंतशास्त्री यांस प्रेरणा देऊन मार्गस्थ केले व जरी मनांतून हाच गुरु असावा व यास शरण जावें असें वाटत होते तरी परमेश्वरानें समक्ष आपल्यास दर्शन देऊन हाच तुझा गुरु असे सांगितल्याशिवाय आपण शरण जाणार नाहीं अशा हट्टाला पेटून शास्त्री इंदूरहून निघाले ते फिरत फिरत नृसिंहवाडीस आले व तेथील अनुष्ठांत त्यांचे इच्छेप्रमाणें भगवंताने प्रत्यक्ष दर्शन देऊन, तोच तुझा गुरू व त्यास तूं शरण जा म्हणून परत पाठविल्यावर परत येऊन श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचे पायांवर लोळण घेतली.

पहिला प्रवाद व दुसरा प्रवाद जवळजवळ सारखाच आहे. पहिल्या प्रवादाप्रमाणें अनंतशास्त्री प्रथम दर्शनींच जे विटले ते तडक निघून गेले. दुसऱ्या प्रवादांत तीन दिवस प्रवचनें ऐकून मनांतील शंकास्थानांचें न विचारतां परभारे निरसन झाल्यानें ब्रह्मचैतन्य महाराजांबद्दल जरी आदर निर्माण झाला होता तरी स्वत:बद्दलच्या मोठेपणाच्या भ्रामक कल्पनेवर विसंबून भगवंताच्या आज्ञेसाठीं ते निघून गेले. या अनंतशास्त्र्यांच्या कृतीनें संत नामदेवांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. प्रत्यक्ष पांडुरंग नामदेवाशी गोष्टी करीत असे व त्याच्या हाताचे जेवत असे एवढ्यावर नामदेव फुगला होता. म्हणून संत गोरोबानें त्यास कच्चे मडके ठरविले तेव्हा नामदेव पांडुरंगाकडे फिर्याद घेऊन गेला तसाच काहींसा हा प्रकार भासतो.

तिसरा प्रकार असा कीं अनंतशास्त्री सायंकाळी इंदोर शहरीं जे आले ती वेळ संध्याकाळची असल्यानें गांवातील श्रीमारुतीच्या देवालयांत उतरले. कडकडीत ब्रह्मचर्याचें पालन करणाऱ्या अनंतशास्त्रांस हेंच स्थान उतरण्यास योग्य होते. तेथें श्रीमारुतिरायाच्या दर्शनास येणाऱ्या जाणाऱ्या लोकांचे तोंडून त्या शहरीं श्रीगोंदवलेकर महाराजांचा मुक्काम असल्याचें समजल्यानें त्यांनीं दुसरे दिवशीं श्रीमहाराजांच्या दर्शनास जाण्याचें ठरवून देवळांत मुक्काम केला. सकाळीं लवकर उठून प्रातर्विधि उरकून, स्नान करून संध्यावंदनादि नित्य आन्हिक सारून ते श्रीमहाराजांचे दर्शनास बाहेर पडले. श्रीमहाराज इंदोरमध्यें केव्हाही आले तरी श्रीयुत् भय्यासाहेब मोडकांकडेच उतरत असत. त्यावेळींही त्यांचा मुक्काम भय्यासाहेबांचे घरींच असल्यानें अनंतशास्त्री तपास करींत करीत तेथें

जाऊन पोंचले. त्यावेळीं श्रीमहाराज फक्त कौपीनधारण करून मधोमध बसले होते व सभोंवती स्त्रीसमूहाचा वेढा होता. अनंतशास्त्री दूर उभे राहून ती मूर्ति न्याहाळीत होते. श्रीवेंकटपतीनें स्वप्नांत ज्या मूर्तीचे दर्शन घडविले होते तशीच ही मूर्ति सतेज दिसत होती. हीच ती सद्गुरुमूर्ति असावी अशी मनोमनीं खूण गांठ पटत होती. परंतु श्रीमहाराजांसारख्यांनी स्त्रीसमूहांत बसून त्यांचेंशी प्राकृत भाषेंत बोलावें व त्यांचेकडून सेवा घ्यावी हें अनंतशास्त्र्यांस पटेना. हा कसला गुरु व हा काय माझा उद्धार करणार असे त्यांच्या अंतर्मनांत पडसाद उमटूं लागल्यानें एक तासभर तेथें उभे राहून असंतुष्ट होत्साते अनंतशास्त्री देवळाकडे परतले.

देवळात परत आल्यावर त्यांच्या डोक्यांत विचारांचे थैमान सुरूं झाले. एक मन म्हणें कीं स्वप्नातील सद्गुरु प्रतिमेशीं श्रीगोंदवलेकर महाराजांची प्रतिमा जुळते तेव्हां जास्त विचार न करतां त्यांस शरण जावें हें बरें. तर दुसरें मन म्हणे मी एवढा शास्त्री, पण्डित व यांना तर संस्कृतचा गंध दिसत नाहीं, अशा परिस्थितींत हें मला आत्मोद्धाराचा मार्ग कसा दाखविणार. असें होतां होता पुन: दुसरें दिवशीं त्यांचेकडे जायचे त्यांनीं ठरविले. ती रात्र तेथेंच काढून पुन: सकाळी उठून सर्व आन्हिक आटोपून अनंतशास्त्री श्रीमहाराजांच्या दर्शनास गेले. त्यावेळीं श्रीमहाराज मुलामुलींच्या घोळक्यात खेळत बसले होते. प्राकृत वाणी उच्चारीत होते. त्या दिवशींही अनंतशास्त्री पुन: एक तासभर उभे राहिले. त्यांचा अभिमान त्यांस आडवा आला व ते श्रीमहाराजांस शरण न जातां व साधा नमस्कारही न करतां परत गेले. श्रीमहाराजांच्या दैदीप्यमान मूर्तीचे तर अनंतशास्त्र्यांस इतके आकर्षण वाटूं लागले होते कीं त्यांना तें गांव सोडून पुढें जाववत नव्हते. त्याच बरोबर श्रीमहाराजांना संस्कृत येत नाहीं. ते मुलांत व स्त्रियांत मिसळतात याबद्दल वैषम्य वाटून ते त्यास शरण जाण्यास तयार नव्हते. अशा मनाच्या दोलायमान परिस्थितींत दिवस गेला. बहुधा त्यांचा दुसरें दिवशीं मुक्काम हलविण्याचा विचार झाला असावा. रात्रीं ते झोंपले असतां श्रीमारुतिरायानें त्यांस स्वप्नांत दर्शन देऊन, ''उगीच कसला विचार करतोस.' मनांतला विकल्प सोडून मुकाट्यानें तूं त्यांस शरण जा. त्यांतच तुझें कल्याण आहे. कारण तोच तुझा गुरु आहे.'' असा संदेश देऊन श्रीमारुतिराय गुप्त झाले.

तिसरे दिवशीं अनंतशास्त्री आपले आन्हिक आटोपून सद्गुरु दर्शनार्थ जे बाहेर पडले तेच मुळीं मारुतिरायानें स्वप्नांत दिलेल्या दिलाशानें संतुष्ट होऊन अंतरंगांत सद्गुरुमूर्ति न्याहाळीतच मार्ग क्रमूं लागले. नित्याप्रमाणें जाऊन उभे राहिले तोंच श्रीमहाराज ''व्यर्थ कां हेलपाटे घालतोस. आम्ही बोलून चालून संसारी. आम्हांस शास्त्र अवगत नाहीं. संस्कृत भाषेचा आम्हांस गंधही नाहीं. आमच्या जवळ तुला काय मिळणार ?'' एवढें म्हणाले मात्र, तोंच आपल्या मनींचे श्रीमहाराजांनी जाणलें ही खूणगांठ अनंतशास्त्र्यांस पटली व ते मातीचें ढेकूळ पाण्यांत विरघळावें तसे विरघळले. त्यांच्या नेत्रांतून आनंदबाष्प स्त्रवूं लागले आणि ते सर्व अभिमान सांडून, धांवत जाऊन श्रीमहाराजांच्या चरण कमलांवर धाडदिशीं जाऊन पडले व गडबडा लोळूं लागले. अनंतशास्त्री देहभान विसरले व अगतिक होऊन श्रीमहाराजांची स्तुती करूं लागले.

श्रीब्रह्मचैतन्यमहाराज म्हणजे खरोखर या चराचरासृष्टींतील अखिल चैतन्याचा गाभाच असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाही. श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांनीं अनंतशास्त्री हा आपला सर्वोत्तम शिष्य होणार हें जाणून त्यांस आपलें खरें स्वरूप दाखविण्याचें ठरविलें व आपलें साकार सगुणरूप अदृश्य करून त्या जागीं

अद्‌भुत कपीचे रुप धारण करून, तेजोमय मारूतीरुपानें दर्शन दिलें. अनंतशास्त्र्यांची चित्तवृत्ति या दर्शनानें शांति पावूं लागली. सवितांदेवतेच्या प्रखर किरणांनी हिमपर्वत जसा एकदम विरघळूं लागतो तसा अनंतशास्त्र्यांचा सुप्त स्थितींतील शास्त्राभिमान, देहाभिमान, तर्कवितर्क वगैरे सर्व दोष श्रीमन्महाराजांच्या तेजानें गळून पडूं लागले. चित्तवृत्तींत तर इतका फरक पडला कीं त्यांच्या मनांत संकल्प विकल्प उद्‌भवेनासे झाले. सद्‌गुरूंच्या अमानुष सामर्थ्याची कल्पना स्थिर होऊन वाढीस लागली. श्रीमन्महाराज हे प्रत्यक्ष मारुतीचा अवतार आहेत याची प्रत्यक्षांत खात्री पटली. अनंतशास्त्री हे कृत नियमांचे जरी कांटेकोरपणानें पालन करणारे होते तरी सद्‌गुरुनाथांच्या सांनिध्यांत निदान त्या दिवशीं तरी शास्त्र्यांच्या कार्यक्रमांत शैथिल्य निर्माण झाल्याशिवाय राहिलें नाहीं.

त्या स्तुतींचे यथार्थ वर्णन करणें मजसारख्या मंदमति पामराला कसें शक्य आहे. तरी पण त्या बाबतींत थोडेसे धाडस करून लिहिण्याचें मी ठरविले आहे. ते येणेप्रमाणे

हे दयाघना, चराचर वस्तूंचे ठायीं तूं चैतन्यरूपानें वास करूनही मानवाप्रमाणें रूप धारण केलें आहेस. हे कृपासागरा, तुला भक्तिपूर्वक अनंत नमस्कार करून तुला शरण आलो आहे. हे चिन्मयस्वरूपा, कितीतरी दिवस तुझ्या या मंगलप्रद दर्शनासाठी धडपडत असलेला मी आज खरोखर धन्य झालो आहे. हे सच्चिदानंदमूर्ते, तुझें प्रत्यक्ष दर्शन घडून देखील माझ्या चर्मचक्षूंना तुझी ओळख पटली नाहीं यांत माझा तरी काय दोष. कारण तूंच सर्व जीवांचा मनचालक आहेस. तुझ्या अनुग्रहानें व माझ्या सुकृतानें मला तुझें सांनिध्य लाभलें. तुझ्या लीला हरींहरांना देखील अगम्य व अतर्क्य आहेत. अतएव हा माझा देहरूपी रथ, त्याला जोडलेल्या मन बुध्दिरूपी घोड्यासंह तुलाच हीं अर्पण करतो. माझी चित्तवृत्ती तर वर्षाकाळीच्या प्रवाहाप्रमाणें चंचल झालेली आहे. ती ही तुलाच अर्पण करतो. तुझ्याशिवाय मला दुसरी गति नाही. तूंच माझे सर्वस्व. एवढेंच नव्हे तर आजपासून ''त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव । त्वमेव सेव्यश्च गुरूस्त्वमेव त्वमेव सर्व मम देव देव '' ॥ १ ॥ अशी माझी स्थिति झाली असल्यानें मला आत्मोध्दाराचा मार्ग दाखीव. तुझ्या पूर्णानुग्रहाशिवाय ते सुतराम अशक्य आहे. मायाजालांतून मला सोडवून, तुझ्या चरणकमलाजवळ अभय देऊन उध्दार कर. तुझ्या इच्छेशिवाय या जगांतील एक काडीहि इकडील तिकडे होणार नाहीं अशी माझी खात्री झाली आहे. तुझे गुणवर्णन प्रत्यक्ष आदिशेषालाही करतां आले नाही ते मजसारख्या पामराला कसें शक्य आहे ? हे जगच्चालका, दयानिधे, माझी एवढी प्रार्थना मनावर घे व मजवर अनुग्रह करून मला कृतार्थ कर. तूंच सर्वांतर्यामीं वास करीत असतोस तेव्हां माझ्या अंत:करणांतील तळमळ तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला समजणार. एकमेव भक्तिच मी तुला अर्पण करूं शकेन. कदाचित् भक्तिरूपीं भांडवल मजजवळ तुटपुंजे, त्याच न्यायानें माझा अंगीकार कर. माझ्या सर्व असंख्य अपराधांची क्षमा कर. तुझी चरणसेवा नित्य घडेल अशी कृपा कर. अशा प्रकारें अनंतशास्त्र्यांनीं श्रीमन्महाराजांची अनन्यभावानें करूणा भाकली.

खरी तळमळ लागलेल्याच्या हातीं निदान गवसताच त्यांस प्रेमाचे उत्कट भरते न आल्यासच नवल. अनंशास्त्र्यांचे सर्व शरीर रोमांचित झाले. सर्वांगास घामाच्या धारा लागल्या. देह थरथरूं लागला. नेत्रांतून अविरल आनंदबाष्पाच्या नद्या वाहूं लागल्या. श्रीमन्महाराजांचे दिव्य चरण आनंदाश्रूंनीं न्हावून निघाले.

अनंतशास्त्र्यांचा हा भाव व ही भक्ति पाहून श्रीमन्ममहाराज परम संतुष्ट झाले. आपल्या अमृतहस्तानें त्यांनी त्यांस वर उठविले. त्यांच्याकडे सावकाश पण निरखून पाहून त्यांच्या परिपक्वतेचा त्यांनी अंदाज घेतला. मोक्ष मिळविण्यासाठीं त्यांची झालेली ही हीनदीन स्थिती पाहून त्यांचे अंत:करण द्रवले व त्यांनी अनंतशास्त्र्यांस दृढ आलिंगन दिले.

श्रीमन्ममहाराजांनीं अनंतशास्त्र्यांस दृढ आलिंगन दिले याचा अर्थ दोघांचाही हृदयाकार एक झाला व त्याचवेळीं श्रीमन्महाराजांनीं निजज्ञान निजशिष्यास दिले. सद्गुरू अशा रीतीनेंच शिष्याच्या हृदयांत ज्ञान ओतत असतात. ''गुरूऽस्तु मौनं व्याख्यानम्'' या आचार्यांच्या उक्तीचेंच श्रीमन्महाराजांनीं अनुकरण केले. व लागलीच अनंतशास्त्र्यांच्या मनाला चिर शांतीचे समाधान लाभले.

यावरून सद्गुरूंच्या दर्शनाचा महिमा किती अगाध व वर्णनातीत आहे हे सूज्ञ वाचकांच्या ध्यानांत येऊन चुकलेच असेल. या जगांत हरप्रयत्नानें दुर्मिळ वस्तूंचा लाभ होऊं शकेल. पण सद्गुरूदर्शनाचा लाभ मिळणें व त्याही पेक्षां त्यांचा पूर्णानुग्रह मिळणें परम दुर्लभ आहे. बलवत्तर पूर्वसुकृत असल्याशिवाय व परमेश्वरानें नियोजित केलेली घटि उदयास आल्याशिवाय हा दिव्य योग घडणें दुरापास्त होय. हा योग म्हणजे आपल्या अनंतानंत जन्मांतील एक परिपक्व कालरूपी सुदिन होय. सद्गुरुदर्शन इतके लाभदायक आहे कीं त्या एका दर्शनानें व्रत वैकल्यें, उपवास, तीर्थयात्रा, जपतपानुष्ठान वगैरेंचे सर्व फल एका क्षणांत लाभू शकते. याचसाठीं अनंतशास्त्र्यांनीं देह किती झिजविला, तपोनुष्ठान कसें केले, तीर्थयात्राप्रसंगानें सद्गुरूचा शोध किती कसोशीनें केला याचे यथार्थ ज्ञान प्रिय वाचकांस होऊन चुकलेंच आहे त्याचबरोबर ही गोष्ट प्रिय वाचकांच्या ध्यानीं आली असेल कीं सद्गुरू प्राप्ती हा सुलभसाध्य विषय नव्हे. सद्गुरू हे सच्छिष्यांच्या उध्दारासाठींच अवतरतात हें जरी खरें असले तरी वाटेल त्या सच्छिष्याचा वाटेल त्या सद्गुरूकडून उध्दार होऊंच शकत नाहीं. ज्या मुमुक्षूचा उध्दार ज्या विविक्षित सद्गुरूकडून व्हावा असा दैवी संकल्प असतो त्याच सद्गुरूकडून त्या सच्छिष्याचा उध्दार होतो. वेगळ्या सत्पुरूषाकडून विविक्षित सच्छिष्याचा उध्दार होऊं न देण्यांतच दैवी संकल्पाचें रहस्य सांठविलेलें असते असे म्हणावें लागते.

अनंतशास्त्र्यांनीं तीर्थयात्रा प्रसंगानें पुष्कळ सत्पुरूषांच्या गांठी भेटी घेतल्या पण मनास शांति देणारा सद्गुरू त्यांस सांपडला नाही. ज्या महात्म्याचे केवळ दर्शनानें शिष्याच्या मनाला अखंड व शाश्वत समाधान लाभते तोच खरा सद्गुरू असें शिष्यानें जाणावें. आणि अशी एकदां आपल्या सद्गुरूची निश्चिती झाल्यानंतर त्या सद्गुरूबाबत ज्यांचे मन कालत्रयींही निश्चयपूर्वक बदलत नाहीं तोच सच्छिष्य. श्रीब्रह्मचैतन्यमहाराज सद्गुरूशोधात भटकत असतांना त्यांनीं अनेक सत्पुरूषांस आपल्यास अनुग्रह द्यावा म्हणून विनंति केली होती तरी प्रत्येकानें त्याचा गुरू वेगळा आहे, आपण नव्हे हें जाणून त्यांस अनुग्रह दिला नाहीं.

पूर्वी संतश्रेष्ठ तुकाराममहाराज देहू गांवीं रहात असतां त्यांची सेवा घडावी व अनुग्रह व्हावा म्हणून छत्रपति शिवाजी महाराज गेले असतां, मी तुमचा सद्गुरू नाहीं. तुमच्या उध्दारासाठीं समर्थ रामदासस्वामींचा अवतार झालेला आहे. असे तुकाराममहाराजांनीं सांगितल्याचे इतिहास प्रसिध्द उदाहरण आहे. संतांच्या चरित्रांत अशी अनेक उदाहरणें सांपडतील.

सामान्य मानव वस्तुस्थितीचा विचार न करता दिसेल त्यास सद्गुरू म्हणून शरण जातो. वास्तविक हा मानव आत्मोध्दाराच्या लालसेनें सद्गुरूस शरण जात नसतो तर सद्गुरूकृपेनें आधिव्याधीपासून त्याचा बचाव व्हावा, संसार सुरळीत चालावा, धनप्राप्ती व्हावी, ऐश्वर्याचा लाभ व्हावा एवढ्या भावनेनेंच तो शरण जात असतो. त्यास कसलाही सद्गुरू चालतो.

अनंतशास्त्री साधे मानव नव्हते. त्यांना ऐहिक सुखाची अभिलाषा नव्हती. त्यांना आत्मोध्दाराची खरी तळमळ होतीं व त्याच्या पूर्तीसाठी सर्व प्रयत्न करून त्यांनीं सद्गुरूचा शोध केला. सद्गुरूदर्शन मिळवून शांति मिळविली व त्यांचे चरणीं सर्वस्व समर्पण करून ते कृतार्थ झाले.

**|| श्रीसद्गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ||**

---

## श्रीब्रह्मानंद महाराज संस्थान, नवबाग विषयीची अधिक माहिती

श्री महाराजांच्या समाधीच्या भोवती ११ खोल्या पूर्वीच्या आहेतच. याशिवाय दोन वर्षापूर्वी एक मोठा हॉल व माडीवर ६ भक्तांच्या खोल्यांचे बांधकाम पूर्ण झाले आहे. समाधी मंदिरात एक दिवस राहण्याची परवानगी आहे. सेवेसाठी अधिक राहावयाचे असल्यास व्यवस्थापकांना कळवावे लागते.

उपासना वेळापत्रक – पहाटे ५.३० ते ७ काकड आरती, सकाळी १० ते १२.३० पूजा नैवेद्य, सायंकाळी ७.३० ते ९ उपासना व आरती.

उत्सवकाळामध्ये सकाळी ८ ते ११ पर्यंत लघुरुद्र होतात. गेली १० वर्षे श्री. ल. द. कुलकर्णी, श्री. सोलापूरकर, श्री. आठवले, श्री. सि. म. आपटे, श्री. पटवर्धन, श्री. प्रभाकर रामचंद्र म्हैसकर पंचमंडळ काम करीत होते. श्री. प्रभाकर रामचंद्र म्हैसकर गेली १० वर्षे पूर्ण वेळ संस्थेचे काम करीत होते. त्या काळातच नवीन वास्तू, मंडप अशी कामे झाली. त्यावेळी श्री. वि. ग. हळबे पंचमंडळात होते. दि. २४.९.२००१ रोजी उत्सवाचे काम झाले. नंतर सुमारे १५ दिवसांनी श्री. प्रभाकर रामचंद्र म्हैसकर यांचे समाधी मंदिरात निधन झाले. सध्याचे पंचमंडळ – (१) श्री. विठ्ठल गणेश हळबे (सरपंच) (२) श्री. सि. म. आपटे (३) श्री. विजयकुमार ग. पटवर्धन (सरकारी) (४) विनायक दामोदर कानिटकर (५) श्री. किरणराव पटवर्धन (सरकार) हे नित्यकाम पाहतात. संस्थानामध्ये पगारी सेवक नाहीत. श्री. मुरलीधर गद्रे, श्री. प्रभाकर रामदासी, श्रीमती मामी रेठरेकर, श्री. फडके, श्री. दीक्षित, श्री. भिमसिंग रजपूत सेवा करीत आहेत.

मंदिरात होणारे उत्सव – (१) चैत्र पौर्णिमा, हनुमान जयंती (२) आषाढ पौर्णिमा गुरुपौर्णिमा (३) भाद्रपद वद्य अष्टमी ते अमावस्या पुण्यतिथी उत्सव (४) कार्तिक पौर्णिमा – तुलसी विवाह (५) श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज पुण्यतिथी उत्सव – मार्गशीर्ष वद्य ते वद्य द्वादशी धनुर्मास

संपर्क :

श्रीब्रह्मानंद महाराज संस्थान
नवबाग (कागवाड)
सध्याचा दूरध्वनी : (०८३१) २६४०९०

विनायक दामोदर कानिटकर (पंच)
३३३, राधाकृष्ण वसाहत, एस.टी.स्टँडजवळ,
सांगली. दूरध्वनी – २३२२५२८

# प्रकरण अकरावें

## गुरूसेवा व सर्पेश्वरी प्रयाण

धर्म म्हटला कीं धर्मगुरूंची आवश्यकता आलीच व धर्म जर सातत्यानें टिकवावयाचा असेल तर धर्मगुरूंची परंपराही टिकवावी लागते. अशा धर्मगुरूंच्या परंपरेच्या रूपानेंच या जगांत सकल धर्म प्रचारांत आल्याचेंच आपल्या निदर्शनास येते. याच्या सहाय्यानेंच गुरूमार्गी झालेल्या मुमुक्षूंस मुक्ति सुलभ होते असा जणू सिध्दांतच आहे. पण या कलियुगांत केवल वेषधारी व शद्बज्ञानधारी गुरूंचा तांडाच दिवसेंदिवस वाढत चालला असल्याचा प्रत्यय हरघडीं येतो व यालाच सामान्य जन भुलतात ते केवळ त्यांच्या अज्ञानामुळें. मुक्तिप्रद गुरूंची ओळख पटण्याची एकतर अशा अज्ञानी लोकांची पात्रता नसते आणि दुसरे म्हणजे ते तरी केवळ मुक्तीची इच्छा करणारे थोडेच असतात. हें जसें खरें तसें मुक्ति देणारे गुरूही विरळ असतात हें ही खरे. शिष्य आपला कार्यभाग होईपर्यंत गुरूच्या कच्छपीं लागलेला दिसतो पण सच्छिष्य मात्र सदैव सद्‌गुरूंच्या आश्रयास असतो. आणि म्हणूनच सद्‌गुरू अशा सच्छिष्याची पूर्ण पारख करून त्यास आश्रय देतात. अशा सदुगरूंची ओळख पटणेंच दुरापास्त असते. अनेक वेदांतग्रथांत सद्‌गुरूंचा अधिकार व त्यांचीं लक्षणें याचे विवेचन आढळून येईल. तरी पण याचे यथार्थ ज्ञान सामान्य जनांनीं श्रीमत् दासबोधांतील पांचवा दशक विशेषत: त्यांतील पहिला व दुसरा समास वाचला असतां सुलभपणें होईल.

सद्‌गुरू हे मानव खरे. पण ते श्रेष्ठ असतात, परिपूर्ण मानव असतात, देव कोटीला पोंचलेले असतात. असें जरीं असले तरी त्यांची वागणूक मात्र सामान्य जनासारखी असते. भक्त निवारणार्थ त्यांचीं संकटें वेळप्रसंगी ते आपल्यावर ओढवून घेतात. लोक निंदेलाही ते तोंड देतात. पण कोणत्याही परिस्थितीत ते आपल्या मनाचा तोल ढळूं देत नाहीत. कमालीची शांतवृत्ती त्यांनीं धारण केलेली असते. नुसत्या उपदेशानें नव्हे तर स्वत:च्या आचरणाच्या प्रात्यक्षिकानें ते आदर्शभूत ठरतात. अशा संतांचा सहवास ज्यांना लाभतो ते खरे भाग्यवंत होत.

सद्‌गुरू हे प्रसिध्दिपराङ्‌मुख असतात. एवढेंच नव्हे तर तसें राहण्याचा त्यांचा अट्टाहास असतो. परमेश्वर जरी विश्वाच्या आड दडून बसलेला असला तरी त्याची ओळख त्यांना पटलेली असते. संसारकर्माच्या खुणा त्यांनीं ओळखलेल्या असतात. अखिल जगत् हे मायामय आहे याची पूर्ण जाणीव त्यांस झालेली असते. त्यामुळे या मायामय जगताकडे पाहण्याची एक विशिष्ट दृष्टि त्यांस प्राप्त झालेली असते. सुखदु:खांच्या प्रतिक्रियापासून ते अलिप्त असतात. सर्वस्व ईश्वराला अर्पण करून त्याच्यावरच सर्व भार ते घालतात. अर्थात् अशांची काळजी करणें ओघानेंच परमेश्वराचे कर्तव्य होऊन बसते. अखंड नामस्मरण हा त्यांचा छंद असतो व अभ्यासानें तोच त्यांचा देहस्वभावच बनतो. त्यांना ऐश्वर्याची हाव नसते म्हणूनच ते हात जोडून त्यांचें पुढें उभे असतात. त्यांना कीर्तीची अपेक्षा नसते म्हणूनच कीर्ति जणू कांहीं त्यांच्यावर रागावते व दिगंतरीं जाऊन पसरते.

अनधिकारी गुरूच्या पाठीस लागणें हें एका आंधळ्यानें दुसऱ्या आंधळ्याचे मागें जाण्याप्रमाणे आहे. अखेर दोघेही अधोगतीला जातात यांत काय नवल. अधिकारी गुरूजवळ अनुभवजन्य ज्ञान असते ते शास्त्रचर्चेनें मिळत नसते. आजवर या भूमंडलावर जेवढे म्हणून ज्ञानी प्रसिध्दीस आले व त्यांना जी सद्‌गति मिळाली ती

सद्गुरूमुखानेंच मिळाली आहे. आमच्या भारतमातेच्या उदरांत सद्गुरूस्वरूप विभूतींची खाणच आहे. अशा विभूति वरचेवर जन्मास येतात व आमच्या सारख्या भरकटलेल्या मंदमतींना सन्मार्गाला लावतात व उध्दारही करतात. अनंतशास्त्री ज्या ब्रह्मचैतन्य महाराजांना शरण गेले ती अशा प्रकारचीच एक थोर विभूति होती.

इ. सनाच्या १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत कलीचे प्राबल्य अमाप वाढले व अधर्म कल्पनातीत माजला. सद्धर्माची व गोब्राह्मणांची अवनती कल्पनातीत झाली. श्रीमद्भगवद् गीतेतील 'संभवामि युगे युगे' वचनानुसार भगवंतासच अवतार घेण्याची गरज भासू लागली असल्यास नवल तें काय. अवतार कार्याच्या पूर्तीसाठीं भगवंतानें श्रीशिवछत्रपतींच्या व श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या रूपानें आपली विभूति प्रकट केली. श्रीशिव प्रभूनें जी स्वराज्याची स्थापना केली. धर्माचा व देवतांचा जो जीर्णोद्धार केला, गोब्राह्मणांचा जो प्रतिपाल केला त्या सर्व कार्याचा पाया घालणारे व त्या कामीं सतत प्रेरणा देऊन चालना देणारे श्रीसमर्थ रामदासस्वामीच होत हे इतिहास देखील नाकारू शकत नाहीं. श्रीसमर्थ रामदासस्वामी हे श्रीमारुतीचे अवतार होत. सर्व भाविक लोक त्यांस तसे मानतातही. या विश्वप्रपंचाच्या कार्यात समर्थांना बिलकूल अवसर मिळाला नाहीं. ते आजन्म ब्रह्मचारीच राहिले. त्यांच्या आईनें आपल्या अंतकाळी त्यांस "बाळा, पुण्यविभूति तूं, माझ्या उदरी जन्मलास, तसेंच तुझें अमानुषत्व व त्यावर आधारलेल्या तुझ्या लीला पाहून, मी खरोखर धन्य झाले. वैराग्य वधूशीं लग्न करून तूं विश्वप्रपंची बनलास. परंतु तुझा सांसारिक विवाह होऊं न शकल्यानें तुझें गृहस्थाश्रमींचे सौभाग्य मला पहावयास न मिळाल्यानें तेवढी आशा शिल्लक राहिली" असें म्हटले. तेव्हां समर्थांनी आपल्या मातोश्रीस "या आशेची व्यर्थ चिंता करूं नकोस. आणखी दोन शतकांनी दक्षिण देशांत उदयास येणाऱ्या भक्तासाठी मला पुन्हां अवतार घ्यावा लागणार आहे. त्यावेळीं रामनामाचा जप व नामसंकीर्तनाचे महत्त्व त्या भगवद्भक्ताच्या मुखानें सर्व लोकांस समजावून देण्यासाठीं व आत्मोद्धाराच्या सुलभ मार्गाचें दर्शन घडविण्यासाठीं मला या कर्मभूमींत अवतार घ्यावा लागणार आहे. त्यावेळीं माझी ब्रह्मचर्याची नौका त्याचे स्वाधीन करून स्वत: गृहस्थाश्रमधर्म स्वीकारून तुझी आशा पूर्ण करीन. तेव्हा सुखानें देहत्याग कर" असें तात्काल वचन दिले. प्रिय वाचक हो ! या अभिवचनाप्रमाणें श्रीसमर्थानींच श्रीगोंदावलेक्षेत्री अवतार धारण केला व गृहस्थाश्रम स्वीकारला. व ज्या भगवद्भक्ताचे स्वाधीन आपली ब्रह्मचर्यनौका केली तो दक्षिणेंतील भगवद्भक्त म्हणजेच आमचे अनंतशास्त्री तथा ब्रह्मानंद महाराज.

माणगंगा नदीच्या पवित्र तटाकीं वास करणाऱ्या रावजीपंत कुलकर्णी नांवाच्या सद्गृहस्थांची भगवद्भक्तिपरायण धर्मपत्नी गीताबाई यांच्या पोटी शके १७६६ माघ शुद्ध १२ या शुभदिनी श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचा जन्म झाला. वयाच्या १२ व्या वर्षी ते गुरु शोधार्थ बाहेर पडले. गोदावरी तीरावर येहेळगांवी वास करीत असलेल्या श्रीतुकारामचैतन्य यांना शरण जाऊन त्यांचा अनुग्रह यांनी मिळविला. बैराग्याच्या वेषांत आसेतु हिमाचल पायीं संचार करून लोकोद्धार केला. नंतर गोंदावलेस येऊन उपासना मार्ग वाढविण्यास सुरवात केली. गृहस्थाश्रम स्वीकारला तरी रामनामस्मरणांत अंतर पडूं दिले नाहीं. अलीकडच्या काळांतील जणूं ते वसिष्ठमुनीच होते. त्यांच्या ठायी अनिर्वचनीय शक्तिविशेष वास करीत होता. शिष्यवित्तापहारी गुरु आधुनिक जगांत अडक्याला तीन मिळूं शकतात पण हे शिष्यहृत्तापहारी होते. शिष्याची मनोभूमिका ज्या दर्जाची असेल

त्या दर्जाचे साधन ते त्यास सांगत असत. मानव प्राण्यानें इतर कांहीं एक न करतां वाणीने अखंड नामस्मरण केल्यास तो सुलभपणें मोक्ष मिळवूं शकतो असा त्यांचा ठाम सिद्धांत होता. ते सर्वांनाच भवतारक रामनाम मंत्राचा उपदेश करीत. प्रपंचाचा त्याग न करतां, व्यवहार सन्मार्गानें चालवून, सकल कर्मफल भगवंताला अर्पण करणे हीच विरक्ति असा नुसता उपदेश न करतां त्याप्रमाणे स्वत: आचरण करून तो आदर्श ते सामान्य जनापुढें उभा करीत असत. सर्व कांही रामरायाच्या इच्छेवर ते सोंपवीत असत. त्यांचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाल्यास, ते निराकांक्षेची मूर्तीच होते, निष्काम कर्माचे व्यक्त स्वरूप होते, निरभिमानाचे माहेर घर होते, निस्पृहपणाचे जणू उगमस्थानच होते व प्रेमाचे चालते बोलते प्रतीक होते असे म्हणणें अतिशयोक्त होणार नाहीं. त्यांचे आचरण व वाणी जितकी आकर्षक होती, तितकीच त्यांची मूर्ति मनोहारी होती. त्यांची अंगकांति इतकी मोहक होती कीं त्यांच्या दर्शनानें प्रत्येकास मोहिनीच पडे. रात्रंदिवस काबाडकष्ट करून कंटाळलेल्या मनुष्यास उत्तम आश्रय मिळाला असतां जसा तो आनंदित होतो तसा भवसागरांत व्यर्थ धडपड करणाऱ्याला केवल यांच्या दर्शनाने निरांतक आश्रय लाभल्याचा आनंद होऊन धैर्य व शांति प्राप्त होत असे. शेकडो गाई यांनीं मृत्युमुखांतून सोडविल्या होत्या. ते मातेच्या ममतेनें प्रेमरसभरित वाणीनें सर्वांस बोध करीत असत. त्यांना उपासनेचे वेगवेगळे सर्व मार्ग मान्य होते. गोंदावलेस येणाऱ्या भक्तांना आपल्या उपास्य दैवताची उणीव भासू नये म्हणूनच कीं काय त्यानीं तेथे श्रीराम मंदिर, श्रीशिव मंदिर, श्रीदत्तात्रेय मंदिर, श्रीविठ्ठल मंदिर, श्रीशनैश्वर मंदिर, श्रीमारुति मंदिर आदि मंदिरें स्थापिली. अशा सद्‌गुरुची व अनंतशास्त्र्यांची गांठ पडल्यावर तेथें कसली कमतरता. उत्तम शिष्याच्या हातीं रत्न पडले असतां त्याचे हातून त्या रत्नाचे अनेक पैलू पाडून त्याचे तेज फांकविण्याचे कार्य झाले नाहीं तरच आश्चर्य.

अनंतशास्त्र्यांवर अनुग्रह करून पहिली जर कोणती कामगिरी बजावली असेल तर श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी आपल्या शिष्योत्तमाला अहंकाराचा वारा लागून बाधा होऊं नये म्हणून त्यांचेकडून त्यांनी मिळविलेली शाल वगैरे सर्व मानाच्या वस्तूंचें दान करावयास लावले. अनंतशास्त्र्यांनी गुर्वाज्ञा प्रमाण मानून तात्काळ तसें केले. तत्क्षणीं अनंतशास्त्र्यांची शास्त्रवासना व देहाभिमानही पार गळून गेले. सद्‌गुरुनाथांना सोडून कोठेंही जावयाचें नाहीं असा त्यांनीं ठाम संकल्प केला व त्यांच्या सेवेला ते सिद्ध झाले. परंतु ज्यावेळी भय्यासाहेबांस शास्त्र्यांना आज तुमच्याकडेच घेऊन जा. यांचा सायंकालचा उपहार तुमच्याकडेच होउं द्या असें सांगून आज्ञा दिली तेंव्हा अनंतशास्त्र्यांस अतोनात दु:ख झाले. सद्‌गुरूंना सोडून जाणें त्यांस पटत नव्हते. आणि गुर्वाज्ञा प्राणापेक्षां जास्त अशी त्यांची ठाम भूमिका असल्याने अनिर्वाहपक्षीं ते भय्यासाहेबांबरोबर त्यांचें घरी परतले. ही सुद्धां एक तऱ्हेने ब्रह्मचैतन्य महाराजांनी शिष्योत्तमाची कसोटीच पाहिली नसेल कंशावरुन? घरीं येऊन सायंसध्यादि आन्हिक आटोपून त्यांनीं फलाहार घेतला. त्यानंतर बोलत बसल्यावेळीं भय्यासाहेबांनी ''शास्त्रीजी, पूर्वी तुम्ही महाराजांच्या दर्शनास जाऊन, त्यावेळची महाराजांची स्थिति पाहून त्यांची हेटाळणी केलीत व नमस्कार सुद्धां न करतां निघून आलांत. असें असतां त्याच सद्‌गुरुनाथांचे ठिकाणीं तुमच्यांत इतकी भक्ति व इतका विश्वास कसा उत्पन्न झाला याचें मला आश्चर्य वाटतें'' असा प्रश्न केला. हें ऐकतांच अनंतशास्त्री आनंदाश्रू ढाळीत म्हणाले. ''भय्यासाहेब ! या महाराजांचा महिमाच इतका अगाध आहे कीं तो हरिहर

ब्रह्मादिदेवांना देखील कळणे शक्य नाहीं. माझ्यासारख्या मंदमतीला तो कसा कळणार ? अज्ञानी अशा मी, या दयाघनाची प्रथम किती निंदा केली तरी महाराजांनी मला आपलेकडे आकृष्ट करून आपले अद्‌भुत असे सत्य स्वरूप दाखवून माझेवर त्यांनीं कृपा केली. अशा सद्‌गुरुच्या तोडीचा दुसरा कोणी असणें शक्य नाहीं. या सद्‌गुरुनाथांच्या दरबारांत निंदकाला तसेंच वंदकाला योग्य तेच स्थान मिळणार यांत संदेह नाहीं. त्यांच्या ठिकाणीं भेदभावाचा अभाव आहे. सद्‌गुरुनाथ कृपासमुद्र आहेत. केवल परब्रह्मच. त्यांचे स्वरूप अवर्णनीय असणारच. अशा भक्तवत्सलाच्या स्मरणमात्रानेंच जन्मजन्मांतरींची असंख्य पातकें सर्व भस्म होऊन जातात. त्यांच्या दर्शनानें भवबंध तुटतो. अशा प्रकारें वर्णन करता करता शास्त्रीजींचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून आनंदाश्रू स्त्रवू लागले. ते भाववश झाले. महाराजांचे ठायीं त्यांची वृत्ति स्थिर झाली व त्यांचें मुखांतून खालील अवर्णनीय उद्‌गार बाहेर पडले. -

माझे सद्‌गुरुराव मारुती अवतार । कोणींही संदेह धरुं नये ॥१॥
दया ती पहावी सद्‌गुरुनाथांची। समर्थांचे परी शोभतसे ॥२॥
नारीनर ज्याला झाले रामरूप। नाहीं नाहीं भेद तिळप्राय ॥३॥
कोट्यानुकोटी उद्धरिले लोक। रामनाम एक बोधूनींया ॥४॥
करुनि व्यवहार परि नाहीं लिप्त। पंकातूनि गगन जैसें जाणा ॥५॥
सच्चिदानंद स्वरूपीं निमग्न। रामरूप सत्य सत्य जाणा ॥६॥
तुर्यातीत अवस्था आहे निरंतर। ब्रह्मानंद खूण सांगतसे ॥७॥

येथे सूज्ञ वाचक अशी शंका घेतील कीं अनंतशास्त्र्यांना ब्रह्मानंद पदवी प्राप्त होण्यापूर्वीच आपल्या कवनांत ब्रह्मानंद असा शब्द प्रयोग कसा केला. सकृत्‌ दर्शनीं शंका रास्त वाटते परंतु ब्रह्मानंद खूण म्हणजे ब्रह्मानंद पदप्राप्तीची खूण असा त्याचा अर्थ घेतला असतां शंकेचे निवारण होते. असो. सद्‌गदितवाणीनें शास्त्र्यांच्या मुखांतून बाहेर पडलेले कवन ऐकून भय्यासाहेबांना परमानंद झाला व अनंतशास्त्र्यांना सद्‌गुरुनाथांच्या निजस्वरूपाची ओळख पटली असल्याची त्यांची खात्री झाली.

दुसरे दिवशीं सकाळीं आपले स्नानादि आन्हिक आटोपून अनंतशास्त्री श्रीमहाराजांचे निवासस्थानीं दाखल झाले ते मात्र पुन्हां त्यांना सोडून कोठेही गेले नाहींत म्हणण्यापेक्षां श्रीमहाराजांनी त्यांना तसें जाण्यास सांगितलेच नाहीं असें म्हणणेंच संयुक्तिक होईल. अनंतशास्त्री रात्रंदिवस सद्‌गुरुसेवेंत निमग्न झाले. श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनीही २/३ दिवसांत आपला मुक्काम हालविला व ते गोंदावलेस गेले, बरोबर श्रीमहाराजांनी अनंतशास्त्र्यांसही नेले व तेथें त्यांच्या सेवेंत ते निरत झाले.

सेवा म्हणजे एक दिव्यच असते. गुरुसेवा म्हणजे तर परम दिव्य. लौकिकी विद्या जरी संपादन करावयाची झाली तरी गुरुदेवांना प्रसन्न ठेवण्यासाठी गुरुदेवांनी सांगितलेली सर्व कामें विनातक्रार करावी लागतात. यांतून जर आत्मविद्या संपादन करावयाची म्हणजे सामान्य काम नव्हे. ते अनन्य सामान्य होय. आत्मविद्या संपादनार्थ कष्टाची पर्वा न करतां गुरूनां सुप्रसन्न ठेवावें लागते. एवढ्यानेंच भागत नाहीं तर गुरूंना काय पाहिजे आहे हें

बिनचूक हेरून त्याच्या आगाऊ तजविजींत असणें हेच खरोखर अवघड. ते किती अवघड असते याची कल्पना खालील सूक्तीवरून येईल. ''सेवा धर्मो परम गहनो योगिनामप्यगभ्य:'' सद्‌गुरुदेखील शिष्याची सर्वतोपरी परीक्षा घेतात. त्यांच्या कसोटीस तो उतरला तरच सद्‌गुरु त्यांत मन घालतात. कारण प्रत्येक शास्त्राचीच मुळीं ''अशिष्याय न देयम्'' अशी स्पष्ट आज्ञा असते व या बंधनानें ते जखडलेले असतात.

सद्‌गुरुसेवा हेंच अनंतशास्त्र्यांचे परम ध्येय होते. श्रीगुरुमूर्तीशिवाय जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्ही अवस्थेंत दुसऱ्या वस्तूच्या चिंतेला ते मनांत थाराच देत नसत. गुरुवाक्य म्हणजे वेदवाक्य ही त्यांची दृढ श्रद्धा होती. श्रीगुरुमूर्ति हेच आपले परम दैवत असा त्यांचा पूर्ण विश्वास होता. गुरुगृह हाच स्वर्ग अशी ठाम भावना होती. सद्‌गुरुनाथ हेच साक्षात् परब्रह्म अशी पूर्ण जाणीव असल्यानें ते शुद्ध भावनेनें अखंड गुरुसेवेंत तत्पर रहात असत. इतर कितीही शिष्य असले तरी स्वत: प्रेमानें सगळी गुरुसेवा ते करीत असत. एवढेंच नव्हे तर निरंतर गुरुवर्यांची सेवा करण्यास शक्ति लाभावी म्हणून श्रीरामप्रभूची प्रार्थना करीत असत. यांची भूक तहान हरपली होती. निमित्त मात्र १/२ घरीं जाऊन मधुकरीभिक्षान्न आणून, ते गुरुंना समर्पण करून, त्यांच्या अनुज्ञेनें त्याचे सेवन करीत असत. गुरुसेवेंत अंतर पडूं नये अशा बेतानेंच परिमित भोजन करण्याची दक्षता घेत असत. निद्रेचाही त्यांनीं त्याग केला होता.

अनंतशास्त्री हे सदैव कौपीन धारण करीत व त्यावर गुडघ्यापर्यंत लांबीचे एक वस्त्र (लुंगी) गुंडाळत असत. यज्ञोपवीत हेंच त्यांचे प्रावरण. ऊन, थंडी, पाऊस, दिवस, रात्र याची कशाचीही पर्वा न करतां, उघड्या अंगानें ते अखंड गुरुसेवेंत रममाण होत असत. ते कोणाबरोबरही बोलत नसत. गुरुमुखांतून बाहेर पडणारी प्रत्येक आज्ञा झेलून, तात्काळ त्याप्रमाणें तजवीज करून पुन्हां त्यांच्या मागें हात जोडून दुसऱ्या आज्ञेची मार्गप्रतीक्षा करीत उभे रहात असत. सद्‌गुरुसमोर उभें राहून ते केंव्हाही बोलत असत. एवढेंच काय त्यांची दृष्टी देखील सद्‌गुरुचरणावर खिळलेली असे. श्रीमहाराजांची गोमातेवर फार प्रीति असे. दिवसाकाठी त्यांना भूस, कडबा वगैरे घालण्यास व त्यांचे अंगावरून हात फिरवण्यास ते एक दोन वेळां तरी जात असत. म्हणून अनंतशास्त्री हें श्रीमहाराज उठण्यापूर्वी पहाटे उठून गोशाळेंत जाऊन शेणमूत काढून, गोठा झाडून स्वच्छ करीत असत. त्यानंतर गुरुगृह झाडून केरकचरा काढीत असत. उष्टे खरकटे, सारवणादि कामें, त्यात कमीपणा न मानतां निरभिमानानें करीत असत.

अशा तऱ्हेनें न कंटाळतां अनन्यभावानें ते सेवातत्पर झाले असल्यानें त्यांना अवसर कसा तो मिळतच नसे. सद्‌गुरुसेवेची महती सच्छिष्यच जाणोत. विषयासक्त व भोजनासक्त अशा आम्हां शिष्यांना ती कशी कळणार ? एक तर ती महती कळवून घेण्याची आपली इच्छा नसते व दुसरें म्हणजे यदाकदाचित् इच्छा झालीच तर ती कळण्याइतकी आपल्या अंगी पात्रता नसते. आमचे सर्व व्यवहार पंक्तीस सुग्रास भोजन करणें, त्यानंतर निद्रासुखाचा यथेच्छ अनुभव घेणें व इतर शिळोप्याच्या गप्पांचे वेळीं खोलपर्यंत न रुजलेल्या फक्त कण्ठापर्यंत पोंचलेल्या वेदांताच्या गोष्टी पोपटांप्रमाणे बोलून व्यर्थ कालक्षेप करण्यावरच केंद्रित झालेले असत. मनमुराद गुरुसेवा करून त्यांचा कृपाप्रसाद मिळवून भवबंधनांतून मुक्त होऊ इच्छिणाऱ्यांची संख्या ''अनामिका

सार्थवती बभूव'' या उक्तीप्रमाणें त्या कोटींतच मोडते असें म्हटल्यास ते वाजवीच ठरेल. अनंतशास्त्र्यांची चित्तवृत्ति गुरूंच्या ठायीं इतकी स्थिर झाली होती कीं, गुरुरावांची हांक कानावर आदळण्यापूर्वीच ते नम्रपणे हात जोडून त्यांचेपुढें उभे रहात असत. ते गुर्वाज्ञा प्राणापलीकडे पाळीत असत. यामुळें सर्व शिष्यांमध्यें अनंतशास्त्री सर्वश्रेष्ठ होते. यांच्या सेवेचे यथार्थ वर्णन करण्याच्या भरीस न पडणेंच बरे. तुलनात्मक दृष्ट्या दर्शन घडवावयाचे म्हटल्यास पतिव्रतेची पतिसेवा देखील अनंतशास्त्र्यांच्या गुरुसेवेपुढें खचित् फिक्की पडेल. वानगी दाखल एक दोन उदाहरणें खालीं देत आहे त्यावरुन कल्पना येईल.

एकदां अनंतशास्त्री हे गुर्वाज्ञेप्रमाणे माणगंगा नदीवर स्नानास गेले असतां, दंत धावन करून स्नानासाठीं ते गडबडीनें उठले. स्नान करतां करतां गुरु आपल्यास हांक मारीत आहेत असा त्यांस भास झाल्यानें ते अर्धवट भिजलेल्या अंगाने जे पळत सुटले ते थेट गुरुंजवळ येऊन उभे राहिले. आसपासच्या लोकांना हें पाहून आश्चर्य वाटून त्यांनीं त्यांस विचारलें असतां ते पळत सुटल्यावेळीं सद्‌गुरुनाथ त्यांस हांक मारीत होते अशी त्यांची खात्री झाली. एकाग्रतेचेच हे लक्षण.

दुसऱ्या एके वेळीं अनंतशास्त्री हे सद्‌गुरुनाथांच्या रहात्या घराच्या धाब्यावरील गवत काढीत होते. त्यावेळीं श्रीमहाराजांनीं त्यांस हांक मारली. ती ऐकतांक्षणीच गुरुनाथांच्या समोर हजर होण्यास उशीर होऊं नये म्हणून देहाची पर्वा न करतां त्यांनीं धाब्यावरून धपकन खालीं उडी मारून गुरुदेवांसमोर हे हात जोडून उभे राहिले. अशा तऱ्हेनें वेळोवेळीं घेतल्या जाणाऱ्या प्रत्येक परीक्षेंत हे उत्तीर्णच होत राहिले.

आणखी एकदां श्रीगुरुंनीं घोड्यावर बसून पंढरपुरास जाण्याचें ठरविलें व शिष्योत्तम अशा अनंतशास्त्र्यांस आपल्या बरोबर घोड्याच्या पाठोपाठ पायीं येण्याची आज्ञा केली. गुर्वाज्ञा होतांच यांनींही मार्गात गुरुवर्यांना लागणारे सर्व साहित्य एका गांठोड्यांत बांधले व ते डोक्यावर घेऊन निघण्यास ते सिद्ध झाले. श्रीमहाराजांनी घोड्यावर बसून पंढरपूरची वाट धरली. अनंतशास्त्री घोड्याच्या पाठोपाठ पळत निघाले. शिष्याची परीक्षा घ्यावी म्हणून कीं काय श्रीमहाराजांनी सरळ वाट सोडली व आपले घोडे खडकाळ व काट्याकुट्यांनी भरलेल्या खांचखळग्यांतून, कांट्याकुट्यांतून ठेंचकळत व कांटे मोडून घेत हूं कीं चूं न करतां चालले होते. श्रीमहाराजांनी सकाळी दोन तास दिवसास जे गोंदावले सोडले ते नऊ दहा तासाला पंढरपुरीं दाखल होऊन ते श्रीराममंदिराला आले. अनंतशास्त्री पाठोपाठ होतेच. श्रीमहाराज घोड्यावरून उतरतांच त्यांनी घोडे नेऊन एकीकडे बांधले. सद्‌गुरूंच्या स्नानाची व्यवस्था केली. नंतर घोड्याचें अंग रगडून त्यास तोबरा दिला. इतक्यांत गुरुदेवांनीं त्यांना चंद्रभागेंत स्नान करून येण्याची आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें ते नदीस जाऊन स्नान करून आलेल्या शिष्यास पाहून कांहीं तरी विसरल्याचा आविर्भाव करून, ''पंढरपूरला आल्यावर ग्रामप्रदक्षिणा करून येऊनच माझा जेवण्याचा परिपाठ असतां यावेळीं मी विसरून जेवावयास बसलो. तरी मजकरितां तूं जा व नगरप्रदक्षिणा पुरी करून ये'' अशी त्यांनीं अनंतशास्त्र्यांना आज्ञा केली. गोंदावलेहून पंढरपूर अंतर ५० मैलापेक्षां जास्त होईल. अनंतशास्त्री घोड्यापाठोपाठ खांचखळग्यांतून, काट्यांकुट्यांतून, दगडाधोंड्यांतून पळत आले होते. त्यांच्या पायात असंख्य कांटे मोडले होते. पाय रक्तबंबाळ झाले होते. तरी तिकडे बिलकूल लक्ष न देतां, भुकेनें व

तहानेनें व्याकूळ झाले होते तरी गुर्वाज्ञा पालन करण्यांत तत्पर असलेल्या त्यांनी ती आज्ञा शिरसावंद्य मानली व कांहींही न बोलतां अति उत्साहानें व आनंदानें ती यथासांग पुरी केली. प्रदक्षिणा पुरी करणेस तब्बल तीन तास लागले. परत येतांच ते श्रीगुरूसमोर हात जोडून उभे राहिले. त्यावेळीं शास्त्र्यांना आलेले पाहून श्रीगुरूंनी त्यांस प्रथम भोजन उरकण्यास सांगितले. श्रीगुरूप्रसादाचे सेवन करून ते पुन्हा श्रीगुरुंजवळ येऊन हात जोडून उभे राहिले. दुसऱ्या एका शिष्यानें त्यास तुम्हीं दमला आहां. थोडी विश्रांति घ्या. श्रींगुरूंनी तुम्हांस हाक मारल्यावर मी कळवीन असे सांगितले त्याचवेळीं श्रीमहाराजांनी शास्त्र्यांस हांक मारली व ते हात जोडून त्यांचे पुढें उभे राहिले. त्यांना पहातांच सद्गुरूंनीं सदय अंत:करणानें त्यांना जवळ बोलावून, आज मी तुला पुष्कळ त्रास दिला, नाहीं ? वाटेच्या प्रवासानें तुझ्या देहाला पुष्कळ श्रम झाले असतील असें म्हणून त्यांच्या सर्वांगावर आपला अमृतहस्त फिरविला. तत्क्षणीं सर्व वेदनांचा परिहार झाल्यानें शास्त्र्यांच्या अंगांत नवचैतन्य संचरले. धन्य ते गुरु व धन्य तो शिष्य. गुरुशिष्यांच्या कसोटीच्या गोष्टी ऐकावयास केंव्हाही मनोहरच असतात. परंतु तशी कृती करणें मात्र अनंतशास्त्र्यांसारख्या श्रेष्ठ शिष्यांखेरीज इतरांना साध्य होणें दुरापास्तच. सच्छिष्य जर मन:पूर्वक गुरुसेवेंत तत्पर राहिला तर त्याची वृत्ति सद्गुरुनाथांचे विषयीं तादात्म्य पावते. दोघांमध्ये रेडिओॲक्टिव्हिटीचा प्रवाह सुरू होतो. त्यामुळें सद्गुरूंच्या मनांत उमटणारे भाव तात्काल सच्छिष्यास समजतात. गुरुशिष्यांचे दोघांचे हृदय एकरूप झालेले असते.

अनंतशास्त्र्यांची तशा प्रकारची विमल सेवा पाहून, अनंतशास्त्र्यांच्या अंगी बाणलेले उत्कट वैराग्य पाहून, आणि त्यांना लागलेली भगवद्दर्शनाची आतुरता पाहून, सद्गुरु ब्रह्मचैतन्य महाराज हे परम संतोष पावले. श्रीरामकार्याचा देशोदशी प्रसार करून लोकसंग्रह करूं शकेल असा हाच एक समर्थ शिष्य आहे अशी त्यांची खात्री झाली. स्वानंदानुभव चाखण्याची जरी याची पात्रता असली तरी तो मिळविण्यांत येणाऱ्या अडचणी दूर होण्यासाठीं याच्याकडून जपानुष्ठान अवश्य करविले पाहिजे असें ठरवून नर्मदातटाकीं सर्पेश्वर नांवाने ओळखल्या जाणाऱ्या ओंकारेश्वराचे देवालयीं जाऊन श्रीराम मंत्राचे तीन कोटीचें पुरश्चरण करणेची अनंतशास्त्र्यांना श्रीमहाराजांनी आज्ञा करून पाठविले.

**॥ श्रीसद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण बारावें

## ब्रह्मानंदपद प्राप्ति

गुरूंची आज्ञा शिरसावंद्य मानून अनंतशास्त्री सर्पेश्वरी दाखल झाले. दिनावधी न लावतां ते तेथे जाऊन पोंचले. ते स्थान भयानक अशा अरण्याच्या मध्यभागीं असून ओंकारेश्वर क्षेत्र म्हणून प्रसिध्द आहे. ते नर्मदा तटाकीं वसलेले आहे. हें पुरातन क्षेत्र असून प्रेक्षणीय आहे. तेथें त्या स्थानाच्या दुर्गमत्वामुळें लोकांचा सुळसुळाट बिलकूल नाहीं. साधक मुमुक्षूंच्या दृष्टीनें हें खरोखर श्रेष्ठतम असें स्थान आहे. निर्जन अरण्याच्या मध्यभागीं असल्यानें एकांतवासाला अत्यंत अनुकूल आहे. निर्जन अरण्यांत असलेल्या या देवाच्या दर्शनास येणारे भक्त विरळच. या देवस्थानचे आसपास वाघ, अस्वल, चित्ता या सारख्या हिंस्त्र प्राण्यांचा संचार असल्यानें येथें दिवसा दर्शनास येण्याचीच जिथें मारामार तेथें वस्तीचे नांवच काढण्याची सोय नाहीं. अशा स्थानीं अनंतशास्त्र्यांचे आगमन होतांच त्यांनीं कैलासपतीला प्रथम साष्टांग वंदन केले. पवित्रतम नर्मदानदी व निवांत शिवमंदिर पाहून त्यांचे सर्वांग पुलकित झाले. आणि न घाबरतां ''देहं वा पातयामि कार्यं वा साधयामि'' असा निर्धार करून त्यांनीं गुर्वाज्ञेप्रमाणें श्रीओंकारेश्वराच्या सांनिध्यात श्रीराम मंत्राच्या पुरश्चरणास प्रारंभ केला.

अनंतशास्त्री दररोज भल्या पहाटें उठून प्रथम ह्या ओंकारेश्वराची भक्तिभावानें स्तुति करून त्याला नमन करीत असत. नंतर त्यांचे आराध्य दैवत अशा श्रीसद्गुरूंना हृदयपटलावर स्थापून भक्तिभावानें त्यांची मानस पूजा करीत असत. यावेळीं ते आसनबध्द होऊन बसत असत. एक तास रात्र शिल्लक असतांनाच ते तेथून स्नानासाठीं नदीला जात असत. तेथें स्नानादि आन्हिक उरकून परत मंदिरीं येऊन षोडशोपचारें शिवाचे पूजन करून पद्मासन घालून रामतारक मंत्र जपाला जी सुरूवात होत असे ती अव्याहतपणें सायंकाळचे ४/५ वाजेपर्यंत चालत असे. त्यानंतर ते आसन सोडून उठत. त्यानंतर फळें धारण करणाऱ्या वृक्षाखालीं पडलेली पानें गोळा करून ती नर्मदेच्या पात्रांत धुवून खात असत व त्यावर नर्मदेच्या मधुर जलाचे पान करीत असत. हा कार्यक्रम दिवसाकाठीं एकदाच व तोही संध्याकाळीं होत असे. जवळपास जनवस्ती नसल्याने मधुकरी भिक्षान्नाची सोय नव्हती. त्यामुळें पर्णाहार हाच त्यांचा आहार बनला होता. अशा रीतीनें दिवस रात्र न म्हणतां श्रीराम मंत्राचा अखंड जप चालला होता. अशा तऱ्हेची उग्र तपश्चर्या अनिर्बंधपणे ६/७ महिने चालू होती.

भगवंत काय किंवा सद्गुरू काय साधकाची मधून मधून परीक्षा घेतच असतात. या परीक्षांनीं सच्छिष्याच्या वा साधकाच्या चित्ताची स्थिरता झाली आहे अगर नाहीं. त्याचे मनोधैर्य वाढले आहे कीं नाहीं याचा अंदाज त्यास येतो. असें म्हणण्यापेक्षां आपल्या भक्ताच्या अढळ निश्चयाचा प्रत्यय जगाच्या निदर्शनास आणून देण्याचा त्यांचा प्रयत्न असतो असें म्हणणेंच संयुक्तिक ठरेल. कारण एक तर पूर्ण खात्री झाल्यावरच साधकावर असली जबाबदारी ते टाकतात. तरी पण साधकांचे मनोधैर्य वाढावें या उद्देशानेंच संकटें निर्माण करून परीक्षा घेण्यांत-येत असली पाहिजे असें वाटतें. या न्यायाला अनुसरून श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी नाना प्रकारचे उपाय योजले.

एके दिवशीं रात्रीं अनंतशास्त्री एकांत चित्तानें जप करीत बसले असतां एक अक्राळविक्राळ वाघ देवळाबाहेर येऊन उभा राहिला व त्यानें दोन तीन वेळां भयानक अशी गर्जना केली. श्रीरामनाममंत्रजपांत गर्क झालेल्या

अनंतशास्त्र्यांना नीं ऐकूं गेली नसेल असें नाही. पण ते जागचे बिलकूल हालले नाहींत. नुसत्या गुरकावण्याचा उपयोग होत नाहीं. असें दिसून येतांच त्या व्याघ्रानें एकदम त्या देवळांत प्रवेश केला. एवढेंच करून तो थांबला नाहीं तर त्यांच्या सभोंवतीं फिरूं लागला. अनंतशास्त्र्यांनीं डोळे उघडून त्या वाघाकडे पाहिले मात्र लागलीच याच्या तडाख्यांतून आपण वाचत नाहीं असें त्यांना वाटले व दुःख झाले. अनंतशास्त्र्यांना जें दुःख झाले ते आपला देह वाघाचे भक्ष्यस्थानीं पडणार म्हणून नव्हे तर सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेची पूर्तता होण्यापूर्वींच देह भक्ष्यस्थानीं पडणार याचे अतोनात दुःख झाले. किंचित्काल मनाची चलबिचल झाली, श्रध्दा ढळली. पण दुसऱ्याच क्षणीं त्यांनीं तोल सावरला. मला त्याची कां काळजी म्हणून त्यांनीं श्रीमहाराजांवरच भार टाकला. या चराचरसृष्टींत माझे उपास्य दैवतच सद्‌गुरुरूपानेंच सगळीकडे व्यापले असल्यानें माझ्या योगक्षेमाची चौकशी करण्याकरतांच व्याघ्ररूपानें प्रत्यक्ष सद्‌गुरुनाथच अवतरले असले पाहिजेत अशी मनाशीं खूणगांठ बांधून, निर्भय होऊन त्यांनीं त्या व्याघ्राला एक नमस्कार केला व पुन्हां डोळे मिटून ते ध्यानस्थ झाले. अशा प्रकारें अनेकवेळां श्रीमहाराजांनीं अनंतशास्त्र्यांची परीक्षा घेतली. पण त्यांनीं आपला दृढ निश्चय ढळूं दिला नाहीं. गुर्वाज्ञापरिपालन हेंच आपलें धैर्य व ते तडीस नेणें हेंच आपलें कर्तव्य हीच ठाम भूमिका मानून त्यांनीं सर्व कष्ट सहन केले व अनुष्ठान चालूं ठेवलें.

''हेम्नः संलक्ष्यतेह ह्यग्नौ विशुध्दिः शामिकाऽपि वा'' असें एक सुभाषित वा शास्त्रवचन आहे. सोन्याची परीक्षा करावी लागते. त्यांतील अखेरची कसोटी अग्निदिव्याची. त्या न्यायानें श्रीमन्महाराजांनीं आपल्या शिष्याची आणखी एक वार कठोरतम परीक्षा घ्यावयाचें ठरविले. त्यांनीं एके दिवशीं आपल्या मायेनें महाभयंकर असें अनेक महासर्प निर्माण केले. ते सर्व इतस्ततः त्या देवालयांत यदृच्छेनें वावरूं लागले. सळसळ करूं लागले. फुत्कारूं लागले. त्वेषाने जमिनीवर फणा आपटूं लागले. परंतु अनंतशास्त्री हे त्यावेळीं गुरूचरणीं एकाग्रतेनें चित्ताचा लय लावून रामस्मरणांत निमग्न असल्यानें ते सर्पलीलांना तिळमात्रही घाबरले नाहीत. हे पाहून त्या भुजंगांनीं अनंतशास्त्री यांचे अंगावर चढण्यास सुरवात केली. सद्‌गुरुचरणीं दृढभाव ठेऊन यासही त्यांनीं जुमानले नाही. हें पाहून त्या भुजंगांनीं त्यांचे अंगास विळखे घालण्यास सुरूवात केली. यासही ते दाद देत नाहींत असें दिसतांच त्या सर्पांनीं अनंतशास्त्र्यांस जखडण्यास सुरवात केली. त्यामुळें अनंतशास्त्र्यांना असह्य वेदना होऊं लागल्या तरी देखील त्यांनीं मिटलेले डोळे न उघडतां श्रीसद्‌गुरूनाथांचे ध्यान करून विचार केला कीं, तीन कोटी श्रीरामनाममंत्र जपण्याची आज्ञा श्रीमहाराजांनींच केली आहे. त्याप्रमाणें जपानुष्ठानास सुरवात झाली आहे. त्याची पूर्तता करणें हे आपले आद्य व परमपवित्र कर्तव्य आहे. गुर्वाज्ञेचे उल्लंघन म्हणजे महत्पाप, नरकप्राप्तीच. गुर्वाज्ञा पालन करण्यांत देहपात झाला तरी हरकत नाहीं. हा जड देह तर नश्वरच आहे. याचा आज ना उद्या केव्हां तरी नाश हा व्हावयाचाच. मग तो गुर्वाज्ञेचे पालन करण्यांत कामीं आला तर कोठें बिघडलें. निदान गुर्वाज्ञेच्या उल्लंघनाच्या दोषांतून तरी मी मुक्त होईन. गुर्वाज्ञा पालन करणें हें माझें जसें कर्तव्य ठरते तसे ते मजकडून पूर्ण करून घेणे हे सदुगरू नाथांचे कर्तव्य नव्हे का ? शिवाय त्या आज्ञेचे पालन करण्यात दुहेरी फायदा आहे. मी यशस्वी झालो तर माझें परमकल्याण होणारच आहे. यदाकदाचित् सर्पाच्या भक्ष्यस्थानीं पडून अयशस्वी झालो तरी कल्याण हें ठरलेलेंच आहे. अनंत शास्त्रींनी असा विचार करीत साधना चालू ठेवली.

अनंतशास्त्री आपल्या बुजगावण्यास बधत नाहींत असें ज्यावेळीं त्या सर्पांनीं पाहिलें त्यावेळीं त्यांनीं अनंतशास्त्र्यांच्या शरीरास इजा होईल अशा तऱ्हेनें आपल्या फण्यांनीं फटके देण्यास सुरुवात केली. सर्वांग करकचून आवळून पीडा देऊ लागले. या चराचर सृष्टींत सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेशिवाय एका काडीची देखील इकडची तिकडे हालचाल होणें शक्य नाहीं मग हे महाभुजंग तरी त्यांचे आज्ञेशिवाय मला कसें चावणार व अपाय करणार असा दृढ निश्चय करून सद्‌गुरुनाथांस 'महाराज' अशी एकवार हांक मारून, त्यांस नमन करून पुन: जप करूं लागले. सर्वांतर्यामीं वास करणाऱ्या सद्‌गुरुनाथांनीं ज्ञान दृष्टीनें आपल्या शिष्याची दृढ श्रध्दा, उच्चतम कोटींतील गुर्वाज्ञापालन, अत्युग्र तपोबल, सत्यनिष्ठा जाणली. त्याच बरोबर अनंतशास्त्र्यांचा देहाभिमान संपूर्णपणें लयास गेला आहे. कामक्रोधादि षड्रिपूंचे पूर्णतया उच्चाटन झाले आहे. हा आता निजानंद चाखण्यास पात्र झाला आहे अशी त्यांची खात्री पटल्यानें, आतां याची आणखी परीक्षा घेण्याचें प्रयोजन नाहीं, असा मनांत विचार करून त्या देवालयांतील महेश्वराच्या लिंगांतून श्रीमहाराज कोटी सूर्याच्या प्रकाशानें तळपत अकस्मात् प्रगट झाले. व मुखानें रामनामाचा उच्चार करीत शिष्योत्तमाच्या मस्तकावर त्यांनीं आपला वरदहस्त ठेवला. तत्क्षणींच सर्व सर्प अदृश्य झाले. देवालयांत एकदम लखलखाट झाला तरी अनंतशास्त्री ध्यान मग्नच राहिले. देवळांत प्रगट होऊन श्रीरामनुग्रहास पात्र होऊन, शिष्योत्तमाच्या मस्तकावर वरहदस्त ठेऊन सद्‌गुरुनाथांनीं जेव्हा 'ब्रह्मानंद' म्हणून हांक मारलीं तेंव्हा श्रीगुरुंचा आवाज ओळखून अनंतशास्त्र्यांनीं डोळे उघडून पाहिले. तेंव्हा देवालयांत एकही भुजंग नसून महेश्वर लिंगांतून प्रगट झालेली सद्‌गुरुमुर्ति त्यांच्या नजरेस पडली. त्याबरोबर त्यांना जो प्रेमाचा उमाळा आला त्याचे यथार्थ वर्णन करणें लेखकाच्या कल्पनाशक्तींच्या बाहेरचे आहे. बसल्या ठिकाणावरून अनंतशास्त्री लगेच उठले व धांवत जावून त्यांनीं सद्‌गुरुनाथांचे पाय घट्ट धरले आणि त्यावर आपले मस्तक ठेऊन नमस्कार केला. अनंतशास्त्र्यांना इतका अवर्णनीय आनंद झाला कीं त्यांनीं आनंदाश्रूंनीं श्रीमहाराजांचे चरणकमल अक्षरश: भिजवून टाकले. सद्‌गुरुनाथांनीं सदयांत:करणानें त्यांना वर उठविलें व हृदयाशीं घट्ट धरून दृढ आलिंगन दिले. तेंव्हा योगी लोकांनादेखील परम दुर्लभ असणाऱ्या अनिर्वचनीय अशा ब्रह्मानंदांत अनंतशास्त्री तल्लीन होऊन पोहूं लागले. एवढेंच नव्हे तर अखिल विश्वच त्यांत तल्लीन झाले असल्यासारखे त्यास भासले. तो आनंद काय वर्णावा खरोखर गुरुशिष्यांच्या मीलनांतील आनंदाचा अनुभव ज्यांनीं प्रत्यक्ष चाखला असेल तेच त्याचे यथार्थ वर्णन करूं शकतील. आमच्यासारख्या येरा गबाळांचें तें काम नव्हे.

कांहीं काळ अनंतशास्त्र्यांना त्यास्थितींत ठेवल्यावर जेंव्हा त्या स्थितींत त्याचा लय लागल्याचें त्यास आढळून आले तेंव्हा थोड्या वेळानें श्रीमहाराजांनीं शास्त्र्यांच्या मस्तकावर हात ठेऊन त्या वृत्तींतून त्यांना जागें केले व ''शिष्योत्तमा ! तुझा दृढ निश्चय व तुझे उग्र तप यांच्या प्रभावानें मी परत संतुष्ट झालो असून, तुझ्यावर मी पूर्णानुग्रह केला आहे. आता तू कृतार्थ झाला आहेस. माझ्या दृढालिंगनानें आता तू ज्या ब्रह्मानंद सुखाचा अनुभव घेतलास त्याच सुखाचे चिरंतन सेवन करीत जगदउध्दाराचे कार्य करण्यास समर्थ आहेस. निरंतर श्रीरामसेवेंत राहून तारकमंत्राचा सामान्य जनांस उपदेश करून विषयासक्त बनून संसारात गटांगळ्या खाणाऱ्या जनसमूहाला भक्तिमार्गास लावण्याची पात्रता तुझे अंगीं आली आहे. आजपासून 'ब्रह्मानंद' या

नांवानें तूं प्रसिध्दी पावशील. एकदोन दिवसांत तूं जपानुष्ठान संपवून इंदूरला निघून ये'' अशी त्यांनीं आज्ञा केली. अमृततुल्य अशा श्रीमहाराजांच्या आज्ञेनें त्यांचा देह रोमांचित झाला, कंठ सद्गदित झाला. नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. व ब्रह्मानंदांत तल्लीन झालेल्या अवस्थेंत त्यांच्या मुखांतून खालीलप्रमाणें गुरुस्तवन बाहेर पडले.

ब्रह्मेंद्रमुख्यामरदुर्लभं श्रीरामस्य नाम प्रतिपादयन्तम् ।
भक्ताय रामार्पितचित्तवृत्ति श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ १ ॥
ब्रह्मप्रतीपाक्षरवाच्यामायागुणैरलिप्तं खमिवाम्बुपंकात् ।
श्रीसच्चिदानंदघनं प्रशान्तं श्रीसद्गुरु नित्यमहं नमामि ॥ २ ॥
चैलादिसर्वान् विषयान् विहाय कौपीनमात्रेण विभांतमच्छम् ।
विपक्षमित्रादिविभेदहीनं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ ३ ॥
तपो न जाने हि चास्मिसिध्दो न राजयोगीति निगर्वभावम् ।
गिरा वदन्तं सकलार्थविज्ञं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ ४ ॥
न्यग्रोधपत्रस्थितरामभद्रसम ममस्तात्मनिरीक्षणेन ।
अनंतमत्संयसृतिदावनीरं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ ५ ॥.

अशा तऱ्हेनें भावपूर्ण स्तवन करून श्रीगुरुचरणाला साष्टांग प्रणाम करून ब्रह्मानंदांनी वर उठून पाहिले तों श्रीसद्गुरुमूर्ति अदृश्य झाल्याचें त्यांचे दृष्टोत्पत्तीस आले. खरोखर गुरुमहाराजांचा महिमाच अगाध आहे यांत संशय नाहीं.

नंतर गुर्वाज्ञेप्रमाणें अत्यंत खडतरपणानें चालू ठेवलेले पुरश्चरण ब्रह्मानंदांनी दोन दिवसांत संपविले. विधींची पूर्तता केली व सद्गुरूदर्शनाच्या इच्छेनें ओंकारेश्वराचा निरोप घेऊन, ब्रह्मानंद पदवी पदरांत पाडून घेऊन सद्गुरूनाथांच्या सूचनेप्रमाणें ते इंदोरकडे प्रयाण करते झाले.

महेश्वर लिंगांतून प्रगट होऊन श्रीमहाराजांनी अनंतशास्त्र्यांस ''ब्रह्मानंदा, तुला काय पाहिजे. तुझा कुष्ठरोग निवारण व्हावा अशी तुझी इच्छा आहे का ?'' असा प्रश्न केला होता. तेव्हां ब्रह्मानंदांनीं अत्यंत नम्रपणें '' हें कुष्ट मला काय करते ? यापासून माझे हितच झालें'' असें उत्तर दिलें. यावर श्रीमहाराज ''खरें बोलल्लास. तुझ्या या निरिच्छ वृत्तीनें तूं पुढें फार वैराग्यशाली होशील. तुझ्या हातून श्रीरामाची अमाप सेवा घडावयाची आहे.'' असा आशीर्वाद दिला असा एक प्रवाद आहे.

**॥ श्रीसद्गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण तेरावे

## पुनरागमन व कर्नाटकीं प्रयाण

वाचकहो, प्रयत्न हाच परीस होय. मात्र त्यास सत्संगाची जोड मिळाली पाहिजे. सत्संगाकडे एकदां का दृष्टी वळली कीं अंगीं मुरलेल्या अपप्रवृत्ती क्रमाक्रमानें आपोआप नाहींशा होतात. संतांच्या ग्रंथांत त्यांचे हृदय सामावलेले असते. ते ग्रंथ म्हणजें संतांचे केवळ अंतरंग. कारण त्यांच्या कृतींचा उगम त्यांच्या विचारांतच असतो. आणि विचारांची बैठक सुधारली कीं काम झालेच म्हणून समजावें. हें सर्व सत्संगानें साधते. संतांचे विचार सुसंगत असतात. आपले विचार तात्पुरत्या प्रापंचिक हिताच्या जपणुकीवर आधारलेले असतात. सुविचाराला सदाचरणाची जोड मिळाली की कार्यभाग झाला. आणि तशी जोड ओघानेंच प्राप्त होत असते. भीति गाडून टाकली पाहिजे. प्राणाची पर्वा न करतां त्याच्यावर उदार व्हावयास शिकले पाहिजे. मानवाला त्रिविध ताप त्रासून टाकतात, त्यामुळें ते त्यास शत्रुवत् भासणारे त्रिविध ताप त्याचे मित्र बनतात व टाकीचे घाव सोसण्याची त्याची प्रवृत्ती बनते. एवढेंच नव्हे तर समर्थपणें ते सोसण्याची त्याची तयारी होते.

ब्रह्मानंद हे ओंकारेश्वरास नमस्कार करून, त्यांचा निरोप घेऊन सर्पेश्वराहून जे निघाले ते गुर्वाज्ञेनुसार इंदूरला येऊन पोंचले. इंदूरास पूर्वी वास केलेल्या भय्यासाहेबांच्या घरीं ते तडक गेले. सर्पेश्वराच्या वास्तव्यांत त्यांनीं पर्णे व फळें खाऊनच ७/८ महिनेपर्यंत अनुष्ठान केले असल्यानें त्यांचे सर्व शरीर कृश झालें होते. शरीरयष्टी पाहून त्यांची सहजासहजीं ओळख पटण्यासारखी परिस्थिति राहिली नव्हती. तरी पण त्यांच्या चेहऱ्यावर जे ब्रह्मतेज झळकत होतें त्यानेंच त्यांच्या गुरूबंधूंना त्यांची ओळख पटली व त्यांनीं त्यांचें स्वागत केलें. ब्रह्मानंद हे त्यावेळीं स्वागताचा स्वीकार करून त्यांत रममाण होण्याच्या मनस्थितींत नव्हते. सद्‌गुरूदर्शनासाठी मनस्वी उतावीळ झाले होते. त्यांनीं भय्यासाहेबांस ''श्रीगुरूमहाराजांचा वास येथेंच आहे ना ? '' असा प्रश्न केला. भय्यासाहेबांनी त्यांस ''सदुगरूनाथांचे वास्तव्य येथें होते पण २/३ दिवसाखालींच ते गोंदवल्यास निघून गेले'' असें सांगितले. तेव्हां ब्रह्मानंद विचारांत पडले. कारण गुरूमहाराजांची आज्ञा इंदूरला जा अशी होती. इंदूरला गुरूमहाराजांचा मुक्काम नव्हता व त्यांच्या दर्शनाची व सेवेची तर यांना तळमळ लागली होती. अशा विचारचक्रात सांपडून ते खिन्न झाले असतां पोष्टमननें एक पत्र भय्यासाहेबांच्या हातीं आणून दिले. भय्यासाहेबांनी ते श्रीमहाराजांचे आज्ञापत्रच हें जाणून, त्यास नमस्कार केला व भक्तियुक्त अंत:करणानें ब्रह्मानंदास वाचून दाखविण्यास सुरूवात केली.

'' आशीर्वाद ब्रह्मानंद पदवीला पोंचलेला शिष्यवर्य अनंतशास्त्री, माझ्याआज्ञेप्रमाणें तुमचेकडे आज अगर उद्यां येईल. त्याला एक दोन दिवस तुमचे येथें ठेवून घेऊन, उत्तम रीतीनें त्याचे आदरातिथ्य करून, त्यास इकडे पाठवावे. आशीर्वाद'' वरीलप्रमाणे पत्रांतील मजकूर ऐकत असतांना ब्रह्मानंदास गहिवरून आले. नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा वाहू लागल्या. दयाघन अशा सद्‌गुरूनाथांचे ते भक्तवात्सल्य पाहून मनांत त्यांनीं त्यांचा धावा सुरू केला. व दर्शनोत्सुक होत्साते लगेच गोंदवल्यास सदुगरूनाथांच्या भेटीस जाण्यास सिध्द झाले. तरी पण इंदूरमधल्या त्यांच्या गुरूबंधूंनी गुर्वाज्ञेनुसार त्यांस दोन दिवस प्रेमादराने ठेऊन घेतलें. ब्रह्मानंदासही गुर्वाज्ञा

शिरसावंद्य मानून तेथें राहणें भाग पडलें. इंदूर निवासी गुरूबंधूनीं ब्रह्मानंदाचे उत्तम आदरतिथ्य करून त्यांची सन्मानानें पाठवणी केली.

ब्रह्मानंदांनीं जी ब्रह्मानंद पदवी मिळविली ती अतिगहन अशा गुरूसेवेनें, त्यांचे मन सुप्रसन्न करून घेऊन, त्यांच्या अनुग्रहास पात्र होऊनच मिळविली. श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनीं या घोर कलियुगांत जो अवतार धारण केला तो केवळ ब्रह्मानंदास आनंदामृत पाजण्यासाठीं केला होता कां ? असा साहजिकच प्रश्न उद्‌भवतो त्यांचे निराकरण असें की सर्वांस आनंदामृत पाजविण्यास जरी ते समर्थ असले तरी ते पदरीं पाडून घेण्यास लोक तरी कुठें आतुर असतात. व नुसती आतुरता दाखवून तरी काय उपयोग ? त्याच्याच बरोबर कष्ट सोसण्याची तयारी असावयास नको काय ? श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांनीं जगदोध्दारासाठींच मानव देह धारण केला होता. जन्म मरणरूपी संसारचक्रांतून सुटका करून घेण्याच्या इच्छेनें शरण आलेल्यांना अभय देऊन, त्यांना या मायाजालांतून सहज लीलेनें सोडविण्यास ते बध्दकंकण होते. पण आमच्यासारखे पामर त्या मदिच्छेनें त्यांस मुळीं शरणच जात नव्हते याला त्यांनीं काय करावे. ब्रह्मानंदाचें सेवन केलेले शिष्य त्यांच्या परिवारांत ब्रह्मानंदाखेरीज दुसरे कोणी मुळींच नव्हते असें नाहीं. पण असे जे थोडे होते त्यांत ब्रह्मानंद अग्रगण्य होते. त्यांना उपमाच द्यावयाची झाल्यास समर्थ रामदासस्वामींच्या कल्याणाची यथार्थपणें देतां येईल.

सद्‌गुरूनाथांच्या पूर्णानुग्रहानें ब्रह्मानंदांचा जरी ग्रंथिभेद झाला होता. चित्तशुध्दि झाली होती व सगुण साक्षात्कारही झाला होता, तरी सगुणमूर्तिरूप आपल्या गुरूवर्यांची सेवा अजून करावास पाहिजे अशी उत्कट तळमळ त्यांच्या अंतरंगीं घर करून राहिली होती. म्हणूनच तांतडीनें ते इंदूरहून निघाले ते गोंदावलेस येऊन दाखल झाले.

गोंदावलेस येतांच श्रीसद्‌गुरूनाथांचे प्रथम त्यांनीं दर्शन घेतले. श्रीगुरूंच्या कोमल चरणकमलांचे संवाहन करून त्यांवर मस्तक ठेवलें. तात्काळ आत्यानंदानें पुलकित होऊन श्रीगुरूंच्या कोमल चरणकमलावर प्रेमाश्रूंचा वर्षाव केला. त्यांचें अंत:करण भावपूर्ण झाले. मंदस्मित करणाऱ्या मनोहर व प्रसन्न अशा श्रीगुरूदेवांच्या मूर्तीवर नजर खिळवून खालीलप्रमाणें स्तुति करण्यास त्यांनीं प्रारंभ केला.

साष्टांग वंदूनी सद्‌गुरूरायासी । चिंतावी मानसीं गुरूमूर्ति ॥ १ ॥
गुरूराव माझे ब्रह्मचि साकार । केला उपकार धरूनी देह ॥ २ ॥
नाहीं निराकार नाहीं हो साकार । ऐसा गुरूराव माझा आहे ॥ ३ ॥
अनिर्वाच्य ब्रह्म चैतन्यासि आलें । दुष्टहि तरले दर्शनयोगें ॥ ४ ॥
सकल निगमागम नेणती महिमा । नाहीं दुजी उपमा सद्‌गुरूसी ॥ ५ ॥
दीन ब्रह्मानंद प्रार्थितसे भावें । मन लय व्हावे रामरूपीं ॥ ६ ॥

अशा प्रकारें स्तुति त्यांनीं केली. वास्तविक आत्मानुभव मिळवून ते ब्रह्मानंदांत मग्न झाले असले तरी गुरूसेवेंत त्यांनीं अंतर पडूं दिले नाहींच तर उलट निरभिमानानें गुरूसेवा हातीं घेऊन पहिल्यापेक्षां जास्त उत्साहानें अखंड २४ तास ते गुरूसेवातत्पर राहूं लागले. प्रथमपासूनच ते सद्‌गुरूसमोर उभे राहून कधीं बोलत

नसत. त्यांच्या सान्निध्यात हजर राहण्याचा प्रसंग आल्यास सदैव हात जोडून त्यांच्या पाठीमागें उभे राहत असत. श्रीगुरूमहाराजांचे पुराण ते बिनचूक श्रवण करीत असत. पण त्यावेळीं देखील ते हात जोडून त्यांच्या मागे अगर एखाद्या कोपऱ्यांत उभे राहिलेले आढळत असत. यदा कदाचित् दुसऱ्या एखाद्या दालनांत ब्रह्मानंद विश्रांति घेण्यास लवंडले असल्यास श्रीगुरूमहाराज ज्या दालनांत असतील त्या दिशेकडे पाय न करण्याची खबरदारी त्या स्थितींत देखील ते कटाक्षानें घेत असत. केवढें जबरदस्त मर्यादापालन ! अशा प्रकारें कांहीं काल ब्रह्मानंदांनी सद्गुरूनाथांचे सानिध्यांत घालविला. त्या कालांत श्रीगुरूनीं त्यांस संपूर्णपणे लोकसंग्रहांचे शिक्षण दिले.

आपला शिष्य आतां स्वतंत्रपणें लोकसंग्रहाचे कार्य करण्यास समर्थ झाला आहे. आतां त्याला आपल्याजवळ ठेऊन घेण्याची आवश्यकता नाहीं असें वाटल्यानें श्रीसद्गुरूनाथांनीं ब्रह्मानंदास हाक मारून "ब्रह्मानंद, तूं आतापर्यंत केलेल्या सेवेनें मी संतुष्ट झालों आहे. यापुढें लोकसंग्रह करण्यास योग्य झालेल्या तुला येथेच ठेऊन घेण्यास प्रभू रामचंद्र तयार नाहीं." दिवसेंदिवस कलीचे प्राबल्य वाढत असल्यानें धर्माचा ऱ्हास होत असून अधर्म वाढत आहे. सत्य, नीति व न्याय यांचा लोप होत असून लोक खोट्याच्या, कपटाच्या, फसवेगिरीच्या आहारीं जात आहेत. परमात्म्याची भक्ति तुच्छ वाटू लागली आहे. केवळ शब्दज्ञान शिकून, वेदांताच्या मोठमोठ्या गोष्टी सांगून लोकांना फसवून, त्यांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन स्वत:चे उदरपोषण करणाऱ्यांची संख्या वाढत आहे. तुझी जन्मभूमी असलेल्या कर्नाटक प्रांतांतील कर्नाटक भूमाता तुझी आतुरतेनें वाट पहात आहे. तरी तिकडे जाऊन तेथील लोकांत श्रीरामभक्तीचा प्रसार कर. श्रीरामनामाचा महिमा सर्वांस समजावून सांग. नामरूचि त्यांच्यांत उत्पन्न कर, समर्थ सांप्रदायाचे मर्म त्यांस पटवून दे. सामान्य जन अज्ञानानें आडमार्गाचा अवलंब करून दु:ख भोगतात. अशा दीनजनांना सन्मार्गास लाव म्हणजे खरें समाधान त्यांस मिळेल. श्रीसमर्थांनीं दासबोधांत सांगितल्याप्रमाणे प्रपंचाचा त्याग न करता परमार्थ साधन करण्याची गुरुकिल्ली त्यांना दाखवून दे. बऱ्याच लोकांना परमार्थाची ओढ असून देखील योग्य मार्गदर्शनाच्या अभावीं ते व्यर्थ धडपड करीत असतात. अशा साधकांना साधन समजावून सांग. तळमळ असणाऱ्या खऱ्या मुमुक्षूंच्या पदरांत मोक्ष पडेल अशी व्यवस्था कर. यासाठीं आतां विलंब न करतां उद्यांच येथून प्रयाण कर. तेथें पोंचताच श्रीरामाचे कार्य हातीं घे आशीर्वाद." असें म्हणून परवानगी दिली.

श्रीमहाराजांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच ब्रह्मानंद परम दु:खी कष्टी झाले. श्रीमन्महाराजांच्या मनोहर सगुण मूर्तीचा विरह एक पळभर देखील होऊ नये अशी ज्यांची इच्छा त्यांना वरीलप्रमाणें सद्गुरूंची आज्ञा ऐकतांच वज्राघात झाल्यासारखे वाटलें. दु:खाक्रांत होऊन हात जोडून खालीं मान घालून अश्रू ढाळीत ते स्तब्ध राहिले. आपले मनोगत श्रीगुरूंना उकलून सांगण्याचे मनोधैर्य त्यांना होईना. परंतु सर्वांतर्यामीं वास करणाऱ्या गुरुवर्यांनीं ते जाणले व म्हणाले. 'शिष्यश्रेष्ठा, तुझा आशय मला कळला. पण श्रीरामरायाचे कार्य करण्यास सर्वस्वीं समर्थ असलेल्या तुला त्याचे मर्जीविरुद्ध उगीच ठेऊन घेतले तर त्यांस मी काय म्हणून उत्तर देऊं ? तसेंच संपूर्ण ज्ञान झालेल्या तुझ्यासारख्यानें अशा तऱ्हेनें विचार व्यक्त करावा हेही उचित नाहीं. तुझ्या मनांतून माझी सेवा करावयाची आहे पण श्रीरामरायाचें कार्य करणें व लोकसंग्रह करणें म्हणजे माझीच सेवा

नव्हे काय? हजारो मैलाचे पलीकडे जाऊन लोकोद्धाराचें कार्य तू करीत असतांना त्यांत विघ्नाचा संभव जरी निर्माण झाला तरी मी स्वत: तेथें प्रगट होऊन सर्व विघ्नांचा परिहार करीन. याची मनीं खात्री बाळग. तेव्हां कोणत्याही विचाराच्या आधीन न होतां तूं माझ्या आज्ञेप्रमाणें उद्याच प्रयाण कर. माझा तुला पूर्ण आशिर्वाद आहे.'' अशा प्रकारें त्यांची समजूत घातली व हें करीत असतांना श्रीमहाराजांनी ब्रह्मानंदास गुरु प्रसाद म्हणून एक जरीची कफनी, डोक्यावरील एक टोपी, पायांतील पादुका जोड, हातांतील कुबडी व लक्ष्मीप्रसाद म्हणून एक दुंडा पैसा देऊन त्यांची बोळवण केली. ब्रह्मानंदांनी या सर्व वस्तूंचा भक्तिभावानें स्वीकार केला. आणखी एकवार सद्‌गुरुनाथांच्या चरणावर मस्तक ठेवलें व त्यांची आज्ञा शिरसावंद्य करून तेथून ते जे अदृश्य झाले ते त्या दिवशीं पुन्हां कोणाच्याही दृष्टीस पडले नाहींत. त्यांनीं एकांत स्थळ गांठलें व तेथें बसून सद्‌गुरुनाथांचे ध्यान करून सद्‌गुरुवियोगाच्या दु:खाचा विसर पाडण्याचा आटोकाट प्रयत्न केला.

मायलेकरांचीच ताटातूट ती. मग समाधान कसें लाभावें ? खूप खटपट करून देखील समाधान लाभेना. गुर्वाज्ञा उल्लंघन करण्याची तर सोयच नव्हती. सद्‌गुरुंना सोडून जाण्यास मन कबूल होईना. नव्हे तो विचारच मनाला सहन होईना. अशा दुहेरी पेचांत सांपडून ब्रह्मानंद परमदु:खी झाले व ते सद्‌गुरुनाथांचे ध्यानांत मग्न झाले.

इकडे सद्‌गुरुही सकाळीं आपल्या जवळून ब्रह्मानंद जो एकदां गेला तो रात्र झाली तरी परत भेटला नाहीं म्हणून बेचैन झाले. अखेर सद्‌गुरुनाथांची स्वारी ब्रह्मानंद ज्या ठिकाणीं एकांतांत बसले होते त्या ठिकाणीं मध्यरात्रीं गेली. दु:खाने भारावलेल्या आपल्या शिष्यास पाहून, त्याच्याजवळ जाऊन, हरतऱ्हेने त्याला बोध करून त्याच्या मनांत ठाण मांडून बसलेल्या गुरुवियोगाच्या दु:खाचा भार त्यांनी हलका केला. मध्यरात्रीं सच्छिष्याच्या सांत्वनास गेलेले श्रीमन्महाराज पहांटे आपल्या निवासस्थानीं परत आले.

ब्रह्मानंदही प्रयाणास हीच शुभवेळ आहे असें समजले व त्यांनीं सद्‌गुरुनाथांची आज्ञा घेतली. श्रीमन्महाराजांच्या वरदहस्तानें प्रसादरूपानें मिळालेले सगळे पदार्थ त्यांनी मनोभावें डोकीवर धारण केले, व मनांत श्रीगुरुमहाराजांच्या सुंदर सगुण मूर्तीचें ध्यान करीत आपलीं जन्मभूमी कर्नाटक प्रांत, तिकडे प्रयाण केले.

**।। श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण चौदावें

## बेलधडी कार्यक्षेत्राची निश्चिती

या भूतलावर जननींचे व जन्मभूमीचे आकर्षण लहानांपासून थोरापर्यंत सर्वांसच असते. प्रभू रामचंद्रानें रावणास मारून लंकेचें राज्य जिंकलें पण तें भक्तश्रेष्ठ बिभीषणास देऊन टाकतांच लक्ष्मणानें श्रीरामास तें कां केलेंस ? सोन्याच्या लंकानगरींत राहून आपणांस सुखानें राज्योपभोग घेतां आला नसता कां ? असें जेव्हा विचारलें, तेव्हां श्रीरामप्रभूंनीं ''जननी जन्म भूमिश्च स्वर्गादपि गरीयसी'' या वचनानें त्याची समजूत घातल्याचें लोकविख्यात आहे. याच न्यायानें ब्रह्मानंदास कर्नाटकप्रांतीं जाण्याची आज्ञा होतांच त्यांना जर मातृभूमीची व जन्मदात्या जननीची ओढ लागली नसती तरच आश्चर्य.

सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेनुसार ब्रह्मानंद गोंदवल्याहून जे निघाले ते प्रथम आपली जन्मभूमी जालिहाळ या गांवीं आले. ते गांवीं पोंचले तेव्हा सूर्यास्तसमय झाला होता. पण आपल्या घरीं न जातां त्यांच्या वृत्तीस योग्य अशा घराजवळील विठ्ठलमंदिरात त्यांनीं वस्ती केली. सायंकाळचे संध्यादि आन्हिक आटोपून त्यांनीं सद्‌गुरुनाथांचे भावचित्र व पादुका आपल्यापुढें ठेऊन मानस पूजा केली व सुस्वर कंठानें भजन करण्यास त्यांनीं सुरवात केली. आनंद रसानें ओतप्रोत भरलेलें त्यांचे भावगर्भित भजन ऐकण्यासाठीं आसपासचे सर्व लोके तेथे जमा झाले. त्या जनसंमर्दात त्यांचे धाकटे व थोरले भाऊ पण होते. पण कोणालाही त्यांची ओळख पटली नाहीं. कारण या वेळपर्यंत त्यांना गांव सोडल्यास १०-१२ वर्षे होऊन गेली होती. शिवाय त्यांचा वेष म्हणजे कौपीन धारण करून वर गुडघ्यापर्यंतच येईल अशा तऱ्हेने गुंडाळलेलें शुभ्रवस्त्र, केसांच्या जटा, डोकीवर महाराजांनी दिलेली मखमली टोपी, भव्य मिशा, मानेचा मागमूस लागूं न देणारी दाढी, गळ्यांत तुळशीच्या मण्यांची जपमाळ व सर्वावर ताण म्हणजे शुद्ध मराठी बोली असा असल्यानें त्यांची लोकांस ओळख पटली नाहीं यांत कसलें आश्चर्य. नित्यनेमाप्रमाणें त्यांनीं आपलें भजन व आरती संपविली व जमलेल्या लोकांच्या तोंडून त्यांनीं गांवांतील सर्व हकीकत समजून घेतली. गांवांतल्या बऱ्याच लोकांनी त्यांस फलाहारासाठी आपल्या घरीं पाचारण केलें. पण आपल्या घरीं जाऊन आपल्या जन्मदात्या मातोश्रीचे हातूनच फलाहार घ्यावा या उद्देशानें ब्रह्मानंद आपल्या थोरल्या भावाबरोबर आपल्या घरीं गेले.

घरीं जातांच जराजर्जर झालेल्या आपल्या मातोश्रीस पाहून, तिच्याजवळ जाऊन 'माय' असें म्हणून त्यांनी मातोश्रीस नमस्कार केला. जीऊबाईंना संतोष झाला. पण अनंतानें नमस्कार केला असेल याची जाणीव त्यांना झाली नाहीं. महाराष्ट्रांतीलच कोणी साधू आले आहेत या भावनेनें त्यांनी आपल्या सुनेला त्या साधूस फलाहार देण्यास सुचविलें. तेव्हां ब्रह्मानन्दांनीं तुम्हीच द्या. दुसऱ्याच्या हातचा मी स्वीकारणार नाहीं असें शुद्ध मराठींत सांगितलें. जवळ असलेल्या यांच्या अग्रजांनी त्यांचा अभिप्राय ओळखला व त्यांस फलाहार देण्यास आपल्या आईस विनविले. वृद्ध जिऊबाईंनीं स्वहस्तानें त्यांस फलाहार दिला. ब्रह्मानंदांनी त्यास स्पर्श करून त्याचा स्वीकार केला. मी येतो असें सांगून पुन्हां एकवार मातोश्रीस वंदन केलें व ते विठ्ठल मंदिरात परतले. मातेच्या दर्शनानें व फलाहारसेवनानें त्यांना इतका परमावधीचा आनंद झाला कीं त्या भरांतच ते निद्रावश झाले.

दुसरे दिवशीं दोन तास रात्र असतानांच ते उठले व ऐन संकटकाली आपण प्राणत्यागास तयार झाल्यावेळी जिनें आपलें रक्षण केलें त्या मार्गदर्शक कुलदेवतेच्या, बनशंकरीच्या दर्शनाच्या ओढीनें त्यांनीं तिकडे प्रयाण केलें व दिवस उगवून एक तास झाला असेल नसेल अशा समयास ते तेथें पोंचले. गेल्याबरोबर श्रीशाकंबरी देवींचे प्रथम त्यांनी दर्शन घेतले. नंतर तेथील पुण्यप्रद अशा पुष्करणींत स्नान केलें. नंतर श्रीशाकंबरी मातेची मनोभावानें पूजा केली. अखेरीस अनेक स्तोत्रें म्हणत म्हणत, नमस्कार करत करत त्यांनीं बऱ्याच प्रदक्षिणा घातल्या. त्या रात्रीं त्यांनीं तेथेंच मुक्काम केला व दुसरें दिवशीं सकाळीं तेथून प्रयाण करून मधुकरीभिक्षान्न मिळवून ते परत तेथें आलें. मधुकरीभिक्षान्न पुष्करणींत बुडवून श्रीशाकंबरी देवीस त्यांनी समर्पण केले व तिच्या आज्ञेनें आपलें भोजन उरकलें. नंतर तेथून निघून त्यांनीं जवळचे अग्निरथस्थानक गांठले व अग्निरथांत बसून सायंकाळीं तें गदगला येऊन पोंचले. गदग गांवीं त्यांना पूर्वपरिचित असलेल्या श्रीत्रिकूटेश्वर मंदिरांत त्यांनीं वस्ती केली. श्रीत्रिकूटेश्वराला त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला व भावयुक्त अंत:करणानें स्तुतिपर असें खालील कवन म्हटलें.

शंभू कैलासीचा राजा । त्यासी नमस्कार माझा ॥१॥
अंकीं शोभे पार्वती । पुढें नाचे गणपती ॥२॥
गळा भुजंगाची माळा । रामनामांवांचुनि भोळा ॥३॥
ब्रह्मानंद पावे शमन । रामकृपे विषय वमन ॥४॥

अशा प्रकारें महेशाची स्तुती करून ती रात्र त्यांनीं तेथेंच घालविली. दुसऱ्या दिवशीं तीर्थांत स्नान करून संध्यादि आन्हिक व त्रिकूटेश्वराची पूजा त्यांनीं आटोपली. दुपारचेवेळीं जवळच्या चार घरीं जाऊन, मधुकरीभिक्षान्न आणून श्रीत्रिकूटेश्वरास नैवेद्य समर्पण करून त्या अन्नाचे भोजन केलें. तेथून ते जे निघाले ते ज्या श्रीवेंकटेशानें त्यास तीर्थाटनाचा व सद्‌गुरुशोधाचा मार्ग दाखवून उपकृत केले होते त्या श्रीवेंकटपतीच्या दर्शनासाठीं श्रीक्षेत्र वेंकटापूर येथें आले.

तेथें येतांक्षणीच प्रथम त्यांनीं श्रीलक्ष्मीपतीचे आतृप्ति दर्शन घेतले व त्या दर्शनानें ते इतके आनंदभरित झाले कीं जणू काय त्यांना सद्‌गुरुनाथांच्या आदेशाची विस्मृति झाल्यासारखे भासूं लागले. कारण सर्व कांहीं बाजूस सारून त्या दिवसापासून ते एकांत सुखाचा अनुभव चाखत तेथेंच वास करूं लागले. नंतर कांहीं दिवसांनीं याच वेंकटपतीच्या सान्निध्यांत राहून सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेप्रमाणें उपासनामार्गाचे व लोकसंग्रहाचें कार्य हातीं घ्यावे असा विचार त्यांचे डोक्यांत घोळूं लागला.

परंतु श्रीरामरायाची तशी इच्छा नसावी असें वाटतें. म्हणूनच कीं काय ब्रह्मानंदांचा शास्त्राभ्यास पूर्ण झाल्यावर, त्यांच्या बंधूंनी त्यांच्या लग्नाचा विचार चालविल्यावेळीं, त्या उसाभरींत न पडतां भगवच्चिंतनांत विरक्तीनें ते काल घालवीत असल्याचे माहित असलेला, व त्यांचे पुराण श्रवण करून भारावून गेलेला, शके १८०४ मध्यें श्रीवेंकटपतीचा प्रसाद घेऊन तीर्थाटनास जाण्यापूर्वी ब्रह्मानंदांनी बेलधडीस जो भागवतसप्ताह केला होता त्या सप्ताहास हजर राहून, त्यांचे ठायीं दृढविश्वास उत्पन्न झालेला बेलधडी ग्रामस्थ एक भाविक, दहा वर्षांनंतर ब्रह्मानंद पदवी प्राप्त करून घेऊन तेच श्रीवेंकटपुरास परत आले असून तेथें वास करीत आहेत अशी बातमी ऐकून, बेलधडीहून मुद्दाम त्यांचे दर्शनास श्रीवेंकटापूर क्षेत्रीं गेला. ब्रह्मानंदास त्यानें साष्टांग वंदन केले. व कांहीं

कुशल प्रश्न विचारून त्यानें अतिनम्रपणे त्यांस कृपा करून आपण बेलधडी येऊन, वास करून, आम्हांस उपकृत करावें अशी विनंति केली. यावर ब्रह्मानंदगुरूंनी ''पाहूं. श्रीरामरायाची जशी इच्छा असेल तसें होईल.'' असें सांगून त्याचें समाधान करून त्याची बोळवण केली. ब्रह्मानंद आतां जीवन्मुक्त झाले होते. तशा स्थितींत सुमारें दोन महिने ते तेथेंच राहिले. नंतर जवळच असलेल्या कपत डोंगरावर जाऊन अनुष्ठान करावें असा विचार करून त्यांनीं श्रीवेंकटेशाची सेवा पूर्ण केली व ते कपत डोंगरावर गेले. अर्थात तेथे जनसंपर्क नव्हताच. तथापि जनसंपर्काचा पूर्ण अभाव असेल अशी एक अवघड गुहा हुडकून तेथें ते वास करूं लागले.

विधिलिखित ही चीज और आहे. ब्रह्मानंद जरी इतक्या अवघड जागीं तपश्चर्या करीत होते तरी ती कुणकुण कपत डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या कडकोळ गांवच्या आपटे घराण्यांतील श्रीनिवास नांवाचे मुलाला लागली. त्याचे दैव उदयास येण्याची घटका भरत आली असावी म्हणून त्यास मधून मधून ब्रह्मानंद गुरूंस दुपारचे वेळीं कधीं थालिपीठ, तर कधीं खिचडी, तर कधीं भाकरी नेऊन देण्याची सुबुद्धि झाली. ब्रह्मानंद गुरूनीं त्याचा अव्हेर मात्र कधींच केला नाहीं. मात्र एके दिवशीं अकस्मात् त्यांनीं त्यास उद्यांपासून तूं येऊं नकोस. नोकरीचा तपास कर. मिळेल ती नोकरी मुकाट्यानें पत्कर. यांतच तुझें कल्याण आहे असे सांगून पाठविले.

त्या दिवसापासून तो मुलगा परत गेला नाहीं. ब्रह्मानंद गुरूंवर त्याची पूर्ण निष्ठा असलेनें त्यानें नोकरीच्या शोधास सुरवात केली. त्याचे शिक्षण बेताचेंच असल्यानें त्याला सांगली संस्थानांत पोलीस खात्यांत शिपायाची नोकरी मिळाली. व चढत चढत लवकरच ब्रह्मानंदगुरूंच्या कृपेस पात्र ठरलेला हा श्रीनिवास फौजदारीच्या हुद्यावर चढला. पुढें त्यानें ब्रह्मानंद गुरूंचा अनुग्रह घेतला व तो त्यांचा निस्सीम भक्त बनला.

याच काळांत डोंगर कपारींत रहात असलेल्या आणखी एका व्यक्तीचे दैव उदयास आले. त्या व्यक्तीचे नांव मल्लया. महाराजांचे खडतर वैराग्य, ते आचरीत असलेले तपोनुष्ठान पाहून त्या भाविकाची महाराजांवर भक्ति जडली व एक तांब्याभर गाईचे दूध आणून देऊं लागला. महाराजही त्या भाविकानें आणून दिलेल्या तेवढ्याच दुधाचे सेवन करून रामनामाच्या आनंदांत मग्न असत.

असा त्यांचा कार्यक्रम चालला असतांना एके दिवशीं पहाटेच्या वेळीं श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी त्यांस दर्शन दिले व ''शिष्योत्तमा ! तुला मी लोकसंग्रहाचें कार्यासाठीं पाठविलें असतां, ते सोडून एकांतांत राहून, तूं एकटाच नामामृत चाखीत त्या आनंदाचा उपभोग घेत राहिला आहेस याला काय म्हणावें ? हें सर्वथा योग्य नव्हे. त्या नामामृताचे माधुर्य संसारासक्त अज्ञ लोकांना पटवून, त्या नामाची गोडी सर्वात उत्पन्न करून त्यांच्यासमवेत श्रीरामनामांत काल घालविण्याचा प्रयत्न कर. त्या लोकांत मिसळून पण त्यांचेपासून अलिप्त राहून श्रीरामाची सेवा करण्यास तूंच एकमेव योग्य आहेस. तरी कसलाही विचार न करतां पूर्वपरिचित असलेल्या बेलधडी ग्रामीं जाऊन वास कर व श्रीरामसेवेला व लोकसंग्रहाला आरंभ कर. श्रीरामाच्या अनुग्रहानें सर्वप्रकारें तुला अनुकूलता प्राप्त होईल'' अशी आज्ञा करून ते अदृश्य झाले. श्री मन्महाराजांच्या दर्शनाने ब्रह्मानंदगुरु पुलकित झाले. त्यांची आज्ञा त्यांनीं शिरसावंद्य केली व आपले अनुष्ठान दुसरेंच दिवशीं संपवून ते बेलधडीच्या वाटेस लागले. तो दिवस शके १८१४ वंदन नाम संवत्सरातील श्रावण कृष्ण पंचमीचा होता. भक्त मल्ल्यास मात्र ते विसरले नाहींत. जातांना मल्लय्यास हांक मारून प्रसाद म्हणून त्यांनीं त्यास एक रुपाया दिला. हा घरीं कोनाड्यांत ठेऊन दररोज याची पूजा करीत जा म्हणजे या पुढें तुला पैशाची केंव्हांही अडचण भासणार नाहीं असें त्यास बजावून सांगितले.

श्रीब्रह्मानंद महाराज कप्पत डोंगरावरून निघाले ते त्याच दिवशीं दुपारचे वेळीं बेलधडीला आले. गुर्वाज्ञेप्रमाणें ते तेथेंच वासही करूं लागले. पूर्वी मुळगुंदला शास्त्राभ्यासासाठीं असतांना ४।६ वेळा ते बेलधडीस येऊन गेले होते. १।२ वेळा त्यांनीं बेलधडी गांवीं भागवत पुराणही सांगितले होते. यामुळें तेथील लोकांस अनंतशास्त्री या नांवानें ते चांगले परिचित होते. आतां जरी ते सद्गुरुकृपेनें महर्षीपदाला पोंचले होते तरी त्यांची योग्यता कळण्याची बेलधडी ग्रामस्थांची पात्रता नव्हती. एक शास्त्री या दृष्टीकोनातून लोक त्यांच्याकडे पहात असल्यानें तेथील लोकांत भक्तिमार्गाचा प्रसार करणें त्यांस अवघड वाटत होते. सामान्य जनता रजोतमोगुणांनी लिप्त होऊन संसारासक्त बनलेली होती. गुरूसेवेंत व एकांत वासात मग्न होऊन राहण्याची संवय झालेल्या ब्रह्मानंदांचे मन अशा लोकांत मिसळणेस तयार होईना. तरी पण गुरुमहाराजांच्या आज्ञेचें पालन करण्यासाठी या लोकांच्या सहवासांत राहिल्याशिवाय गत्यंतर नसल्यानें बेलधडीस मुक्काम ठेऊन रामसेवा व लोकसंग्रह या कार्यात आसक्त होण्याचा त्यांनीं ठाम निर्धार केला. सद्गुरूनाथ हे सर्व शक्तिमान असतांना आपल्याला या कार्याची चिंता करण्याचे कारणच काय ? सर्व भार सर्वस्वीं त्यांचेवरच आहे. अशा विचारमालिकेच्या प्रादुर्भावानें व प्राबल्यानें, मनात असून देखील दिवसेंदिवस त्या कार्यापासून ते अलिप्तच राहूं लागले. त्यावेळचा त्यांचा नित्यक्रम जोरदार होता.

दररोज दोन तास रात्रीस उठून मधुर कंठाने एक तासभर ते रामनामाचा घोष करीत असत. हा घोष आसनबद्ध होऊन चालत असे. त्यानंतर शौचमुखमर्जनादि देहधर्म आटोपून अजून एक तास रात्र बाकी असतांनाच स्नान करून एकांत स्थळीं जाऊन बसत असत. एकदम सायंकाळींच ते परत येत असत. त्यानंतर मधुकरीभिक्षान्न आणून सद्गुरुनाथांस ते समर्पण करून मग जेवण करीत असत. त्यानंतर सायंसंध्या उरकून श्रीमन्महाराजांचे भावचित्र व पादुका पुढें ठेऊन अत्यंत भाविकपणें सुस्वर भजन करीत असत. सुमारें चार तास रात्रीस भजन संपत असे व मग आरती करून, त्यानंतर सहा तास रात्र होईपर्यंत राम राम म्हणत बसत असत. या कार्यक्रमाचे वेळीं कोणाबरोबरही विशेष बोलत नसत. मौनव्रत धारण करून रहात होते म्हटलें तरी चालेल. अशा तऱ्हेच्या यांच्या अद्भुत वैराग्याचा व त्यांच्या मुखकमलावर विलसणाऱ्या दैवी तेजाचा त्या ग्रामस्थ मंडळीवर प्रभाव न पडतां तरच नवल. तेथील लोक हळूहळू भाविक बनून त्यांच्यावर भक्ति व विश्वास ठेऊं लागले. एवढेच नव्हे तर हळूहळू त्यांना आवडेल अशा तऱ्हेनें वागूं लागले. दृश्य असा मोठा फरक तो हा कीं दररोज रात्रीं चालणाऱ्या त्यांच्या भजनाचे वेळीं सर्व ग्रामस्थमंडळी न चुकतां हजर राहूं लागली. भजनाचे वेळीं ब्रह्मानंदगुरूंच्या तोंडून बाहेर पडणारे सद्गुरुप्रशंसेचे अभंग ऐकून या पृथ्वीतलावर गोंदावलेकर नांवाचे सत्पुरुष आहेत व त्यांचे ब्रह्मानंदगुरु हे शिष्य आहेत एवढी कल्पना त्या भाविकांस येऊन चुकली होती. "माझे सद्गुरुराव मारुती अवतार" हा अभंग सांगतांना ब्रह्मानंदगुरु इतके एकरूप होत असत कीं त्यावेळीं त्यांचा कंठ दाटून येत असे. डोळ्यांतून प्रेमाश्रू ओघळत असत. ते पाहून लोकांच्या मनांतील ब्रह्मानंदगुरूंविषयी भावभक्ति वाढू लागली. त्याचा परिणाम म्हणून कीं काय गांवांतील लोक उत्तरोत्तर त्यांस अनंतशास्त्री असें न म्हणता 'गुरु' असे संबोधूं लागले.

**।। श्रीसद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण पंधरावें

## उन्मनी अवस्था व बेलधडीत श्रीमन्महाराजांचे आगमन

उन्मनी ही एक अवस्था आहे. या अवस्थेंत साधक अंतर्मुख होतो. बाह्यसृष्टींतील व्यापारांचे त्यास संपूर्ण विस्मरण होते. देहाची खबर नाहींशी होते. देह जगविण्यासाठीं आवश्यक असलेल्या खाण्यापिण्याची देखील त्यास शुद्ध नसते. सद्‌गुरूपदिष्ट मंत्राच्या सतत अभ्यासानें मनांत उद्‌भवणाऱ्या सुष्टदुष्ट अशा सर्व संकल्प विकल्पांचे तो खंडन करतो. परिशुद्ध मनानें हृत्पटलावर सद्‌गुरुनाथांच्या दिव्य मूर्तीची अगर आपल्या उपास्य देवतेच्या मनोहर मूर्तीची स्थापना करून त्यावर कायम दृष्टी खिळवून तो सतत निजानदांत मग्न होऊन रहात असतो. स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण असे जे चार देहभाव आहेत त्यांना विसरून केवळ अनुभवानेंच ज्याची जाणीव होऊं शकते अशा तऱ्हेचा तो आनंद असतो. विचार करून तो समजूं शकत नाहीं. मनानें कल्पना करून तो उमगतही नाहीं. तो दृष्टीला अगोचर तर असतोच पण वाणीनें वर्णनही करतां येण्यापलीकडचा असतो. सद्‌गुरुंच्या कृपेशिवाय त्याचा अनुभव असा चाखतां येत नाहीं तसेंच त्यांच्या कृपेशिवाय त्यांतून लवकर पारही होतां येत नाहीं.

एकदां कां ही अवस्था प्राप्त झाली कीं त्याच्या सुखानंदाला मुकण्याची कांही सत्पुषांची मुळीं तयारीच होत नाहीं. अन्तकालापर्यंत त्या स्थितींत राहून नित्यानंदाचा अनुभव घेत ते रहातात. यामुळें सामान्य जनांचें अतोनात नुकसान होतें. कारण त्यांना अशा सत्पुरुषांचा सहवास घडत नाहीं व मार्गदर्शनही होत नाहीं. खरें पाहूं जातां अशा सत्पुरुषांचा अवतारच मुळीं लोकांच्या उद्धारासाठी असतो. धर्मजागृतीसाठी असतो. ज्यावेळीं ती स्थिति ओलांडून परत बाह्य सृष्टीच्या व्यवहारांत ते लक्ष घालतात, तेव्हांच ते त्या सुखाच्या गोडीची लालूच आमच्यासारख्या मंदमतींना दाखवून आम्हांला त्या कामीं प्रवृत्त करण्यास समर्थ ठरतात. या अवस्थेतून तावून सुलाखून बाहेर पडल्यावर आमच्यासारख्या संसारासक्त जनांना त्यांतून मुक्त करून पैलतीरास नेण्यास ते बद्धपरिकर होतात. खरोखर असल्या महनीयांचे जगावर अनेक उपकार आहेत.

या अवस्थेची झुळूक लागू लागतांच ब्रह्मानंदगुरूंनीं कांही भाविकांना याउप्पर आपण कोठेंही असलों तरी आपल्यास हुडकून आणून आठवणीनें जेऊं घालण्यास सुचविलें होतें. या अवस्थेत बहुधा ते दिगंबर स्थितींत डोंगर पायथ्यास, झाडीच्या आसपास, तळीं पुष्करणी सारख्या जलाशयाचे काठी उभ्या पिकांमध्ये डोळे झाकून पडलेले आढळत. भाविक लोक यांना हुडकून, उठवून हात धरून घरीं आणून जेऊं घालीत असत. जेवतांना ते सर्व पदार्थ एकत्र कालवीत व अवघे तीन चार घास घेऊन जेवण संपवीत असत. भोजनाचे वेळी देखील रामनामाव्यतिरिक्त दुसऱ्या शब्दांचा उच्चार त्यांच्या मुखांतून बाहेर पडत नसे. एक एक दिवशीं तर किती हुडकले तरी ते सांपडत नसत. कित्येक वेळीं तर थंडी, ऊन, पाऊस न म्हणतां, दगड गोटे, कांटेकुटे, केरकचरा वगैरे घाणीस न जुमानता, हवे तेथें झोंपत असत. अशा अवस्थेत कोणीही त्यांना बोलावून नेले तरी त्याचेबरोबर जात व त्यास कांहींही खावयाला दिले तरी खात. भाविक लोकांनीं आंघोळ घातली तरच त्यास आंघोळ मिळत असे.

बेलधडी ग्रामीं रंगराव इनामदार नांवाचे एक भाविक होते. त्यांची धर्मपत्नी द्वारकाबाई ही महान् साध्वी होती. ब्रह्मानन्दगुरूंवर द्वारकाबाईची विशेष भक्ति असल्यानें ती त्यांची अशा स्थितींत फार आदरानें सेवा

करीत असे. गुरु कोणत्या जागीं पडलेले आहेत हे लोकांच्याकडून समजून घेऊन, स्वत: तेथवर जाऊन, देहभानरहित स्थितींत डोळे मिटून पडलेल्या त्यांना उठवून, हात धरून घरीं आणून, जातीनें त्यांना आंघोळ घालून नंतर जेवावयास वाढीत असे. कित्येक वेळां तर ते स्वत:च्या हातानें जेवण्याच्या परिस्थितींत नसल्यावेळीं लहान मुलांना भरवितात त्याप्रमाणें लहान लहान घांस करून ती जेऊं घालीत असे. नंतर त्यांचे तोंड धुवून, त्यांना अंथरुणावर निजवून मग आपण जेवीत असे. पुढें पुढें ही तर रोजचीच दिनचर्या होऊन बसली होती. साध्वीची त्यांचेवर इतकी भक्ति बसली होती कीं जर एखादे दिवशीं हुडकून देखील ते सापडले नाहींत तर ही महासाध्वी जेवण न करतां उपाशी रहात असे. धन्य ती माऊली व धन्य तिची अनन्य सेवा. खरोखर तिची पुण्याई जबर म्हणून तिला अशा सत्पुरुषांच्या सेवेचा लाभ झाला. ब्रह्मानंद गुरुदेखील मातृभाव दाखविणाऱ्या या साध्वीला 'काकी' असें संबोधीत असत व केव्हां केव्हां तर प्रेमातिशयानें स्वमुखानें आपल्या सद्गुरुनाथांच्या अगाध लीला तिला सांगत असत.

या उन्मनी अवस्थेंतच ब्रह्मानंदगुरूंच्या दैवी सामर्थ्याची हळूहळू प्रचीति बेलधडीच्या लोकांस येऊं लागली. एकदां एका भाविक गृहस्थाची मुलगी फार आजारी होती. औषधोपचारांची कमाल करून देखील ती बरी होण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां अगतिक झाल्यानें गुरूंना भेटून तरी कांहीं उपाय विचारावा या भावनेनें त्यानें त्यांचा खूप शोध केला. परंतु त्यांचा शोध न लागल्यानें निराश होत्साता तो घरीं परतत असतां जोंधळ्याच्या पिकांत डोळे झांकून बसलेले गुरु त्याच्या नजरेस पडले. पळत त्याच्याकडे जाऊन त्यानें त्यांस नमस्कार केला मुलीचा आजार जास्त झाला आहे असे विनयपूर्वक विनविलें. गुरूंनी डोळे उघडून त्यांचेकडे पहातांच, त्यांचे मौन असल्यानें त्यानें चिटदिशीं बरोबर आणलेली पाटीपेन्सिल त्यानें त्यांच्यापुढे ठेविली. गुरूंनी 'मुलगी अल्पायुषी आहे. व्यर्थ काळजी करूं नकोस' असें लिहून पाटी त्यास परत दिली. तें वाचून, हताश होऊन तो घरीं परतला तों आश्चर्य असें कीं, आपल्या आजारी मुलीस मांडीवर घेऊन नामस्मरण करीत बसलेले गुरु त्याला दिसले. कांही वेळानंतर गुरूंच्या मांडीवरच त्या मुलीनें प्राण सोडला. अशी गोष्ट सांगतात कीं या उन्मनी अवस्थेंतच एकदां कोठे तरी हिंडत असतां कांही दुष्ट लमाणानीं चेष्टेनें कुत्र्यास छू करून त्यांचे अंगावर घातले. त्यासरशीं त्या कुत्र्यानें त्यांच्या पायास कडकडून चावा घेतला. हे विदेही स्थितींत असल्यानें त्यांनीं त्या कुत्र्याच्या चाव्याची परवा न करतां तसेंच आपले भ्रमण चालू ठेवलें. ब्रह्मानंदाच्या पायांतून रक्तस्त्राव होत असल्याचें पाहून इनामदारांकडील कांहीं लोकांनी त्या लमाणांस योग्य शासन झालें पाहिजे असें ठरवून त्यांचा शोध त्यांनीं चालविला. त्या लमाणांना बोलावून घेतले असल्याचें गुरूंस समजतांच ते स्वत: इनामदारांकडे गेले. असें करणें (त्यांना शिक्षा करणें) केंव्हाही योग्य नव्हे असें सांगून त्यांस पोटभर जेऊं घालून त्यांनीं परत पाठविण्यास लावले. हे सर्व त्यांनीं पाटीवर लिहून त्यांस समजाविले.

अशा प्रकारें सहा महिन्यावर काल त्यांनीं घालविला व पुढें ते क्रमाक्रमानें ही अवस्था ओलांडून जरी पूर्ववत् व्यवहार करू लागले तरी त्यांनीं आपलें मौनव्रत सांडले नाहीं. नंतर काहीं काल गदग येथील भीष्म तलावाजवळील एका शेतांत त्यांनीं वास केला. त्या कालांत एकदां असे घडलें कीं, श्रीमन्महाराजांचा गोंदवल्याचा एक शिष्य श्रीगोकर्णाकडे चालला असतां सहजगत्या गदगला आला. ब्रह्मानंद तेथील एका शेतांत रहात असल्याचें त्यास समजल्यानें तो त्यांच्या भेटीस गेला. आपण गोकर्ण क्षेत्रास जात असल्याचें त्यास कथन करून आपण येणार कां

अशी त्यानें पृच्छा केली. ब्रह्मानंदगुरूंनी मंदस्मित केलें व आपल्या अमृतवाणीनें त्यात सांगितलें तें असें -

जेथें दिसें सद्‌गुरुचरण । तेचि आम्हां गोकर्ण ॥१॥
गोकर्णीचा महेश्वर । सद्‌गुरुनाथ खरोखर ॥२॥
माणगंगेचिया तीरीं । लोळताती मुक्ति चारी ॥३॥
गोंदावले ऐसें भुवन । सद्‌गुरूंचे जन्मस्थान ॥४॥
गोंदावले ऐसें क्षेत्र । सोडुनि जावें का इतरत्र ॥५॥
ब्रह्मानंद सांगू किती । सद्‌गुरुविण नाहीं गति ॥६॥

हा अभंग ऐकून तो शिष्य मनांत खजील झाला असल्यास नवल काय ? मात्र ब्रह्मानंदांची सद्‌गुरुचरणावर असलेली उत्कट भक्ति व अकृत्रिम प्रेम पाहून त्यानें त्यांस मन:पूर्वक धन्यवादच दिला.

पुढें कांही दिवसानंतर ब्रह्मानंदगुरु पुन्हां परत बेलधडीस येऊन राहू लागले. आतां त्यांना आत्मविश्वास प्राप्त झाला असावा असें वाटतें. कारण एक दिवस सहज बोलतां बोलतां त्या गांवच्या इनामदारांपुढे तेथें एक श्रीराममंदिर बांधण्याचा आपला मानस त्यांनीं व्यक्त केला. इनामदारांनी तात्काळ आपली संमती दिली. व त्यांस कदाचित् जागेची अडचण भासेल हें जाणून आपल्या घराजवळील शिवमंदिरासमोरील जागा देवालयासाठीं देऊं करून, द्रव्य सहाय्य करण्याची व इतर सर्व तऱ्हेची मदत करण्याची कबुली आपणहून दिली. गुरूंना अत्यानंद झाला व लागलीच कामास सुरवात करावयाची म्हणून स्वत: दगड डोक्यावरून वाहून आणून टाकण्यास त्यानीं सुरवात केली. देवालयाचा पायाही स्वत: खणण्यास त्यांनीं सुरवात केली. अशा प्रकारें सुमारें दोन महिने त्यांनीं स्वत: कष्ट घेतले. परंतु ग्रामस्थ मंडळींकडून अपेक्षेप्रमाणें साह्य झालें नसावें. केव्हां एकदां देऊळ तयार होईल व रामभक्तीच्या बीजाचे रोपण लोकांच्या मनमानसांत आपण करूं इतकी आतुरता त्यांस लागून राहिली होती. आपल्या सहाय्यास श्रीमन्महाराज धांवून आल्याशिवाय तें होणार नाहीं असें वाटून, श्रीमन्महाराजांच्या आगमनासाठीं गांवाशेजारी मळ्यांत असलेल्या एका देवळांत बसून, मौन धारण करून, त्यांनीं अनुष्ठानास सुरवात केली. मात्र अनुष्ठानास सुरवात करण्यापूर्वी मातोश्रीसमान असलेल्या द्वारकाबाईनां ''काकी, थोड्याच दिवसांत आपले गुरुमहाराज इकडे येणार आहेत'' असें त्यांनीं सांगितलें होतें.

अनुष्ठानास सुरवात केल्याच्या दहाव्या दिवशीं चमत्कार घडला. श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्य महाराज शिष्यपरिवारासमवेत अकस्मात् बेलधडी गांवीं आले व गांवाजवळच्या मारुतिरायाच्या देवळांत उतरले. श्रीमन्महाराजांचा अजानुबाहू देह, सोन्याप्रमाणें झळकणारी त्यांची शरीरकांति, त्या कांतीला शोभेल अशी त्यांनीं धारण केलेली केशरी कफनी, त्याच्या कडेला असलेली लखलखीत जराची शोभिवंत कलाकुसर, जरीकांठीं नेसलेले भारी किमतीचें रेशमी वस्त्र, कलाकुसरीची डोक्यावर धारण केलेली मखमली टोपी भाल प्रदेशावर शोभायमान दिसणारे उभे केशरी गंध, मंदस्मित दर्शविणारा मनमोहन चेहरा, पायांत शोभणाऱ्या लांकडी खडावा, एवंगुणविशिष्ट अशी ती भव्य पुरुषाकृति पाहून प्रत्येक जण भाविकपणें नतमस्तक होऊन नमस्कार करून, त्या सुंदर रूपाचें आपल्या डोळ्यांनीं आतृप्ति सेवन करीत जागच्याजागीं खिळल्यासारखा उभा रहात असे. श्रीमन्महाराजांनीं 'ब्रह्मानंद येथें कोठें राहतात' म्हणून विचारले तेव्हां त्या लोकांनीं तोपर्यंत तें नांव कधींच ऐकलें नसल्यानें, त्यांनीं एकदम या नांवाचें येथें कोणी रहात नसल्याचें सांगितलें. तें ऐकून

महाराजांबरोबरील शिष्यांनीं ब्रह्मानंद म्हणजेच पूर्वाश्रमीचे अनंतशास्त्री असा खुलासा करतांच ते या शेतांत असलेल्या देवळांत राहतात असें सांगितलें. तर मग गोंदावलेकर महाराज आले आहेत असें त्यांस कळवा असें शिष्यांनीं सांगतांच, लोक शास्त्र्यांना ही हकीकत सांगण्यास पळत सुटले व त्यांनीं ती वार्ता ब्रह्मानंदांना दिली. महाराज आले असल्याची वार्ता कानावर पडतांक्षणींच भावाविष्ट होऊन ब्रह्मानंदांनी अवधी न लावतां एकदम त्या शेताच्या कुंपणावरून उडी मारली. दगड गोटे, कांटेकुटे, खांचखळगे, उंचवटे ढिगारे यांचा विचार न करतां पळतच ते मारूतिरायाच्या देवालयांत आले. आपल्या मानसमंदिरांतील मनमोहक मूर्तीच प्रत्यक्ष उभी ठाकली असल्याचें पाहून, हर्षभरित होऊन, सद्‌गुरुनाथांच्या पदयुग्मांवर मस्तक ठेऊन, साष्टांग नमस्कार करून, हात जोडून आनन्दबाष्पांचा वर्षाव करीत श्रीमन्महाराजांच्यासमोर ते उभे राहिले. त्यांना पाहून श्रीमन्महाराज हास्य वदनानें 'ब्रह्मानंद, इतके श्रम कां करतां'' असें प्रेमानें म्हणाले व त्यांच्या मस्तकावर त्यांनीं आपला अभय कर ठेविला. श्रीमन्महाराजांचे अप्रतिम दिव्य तेज पाहून व ब्रह्मानंदगुरूंवरील त्यांच्या निस्सीम शिष्यवात्सल्याची प्रचीति प्रत्यक्ष अनुभवून ते लोक आश्चर्यानें स्तिमित झाले. तसेंच गुरूंनीं यापूर्वी अनेकवार ज्यांचे वर्णन केलें होते तेच हे महाराज असले पाहिजेत असा रास्त तर्क त्यांनीं बांधला. ब्रह्मानंदगुरूंनी देखील ग्रामस्थांस जास्त वेळ संशयांत न ठेवतां जेव्हां हेच आमचे ब्रह्मचैतन्य महाराज असें त्या लोकांस सांगितलें तेव्हां त्यांनी ''श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्य महाराज की जय'' अशी उत्स्फूर्त गर्जना केली. नंतर तेथील इनामदार यांनीं श्रीमन्महाराजांना मोठ्या थाटाने आपल्या घरीं बोलावून नेऊन त्यांचा साजेसा सत्कार केला.

श्रीममन्महाराजांनी बेलघडींत एकूण १० दिवस मुक्काम केला. त्यांच्या दिव्य व सुंदररूपानें व मृदु मधुर भाषणानें ग्रामस्थ मंडळींवर मोहिनी घातली होती. त्यांच्यावर दृढ श्रद्धा बसली असल्यानें आपापल्या घरीं बोलावून त्यांचा सत्कार व्हावा म्हणून प्रत्येकानें जणूं दिवस वाटून घेतले होते. थाटानें पाद्यपूजा, समाराधना चालल्या होत्या. एका गृहस्थानें घरगुती अडचणीमुळें श्रीमन्महाराजांस घरीं बोलाविण्याचा बेतच रद्द केला होता. श्रीमन्महाराज गांवास परत निघणार त्या दिवशीं ''श्रीमन्महाराजांस घरीं बोलावून, पाद्यपूजा करून, भोजन घाल. त्या दिवशीं २५ चे वर पान होणार नाहीं.'' असें ब्रह्मानंदगुरूंनी त्या गृहस्थास आग्रहानें सांगितले. त्यानें कसेंबसें कबूल केलें. महाराज गांवाला जाण्याच्या दिवशीं त्यानें श्रीमन्महाराजांस नमस्कार करून आपलें घरीं येऊन, पाद्यपूजा स्वीकारून अनुग्रह द्यावा अशी विनंति केली व घरीं जाऊन २५।३० पानांच्या स्वयंकापाची तयारी चालविली. इकडे श्रीमन्महाराजांचे प्रवचन सुरू झालें. त्यांत ग्रामस्थ मंडळी तल्लीन होऊन गेली होती व श्रीमन्महाराज इतके रंगले होते कीं, त्या दिवशींचे त्यांचें प्रवचन 'न भूतो न भविष्याति' असें झालें. दररोजच्या प्रवचनांत ब्रह्मानंदगुरूंची योग्यता किती मोठी आहे. त्यांनीं हातीं घेतलेलें काम किती थोर आहे. लोकसंग्रहाचें त्यांचे कार्य निर्विघ्नपणे पार पाडण्यास जनतेच्या निरलस सहाय्याची किती जरूरी आहे वगैरे विषयीं सदुपदेश करण्यास श्रीमन्महाराज चुकत नसत. त्यादिवशीं विशेषत्वानें श्रीमन्महाराजांचें मुखांतून ब्रह्मानंदगुरूंविषयी बाहेर पडलेले उद्‌गार ऐकून तर सर्वच ग्रामस्थ भारावून गेलें.

वास्तविक त्या दिवशीं यजमानानें ग्रामस्थांस आमंत्रण दिले नव्हते. अकरा वाजणेचे सुमारास स्वयंपाकाची सिद्धता करून यजमान श्रीमन्महाराजांस बोलावणेस आला तरी निरूपण चालूंच होते. स्नानाला उठावे अशी त्यानें विनंती केली व स्वयंपाकाची सिद्धता झाली असल्याची वर्दी दिली. श्रीमन्महाराजांनी स्नानास उठतां

उठतां, ''मी आज गांवांस जाण्यास निघत आहे तरी तुम्ही सर्वांनी माझ्या पंक्तीस भोजन करावे'' म्हणून आमंत्रण देऊन टाकले. ''स्वयंपाक तयार झाला आहे म्हणे. पाहू या चला'' असें म्हणून लोकांना घेऊन ते यजमानांच्या घरीं गेले. पाकशालेंत जाऊन सिद्धान्नावर त्यांनीं आपली अमृत दृष्टि टाकली व आतां उशीर न करतां पानें मांडून, वाढण्याची सिद्धता करा असें सांगून ते स्नानास गेले.

श्रीमन्महाराजांबरोबर त्यावेळीं दोनशे तरी लोक असतील. सर्वांस आपले पंक्तीस बसवा अशी श्रीमन्महाराजांची आज्ञा झाली होती. महत्प्रयासाने २५।३० पानांस पुरेल इतक्या अन्नाची सिद्धता कशीबशी केली असतां आतां या सर्व लोकांस कसें व काय वाढूं अशा चिंतेनें तो गृहस्थ त्रस्त होऊन गेला होता. त्यास कांही सुचेनासें झाले होते. ब्रह्मानंदगुरूंनी ''श्रीमन्महाराज मूर्तिमंत येथे हजर असतांना तुम्हांस काळजी करण्याचें कारणच काय ? त्यांच्या आज्ञेप्रमाणें पानें घाला'' म्हणून समजावून सांगितले तरी त्याचे समाधान होईना. त्या बिचाऱ्यास या गुरूशिष्यांच्या 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' शक्तीची काडीमात्र कल्पना नसल्यानें तो तरीही अनमान करीतच होता. श्रीमन्महाराज स्नान संध्यादि आटोपून पाटावर येऊन बसले. त्यांनीं हातांत तुलसीपत्र व भरलेले पाण्याचे भांडे घेऊन, स्वयंपाकघरांत जाऊन सर्व स्वयंपाकाचा श्रीरामरायास नैवेद्य दाखविला व आतां पानें वाढा असें सांगून ते पुन: पाटावर विराजमान झाले. अखेर ब्रह्मानंदगुरूंनी कंबर कसली व वाढण्यास सुरुवात केली. तेवढ्याच स्वयंपाकात सर्व लोकांचे आकंठ भोजन उरकले. तरी देखील आणखी अन्न उरले असल्याचे जेव्हां लोकांचे निदर्शनास आले तेव्हां ब्रह्मानंदगुरु दररोज म्हणत असलेल्या आरतींतील 'ओंदूं पाविन अन्नवसावेर मंदिगुणसिदवने' या पदाची प्रत्यक्ष सत्यता पटल्याचें पाहून, श्रीमन्महाराज हे देवकोटींतील आहेत अशी त्यांची बालंबाल खात्री झाली व त्यांचे विषयींची त्यांच्या मनांतील पूज्यबुद्धि शतगुणित झाली.

श्रीमन्महाराजांच्या रोजच्या निरूपणाचा भर नामस्मरणावर असे. अविरत भगवंताचे नामस्मरण करणें हें त्यांतील सारसर्वस्व असे. ''नामस्मरणाशिवाय या कलियुगांत अधिक श्रेष्ठ दुसरें कोणतेंच साधन नसल्यानें या भवरोगाचें निवारण करण्यास नामस्मरण हेंच एकमेव परम औषध आहे. म्हणून सुखानें संसार करतां करतां परमार्थ साधण्याचा सुलभ मार्ग म्हणजे नामस्मरणच. भक्तिविश्वासानें अखंड नामस्मरण करणाऱ्यांच्या पापराशींचे नि:संशय भस्म होऊन जाते. त्यांचे पावित्र्य वाढतें व त्यास आत्मोद्धाराचा मार्ग दिसू लागतो. भवसागराच्या भीतींतून ते मुक्त होतात व स्वानंदरूपांत मग्न होतात. याचा प्रत्यंतर पुरावा म्हणजे तुमचे ब्रह्मानंद. याच जन्मीं जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कायमची मुक्तता व्हावी अशी प्रबल इच्छा असणाऱ्यांनी सर्वकाळ नामस्मरणांत दंग राहिले पाहिजे. श्रीरामप्रभू त्यांस निश्चयानें मुक्त करील असा भरंवसा बाळगा. वेळोवेळी तुम्हांस सन्मार्गदर्शन करण्यास तुमच्या सुदैवाने तुम्हांस ब्रह्मानंद लाभले आहेत. त्यांच्या आज्ञेंत वागा. तुमचे कल्याणच होईल. यांत संशय नाहीं.'' अशा प्रकारचा श्रीमन्महाराजांच्या मुखांतून बाहेर पडणारा उपदेश दररोज त्यांच्या कर्णरंध्रांत शिरूं लागल्यानें तो त्यांच्या हृदयांत खोलवर शिरून तेथें रुजूं लागल्यानें मधुबिंदूप्रमाणें त्यांस अवीट गोडी वाटू लागली.

श्रीमन्महाराजांचा मुक्काम बेलधडीत असतांना ब्रह्मानंदांच्या मातोश्री जिऊबाई गदग येथें राहतात अशी त्यांस बातमी समजतांच, लागलीच एक बैलगाडी पाठवून त्यांनीं त्यांस बेलधडीस बोलावून घेतल्याचें ऐकिवांत आहे. त्यांचा श्रीमन्महाराजांनीं मर्यादातिशयानें सत्कार करून, त्यांस प्रेमपूर्वक नवें लुगडें नेसवून, फळें अर्पण करून त्यांना प्रदक्षिणा घालून साष्टांग नमस्कार घातला व तुमचा उपकार जगावर अपरिमित झालेला आहे.

असल्या भगवद्भक्ताला जन्म देऊन जगाला तुम्ही चिरऋणी केलें आहे. खरोखर तुम्ही धन्य आहां असें त्यांचे गुणानुवाद गाऊन, त्यांना सुग्राम भोजन घालून त्यांची परत त्यांनीं पाठवणी केल्याची आख्यायिका आहे.

ब्रह्मानंदगुरूंनी स्वत: खणलेला श्रीराममंदिराचा पाया श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी पाहिला. बांधकामासाठी ब्रह्मानंदगुरूंनीं स्वत: वाहून आणून रचून ठेवलेल्या दगडांचा ढीगही त्यांनीं पाहिला. देवालय बांधण्याच्या कार्यासाठीं त्यांनीं ब्रह्मानंदगुरूंना प्रसाद म्हणून एक रुपया दिला. विजयसंवत्सराच्या माघ शुद्ध अष्टमीच्या दिवशीं शुभमुहूर्तावर श्रीमन्महाराजांनी स्वत: आपल्या अमृत हस्तानें पाया खणलेल्या भूमीवर दूधतुपाचें सिंचन करून, दक्षिण दिशेच्या भिंतीच्या पायाच्या दगडाची स्थापना केली. व ''बेलधडी ग्राम हे पवित्र स्थान आहे. भगवंताचा पादप्रक्षेप येथें झाला आहे. सीतामाईचे रावणानें हरण केल्यानंतर श्रीरामप्रभू जानकीच्या शोधास दंडकारण्यांतून ऋष्यमूक पर्वताकडे जात असतांना त्यांचा या जागीं मुक्काम झाला होता. म्हणूनच या जागीं श्रीराम स्थापना करण्याचा आदेश मी ब्रह्मानंदास दिला आहे.'' असे सांगितले. हा वृत्तांत ऐकून जमलेल्या मंडळींनीं श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचा प्रचंड जयजयकार केला.

दुसऱ्याच दिवशीं श्रीमन्महाराजांचे प्रयाण असलेनें आबालवृद्ध, स्त्रीपुरुष त्यांना निरोप देण्यासाठी गांवाबाहेरील पिंपळाच्या झाडापर्यंत गेले होते. श्रीमन्महाराजांच्या वियोगाच्या कल्पनेनें सर्वांना असह्य दु:ख होत होते व सर्वांच्या नेत्रांतून अविरत अश्रुधारा वहात होत्या. मातृवियोगाच्या वेळीं मुलांची जशी स्थिति होते तशी सर्वांची अवस्था झाली होती. दैवी प्रेमाच्या प्रभावानें शाद्बिक वर्णन करण्यापेक्षां त्यावेळचा देखावाच प्रत्यक्ष पुरावा होता, म्हणून तर त्यांचे पाठोपाठ लोक आले होते. अखेर श्रीमन्महाराजांनी सगळ्यांस थांबण्यास सांगितले. सर्वांनीं भराभर त्यांचे दर्शन घेऊन त्यांचे पाय अश्रुजलानें भिजवून टाकले. श्रीमन्महाराजांनी सर्वांकडे कृपाकटाक्षानें पाहिले व आपल्या मधुरवाणीनें सर्वांस उद्देशून खालील संदेश दिला.

धन्य बेलधडी ग्राम। घोष होय रामनाम॥
होय आनंद उल्हास। ब्रह्मानंदे केला वास॥
त्याचे आज्ञेंत चाला। रामनाम सर्व बोला॥
मग होईल कल्याण। चिंतन करा रात्रंदिन॥
आहो तुम्ही इनामदार। कृपा करा थोडी फार॥
एवढा करा उपकार। बांधा रामाचे मंदिर॥
आळस तुम्ही करू नका। एवढी गोष्ट माझी ऐका॥
दीनदास म्हणे येतो। आतां निरोप हा घेतो॥

यानंतर ब्रह्मानंदांच्या सांगण्याप्रमाणें तुम्ही सर्व ऐकत गेल्यास तुमचेच निर्विवाद कल्याण होईल. श्रीरामरायाच्या प्रतिष्ठापनेची शक्य तितक्या लवकर तयारी केल्यास मी स्वत: त्यासाठीं येईन असें सांगतांच हर्षोत्फुल्ल अंत:करणानें महाराजांचा जयजयकार करून सर्वांनीं त्यांची पाठवणी केली. तेथून महाराज गदगला गेले व तेथें रेल्वे गांठून त्यांनीं गोंदावलेस प्रयाण केले.

**॥ श्री सद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण सोळावें

## बेलधडींत श्रीरामस्थापना

श्रीमन्महाराजांच्या बेलधडींतील मुक्कामांतील निरुपणाचा ग्रामस्थ मंडळींवर एवढ जबरदस्त प्रभाव पडला कीं, त्यांनीं वर्णिलेली ब्रह्मानंदगुरूंची योग्यता ऐकून ब्रह्मानंद गुरुंविषयीं बेलधडी ग्रामस्थांचे मनांत एवढा आदरभाव प्रकर्षानें निर्माण झाला कीं, श्रीमन्महाराजांनी बेलधडीहून गोंदावलेस प्रयाण केल्या दिवसापासून सर्व ग्रामस्थ ब्रह्मानंदगुरूंच्या भोंवतीं बहुसंख्येनें सतत हजर राहून, त्यांच्या आज्ञेत वागून, त्यांच्या सर्व कार्यास मन:पूर्वक सक्रिय सहाय्य करूं लागले. आतां मात्र ब्रह्मानंदगुरूंनी आपल्या एकांतवासाचा त्याग केला. ते जनसंमर्दांत राजरोस मिसळूं लागले. तसेंच आसपासच्या गदग, बेटगिरी, मुळगुंद, लकुंडी, होंबळ, हंदिगोळ वगैरे गांवीं वरचेवर संचार करण्यास त्यानीं सुरवात केली.

थोड्याच दिवसांत त्यांनीं बेलधडी येथें श्रीरामनाम सप्ताह उभा केला. त्या सप्ताहासाठी आसपासच्या गांवचे त्यांचे अनेक भक्त आले होते. त्यानंतर गांवोगांव संचार करून, तेथें श्रीरामनाम सप्ताह उभा करून, अन्न संतर्पणाचा त्यांनीं सपाटाच सुरू केला.

या सर्वाचे पर्यवसान ब्रह्मानंदगुरूंची कीर्ती पसरण्यांत झाले. त्यांचा शिष्यसंप्रदायही फोफावूं लागला. त्यांचे लोकसंग्रहाचे कार्य उत्तम रीतीनें पार पडूं लागले. भक्तवृंदाकडून बेलधडी येथे आरंभिलेल्या श्रीराममंदिराच्या बांधणीसाठीं द्रव्य सहाय्य भरपूर होऊं लागले. त्यामुळें बांधकामास व एकंदर उभारणीस गति मिळूं लागली. एकदां प्रसंग असा निर्माण झाला कीं, मजुरांची मजुरी भागविण्यास पंचेचाळीस रुपये कमी पडत असल्यानें ब्रह्मानंदगुरूंनी एका भाविक भक्ताकडे रुपये हात उसने मागितले. त्या भाविकानें आपल्याजवळ फक्त पंचवीस रुपयेच आहेत असे सांगून तात्काळ आणूनही दिले. पण चमत्कार असा झाला कीं, त्या पंचवीस रुपयांतूनच वडरांची मजुरी पंचेचाळीस रुपये ब्रह्मानंदगुरूंनी भागविल्याचें त्या भाविकाला समक्षांत दिसून आल्यानें आश्चर्य वाटले.

न्यायासनाचे उच्च स्थान मंडित करणारे फडके या नांवाचें एक सद्‌गृहस्थ गदग येथें रहात होते. ते परम धार्मिक होते. ब्रह्मानंदगुरुंवर त्यांची दृढ निष्ठा होती. त्यामुळें गुरु देखील गदगला गेल्यावेळीं त्यांच्याच घरीं उतरत असत. वस्तीही करीत असत. सायंकाळीं गुरु करीत असलेले रामभजन ऐकून, प्रभावित होऊन, ब्रह्मानंदगुरुंकडूनच अनुग्रह घेण्याचा त्यांचा पक्का निर्धार झाला होता. एकदा अकस्मात् गुरु त्यांचे घरीं आल्यावेळीं भक्तिपूर्वक वंदन करून त्यानीं आपला मनोदय गुरूंस निवेदन केला. अनुग्रह देण्याची जरी श्रीमन्महाराजांची आज्ञा ब्रह्मानंद गुरूंस झाली होती, तरी आपल्या गुरूंचा महिमा वाढावा याच केवळ उद्देशानें ते प्रत्येकास गोंदावलेस जाऊन अनुग्रह घ्या असें सांगत असत. त्यास अनुसरूनच या वेळींही त्यांनीं त्यांस श्रीमन्महाराजांकडे गोंदावल्यास जाण्यास सांगितले. त्यावर फडक्यानींही कांहींसें त्रासिकपणानें ''एवढी त्यांची थोरवी सांगतां तर मी असले ठिकाणीं येऊन त्यांनीं मला उपदेश केला तर खरें'' असें म्हटले. हें ऐकून, फडक्यांच्या अज्ञानाची कींव करून, ब्रह्मानंदगुरूंनी मंदहास्य केलें व ''तशी तुमची उत्कट भक्ति असेल तर निश्चयें करून तुमचे मनोरथ पूर्ण होतील. मात्र नित्य

नेमानें श्रीमन्महाराजांच्या पादुकांची पूजा करतांना अखंड राम, राम असें नामस्मरण चालू ठेविलें पाहिजे. शिवाय प्रत्येक गुरुवारीं उपोषण केले पाहिजे,'' असे सांगितले. त्याप्रमाणें त्या दिवसापासून त्यांनीं भक्तियुक्त अंत:करणानें गुरूंच्या सांगण्याप्रमाणें करण्यास सुरवात केली.

सुमारें दोन महिने हा कार्यक्रम चालला असेल. इतक्यांत अकस्मात् ब्रह्मानंदगुरु फडक्यांचे घरीं गेलेवेळी आपल्या सांगण्याप्रमाणें अव्याहत कार्यक्रम सुरू ठेवला असल्याचें फडक्यानीं त्यांस कळविलें. त्यांच्या भक्तिभावाची खात्री पटतांच, अनुग्रहास हे सर्वथा पात्र आहेत असें वाटतांच, पुन: एके गुरुवारीं ते फडक्यांच्याकडे आले. फडक्यांनीं भक्तिभावानें श्रीगुरूंच्या चरणास वंदन केले व माध्यान्ह भोजन आपलेकडेच व्हावे अशी इच्छा प्रगट केली. ब्रह्मानंदगुरूनीं ''आज गुरुवार आहे. दुपारीं मी जेवत नाहीं. सायंकाळी लवकरच श्रीमन्महाराजांची पूजा करून नैवेद्य समर्पण करून भोजन करूं'' असे सांगितले व गुरु बेटगिरीस निघून गेले. यांनीं इकडे सायंकाळचे स्वयंपाकाची तयारी चालविली. सूर्यास्तसमयीं ब्रह्मानंदगुरू बेटगिरीहून परत आले. स्वयंपाकाची सिद्धता झाली असल्याचें पाहून गुरूंनी फडके यांस स्नान करून मुकटा नेसून येण्यास सांगितले. गुरूंनी स्वत: एका खोलींत पाट मांडवून, त्यावर कृष्णाजिन पसरावयास लावून, मागें टेकण्यास एक पाट ठेवविला. स्नान करून, सोंवळे नेसून तो भक्त येतांच, तो व त्याची पत्नी यांचेसह आपण उच्च स्वरांत श्रीराम, श्रीराम असें नामस्मरण करीत श्रीगुरु बसले. अशा प्रकारें एक तासभर नामस्मरण झाले असेल नसेल तोंच पुढच्या दरवाज्यांत खडावांचा आवाज ऐकू येऊं लागला. त्याचबरोबर ''जय जय रघुवीर समर्थ' अशी मंजूळ गर्जना कानीं आली. फडक्यांनी दरवाजाकडे दृष्टि वळविली तोंच त्यांना तेज:पुंज शरीरधारी, अजानुबाहु अशा श्रीमन्महाराजांच्या सुंदर मूर्तीचे दर्शन झाले. तो भाविक आनंदातिशयानें रोमांचित झाला व सद्गुरुनाथांच्या पायावर नत मस्तक झाला. ब्रह्मानंदगुरूंनी देखील गडबडीनें येऊन प्रेमातिशयानें साष्टांग नमस्कार केला श्रीमन्महाराज मंदस्मित करीत पूर्वी तयार करून ठेवलेल्या आसनावर विराजमान झाले. ब्रह्मानंदगुरूंनी सुचवितांच त्या भाविकानें श्रीमन्महाराजांची भक्तिभावानें पूजा करून आरति केली. त्यांच्या चरणतीर्थाचे प्राशन केले व अत्यंत विनयानें त्यांच्यासमोर हात जोडून तो उभा राहिला. त्रिकालज्ञानी श्रीमन्महाराजांनी त्यास अनुग्रह देऊन श्रीराम तारक मंत्राचा त्यास उपदेश केला आणि ब्रह्मानंदांच्या सांगण्याप्रमाणें वागल्यास तुमचें कल्याण होईल असेंही बजावले.

या वेळेपर्यंत ब्रह्मानंद गुरूंनी पानें मांडून भोजनाची तयारी करविली होती. सर्वांबरोबर श्रीमन्महाराजांनीं भोजन केलें. ताम्बूलग्रहण केले व ब्रह्मानंदगुरूंच्या सूचनेप्रमाणें स्वतंत्र खोलींत तयार केलेल्या बिछान्यावर ते झोंपले. त्यांना झोंप लागेपर्यंत तो भाविक त्यांचे पाय चुरित बसला होता. नंतर ब्रह्मानंदगुरु निजलेल्या खोलींत येऊन त्यांची परवानगी घेऊन, स्वत: झोंपण्यास गेला. सकाळीं लवकर उठून महाराज उठण्याची प्रतीक्षा करीत तो बसला. सूर्योदय झाला तरी कोणीच उठेना हें पाहून त्यानें दोन्ही खोल्या पाहिल्या. आंत कोणीच नव्हते. तो आश्चर्यचकितहि झाला तसाच खिन्नहि झाला. अखेर ब्रह्मानंद गुरूंचे दर्शन होईपर्यंत अन्नग्रहण करावयाचें नाहीं असा निर्धार करून तो तारक मंत्राचा तप करीत बसला. अशा तऱ्हेनें तीन दिवस उलटले. चवथ्या दिवशीं दीनवत्सल ब्रह्मानंदगुरूंनी त्याला नांवाने हांका मारत येऊन दर्शन दिले. त्याचे समाधान केले व दुपारचे भोजन त्याचे घरीं करून ने बेटगिरीस गेले.

सर्व तऱ्हेची अनुकूलता प्राप्त झाल्यानें, भक्त जनांच्या सक्रिय सहानुभुतीनें बेलधडी येथील श्रीराममंदिराच्या बांधणीचें काम अवघ्या एका वर्षात पूर्ण झाले. ब्रह्मानंदगुरूंनी श्रीराम, सीता, लक्ष्मण व मारुति यांच्या शुभ्र अशा सुंदर व मनमोहक मूर्ति करवून आणल्या. मूर्तींच्या प्रतिष्ठापनेसाठी श्रीमन्महाराजांना बोलावून आणणेचें ठरतांच त्या गांवांतील जहागीरदारांच्यापैकीं दोघां आसामींस गोंदावलेस धाडून दिले.

श्रीमन्महाराजांस आणण्यासाठीं तेथून निघालेले ते दोघे माणगंगातीरीं वसलेल्या गोंदावले क्षेत्रीं येऊन पोंचले. श्रीमन्महाराजांचे दर्शनानें पुनीत झाले. त्यांस साष्टांग नमस्कार करून, ब्रह्मानंदगुरुंची विनंति व प्रतिष्ठापना महोत्सवाची सिद्धता त्यांनीं श्रीमन्महाराजांस निवेदन केली. त्यावर श्रीमन्महाराजांनी हंसतमुखानें आपला संतोष व्यक्त केला. त्यास आशीर्वाद दिला व लवकरच निघूंया असें अभिवचन देऊन त्यांचे समाधान केले. सात आठ दिवस झाले. दररोज, स्नान, वारंवार उपहार, मिष्ठान्न भोजन अशा प्रकारें थाटाच्या सत्कारांत त्यांचा काल चालला होता. सद्‌गुरुनाथांचा तो अवाढव्य विश्वप्रपंच, जनताजनार्दनावरील त्यांचें तें अकृत्रिम प्रेम पाहून बेलधडीकर पाहुणे अगदीं स्तिमित झाले होते. श्रीमन्महाराजांच्या प्रेमरज्जूंनीं ते इतके जखडले गेले होते कीं, आपण श्रीमन्महाराजास बेलधडींस बोलावून घेऊन जाण्यास आलो आहों हेंच मुळीं ते विसरून गेले होते व आनंदानें त्यांच्या सान्निध्यसुखाचा उपभोग घेत राहिले होते.

दोन महिने होऊन गेले तरी बोलावण्यास गेलेल्या लोकांकडून कांहींच वार्ता न कळल्यानें ब्रह्मानंदगुरूंनीं पुन: एकास गोंदावलेस पाठविले. ब्रह्मानंदगुरूंनीं प्रतिष्ठापना महोत्सवासाठीं काशी, बडोदा, पुणें वगैरे ठिकाणच्या आपल्या परिचित पंडितांना अगोदरच बोलावल्याप्रमाणें ते सर्व येऊन दाखल झाले होते. आतां पावेतों ब्रह्मानंदगुरूंची कीर्ति सर्व कर्नाटकभर पसरली असल्यानें, व प्रतिष्ठापना महोत्सवास गोंदावलेहून सद्‌गुरुनाथांची स्वारी येणार असल्याचें वर्तमान कांनीं पडल्यानें चहूंबाजूंनीं अगदीं कानाकोपऱ्यांतून देखील जनसंमर्द बेलधडीस येऊन थडकूं लागला. जमलेल्या विद्वान् मंडळींनीं आपल्या मतानें शुभमुहूर्ताची देखील निश्चिती केली होती. पण ब्रह्मानंदगुरुंनीं त्यांस 'आपल्या सद्‌गुरुनाथांचे येथें आगमन झाल्यावर, ज्या दिवशीं व ज्या वेळीं आपल्या अमृतहस्तानें ते स्थापना करतील तोच आमचा सुमुहूर्त' असें ठामपणानें पण हंसत हंसत सांगून त्यांचें समाधान केले. मात्र पण्डितांच्या अभिप्रायाप्रमाणें शास्त्रसंमत अशी प्रतिष्ठेची सर्व सिद्धता करण्याची त्यांनीं बाकी ठेविली नव्हती.

ब्रह्मानंदगुरूंनीं धाडलेला तो दुसरा गृहस्थ गोंदावलेस पोंचला पण श्रीमन्महाराजांचा मुक्काम तेथें नसल्याचें त्यास आढळून आले. चौकशीअंती जवळच असलेल्या म्हसवड येथील भक्तांच्या आग्रहावरून श्रीरामनवमी उत्सवासाठीं ते गेले असल्याचें त्यास समजले. तोही गृहस्थ म्हसवडला जाऊन श्रीमन्महाराजांस भेटला. साष्टांग नमस्कार करून श्रीरामप्रतिष्ठापनेसाठी बेलधडीस येणेचें करावें अशी त्यानें श्रीमन्महाराजांस नम्र विनंति केली. त्याचा तो आदरभाव पाहून लगेच दुसरे दिवशीं निघण्याचा त्यांनीं निर्धार करून शिष्यांस सर्व तयारी करण्याची आज्ञा केली. बेलधडींस जाण्याचे निश्चित झाल्याचें ऐकून आमंत्रणास मागाहून आलेल्या त्या गृहस्थास अत्यानंद झाला व ही आनंदाची वार्ता तारेनें त्यानें ब्रह्मानंदगुरूंस कळविली.

ठरल्याप्रमाणें दुसरेच दिवशीं श्रीमन्महाराज शेंकडो शिष्यांसमवेत म्हसवडहून निघाले व मन्मथनाम संवत्सरांतील चैत्र महिन्याच्या शुद्ध चतुर्दशीस बेलधडीस येऊन पोंचले. त्यांच्यासमवेत आलेल्या शिष्यपरिवारांत हर्दा, इंदूर, गोंदावले वगैरे गांवच्या शिष्यांचा भरणा बराच होता. बेलधडीच्या ग्रामस्थांचा उत्साह काय वर्णावा. त्यांनीं तोरणें बांधून सर्व गांव सजविला होता. श्रीमन्महाराजांचे आगमन होतांच गांवचे लोक त्यांस सामोरे गेले व वाद्य घोषांत अति थाटानें त्यांनीं त्यांस मिरवीत आणले. मुळांत बेलधडी गांव लहान असले तरी मिरवणुकींत सर्व लोक सामील झाले असल्यानें पहावे तिकडे लोकच लोक दिसत होते. श्रीरामनाम घोष अखंड चालू होता. प्रतिष्ठापनेच्या आदले दिवशीं श्रीमन्महाराजांच्या नेतृत्वाखालीं द्विजवृंदांनी समारंभपूर्वक मूर्तींसह मंडपांत प्रवेश केला. नंतर मूर्ति उंच शिलातलावर ठेवण्यांत आल्या. श्रीमन्महाराजांनीं जमलेल्या झाडून सर्वांस मूर्तींस स्पर्श करण्याची अनुज्ञा दिली. तें ऐकून शूद्रादि लोकांस अत्यानंद झाला. त्या मनमोहक मूर्तीला हस्तस्पर्श करून, प्रत्येकजण आनंदभरित तर झालाच पण स्वत:बद्दल त्या प्रत्येकास धन्यता वाटल्याशिवाय राहिलीं नाहीं. असल्या लोभस मूर्तींची अचूक पारख करून त्या आणल्याबद्दल सर्वांनींच ब्रह्मानंदगुरूंची मुक्तकंठानें प्रशंसा केली.

इकडे द्विजवर्यांनी स्वस्ति पुण्याहवाचनापासून प्रतिष्ठापनेच्या कार्यास प्रारंभ केला. तत्पूर्वी कराव्या लागणाऱ्या जलाधिवास, शैय्यादिवास आदि सकल क्रिया विधिपूर्वक यथासांग पार पाडल्या. श्रीशके १८१७ मन्मथनाम संवत्सराच्या चैत्र महिन्याच्या कृष्ण द्वितीया या दिवशीं गुरुवारीं शुभमुहूर्तावर श्रीसमर्थ सद्‌गुरु श्री ब्रह्मचैतन्य महाराजांच्या अमृतहस्तानें श्रीसीता, श्रीराम, श्रीलक्ष्मण व श्रीमारुती या मूर्तींची प्रतिष्ठापना मोठ्या थाटानें पार पडली. विद्वान् पण्डितांच्या वेदघोषानें, जनताजनार्दनाच्या जयजयकारानें, शहनाई, भेरी, वाजंत्री, ढोल, चौघडा वगैरे सारख्या मंगल वाद्यांच्या निनादानें व मधून मधून होणाऱ्या शिंगाडयांच्या ललकाऱ्यानीं दशदिशा दुमदुमून राहिल्या. अंत्यजापासून सर्व जातींच्या लोकांना यथेच्छ अन्नदानानें तृप्त केले. ब्रह्मानंदगुरु बारीक नजरेनें हेरून केंव्हाही, कसलीही अडचण भासू नये अशी तयारी जातीनें लक्ष घालून करवीत असत. दंतधावनास राखुंडी, स्नानास तेल, ऊनपाणी, शिकेकाई पासूनची त्यांनीं तयारी ठेविली होती. व असें करून केवळ कौपीन धारण करणारे लोक देखील राजेमहाराजे यांचे हातून होणार नाहीं असें कार्य लीलामात्रें करतात हें जगाच्या निदर्शनास ब्रह्मानंदगुरूंनीं आणून दिले. ''कौपीनवन्त: खलु भाग्यवन्त:'' हें आचार्यांचे वचन खोटें कसें होणार ! श्रीब्रह्मानंदगुरूंनीं समारंभाची केलेली कडेकोट व्यवस्था व काम करण्याची व करवून घेण्याची शिस्त वाखाणण्यासारखी होती. श्रीमन्महाराजसुद्धा संतोष पावले व त्यांनीं आपल्या प्रिय शिष्याचे मन:पूर्वक कौतुकही केले, व ब्रह्मानंदाचे म्हणण्याप्रमाणें वागलात तर तुम्हीपण त्यांच्याप्रमाणे श्रीरामरायाच्या कृपेला पात्र व्हाल असें सर्व लोकांस त्यांनीं आवर्जून सांगितलें. श्रीमन्महाराजांचे निरूपण दररोज होत असे. त्यावेळचे त्यांचे सुसंवाद रूप व मनाची पक्कड घेणारे उबोधक निरूपण ऐकून सर्व लोक आनंद सागरांत बुडून जात असत. अशा तऱ्हेनें रामनामाचा बोध करून सर्वांना त्यांनीं सन्मार्गपथावर नेऊन सोडले.

या अल्पावधींत असंख्य लोकांनीं श्रीमन्महाराजांकडून अनुग्रह घेतला. संसार हा एक भवरोगच आहे. रोग म्हटला कीं दु:ख आलेच. दु:खाचे निवारण करण्याचा आटोकाट प्रयत्न करणें हा माणसाचा स्वभावधर्म

आहे. त्यासाठीं दुसऱ्याची म्हणजे वैद्याची मदत घ्यावीच लागते. पण भवरोगाच्या निवारणार्थ साध्या वैद्यानें भागत नाहीं तर त्याला जबरदस्त मांत्रिकच लागतात. श्रीमन्महाराज हे जबर पण कुशल मांत्रिक होते. त्यामुळें प्रपंचांतील अडीअडचणींच्या निवारणार्थच लोकांच्या झुंडीच्या झुंडी तेथें जमत असत. पण श्रीमन्महाराज मात्र कुशलतेनें त्या कटकटींतून मुक्त होण्याचा उपाय सांगून त्यांस श्रीरामभजनीं लावीत असत. ही झाली सामान्य जनांची गोष्ट. मोठमोठ्या पण्डितांच्या शंकांचे समाधान तर ते प्रापंचिक व्यवहारांतील दाखले देऊन करीत असत. एकदां सायंकाळचे निरूपण चालले असतां कांहीं पण्डितांनीं '' मरण समयीं मानवाला श्रीरामनामाचे स्मरण कसें होणार ? कारण मानव त्यावेळी त्रिदोषप्रकोपानें अत्यंत व्यथित होतो व परिणामीं त्याचा स्मृतिभ्रंश होतो. मग अशा कठीण प्रसंगी नामस्मरणाची आठवण कशी होणार'' असा प्रश्न करून ''प्राणप्रयाण समये कफवात पित्तैः कण्ठावरोधनविधी स्मरणं कुतःस्ते'' हें वचनही त्यांनीं श्रीमन्महाराजांचे ऐकविलें. श्रीमन्महाराजांनी नुसते मंदस्मित केले व पण्डितांना उद्देशून ते म्हणाले, ''तुमचा प्रश्न योग्य आहे. आतां असें पहा. गर्भवती स्त्री नवमास पूर्ण झाल्यानंतर प्रसवकालीं अपार अशा प्रसववेदना अनुभवीत असतांना देखील भावी शिशूचे गोजिरे मुख कसें व केव्हां पहावयास मिळते याची जागृति त्या स्त्रीच्या मनांत जशी घर करून असते त्याच प्रमाणें अतिदुःखदायक अशा मरणसमयीं देखील नामांत निष्ठा असलेल्यांच्यांत नामस्मरणाची जागृति कायम वास करून असते'' अशा तऱ्हेने प्रश्नाची उकल करून त्यांनीं सर्वांचे समाधान केले.

प्रतिष्ठापना महोत्सव यथासांग पार पाडून, श्रीमन्महाराजांनीं शिष्यपरिवारासह गोंदावलेस प्रयाण केले. निघण्याचे वेळीं बेलधडी गांवांतील सर्व देवालयांचा जीर्णोद्धार करण्याची त्यांनीं ब्रह्मानंदास आज्ञा केली. ब्रह्मानंदगुरूंनींही सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेप्रमाणें त्या गांवांतील श्रीमारुती, श्रीशंकर, श्रीदेवी आदि सर्व देवालयें सुंदर बांधवून घेतली. श्रीरामरायाच्या देवळाजवळ जागा घेऊन दरवर्षी उत्सवादि कार्यांच्यावेळीं उपयुक्त ठरेल अशी एक उत्तम धर्मशाळा बांधविली. तेथेंच एक विहीरही खोदविली. उत्सवास दहा हजारापर्यंत लोक जमले तरी स्वयंपाकास पुरतील अशी मोठ मोठी भांडी तपेली, हांडे, टोप वगैरे घेतली. एवढेंच नव्हे तर विळी, किसणी, पहार, पाट्यावरवंट्यापासून सकल उपकरणांचा भरपूर संग्रह केला. संस्थान दरबारीं उत्सव प्रसंगीं पालखी, छत्र चामर, तोरण, अबदागिरी वगैरे ऐश्वर्याचा अवलंब करण्यांत येतो त्याचप्रमाणें ती उपकरणें तयार करवून घेऊन श्रीरामसंस्थानाचे ऐश्वर्य त्यांनीं वाढविले. उत्तम रथ व वाहनेंही तयार करवून घेतली. श्रीरामरायाच्या त्रिकाळ पूजेची व्यवस्था केली. भजन आरती, नित्यनेमानें करावयाची उपासना क्रमपद्धति घालून दिली. श्रीसमर्थ सांप्रदायांतील आराधना पद्धतीचे सर्वांस ज्ञान करून दिले. आपण स्वतः त्याप्रमाणें वागून दाखवून त्याचे अनुकरण करूं इच्छिणाऱ्यांच्या मनांतील भक्तिमार्गाची अभिरुचि श्रीगुरूंनी वाढीस लाविली.

**॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण सतरावें

## आराधनापद्धति नियमावली

बेलधडींस श्रीराममंदिराची स्थापना तर झाली. पण नुसती स्थापना केली म्हणजे भागत नाहीं. प्रत्येक देवतेचा वर्षाकांठी एक तरी उत्सव असतोच. श्रीरामदेवतेचा उत्सव म्हणजे जन्मोत्सव. त्याचीं सुरवात चैत्र शुद्ध प्रतिपदेस होऊन समाप्ति दशमीस होत असते. त्या उत्सवाची सुरवात ब्रह्मानंद महाराजांनीं थाटानें करून दिली. ती अव्याहत आजतागायत चालू आहे. श्रीरामनवमीच्या उत्सवात सुरवात होतांच प्रतिवर्षी चार पांच हजारापर्यंत लोक जमूं लागले. उत्सवांत वेदपारायण, पुराण, कीर्तन, निरूपण आदि कार्यक्रमास सुरवात झाली. दररोज पालखी काढण्यांत येऊं लागली व वाहनेंहीं निघूं लागलीं. कितीही जनसमुदाय जमला तरी कोणत्याही तऱ्हेची गैरसोय होऊं नये म्हणून ब्रह्मानंदगुरूंनीं कामाची वांटणी केली व कोणी कोणतें काम करावयाचें याची व्यवस्था घालून दिली. त्यामुळें व्यवस्थेंत तिळमात्र उणीव भासत नसे. नामघोष अहर्निश कानावर पडत असे. सकाळीं ११ वाजतां नैवेद्य व आरति व्हावयाचीच व १२ वाजतां पहिली पंगत बसावयाचीच असा जो पायंडा पडला तो अद्याप टिकून आहे.

हनुमानजयंत्सुत्सव, रामसिंहासनोत्सव, गुरुपौर्णिमा उत्सव, प्रौष्ठपदी उत्सव, दासनवमी उत्सव वगैरे उत्सवांची सुरवात ब्रह्मानंदगुरुंनी करून दिली. आषाढ शुद्ध पौर्णिमेस, भाद्रपद शुद्ध पौर्णिमेस व माघ वद्य नवमीस समाप्ति होईल अशा बेतानें अहोरात्र अखंड रामनाम सप्ताहास सुरवात करण्यांत आली.

देवळाच्या जवळ असलेल्या मारुतीच्या देवालयापुढें चौघड्यासाठीं जागा बांधण्यांत आली व दररोज प्रात:काळीं व सायंकाळी न चुकतां चौघडा वाजेल अशी कायम स्वरूपाची व्यवस्था करण्यांत आली. श्रीरामरायाच्या नित्य त्रिकाल होणाऱ्या पूजेच्यावेळीं ताशा वाजंत्री वाजविणेची व्यवस्था त्यांनीं केली. त्रिकाल पूजेचे वेळीं छत्र चामर वगैरे राजैश्वर्य यांचा उपयोग करण्याचा नेम केला. गांवाच्या उत्तरेस पण जवळच एक सुंदर दगडी तळें बांधविण्यांत येऊन रामतीर्थ असें त्याचे नांव ठेवण्यांत आले. त्या तळ्याच्या कांठावर असलेल्या शमीच्या वृक्षाखालीं पादुकांची स्थापना करण्यांत आली असून, उत्सव प्रसंगी निघणारी पालखी, वाहन, रथ तेथपर्यंत नेण्याची प्रथा सुरु झाली. तशीच ती अद्याप चालू आहे.

बेलधडी गांव लहानसें खेडें खरें, पण तेंच आज पुण्य क्षेत्र बनले आहे. पूर्वी तेथील लोकांस अभंग म्हणण्याची वा भजन करण्याची बिलकूल संवय नव्हती. ब्रह्मानंदगुरुंच्या कृपेनें याची गोडी त्यांस लागली. ब्रह्मानंदगुरुंनी घालून दिलेली पद्धति रामदासी पद्धति होती. पण त्यांतील अभंग, पदें, स्तोत्रें ही महाराष्ट्र भाषेंत असल्यानें भाविकांना म्हणण्यास अडचण भासू लागली. म्हणून त्यांनीं ब्रह्मानंदगुरुंस त्या तऱ्हेच्या उपासना पद्धतीचे एक पुस्तक छापविण्याचा आग्रह सुरू केला. ब्रह्मानंदगुरुंनीही असा विचार केला कीं खरोखर जर पुस्तक छापविले तर त्याच्या सहाय्यानें श्रीसमर्थ सांप्रदायाचा, तसेंच श्रीरामरायाच्या भक्तिमार्गाचा लोकांत व्यवस्थित प्रसार होईल, त्याप्रमाणें त्यांच्या हातून आचरण घडूं लागेल, साहजीकच सन्मार्गप्रवृत्तीकडे ते झुकतील. एवढ्यासाठींच त्यांनीं पुस्तक छापविणेस आपली संमती दिली व देवस्थानाशीं संबंधित अशा सर्व नियमांसह

'श्रीराम संस्थान बेलधडी भजनीपद्धति' या नांवाचें पुस्तक त्यांनीं छापवून घेतले.

ब्रह्मानंदगुरुंनीं छापवून तयार केलेलें पुस्तक मुळांतून वाचणें व आचरणांत आणणें केंव्हाही श्रेयस्कर. तथापि त्यांतील मुख्य मुख्य महत्त्वाच्या भागांचे दिग्दर्शन करणें अप्रासंगिक होणार नसल्यानें ते येथें नमूद करण्यांत येत आहेत. श्रीब्रह्मानंदगुरुंनीं घालून दिलेले खालील नियम सर्वसामान्यपणें सर्वांनांच उपयुक्त आहेत. साधक मुमुक्षूंच्या दृष्टीनें तर ते श्रेष्ठतम ठरतील यांत शंका नाहीं.

श्रीसमर्थभक्तांनीं पहाटें तीन वाजतां उठावें. मुखमार्जन करून इष्ट देवतेची मानस पूजा करावी. श्रीगणेश, श्रीराम, श्रीमारुति, श्रीशंकर, श्रीसमर्थ रामदास, श्रीसद्गुरु यांचे स्मरण करावें व एक तासभर कोणाशींही न बोलतां श्रीराम, श्रीराम असें एक चित्तानें म्हणत बसावें. त्यानंतर बहिर्दिशेस जाऊन यावे. स्वच्छ हातपाय धुवून श्रीराम असें तोंडानें म्हणत स्नान करावें व देवळांत जावें. तोपर्यंत कांहींनीं मानस पूजा संपवून देवळांत थोडेसे पाणी शिंपडून ते झाडावे. नंतर ते सारवून रांगोळी घालावी.

इतकी सिद्धता झाल्यावर देव झोंपलेल्या मंदिराच्या दरवाजाजवळ येऊन सर्वांनीं उभ्यानें "उठि उठि बा रघुनाथा" ही भूपाळी सुस्वर कंठानें म्हणावी. देवाचे शयनघर स्वतंत्र असल्यास त्या दरवाज्यांसमोर वरील भूपाळी म्हटली पाहिजे. त्यानंतर शेजघराचा दरवाजा उघडून सर्वांनीं श्रीरामरायाचें दर्शन घेऊन साष्टांग नमस्कार घालावा. नंतर गाभाऱ्याचा दरवाजा उघडून देवास देवालयांत न्यावे. त्यानंतर "राम सर्वांगीं सांवळा" हा अभंग म्हणून स्तोत्रपाठ म्हणावा. हा विधि उरकेपर्यंत पुजारी देवांची यथासांग पूजा उरकून नैवेद्य दाखवून मंगलारति करतील व तुपांत भिजविलेले कांकडे सर्वांस देतील. मग सर्वांनीं श्रीरामरायाची काकडारति करावी. श्रीरामचंद्राची कांकडारति केल्यानें महापुण्य लागते म्हणून ती कोणीही चुकवूं नये. कांकडारति झाल्यावर श्रीराम, श्रीराम म्हणत देवास ११ प्रदक्षिणा घालून साष्टांग नमस्कार घालावा व तीर्थप्रसाद घेऊन जावें.

त्यानंतर स्नान न झालेल्यांनीं स्नान संध्या करुन देवालयांत जावें. देवाची पूजा करून, प्रदक्षिणा नमस्कार घालून, श्रीमद्भगवद्गीता, विष्णुसहस्त्रनाम, अध्यात्मरामायण, रामसहस्त्रनाम, रामगीता, रामहृदय वगैरेंचे यथाशक्ति पारायण करावे. नंतर उपदिष्ट जप असेल तर ५००० जप करावा. उपदिष्ट जप नसेल तर श्रीराम, श्रीराम असा ५००० जप करावा. त्यानंतर थोडा उपहार घ्यावा व नंतर मुखानें राम, राम म्हणत प्रपंचांतील कामें १२ वाजेपर्यंत करावी. त्यानंतर श्रीरामाची माध्यान्ह पूजा करावी. नैवेद्य दाखवून आरति करावी. आरति करतांना श्रीगणेश, श्रीराम, श्रीशंकर, श्रीगोपालकृष्ण, श्रीमारुति, श्रीरामदास, श्रीसद्गुरु अशा क्रमानें आरत्या म्हणून तीर्थ घ्यावे. त्यानंतर घरीं आलेल्या अतिथि, अभ्यागत यांच्या समवेत मुखानें राम राम म्हणत भोजन करावें. भोजनोत्तर वामकुक्षी करणेपूर्वी तांबूल भक्षण करावा. तेंव्हा सुद्धां मुखानें राम राम म्हणतच असावें. त्यानंतर पुन: तीन तासपर्यंत प्रपंचांतील कामें करावी. मुखानें रामनाम चालूंच ठेवावें. लोकांशी बोलत असतांना देखील रामनामाचे विस्मरण होऊं देऊं नये. त्यानंतर पुराण श्रवण करावें किंवा ग्रंथावलोकन करावें किंवा परमार्थाचा विचार करावा. हे करत असतांना देखील मुखानें रामराम म्हणतच असावे. सायंकाळी देवालयांत जाऊन यथाशक्ति सर्व देवांचे दर्शन घ्यावे.

सायंकाळी खालील नियम आचरणांत आणावा. सुरवातीस श्रीसमर्थ रामदास्वामीविरचित ''भीमरूपी महारुद्रा'' हे स्तोत्र म्हणावें. हें म्हणत असतांना श्रीमारुतिरायास ११ प्रदक्षिणा घालाव्या. नंतर श्रीमारुतिरायापुढें कापूर किंवा निरांजन लावून ''कोटीच्या कोटी गगनीं उडाला'' ही आरति म्हणावी. नंतर ११ नमस्कार घालावे. नंतर श्रीरामासमोर उभें राहून ''सुंदरानना पिंग लोचना'' हे भीमाष्टक म्हणावें व दररोज एक करुणाष्टक म्हणावें. नंतर श्रीरामरायासमोर उभें राहून एकेक सवाई म्हणावी व जयजयराम म्हणत दोन्ही हात जमिनीला लावून नमस्कार करावा. नंतर श्रीरामाकडे हात करुन 'परम सुंदर रुप शामल' हा जोहार म्हणावा. त्यानंतर 'वदन सुहास्य रसाळ हा राघव' व 'त्रिविध तापहारक हे गुरुपाय' ही पदें करुणापूर्ण रीतीनें म्हणावी. त्यानंतर श्रीसमर्थकृत 'राममंत्राचे' पाच श्लोक, श्रीसमर्थकृत 'मनासबोध' यांतील १३ श्लोक, श्रीसमर्थांच्या 'दासबोधांतील' दोन समास नित्य नेमानें वाचावे. हा कार्यक्रम सूर्यास्तापूर्वी आटोपला पाहिजे.

सूर्यास्तानंतर सर्वांनीं संध्यावंदन आटोपून भजनासाठी एकत्र जमावें. महत्वाची कामें असणाऱ्यांनीं भजनास येण्यास उशीर झाल्यास अगर अजिबात येतां न आल्यास, त्यांनीं हळहळ व्यक्त करून ''रामा, अपराधाची क्षमा कर'' म्हणून प्रार्थना केली पाहिजे. एकदा का भजनास सुरवात झाली कीं ते संपेपर्यंत कितीही जरुरीचे काम असले तरी मध्यें कोणाशीही बोलू नये. गैरमाहितगार कोणी भजनास येऊन मध्यें बोलूं लागल्यास माहितगारांनीं या नियमाकडे त्याचे लक्ष वेधून त्यास गप्प बसवावें. भजन संपल्यावर अवधि असल्यास परमार्थासंबंधी चर्चा करण्यास हरकत नाहीं.

या वेळेपर्यंत पुजाऱ्यांनी देवाची सायंपादपूजा संपवून आरति लावावी. दुपारप्रमाणेंच श्रीगणपती, श्रीराम, श्रीशंकर, श्रीगोपालकृष्ण, श्रीमारुति, श्रीरामदास, श्रीसद्‌गुरु या क्रमानें आरत्या म्हणाव्या. त्यानंतर अष्टावधान, ब्रह्मस्तुति, श्रीसमर्थरचित स्तोत्रपाठ म्हणून शेजारति करावी. उत्तम प्रकारची शय्या तयार करुन श्रीरामरायाला झोंपवावें. तीर्थप्रसाद भक्षण करून, राम राम म्हणत आपापल्या घरीं जावें.

हें झाले ढोबळ दिग्दर्शन, परंतु या संबंधी जी स्वतंत्र छोटीशी पुस्तिका प्रसिद्ध करण्यांत आली आहे त्यांत खुलासेवार वर्णन असून देवस्थानासंबंधी व उत्सव व त्या संबंधीचे समग्र कार्यक्रमांची नियम बद्ध मांडणी करण्यांत आली आहे.

या प्रमाणें दिवसा व रात्रीं भाग घेत असतांना देखील खालील पांच नियमांचे मनापासून पालन करण्याची आवश्यकता आहे असें ब्रह्मानंदगुरूंचे आग्रहाचे सांगणें आहे. ते नियम म्हणजे (१) परस्त्री मातेसमान मानावी. (२) हांतून होईल तेवढा परोपकार निरलसपणें करावा. (३) कोणालाही दु:ख प्रत्यक्षांत देऊं नये, एवढेच काय पण त्याने मन दुखावेल अशी दुष्ट भाषाही कधीं वापरुं नये. (४) कसलाही विपत्काल आला तरी श्रीरामाला विसरुं नये. (५) श्रीरामावरील प्रेमांत केंव्हांही यत्किंचितही अंतर पडूं देऊं नये हे होत.

प्रापंचिक लोकांनी आमरण वरील कार्यक्रम अंमलांत आणल्यास श्रीरामप्रभूच्या कृपेनें निश्चित ते कृतार्थ होतील असें ब्रह्मानंदगुरुंचे विश्वासपूर्ण सांगणें आहे. त्यांची वरील दैनंदिनी पाहिली असतां आजकालच्या धकाधकीच्या मामल्यांत इतका वेळ घालविणें परवडण्यासारखे नाहीं असेंच प्रत्येकास वाटेल. वाटणें साहजीक

आहे. नव्हे ते योग्यही आहे. त्यांनीं दाखविलेला मार्ग केवळ परमार्थात गढलेल्या लोकांस, पेन्शनर लोकांस, तसेंच सुखवस्तु माणसांस आचरण्यास योग्य आहे. पण त्यांतील तत्व लक्षांत घेतल्यास सर्वांस आचरण्यास योग्य असाच तो आहे. तें तत्व म्हणजे काम नसल्यावेळीं मुखानें मोठ्यानें रामाचे चिंतन करणें व काम करतांना मनांतल्या मनांत त्या रामाचा आठव सतत करणें, अजिबात विसर पडू न देणें हा होय. प्रयत्नानें ते साध्य होऊं शकते हा अनुभव आहे.

प्रापंचिक मनुष्यास प्रपंच हा दु:खमय वाटतो. खरें पाहिले असतां तो दु:खमय नसतो. तो दु:खमय आहे या आपल्या एकमेव भावनेनेंच तो तसा भासतो. अखिल विश्वांत आनंद भरला आहे पण मन चिंतेंत व्यग्र असल्यानें तो आपल्याला दिसत नाहीं. तो पाहण्याची दृष्टि ईशकृपेनेंच प्राप्त होत असते. ती दृष्टि या उपायाने प्राप्त होते.

प्रपंचांत मुलें असणाऱ्यांना द्रव्य नसल्याचें दु:ख असतें. द्रव्य असणाऱ्यांना कदाचित् सुंदर रूप नाहीं याचें दु:ख असतें. सौंदर्य असणाऱ्यांना विद्वत्ता नाहीं म्हणून दु:ख असतें. या सर्वांचीं अनुकूलता असल्यास कसल्या तरी रोगाचे दु:ख असते. सारांश कुबेराइतके धन, कश्यपमुनी इतकी संतती, मदनाचें रूप, बृहस्पति इतकी विद्या, भूमंडलाचे राज्य, निरोगी शरीर वगैरे सर्व कांहीं उपलब्ध असले तरी मरण चुकत नाहीं हें दु:ख सर्वांना असतेच. असा विचार केला असतां कोणीही सुखी नाहीं हाच अनुभव सर्वांचा आहे. एवढ्याचसाठी कसलीही चिंता न करतां, चिंतेचें ओझें परमेश्वराचें माथी मारून एकाग्रमनानें, परम भक्तीनें सतत श्रीरामाच्या स्मरणाचे अनुसंधान बाळगणाऱ्यांना मात्र यत्किंचितही दु:ख जाणवत नाहीं. ते सतत आनंदात असतात. याचे कारण म्हणजे रामनामाशिवाय दुसऱ्या कशांतच सुख नाही हें होय. हा अनुभव साधुसंतांनीं घेतलेला असतो. व म्हणूनच ते इतक्या छातीठोकपणे जगास सांगत असतात. त्या करतांच प्रत्येकानें रामनाम स्मरणाचा कदापि विसर पडूं देऊं नये. संसारी माणून स्वत:च्याच संसारांत गुरफटून जातो व त्यास योग्यायोग्य कळेनासें होते. संत सर्व विश्वाचा, प्रामुख्यानें रंजल्या गांजल्यांचाच संसार करतात. म्हणून संतचरित्राचा अभ्यासही आपल्याला योग्य मार्गावर आणण्यास उपयोगी ठरतो व त्यांच्या वचनांची आपल्यास खात्री पटवून देण्यास समर्थ ठरतो.

अशी आहे श्रीब्रह्मानंदगुरुप्रणीत उपासना पद्धति. ती त्याच्याकडे श्रीसमर्थ रामदासस्वामींचे परंपरेंतून आली होती. या पद्धतीच्या अवलंबाने मुमुक्षुजनांना साधकावस्था तर प्राप्त होईलच, एवढेंच नव्हे तर ते खात्रीनें सिद्धावस्थेप्रत पोंचतील, सुखाने संसार साधून परमार्थसुखाचा उपभोग घेतील. श्रीब्रह्मानंदगुरूंनी सिद्धावस्था याच मार्गानें प्राप्त करून घेतली होती. पण अज्ञजनांच्या कल्याणासाठीं श्रीरामरायाच्या उपासनेचा क्रम अव्याहत चालूं ठेऊन त्यांनीं आम्हांस सुखाचा मार्ग दाखविला. एवढ्याचसाठीं त्यांचें परोपकारमूर्ति, निस्वार्थनिधि, अधिकारी महात्मे म्हणून वर्णन केलें जाते.

बेलधडी ग्रामस्थ, आबालवृद्ध, स्त्रीपुरुष सर्व, त्यांच्यापुढील श्रीब्रह्मानंदगुरुंच्या नित्याचरणाच्या आदर्शानें रामनामांत रत झाले. तसेंच श्रीरामरायाच्या सेवेंत व श्रीब्रह्मानंदगुरुंच्या सुखसहवासांत आनंदानें काळ घालवू लागले.

कर्नाटकांतील काय किंवा महाराष्ट्रांतील काय सामान्य जन जे ब्रह्मानंदगुरुंच्या कच्छपी लागत, ते त्यांचें उत्कट वैराग्य, अनन्य गुरुभक्ति, मृदु मधुर वाणी व त्यांच्या मुखावर विलसणारे आत्मतेज यानेंच. लहान मोठ्या आसपासच्या गांवांना दिल्या जाणाऱ्या त्यांच्या भेटी व सर्व जातींतील लोकांवर असलेली त्यांची समदृष्टि व अलौकिक प्रेम हेंही त्याचे एक कारण आहे. श्रीब्रह्मानंदगुरु हे आपले आप्त व हितकर्ते आहेत असा सर्वांचा विश्वास असे. त्यांचा मुक्काम जेथें असेल तेथें भजन, आरति नित्य नेमानें चालत असें, अपार अन्नसंतर्पण होत असे. त्याशिवाय त्यांचे समाधानच होत नसे. श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें सदा रामनामस्मरण, मोठ्या थाटानें श्रीरामाचा उत्सव व अन्नसंतर्पण ही दिनचर्या शेवटपर्यंत अव्याहत त्यांनीं चालविली होती. त्यांची गुरुभक्ति वर्णनातीत होती. सिद्धावस्था प्राप्त झाली म्हणून गुरुभक्तींत त्यांनीं ताजेपणा कायम टिकविला होता. श्रीमन्महाराज म्हणजे प्रत्यक्ष रामाचा अवतार अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. गुरुभक्तीचे पाठ ते आपल्या आचरणानें लोकांना देत असत. कारणाशिवाय हे सद्गुरुनाथांच्या समोर उभे रहात नसत, बसत तर कधींच नसत, श्रीमन्महाराजांना कांहीं कळविणेचें झाल्यास दुसऱ्याच्या मार्फत कळवीत असत. त्यांच्या सानिध्यांत कोणाकडून ही नमस्कार करून घेत नसत. लोकांना अनुग्रह देऊन उपदेश देण्याचा आज्ञाधिकार श्रीमन्महाराजांनी दिला होता तरी श्रीमन्महाराजांचे अस्तित्व असेपर्यंत जवळजवळ त्यांनीं स्वत: कोणालाच उपदेश दिला नाहीं. सद्गुरुनाथांच्या आज्ञेशिवाय नवीन कार्य ते कधीं हातीं घेत नसत. एवढेंच काय पण यांनीं केलेल्या सर्व बांधकामावर "श्रीब्रह्मचैतन्य महाराज यांनीं बांधलेले" असाच शिलालेख त्यांनीं कोरला आहे. यावरून त्यांची गुरुभक्ति महत्तर होती एवढेंच नव्हे तर श्रीमन्महाराजांची महती वाढविण्याची त्यांची उत्कट इच्छा असल्याचें, स्पष्टपणें व्यक्त होत नाहीं काय ? असे सांगतात कीं रामनवमी उत्सवांत व नवरात्रोत्सवांत प्रतिपदेपासून दशमीपर्यंत हे खडतर उपवास करीत असत. दररोज रात्रीचे कीर्तन संपवून देवाचे वाहन निघून आरति होईपर्यंत ते तीर्थप्राशन देखील करीत नसत. सर्व आटोपल्यावर एक भांडेभर पन्हे अगर सरबत मात्र घेत असत. दशमी दिवशीं रथोत्सव होऊन सर्व लोकांचे भोजन उरकल्यावर पारणे सोडीत असत. एकादशीचे दिवशीं तीर्थाशिवाय दुसऱ्या कशाचाही ते स्वीकार करीत नसत व सर्वांसही तोच नियम लावत असत.

बेलधडींत मुक्काम असला कीं बरोबर सूर्यास्तास संध्या संपवून श्रीराममंदिरांत भजनास स्वत: बसत असत. सुरवात आपण स्वत: करीत असत. त्यांच्या भक्तिरसपूर्ण मृदु मधुर वाणीतील भजनानें श्रोतृवृंद तल्लीन होत असे. बहुश: श्रीसमर्थ व श्रीतुकाराम यांचे अभंग ते सांगत असत पण कर्नाटकस्थ लोकांच्या विनंतीवरून पुढें त्यांनीं श्रीगणपती, श्रीराम, श्रीमारुति यांच्या स्तवनपर कानडी अभंग रचनू त्यांनीं सांगण्यास सुरवात केली. वानगीदाखल कांही खाली दिले आहेत.

१) नमो लंबोदरा नमो विघ्नहरा । नमो देवावरा गजानन ।।१।।
स्मरणमात्रदिंद संकट कळियुवि । देव गौरीताई नंदनना ।।२।।
ब्रह्मानंदग मति कोडो गणपती । नामदह्नि कोडू प्रेमा ।।३।।

२) पतितपावना यंबो बिरुदु । सत्य माडु रामा निंदू ।।१।।
अनाथनात यंबो नाम । खरे इरलि मेघ:शाम ।।२।।

साधुसंत मुनिगळेल्ल । दीन दयाळ अंतारल्ला ॥३॥
होगळुवरु निन्न कीर्ति । सहजविदु विश्वमूर्ति ॥४॥
ब्रह्मानंद बेडुव रामा । नामदल्लि कोडू प्रेमा ॥५॥

३) साष्टांग मारुतिराया हेळो यल्लि रामराया ॥१॥
अञ्जनिदेविय कुमरा इरुवनेल्लि रघुवीरा ॥२॥
खरे नुडियो हनुमंता यंद शिगुव सीताकान्त ॥३॥
बेडिकोम्बुवे भीमा निनगे पादा तोरिसो ननगे ॥४॥
ब्रह्मानंदा बंदा शरणा कळेयो यन्न जन्ममरणा ॥५॥

ब्रह्मानंदगुरुंचा रामनामसप्ताहावर भर होता. त्यावेळींही मुक्तद्वार अन्नसंतर्पण चालत असे. कांहींही निमित्तानें, मग ते एखाद्या जयंतीचे असो अगर तुळसी अगर बिल्वदल अर्चन असो, आपल्या भोंवती लोक गोळा करावयाचे, त्यांच्याकडून भरपूर रामगर्जना करवावयाची व मग जेवणावळ उठवावयाची असा त्यांचा खाक्या होता. महार, मांग, वडार, लमाणी, कंजारभाट हरणशिकारी या सारख्या सगळ्या जातीच्या लोकांना देखील श्रीखंड पुरी, खीर पुरी, लाडू वगैरे पक्वान्नांचे जेवण घातल्याचे आपण समक्ष पाहिले आहे असें सांगणारे लोक अद्याप भेटतात.

एकदां पाऊस न पडल्याने दुष्काळ पडला होता. गोरगरीबांना अन्न नव्हते. तेव्हां त्या बिचाऱ्यांना मारुति मंदिरांत बोलावून श्रीब्रह्मानंदगुरुंनी पाळीपाळीनें प्रत्येक वेळी ८।१० लोक याप्रमाणें तास तास भजन करुन घेऊन त्या सर्वांना नाचणे व जोंधळे देऊन त्यांचे त्यांनीं रक्षण केल्याचे सांगतात.

एकदां बेलधडीस प्लेगचा धुमाकूळ चालू होता. लोक रानांत झोपडी घालून राहिले होते. एके दिवशीं दुपारीं अकस्मात् एका झोपडीनें पेट घेतला व जवळपासच्या २५-३० झोपड्या खाक झाल्या. लोक अन्नास मोताद झाले. ही हकीकत श्रीब्रह्मानंदगुरुस कळतांच ते जातीनें तेथे गेले. सर्वांचे त्यांनीं आपल्या मृदुमधुर वाणीनें सांत्वन केले. प्रत्येक पुरुषांस एक धोतर, एक अंगरखा एक रुमाल व प्रत्येक स्त्रीस एक लुगडे, एक चोळी, प्रत्येक मुलास एक अंगरखा, एक टोपी व प्रत्येक कुटुंबास दोन घोंगड्या व चार दिवस पुरेल इतके धान्य देऊन त्यांचे संरक्षण केले.

कर्नाटकांत नागपंचमीच्या सणास प्रत्येक मूल एक एक खोबऱ्याची वाटी घेऊन त्या वाटीस मधोमध थोड्या अंतरावर दोन भोंके पाडते व त्यांतून एक दोरी ओवून घेऊन तीस पीळ घालून वाटी फिरविण्याचा खेळ खेळते असा प्रघात आहे. तेव्हां मुलांना आपल्याकडे आकृष्ट करण्याचे दृष्टीनें बहुधा श्रीब्रह्मानंदगुरुंनी एका नागपंचमीस, बेलधडींतील श्रीरामरायाच्या मंदिराच्या कट्ट्यावर बसून सर्व मुलांस प्रत्येकीं एक याप्रमाणें खोबऱ्याची वाटी दिली. 'तसें करण्यास त्यांस ५-६ पोती खोबऱ्याच्या वाट्या लागल्या. आंब्याच्या दिवसांत गाड्यांनी आंबे खरेदी करून गांवांतील सर्व लोकांस ते स्वत: वाटीत असत. आमरस भोजन तर वरचेवर घालीत असत. अशा एकंदर वर्णिलेल्या त्यांच्या आचरणावरून ''विद्या विनय संपन्न ब्रह्मणे गवि हस्तिनि।

शुनि चैव श्वपाकेच पण्डिता: समदर्शिन:।। या उक्तीप्रमाणें त्यांच्या अंगी विश्वकुटुंबत्व, समभाव वगैरे गुण किती उत्कृष्टतेनें वास करीत होते याचेच स्पष्ट दिग्दर्शन होत नाहीं काय ?

भजनाला अगर नामसप्ताहास बसल्यावेळीं उपाधिरहित माणसाप्रमाणें ते अगदीं निष्काळजी दिसत. पण उत्सव प्रसंगीं सर्वांगाला डोळे असल्याप्रमाणें कमालीची दक्षता बाळगतानाही दिसत असत. ते विनोदही तितकाच करीत, लोकांचा आदरसत्कार ही तितकाच करीत व हजर असलेल्या लोकांना विशेष प्रकारच्या शिव्याही तितक्याच देत असत. यांतील मर्म जाणणारेच जाणतील येरा गबाळाचें तें काम नव्हे. श्रीब्रह्मानंदगुरु म्हणजे जनप्रियत्व, अक्रोध, निर्लोभ, निरहंकार याची जणूं साकार मूर्तीच होय. त्यांच्या परम गहन परमार्थाची मख्खी एकनिष्ठ सेवाभावांत, चंदनाच्या खोडाप्रमाणे देह झिजविण्यांत, उत्कट गुरुभक्तीच्या प्रदर्शनांत सामावल्याची खूण लोकांस पटत असे. मधून मधून श्रीमद्भागवत, एकनाथीभागवतासारखे ग्रंथ वाचून दाखवून ते लोकांस हितोपदेशही करीत असत. भजनांतील त्यांची तल्लीनता वाखाणण्यासारखी आहे. तरी पण ''व्यर्थ केट्टेनल्ला। देहवू सार्थ वागलिल्ला'' हे पद म्हणतांना देहभान विसरून ते अक्षरश: नाचत असल्याचें लेखकानें समक्ष पाहिले आहे. आपल्या शिष्यांच्या प्रापंचिक अडचणींचे ते निवारण तर करीतच त्याचबरोबर त्यांच्या मनांत श्रीरामनामाबद्दल विश्वास निर्माण करीत. अशा श्रीब्रह्मानंदगुरुंनीं आपल्या सद्गुरुनाथांच्या आज्ञेनुसार जगदोद्धाराचे कार्य हातीं घेऊन श्रीरामरायाचा उपासनामार्ग एकट्या कर्नाटकांतच नव्हे तर महाराष्ट्रांत देखील त्यांनीं वाढीस लावला. असंख्य लोकांस त्यांनीं सन्मार्गास लावले. त्या उद्देशानें प्रसंगोपात त्यांनीं अद्भुत अशा किती तरी अमानुष लीला दाखविल्या. त्यांचें वर्णन तरी किती म्हणून करावें.

श्रीब्रह्मानंदगुरुंचे पहिले कार्य म्हणजे बेलधडी ग्रामीं श्रीरामरायाचे मंदिर बांधून आपल्या सद्गुरुनाथांच्या हस्तें तेथें मनमोहक मूर्तीची प्रतिष्ठापना करून, सर्व ग्रामस्थांस श्रीरामरायाच्या सेवेस लावून त्या ग्रामाचे क्षेत्र बनविलें हें होय. त्यांचे दुसरें अद्भुत कार्य म्हणजे नरगुंद येथें त्यांनीं आरंभिलेल्या १३ कोटी श्रीरामतारकनामजपयज्ञाचा उत्सव हें होय.

**।। श्रीसद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण अठरावे

## नरगुंद येथील १३ कोटी जपयज्ञ व त्याची सांगता

''यज्ञानां जप यज्ञोस्मि' असें भगवंताचें गीतेंत वचन आहे ते सर्वश्रुतच आहे. अद्‌भुत प्रमाणावर श्रीगुरुंनीं एकंदर तीन नामजपयज्ञ केले. त्यांतील नरगुंदचा जपयज्ञ प्रथमचा.

श्रीगुरु नेहमीं खेडोपाडीं देखील संचार करीत असत. असेंच हिंडत हिंडत ते एकदां नरगुंद गांवीं गेले. या गांवीं श्रीगुरुंचा भक्तपरिवार मोठा होता. त्यामुळें नरगुंद गांवीं त्यांची फेरी वरचेवर होत असे.

नरगुंद हे तालुक्यांतील पेट्याचें गांव. संस्थानी अमदानींत हें राजधानीचें गांव होते. तेथील राजे ब्राह्मण होते. त्यांची धर्मावर श्रद्धा होती. जेथील राजा ब्राह्मण तेथील राजधानीचे गांवीं बहुसंख्य ब्राह्मणवस्ति असावयाचीच. त्या नियमानें येथेंही ब्राह्मणवस्ति भरपूर होती. आणि या सर्वांची श्रीगुरुंवर फार भक्ति होती.

आपले गांवीं श्रीगुरु आल्याची बातमी पसरतांच तेथील सर्व भाविक भक्त त्यांच्या दर्शनास जमले. एके दिवशीं दुपारचे जेवण चालले असतां श्रीगुरुंनी सहज बोलतां बोलतां ''तेरा कोटी जप सुरु करावा म्हणतो. त्यासाठीं तुम्ही सर्वजण बेलधडीला येणार ना ?'' असें म्हटले. तें ऐकून सर्वांनीं एकजुटीने ''घरदार सोडून ४।६ महिने बेलधडीस येण्यास आम्हांस कसें शक्य आहे. यासाठीं जप येथेंच केल्यास ठीक होईल. आम्ही सर्वजण आपल्या आज्ञेप्रमाणें त्यांत भाग घेण्यास व इतर कामे करण्यास तयार आहों'' असें विनयपूर्वक सुचविलें.

तें ऐकून श्रीगुरु हसले व ''पाहू या. श्रीसद्‌गुरुनाथांना विचारूं या. त्यांची परवानगी मिळाल्यास तुमच्या सर्वांच्या इच्छेप्रमाणें येथेंच करूं या''.असें म्हटले. त्यावेळीं सर्वांनीं तात्काळ श्रीमन्महाराजांच्या अनुज्ञेसाठी येथून पत्र लिहावे असा आग्रह धरला. श्रीरामरायाविषयींचा त्या ग्रामस्थांच्या मनांतील आस्तिकभाव पाहून श्रीगुरु संतुष्ट झाले व त्याच दिवशीं तेरा कोटी जपयज्ञास श्रीमन्महाराजांची अनुज्ञा मिळविण्याविषयीं आपल्या नेहमींच्या शिरस्त्यास अनुसरून श्रीब्रह्मानंदगुरुंनीं पंढरपुरचे श्रीमन्महाराजांचे परमभक्त अप्पासाहेब भडगांवकर यांस पत्र लिहिलें.

श्रीमन्महाराजांकडून श्रीगुरुंस आलेले आज्ञापत्र अत्यंत मार्मिक, हृदयंगम व बोधप्रद आहे. तें श्रीगुरुंच्या कानडी चरित्रकारांना उपलब्ध झाले असल्यानें व त्यांनी ते छापले असल्यानें त्यांच्या अनुज्ञेनें ते जसेंच्या तसेंच वाचकवृंदांस सादर करीत आहे.

''श्रीरामचंद्रपरायण ब्रह्मानंद योगी यांस -

ब्रह्मचैतन्यबुवा मु.।। इंदूर यांचा अनेक आशीर्वाद. पत्र लिहिणेचे कारण आपला तेरा कोटी जपाबद्दलचा मजकूर अप्पासाहेब यांचे मार्फत कळला. तरी लिहिल्याप्रमाणें हरीपूर येथें करण्यास सुरवात करावी. जरूर जरूर जरूर. मी काशीहून परत हर्दे मुक्कामी येऊन येथें रामनवमीला श्रीरामाची स्थापना केली व आतां नैमिषारण्यांत जाण्याचा विचार आहे. आपल्यास कळावें. आणि ज्या ठिकाणीं तेरा कोटीची सोय असेल त्या ठिकाणीं करावा. कृष्णातीर बरें आहे. परंतु आतांचे दिवस घोर कलीचे असल्यामुळे चांगले सत्कर्म कोणतेही शेवटास जाऊं न देण्याबद्दल कलीचा दुराग्रह आहे. तरी त्याचा प्रयत्न न चालण्याचा उपाय तपोबल पाहिजे. शब्दज्ञान, व जगाचे महत्व व निंदा ही दोन्ही उपयोगाची नाहींत. तर तशाचा सहवास करूं नये. नास्तिक कुतर्कांशीं वाद न करतां, अहंभावरहित, व्यवहाराचा संबंध न ठेवतां, अक्रोध, निर्लोभ, चित्तांत वृत्ति लीन करून, उपासनारूप जग पहावें.

अखंड नाम स्वत: घ्यावें हे आपलें कर्तव्य आहे. मी आपणांस सांगावें असें नाहीं. पण सूचनार्थ लिहिलें आहे. दुसरें असें. मन चित्तवृत्ति, बाह्य नामस्मरण झाल्यावांचून साधनांत आळस करूं नयें तसेंच स्त्रियांचे मुखावलोकन, त्यांचे शब्द, स्पर्श, भाषण, ममत्व, अगत्य, इ. कधीं सत्य मानू नये व त्याचे वारे कधीं लागूं देऊं नये. असे १३ कोटी होईतोंपर्यंत करावें. माझी विनंति आहे. कारण काळ फार भयंकर आहे. तर माझ्या चालीनें चालूं नका. माझे वेळ, काळ कारण वेगळे आहे. तथापि मी अन्य अवस्थींच राहणार अथवा देह सोडणार. कारण आतां पुढे धर्म, दया, शांति, भक्ति, नीति कोठें आढळत नाहीं. सबब संभाळून वागा. राम, राम अखंड जागा. हा आशिर्वाद.'' याप्रमाणें आलेले सद्‌गुरुनाथाचें आज्ञापत्र पाहून श्रीब्रह्मानंदगुरुंचा आनंद ओसडूं लागला. सद्‌गुरुनाथांच्या आज्ञापत्राप्रमाणें नदी तटाकीं जपयज्ञ करावयाचे श्रीगुरुंच्या मनांत येऊ लागले. नरगुंदला नदी तटाक नसल्यानें दुसरें कार्यस्थळ पाहण्याची त्यांस पाळी आली. परंतु नरगुंद येथील भक्तजनांचा नामयज्ञाबाबतचा परम भाव उत्साह पाहून व श्रीमन्महाराजांच्या ''ज्या ठिकाणी १३ कोटीची सोय असेल त्या ठिकाणीं करावा'' या आदेशाचा आधार घेऊन श्रीगुरुंनी नरगुंदांतच जपयज्ञ करणेचा निश्चय केला.

नरगुंदगांवी एक भव्य असे श्रीविठ्ठलमंदिर आहे. तेथेच सगळ्या भाविकांच्या मनांतून जपयज्ञ व्हावा असें असल्यानें श्री शालिवाहन शके १९२३ प्लवनाम संवत्सराच्या आषाढ शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत श्रीरामनाम सप्ताहाचा आरंभ करण्यांत आला. आसपासच्या चहूंकडील भाविकांना आमंत्रणें गेली. भाविकांच्या मेळ्यांत सप्ताह थाटानें चालूं राहिला. श्रीगुरुपौर्णिमेच्या दिवशीं श्रीमन्महाराजांच्या पादुकांना पंचामृताभिषेक करून पूजा थाटाने करून आरती करण्यांत आली. त्यानंतर तेरा कोटी जपाचा संकल्प करण्यांत येऊन सद्‌गुरुनाथांपुढे श्रीफल ठेवण्यांत आले व त्याच शुभमुहूर्तावर श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें श्रीब्रह्मानंदगुरुंनीं स्वत: प्रथम जपास प्रारंभ केला.

जपास बसणाऱ्या अनुग्रहित लोकांना जपाचे नियम समजावून सांगण्यासाठी व परगांवांहून जपासाठीं येऊन राहणाऱ्या लोकांच्या भोजनाची व राहण्याची व्यवस्था करण्यासाठीं म्हणून सुरवातीस एकदोन महिने श्रीगुरुंनी आपला मुक्काम तेथेंच ठेवला. त्यामुळें श्रीक्षेत्र बेलधडी येथील राममंदिरांत दररोज काकडारति, मध्यान्ह नैवेद्य, आरति, सायंभजन, आरति अष्टावधान वगैरे प्रकारांनीं भगवंताची उपासना ज्या क्रमानें चालते त्याचप्रमाणें चांगल्या रीतीनें सुरूं झाली.

त्या विठ्ठलमंदिरांत रोज शेकड्यानें स्त्री, पुरुष, मुलें जपाला बसत असत. त्या सगळ्यांच्या जेवणाची व्यवस्था श्रीगुरुच करीत होते. उत्तरोत्तर परगांवांहून जपासाठीं येणाऱ्या लोकांची संख्या वाढूं लागली. त्यामुळें अवघ्या ६।७ महिन्यांतच तेरा कोटीची जपसंख्या पुरी होत आली. जपसंख्या आटोक्यांत येतांच श्रीब्रह्मानंदगुरुंनी जपयज्ञाच्या सांगतामहोत्सवासाठीं श्रीमन्महाराजांना विनंतिपूर्वक बोलावून आणण्यासाठीं नरगुंदच्या दोघां भाविकांची गोंदवल्यास रवानगी केली व आपण महोत्सवाच्या तयारीस प्रारंभ केला.

श्रीमन्महाराजांस आमंत्रण देण्यास गेलेले भाविक ज्यावेळीं गोंदावल्यास गेले त्यावेळीं श्रीमन्महाराज भाविकांच्या मेळाव्यांत विराजमान झालेले त्यांस दिसले. श्रीमन्महाराजांच्या चरण कमलाला भक्तिभावपूर्वक साष्टांग नमस्कार करून त्यांनीं श्रीगुरुंची विज्ञापना त्यांस कळविली. तें ऐकून श्रीमन्महाराजांनी आपल्यास झालेला संतोष व्यक्त केला व निघण्यासंबंधीची आपली संमत्ती दर्शविली. आज निघूं या, उद्यां निघूं या अशी चालढकल करीत करीत पुढें सुमारें दोन महिन्यांनीं श्रीमन्महाराजांनीं शेंकडो शिष्य परिवारासमवेत तेथून

प्रयाण केले.

जपयज्ञाच्या सांगतामहोत्सवास श्रीमन्महाराज येणार असल्याची वार्ता यावेळपावेंतों कर्नाटकाच्या कानाकोपऱ्यांत पसरली होती. त्यामुळें महिनाभर आधींपासून सुमारें हजार एक लोक जमून राहिले होते. श्रीमन्महाराज आल्यानंतर तर जनसमूह ८।१० हजारपर्यंत फुगला असावा.

श्रीमन्महाराज गोंदावलेहून निघाले ते पंढरपूर, सोलापूर, विजापूर यामार्गे मल्लापूर स्टेशनवर उतरलें. तेथें आगाऊ तयार ठेवण्यांत आलेल्या बैलगाडींतून यावगलला गेले. यावगल गांवीं शिवदीक्षित या नांवाचे एक सुखवस्तु, घरंदाज, श्रीमंत गृहस्थ रहात होते. यांच्या घरांत पूर्वीपासून पिशाच्चबाधा होती. त्याच्या निवारणार्थ त्यानें बरेच उपाय करून पाहिले परंतु त्रास कमी होत नव्हता. त्याची व श्रीब्रह्मानंदगुरूंची गांठ पडल्यापासून त्यांच्यावर त्याची विशेष भक्ति जडली होती. श्रीगुरु वरचेवर त्यांच्याकडे जात असत. एका खेपेस शिवदीक्षितांनी श्रीगुरुंस पिशाच्चबाधेचे निवारण करण्याची विनंति केली. श्रीगुरुंनी नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे श्रीमन्महाराजांस शरण जाण्यास सुचविलें व एका खेपेस स्वत: गोंदावल्यास चाललेवेळीं शिवदीक्षितांस बरोबर नेऊन श्रीमन्महाराजांच्या पायावर घातलें.

श्रीमन्महाराजांनीं शांतपणे त्यांची सर्व हकीगत ऐकून घेतली व त्यांना श्रीदत्तगुरुंची व श्रीरामरायाची प्रतिष्ठा करून भक्तिभावानें त्यांची सेवा करा म्हणजे सर्व बाधांचे निवारण होईल असें सांगितले. लागली च त्या भाविकानें आपणच तेथपर्यंत येऊन आपल्या हातानें प्रतिष्ठा करावी अशी तळमळीनें विनंति केली. तेव्हां श्रीमन्महाराजांनीं आधीं देऊळ तयार करा पुढें मला तिकडे यावयाचें आहे. तेव्हां तुमचे इच्छेप्रमाणें करूं म्हणून अभय दिलें. शिवदीक्षित संतुष्ट झाले व श्रीमन्महाराजांची आज्ञा घेऊन गांवीं गेलें.

शिवदीक्षितांनीं आपल्या घराजवळच्या स्वत:च्या जागेंतच श्रीगुरुंच्या सल्याप्रमाणें सुंदर मंदिर बांधले. श्रीदत्तदिगंबराची मूर्ति व श्रीपट्टाभिरामाची मूर्ति अशा दोन्ही मूर्ति आणवून ठेवल्या. याच शिवदीक्षितांस श्रीगुरुंनी श्रीमन्महाराजांस बोलावण्यास पाठविल्यानें जातांना मूर्तीच्या प्रतिष्ठापनेची सर्व सिद्धता करूनच ते गेले होते.

म्हणून तर श्रीमन्महाराज यावगलला येतांच शिवदीक्षितांच्या घरीं गेले. तेथें दोन दिवस मुक्काम करून, प्रतिष्ठापना कार्य संपवून त्यांचे मनोरथ त्यांनी पूर्ण केले. नंतर बैलगाड़ींतूनच प्रवास करीत नरगुंदला जाऊन पोंचले. भाविक भक्तांनीं उत्साहपूर्वक सर्व गांव तोरणांनी आधींच सजविले होते. रस्त्यावरील धुरळा उडूं नये म्हणून गांवांतील रस्त्यावर पाणी शिंपडून ठेवले होते. व त्यावर रांगोळी घालून रस्ते सुशोभित केले होते. श्रीमन्महाराजांना समारंभानें वाजत गाजत आणण्यासाठीं भाविक भक्त भजनीमेळ्यासह गांवाबाहेर एक मैलावर सामोरे जाऊन मार्गप्रतीक्षा करत थांबले होते व इतर लोक गांवापासून तेथपर्यंत दुतर्फा पसरले होते.

श्रीमन्महाराजांचे लांबून दर्शन होतांच सर्वांनीं एककंठानें जयघोष करण्यास सुरवात केली व त्यांस मिरवीत गावांत उभारलेल्या भव्य मंडपांत आणले. मंडपांत मध्यभागीं उंच सिंहासन तयार करण्यांत आले होते. त्यावर श्रीमन्महाराज विराजमान झाले. दर्शनोत्सुक जनसमूहानें अहमहमिकेनें श्रीमन्महाराजांचे दर्शन घेतले. त्या दिवसापासून श्रीरामरायाच्या घोषाला ना अंत ना पार अशी स्थिति झाली. भोजनाच्या पंक्तीवर पंक्ती उठूं लागल्या. सर्व ज्ञातीच्या लोकांना देखील मुक्तद्वार अन्नसंतर्पण चालूं होते. श्रीमन्महाराजांकडून अनुग्रह घेण्यासाठीं, तसेंच प्रापंचिक दु:खें सांगून त्यावर इलाज विचारण्याची नुसती रीघ लागून राहिली.

अशाप्रकारें त्या महोत्सवानंदांत दोन दिवस गेले नाहीत तोंच गांवांतील पाण्याच्या तलावांतील पिण्याच्या पाण्याचा सांठा कमी होऊं लागल्यानें लोक चिंताक्रांत झाले. त्यांची चिंता रास्तच होती. कारण जवळपास पिण्याच्या पाण्याचा सांठा कोठेच नव्हता. अशा स्थितींत ८।१० हजार लोकांना पाणी पुरवठा कसा करावयाचा. अंखेर श्रीगुरुपुढें त्यांनीं आपली चिंता व्यक्त करतांच 'मूर्तिमंत श्रीमन्महाराज येथें हजर असतांना व श्रीरामनाम अहर्निश चालू असतांना, खुळ्यानों, कसली चिंता करतां. पाण्याची कमतरता कशी भासेल' या शब्दांत त्यांचे समाधान श्रीगुरुंनी केले. आकाशाकडे कृपाकटाक्षानें पाहिले व रोजच्याप्रमाणें अति उत्साहानें श्रीमन्महाराजांची पूजा, आरति करून भोजनाची पंगत बसविली. संपूर्ण जेवणावळ आटोपली आणि चमत्कार असा झाला कीं, आकाशांत इतके काळे ढग जमले कीं आकाशच दिसेना. अकस्मात् भयंकर पावसास सुरवात झाली. क्षणार्धात पहावे तिकडे पाणी दिसूं लागले. तळे, विहिरी सर्व कांहीं भरून वाहू लागले.

वास्तविक तो माघ महिना होता. अर्थात् पावसाचा यत्किंचित् संभव नव्हता आणि पावसाचे चिन्ह दिसत नसतांना श्रीगुरुंच्या महिम्यानें पाण्याची समृद्धि झाली. हें केवळ श्रीमन्महाराजांचे ठायीं असलेल्या श्रीब्रह्मानंदगुरुंच्या दृढ विश्वासाचें फळ. या अद्भुत घटनेनें तेथील लोकांचा उत्साह शतगुणित झाला असल्यास नवल तें काय ?

श्रीमन्महाराजांचा तेथें ८ दिवस मुक्काम होता. सर्वांची जेवणाची उत्तम व्यवस्था होती. तेथें न जेवणाऱ्यांसाठीं तांदूळ, डाळ वगैरे सामान देण्याचीही व्यवस्था असल्यानें सर्वजण संतृप्त झाले होते. समारंभाच्या समाप्तीचे दिवशीं श्रीब्रह्मानंदगुरुंनी श्रीमन्महाराजांचे हस्तें जमलेल्या शेकडो विद्वानांना एकेक महावस्त्र व एकेक मोहोर दक्षिणा देववून त्यांची संभावना केली, व हजारो गोरगरिबांना अन्न, वस्त्र व द्रव्य देववून त्यांना आनंदित केले. अनेक लोकांना बीज मंत्राचा उपदेश श्रीमन्महाराजांकडून देवविला.

परमानंदांत नामजपयज्ञमहोत्सवाची समाप्ति करून श्रीमन्महाराज प्रयाण करण्यास सिद्ध झाले असतां नवलगुंद, होंबळ, हंदिगोळ, हुलकोट्टि, गदग, बेटगिरी, हुबळी, धारवाड वगैरे गांवच्या लोकांच्या आग्रहाच्या आमंत्रणावरून वरील सर्व गांवांस त्यांनीं भेट देवून सर्वांस पुनीत केले. अखेर श्रीब्रह्मानंदगुरुंनीं त्यांस बेलधडीस श्रीरामनवमी उत्सवास नेलें. श्रीमन्महाराजांच्या उपस्थितीनें तो उत्सव अधिक थाटांत पार पडला. चैत्र वद्य द्वितीया श्रीरामरायाच्या प्रतिष्ठापनेचा वाढदिवस साजरा करून, दुसरेच दिवशीं तेथून प्रयाण करून, मुळगुंद, कूर्तकोटी वगैरे गांवांस भेट देऊन श्रीमन्महाराजांनीं गोंदवल्यास प्रयाण केले. श्रीगुरुंना पण गोंदवलेस जाणें भाग पडले. परतण्यास परवानगी न मिळाल्यानें त्यांस ४ महिने तेथें रहावें लागले. पुढें श्रीमन्महाराज हर्द्यास गेले. जातांना आपल्याबरोबर त्यांनीं श्रीब्रह्मानंदगुरुंसही नेले होते.

तेथील उत्सव संपवून श्रीमन्महाराज परत गोंदवलेस आलेवर श्रीब्रह्मानंदगुरुंस कर्नाटकीं परतण्यास अनुज्ञा मिळाली. कर्नाटकांत परत येतांच श्रीरामनामउपासना मार्ग वाढविण्यास, लोकोद्धाराच्या कार्यास त्यांनीं जोराची चालना दिली. ठिकठिकाणीं रामनाम सप्ताह करून अन्नसंतर्पण करण्याचा त्यांनीं सपाटाच सुरू केला. अशा प्रकारें संचार कार्य व श्रीरामनामाचे प्रसार कार्य ६।७ वर्षे चालू होते. अकस्मात् एके दिवशीं पुन्हां नामजपयज्ञ करण्यासंबंधी श्रीमन्महाराजांचे श्रीगुरुंस आज्ञापत्र आले.

**।। श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण एकोणिसावें

## श्रीक्षेत्र बिद्रहळ्ळी येथील नामजपयज्ञ

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें श्रीममन्महाराजांची नामजपयज्ञ करणेविषयी आज्ञा होतांच श्रीब्रह्मानंदगुरुंना अत्यानंद झाला व त्यासाठीं योग्यस्थळ ठरविण्याकरितां त्यांनीं संचार सुरू केला. मागील जपयज्ञाचेवेळीं श्रीमन्महाराजांनीं नदीतटाकाची केलेली सूचना त्यांचे डोळ्यापुढें होतीच. त्यामुळें तुंगभद्रेच्या कांठीं वसलेले पुराणप्रसिद्ध बिद्रहळ्ळी गांव त्यांनी पसंत केलें. जरी हें गांव लहान असले तरी ते सर्व तऱ्हेनें अनुकूल आहे असें श्रीगुरुंना वाटले. कारण याच्याजवळच विठ्ठलपूर, रंगापूर, आदि क्षेत्रें आहेत. तेथे पूर्वी बिष्टाय्या नांवाचे महापुरुष होऊन गेले. त्यांना कैलासपतीचा अवतारच मानीत असत व त्यांनीं तेथें अनुष्ठानही केले होते.

भविष्योत्तर पुराणांत बिद्रहळ्ळी हें काशी क्षेत्रासमान असल्याचें वर्णन केलेले आहे. या गांवीं बिदरहळयव्वा नांवाच्या ग्रामदेवतेचें मंदिर आहे. यावरूनच गावास बिदरहल्ली नांव पडले असावेसें दिसतें. या गांवाबाहेर नदीकांठीं श्रीमुरलीधराचे देऊळ आहे. या देवळांतील मूर्ति काळ्या दगडाची असली तरी नयनमनोहर आहे. मात्र त्या गावात त्यास श्रीमुरलीधराचें देऊळ न म्हणतां श्रीवेणुगोपालमंदिर म्हणण्याचा प्रघात आहे. ते देवालय त्यावेळीं जीर्ण झाले असल्यानें श्रीब्रह्मानंदगुरुंनीं प्रथम त्याचा जीर्णोद्धार केला. जीर्णोद्धार करतांना तेथें पुढील होणाऱ्या नामजपयज्ञाचेवेळीं स्वयंपाक करणेस व अन्नसंतर्पणास सुकर होईल ही दृष्टी ठेवून बांधकाम करवून घेतले.

लहान गांवाच्या मानानें तेथें अवघी १५-२० च ब्राह्मणांची घरें त्यावेळीं होती. जीर्णोद्धाराचे वेळीं या गांवचे लोकांचा व श्रीगुरुंचा परिचय चांगला झाला असल्यानें श्रीगुरुंवर त्यांचा दृढ विश्वासही बसला होता. म्हणून श्रीगुरुंनीं या गांवींच नामजपयज्ञ करण्याचा आपला मानस जेव्हां त्या लोकांस कळविला, तेव्हां त्या गांवच्या सर्व लोकांनीं मोठ्या उत्साहानें त्या कार्यास आपली संमती दर्शविली व श्रीगुरुंच्या आज्ञेप्रमाणें सर्वजण वागूं असे आश्वासनही त्यांनीं श्रीगुरुंस दिलें.

श्रीब्रह्मानंदगुरुंनी जपानुष्ठानास लागणाऱ्या सर्व साहित्याची सिद्धता केली. या खेपेस जपानुष्ठानाचा प्रारंभ श्रीमन्महाराजांचे हस्तें करवावा या इच्छेनें त्यांस विज्ञापना करुन बोलावून आणण्यासाठीं श्रीब्रह्मानंदगुरुंनी गोंदावलेस शिष्यांची रवानगी केली. श्रीमन्महाराजांना इतर कार्यामुळें तिकडे जातां येणें शक्य नव्हते. म्हणून त्यांनीं जपानुष्ठानास प्रारंभ करण्याचें आज्ञापत्र आपले विश्वासू शिष्य अप्पासाहेब भडगांवकर, भाऊसाहेब केतकर, अप्पासाहेब घाणेकर यांच्या हातीं देऊन त्यांस तिकडे रवाना केले. ते पत्र खालीलप्रमाणें.

॥ श्रीसमर्थ ॥

''सर्व उपमायोग्य रा. रा. रामभक्त परायण ब्रह्मानंदबुवा यांस आशीर्वाद.''

''वि. लिहिणेचे कारण तेरा कोटी श्रीराममंत्राचा जप करणारे भक्तराज व ब्रह्मानंदमहाराज तुम्ही; महाभागवत, जप करणारे मंडळी यांनी या कलियुगांत 'थोर केले अनुष्ठान त्यानें प्रसन्न माझे अंतकरण. ''मी सदा सर्वदा तुमचे आधीन। तुम्ही सर्वत्रांनीं एक करावे काम। लौकिकी वासनेचा करूनि त्याग। माझें सांगणें

मानावे प्रमाण। संतोषानें सुप्रसन्न चित्त करून, तुम्ही ब्राह्मण भोजन, उत्सव, पुरश्चरण, जें कांहीं तुम्हांस दिसेल, जे योग्य असेल तें सत्कर्म करावें. इकडून अप्पासाहेब, घाणेकर, भाऊसाहेब पाठविले आहेत तर अप्पासाहेब भडगांवकर यांस मी समजून करावे. मीच समजून करावे आरंभ। त्यांचे म्हणण्याप्रमाणें करावें वर्तन। मी तुम्हांस सर्वास येऊन दर्शन देईन यांत शंका नाही. आतां हे ऐकावें वचन। प्रारंभास विलंब न करावा क्षणभर। जप करणारे मंडळीस, भागवतास, ब्रह्मानंदास हेच मागणें आहे एक. मी आल्यापूर्वी अप्पासाहेब, घाणेकर पोंचल्याबरोबर करावा प्रारंभ. सामान वायां जाऊं देऊं नये. यांत फार अर्थ आहे. समक्ष समजल्यानंतर वाटेल खरे। लौकिकी भावार्थ सोडूनि द्यावा। आरामाचा राम जोडावा। सत्कर्मास हजारो विघ्नें असतात. परंतु सर्व एका बाजूला ठेऊन शेवटाला नेण्याचा यत्न करावा. प्रारंभ करण्यांत उशीर न लावावा. हा आशीर्वाद. बाकी मजकूर भाऊसाहेब, घाणेकर, सांगतांना कळेल. आशीर्वाद.

ता. क. तुम्हांस सांगितल्याप्रमाणे मी येऊन घटकाभर तुम्हांस भेटेन यांत संशय नाहीं. पत्राप्रमाणें सर्वत्र मंडळींनीं वागावें यांत फार खरें आहे. उगीच हाट करू नका. माझे आज्ञा मोडूं नका. हा आशीर्वाद.

ब्रह्मचैतन्य गोंदावले.

वर उद्‌धृत केलेलें श्रीमन्महाराजांचे आज्ञापत्र घेऊन आलेल्या भाऊसाहेब व अप्पासाहेब द्वय यांच्या तोंडून सर्व सूचनावजा हकीगत ऐकून घेऊन ती शिरोधार्य मानून श्रीशके १८२९ प्लवनाम संवत्सरांतील दासनवमी दिवशीं समाप्ति होईल अशा बेतानें माघ वद्य द्वितीयेस गुरुवारीं सूर्योदयाच्या आंत श्रीमन्महाराजांच्या पादुकांना व श्रीमुरलीधरला पंचामृताचा अभिषेक करून, आरति करून तेरा कोटी श्रीरामनामजपाचा संकल्प करून, *श्रीफल ठेवून, 'रघुपति राघव राजाराम' या भजन सप्ताहाला व श्रीरामजपाला एकदम त्यांनीं प्रारंभ केला.*

नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें आसपासच्या चोहोंबाजूंच्या सर्व लोकांना कळविण्याची आगाऊच व्यवस्था करण्यांत आल्यानें व त्यांतच श्रीमन्महाराजही येणार आहेत अशी दाट वदंता पसरल्यानें हजारोनीं लोक सप्ताहासाठी जमले होते. श्रीमहाभागवतांचा मुक्कामही तेथेंच होता. सप्ताहाचा थाट काय वर्णावा. श्रीदासनवमीच्या दिवशीं दुपारीं स्वत: श्रीब्रह्मानंदगुरुंनी श्रीसमर्थांच्या निर्याणाचे अनेक अभंग म्हणून कीर्तिरूप दासकथन करून मोठ्या थाटानें नवमी उत्सव संपविला. श्रीमुरलीधराची, श्रीसमर्थांची, श्रीमहाराजांची आरति करून, नैवेद्य दाखवून ब्राह्मण, सुवासिनींना भोजन घातलें. सर्व गांवास आमंत्रण होते.

जपानुष्ठानाची व्यवस्था श्रीमुरलीधराचें देवळांत केल्यानें लोक दररोज तेथेंच जपास बसत असत. श्रीबेलधडीभजनी पद्धतीप्रमाणें कांकडाआरति, मध्यान्हनैवेद्यारति, सायं भजनी आरति वगैरे नित्यनेम व उपासनाक्रमात श्रीगुरुंनीं येथे आरंभ केला. व न चुकतां तो चालावा म्हणून श्रीगुरु फार करून तेथेंच राहूं लागले.

सुरवातीस जपास बसलेल्या लोकांची संख्या साठ ते सत्तर इतकीच होती. पण श्रीगुरुंनीं पुष्कळ गांवचे लोकांस पत्रें पाठवून बोलावून घेतल्यानें ती संख्या उत्तरोत्तर वाढत वाढत २५० पर्यंत गेली. अर्थात या सर्व लोकांची उतरण्याची, फलाहाराची, भोजनाची उत्तम व्यवस्था ठेवण्यांत आली होती. श्रीब्रह्मानंदगुरु मधून मधून जातीनें त्यांच्या योगक्षेमाची चवकशी करीत असल्यानें ते सर्व श्रीरामनामजपांत आनंदानें मग्न होत

असत. जपयज्ञासाठीं लोकांनीं तेथें गर्दी करण्याचे दुसरे कारण म्हणजे पवित्र पुण्यक्षेत्रीं वास, पावन करणाऱ्या तुंगेच्या स्नानाचा लाभ व श्रीगुरुंचा प्रेमळ सहवास हे होय. अशा त्रिवेणी संगमाचा सुयोग सुखासुखी कोण बरें दवडील ! अशा धूमधडाक्यांत पूर्वी नरगुंदांत झाल्याप्रमाणें येथेंही तेरा कोटी जपसंख्या अवध्या ७।८ महिन्यांत पूर्ण झाली. हातासरशी सांगतामहोत्सवही लवकर करावा म्हणून श्रीब्रह्मानंदगुरुंनीं श्रीमन्महाराजांस आमंत्रण करण्यास व बोलावून आणण्यास आपल्या एका विश्वासू शिष्याची योजनाबद्ध नियुक्ति करून त्यास गोंदावलेस रवाना केले व सामुग्रीच्या जय्यत तयारीस त्यांनीं स्वत:च्या देखरेखीखालीं सुरवात केली. इतका कामाचा व्याप असूनदेखील सायंभजनास दररोज स्वत: सुरवात करून लोकांना हितोपदेश करण्याच्या परिपाठांत श्रीब्रह्मानंदगुरुंनी कधींही खंड पडूं दिला नाहीं.

श्रीगुरुंनीं पाठविलेला भाविक गोंदावलेस पोंचतांच त्यानें श्रीमन्महाराजांचे दर्शन घेऊन नम्रपणे त्यांस श्रीगुरुंच्या विनंतीचे व तेथील हकीगतीचे कथन केलें. सर्व वृत्तांत ऐकून हर्षभरित अंत:करणानें बिदरहळ्ळीस जाणेस निघण्यास आपली संमती दर्शविली. पण दर खेपेसच कारणाकारणानें प्रत्यक्ष निघण्यास श्रीमन्महाराजांस दिनावधि होत असे. तेंच या खेपेसही झाले. आज उद्यां करीत करीत त्यांनीं चार महिने घालविले. असें करण्यांत श्रीमन्महाराजांचा कांहीं तरी उदात्त हेतू असला पाहिजे. तो म्हणजे सर्व सिद्धता होण्यास भरपूर वेळ मिळावा हा एक व दुसरा अति महत्वाचा म्हणजे त्या निमित्तानें जमलेल्या लोकांचा जास्तींत जास्त काळ ईश्वर भजनांत जात राहिल्यानें ते पुढील आयुष्यांत बाळकडू ठरावें हाच असला पाहिजे. शेवटीं श्रीमन्महाराजांनीं प्रयाण केले. या खेपेस त्यांचे बरोबर सुमारें ३०० लोक होते. या खेपेस श्रीमन्महाराजांची प्रकृती असावी तशी चांगली नव्हती. ते दम्याच्या विकारानें फार अशक्त झाले होते. त्यावेळीं त्यांनीं बापूसाहेब साठे नांवाच्या आपल्या एका शिष्यास लिहिलेल्या पत्रातील उल्लेखावरून वरील विधानाची सत्यता पटते. पत्रांतील संबंधित मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणें-

''विशेष लिहिण्यांचे कारण मी ब्रह्मानंदबुवाकडे प्राणाच्या कराराबरोबर आलो आहे. मी जीविताची आशा सोडून आलो आहे. दररोज ताप चार डिग्री येतो. श्वास फार झाला आहे. अन्न खाववत नाहीं. जिना चढून जाण्याची शक्ति उरली नाहीं, असें झालें आहे. परंतु भागवतांनी व ब्रह्मानंदबुवांनीं तेरा कोटी जप केला आहे. या शिवाय दोन ठिकाणीं श्रीरामाच्या स्थापना होणार आहे. एवढ्याकरिता देह गेला तरी हरकत नाहीं असें समजून मी आलो आहे. माझ्याबरोबर सुमारे तीनशे लोक आहेत.''

एवढ्या मोठ्या परिवारासह श्रीमन्महाराज प्रथम हुबळीस आले. हुबळींत दत्तोपंत तबीब व चिंदबर नायक करी हे भाविक रहात होते. ते श्रीब्रह्मानंदगुरुंचे विशेषभक्त असल्यानें त्यांच्यावर श्रीमन्महाराजांचा अनुग्रह होऊन ते त्यांच्या कृपेस पात्र व्हावे या इच्छेनें त्यांनीं त्यांना पूर्वीच आपल्याबरोबर गोंदावलेस नेऊन श्रीमन्महाराजांच्या पायावर घालून, त्यांच्याकडून त्यांस अनुग्रह देवविला होता. त्याचवेळीं श्रीमन्महाराजांनीं त्यांस हुबळीमध्ये श्रीराम स्थापना करण्याची आज्ञा केली होती.

अनुग्रह घेऊन हुबळीस परत आल्यानंतर श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें दत्तोपंत तबीबांनी आपल्या घराजवळ मंदिर बांधावें असा विचार करून तो श्रीगुरुंस बोलून दाखविला. तें ऐकून श्रीगुरुंनीं त्यांना 'दुसरे

मंदिर बांधण्याच्या भानगडींत पडूं नकोस. तुझ्या घराजवळ असलेल्या ईश्वरमंदिराच्या एका भागांत श्रीरामप्रभूसाठीं एक सिंहासन तयार करवून मूर्ति आणून ठेव. आमचे महाराज हरिहरांत भेद मानीत नाहींत. हें सर्वांस पटण्यासाठीं बहुश: सगळीकडे त्यांनीं श्रीरामाचे देवळांत शिवलिंगाची व शिवमंदिरांत श्रीरामाची स्थापना केली आहे. त्या करता तू ही तसेंच करावें' असें सांगितले. श्रीगुरुंच्या आज्ञेनुसार त्या भाविकानें त्याप्रमाणें सर्व सिद्धता केली. अमृतशीलेच्या श्रीराम, सीता, लक्ष्मण व श्रीमारुति यांच्या सुंदर मूर्ति आणवून ठेवल्या व श्रीगुरुंना कळविले. श्रीगुरुंनीही जपयज्ञाच्या सांगतेच्यावेळी श्रीमन्महाराजांस बोलावून आणण्यासाठीं दूरदर्शीपणानें नेमकी दत्तोपंतांची निवड करून त्यांस पाठविल्यामुळेंच श्रीमन्महाराज प्रथम हुबळीस आले. 'योजकस्य योजकत्वम्' म्हणतात तें हेंच.

श्रीमन्महाराजांच्या स्वागतास हुबळी स्थानकावर हजारो प्रतिष्ठित लोक उपस्थित होते. श्रीमन्महाराज अग्निरथांतून खालीं उतरतांच सर्वांनीं त्यांचा उत्स्फूर्त जयजयकार केला. फुलांच्या असंख्य माळा त्यांस घालण्यांत आल्या. भजनी मेळ्याच्या घोषांत मिरवणुकीनें त्यांस गांवांत नेण्यांत आले. सर्वांना श्रीमन्महाराजांचे दर्शन मिळण्यास रात्रीचे अकरा वाजले.

श्रीमन्महाराजांचा मुक्काम हुबळींत तीन दिवस होता. तेथील भक्तवृंदाने श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें श्रीरामस्थापनेचे कार्य अतिशय उत्साहानें पार पाडले. पुष्कळ अन्नसंतर्पण झाले. नामघोषहि बहुत झाला. याच मुक्कामांत हुबळीच्या सिद्धारूढ स्वामींनी आपले शिष्याकरवीं श्रीमन्महाराजांच्या दर्शनाची इच्छा प्रकट केल्यानें श्रीमन्महाराजांनीं त्यांस सायंकाळी यावें असा निरोप पाठविला. पण दुपारीं तीन वाजतांच आपल्या शिष्यपरिवारासह श्रीमन्महाराज आरूढमठाकडे गेले. आरूढ स्वामी सन्मानपूर्वक त्यांस सामोरे गेले. दोघांनीं एकमेकांस आलिंगन दिले. आरूढस्वामींनीं श्रीमन्महाराजांस मठांत बोलावून नेऊन सर्व मठ हिंडून दाखविला. कांहीं काळ श्रीमन्महाराजांस आपल्याजवळ आपल्या आसनावर बसवून घेतले. नंतर दोघांचे एकांतांत संभाषण झाले. श्रीमन्महाराजांस पोंचविण्यास आरूढस्वामी एक फर्लांगपर्यंत गेले होते.

हुबळीचा कार्यक्रम संपवून श्रीमन्महाराजांनीं रेल्वेनें गदगला प्रयाण केले. तेथेंही डॉक्टर, वकील, सरकारी नोकर यांनीं स्टेशनवर श्रीमन्महाराजांचा जयजयकार केला. त्यांना फुलांच्या माळा घालून त्यांचे स्वागत केले. श्रीगुरुंनीं आधींच ठरविल्याप्रमाणें तेथील सुप्रसिद्ध वकील जनार्दनपंत आठवले यांनीं त्यांस आपले घरीं बोलावून नेले. त्या रात्रीं तेथें मुक्काम करून दुसरे दिवशीं श्रीमन्महाराजांनीं श्रीमहाभगवतांचे आमंत्रण स्वीकारून बैलगाडींतून कूर्तकोटीला प्रयाण केले.

कूर्तकोटी गांव हे गदग पासून ८-१० मैल अंतरावर आहे. हे श्रीभागवतांचे जन्मस्थान, श्रीभागवतांचे पूर्वाश्रमांतील नांव लिंगनगौडा होते. ते गर्भश्रीमंत असले तरी सुविद्य होते. त्यांनीं लौकिकी विद्येत पी.एच.डी. व संस्कृत भाषेंत विद्याभूषण असा गौरव संपादन केला होता. त्यांनी शास्त्राचा अभ्यास मुळगुंदांतील ब्रह्मश्री गुरुनाथशास्त्री यांच्याजवळ करून अद्वितीय पांडित्य मिळविले होते. श्रीब्रह्मानंद व यांचे गुरु बहुधा एकच असावेत. यांनीं अनेक पण्डितांना आपल्या विद्याबळानें व वाक्चातुर्याने जिंकून विद्याभूषण लिंगेशशर्मा असें नामाभिधान मिळविले होते.

एकदां अकस्मात् श्रीगुरु श्रीरामनवमी उत्सवाचे भिक्षेसाठी कूर्तकोटीस, त्यांचा शिष्यपरिवार तेथें असल्यानें, नेहमीप्रमाणें गेले होते. तेव्हा लिंगनगौडा गांवांतच होते. श्रीगुरुंनीं काशी क्षेत्रीं शास्त्राचा विशेष अभ्यास केला असल्याचें वर्तमान त्यांचे कानावर गेले होते. तरी श्रीगुरुंची वेदान्तशास्त्रांत आपल्यापेक्षां किती जास्त तयारी आहे याची परीक्षा घेण्याच्या उद्देशानें त्यांनीं श्रीगुरुंस आपले घरीं बोलावून घेतले. कांही काळ इकडच्या तिकडच्या गप्पा करून शास्त्रांतील अतिगहन विषयांस हात घालून त्यांनीं श्रीगुरुंस कांहीं प्रश्न विचारले. प्रश्न ऐकून श्रीगुरुंनी फक्त स्मित केले व नम्रपणें ''लिंगनगौडा, श्रीमन्महाराजांचा अनुग्रह घेतल्यापासून माझी जीभ संपूर्णपणे मी श्रीरामरायास विकली आहे. त्यामुळें माझी शास्त्रवासना संपूर्णतया नष्ट झाली आहे. तुमचे प्रश्न जरी शास्त्राला संमत असले तरी त्यांचे समाधानकारक उत्तर सांपडणें मुष्कील. त्या फंदांत पडून खरे समाधान लाभणें कठीण. कारण ''शब्दजालं महारण्यं चित्तभ्रमणकारणम'' या श्रीमदाचार्यांच्या उक्तीप्रमाणें अखेर चित्ताचे भ्रमण होणारच. त्यामुळें आपल्याला हवी असलेली शांति व समाधान केव्हांही मिळणार नाहीं, हें निश्चित ठरवून, मी श्रीममन्महाराजांना शरण जाऊन, त्यांच्या कृपेनें जन्माचे सार्थक होण्याचा मार्ग पत्करला आहे. तुम्हांस सांगावयाचे म्हणजे मनाला शाश्वत शांति व समाधान मिळावयास पाहिजे असल्यास भगवंताच्या नामावर अढळ श्रद्धा ठेऊन अखंड नामस्मरण करावें. नामाचा महिमा अगाध आहे. नामांत रंगलेल्यानांच त्याचा अनुभव येतो. नामस्मरणासारखें दुसरें सुलभ साधन त्रैलोकीं कोणतेही नाहीं'' असें सांगितले. त्यांचा कंठ दाटून आला नेत्रांतून प्रेमाश्रू ओघळूं लागले. तोंडांतून शब्द निघेना. थोड्या वेळानें सावकाश खालीलप्रमाणें कानडी अभंग म्हणून ते डोळे मिटून स्वस्थ बसले.

'धन्य इवर ताई, धन्य इवर तंदी। धन्य इवर मंदी बळगवू।। १।।
रामनामवस्ति दारनालिगेयल्ली। दारहृदयदल्ली रामरूप ।।२।।
भक्तिप्रेमदिंद कंठसद्गदवागी । बाष्पोदक होगी कण्णूमंजू ।।३।।
नृत्य माडुवाग देहभानविल्ल । नोडुव जगवेल्ल राममया ।।४।।
इंथर सेवा कोडू रामदेवा । बेडुवे बरवा ब्रह्मानंदा ।।५।।

श्रीगुरुंची प्रेमपूरित वाणी, त्यांचा विनय, त्यांची भगवत्भक्ति, नामावरील त्यांची दृढनिष्ठा पाहून पंडित लिंगनगौडा स्तिमित झाले. त्यांच्यांत श्रीगुरुंविषयीं आदर निर्माण झाला. हे सामान्य नव्हेत ही भावना जागृत झाली. ज्याकरितां आजवर मी प्रयत्नांत होतो ते मला यांच्याकडून मिळणार असा विश्वास निर्माण झाला व मला सत्य, शाश्वत समाधान मिळेल असा अनुग्रह करावा असें म्हणून ते श्रीगुरुंना शरण गेले. तेव्हां श्रीगुरुंनीं आपल्या नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें श्रीमन्महाराजांच्या अमानुषत्वाचें वर्णन करून त्यांना शरण गेल्यास तुमची इच्छा पूर्ण होईल असें त्यांस पटवून, आपल्या पुढील गोंदावलेच्या फेरींत त्यांस आपल्याबरोबर नेऊन, श्रीमन्महाराजांच्या पदरांत त्यांस टाकले.

श्रीमन्महाराजांची भव्य सतेज मूर्ति, त्यांचे अद्वितीय ज्ञान, वैराग्य, त्यांचा अगाध महिमा, समभावानें सर्वाठायीं व्यक्त होत असलेलें प्रेम प्रत्यक्षांत पाहून लिंगनगौडा इतके भारावलें कीं ते तात्काळ अनन्य भावानें श्रीमन्महाराजांस शरण गेले व आपलें तनुमनधन श्रीमन्महाराजांच्या चरणीं त्यांनी अर्पण केलें. विद्येच्या

अभिमानाचा संपूर्णतया त्याग करून ते त्यांच्या सेवेंत अखंड तत्पर झाले. त्यांची सेवाही तशीच अपूर्व होती म्हणून श्रीमन्महाराजांची कृपा त्यांस संपादन करतां आली. अखेर महाभगवत हें गुरुनामधेय मिळवून, उपासना मार्ग व श्रीराम नाम यांचा प्रसार करणेची आज्ञा मिळवून तें आपल्या कूर्तकोटी गांवाला परतले.

पुढे थोड्याच काळांत आपल्या घरींच श्रीराम प्रतिष्ठा करणेचा विचार कायम करून, सर्व सिद्धता करून, श्रीराम, सीता, लक्ष्मण यांच्या अमृत शिलामूर्ति करवून आणवून ते श्रीमन्महाराजांच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत होते. श्रीमन्महाराज हुबळीस येताच त्यांना कूर्तकोटीस बोलावून आणणेकरितां स्वत: पुढाकार घेऊन, गांवातील कांहीं सद्गृहस्थांना बरोबर घेऊन हुबळीस जाऊन, श्रीमन्महाराजांना विनंति करून, मोठ्या थाटानें ते त्यांस गदगहून आपल्या गांवी घेऊन आले.

कूर्तकोटी गांवीं श्रीमन्महाराज फक्त तीन दिवस होते. प्रतिष्ठा महोत्सवाचे सर्व कार्य यथासांग पार पडले. या तीन दिवसांत महाभागवतांनीं मुक्तद्वार अन्नसंतर्पण केलें. श्रीमहाभागवतांचा परिचय सगळीकडे विशेष असल्यानें लांब लांबच्या देशांतून थोर पण्डित, सरकारी नोकर वगैरे पुष्कळ जनसमुदाय जमला होता. श्रीमन्महाराजांचे कडून उपदेश घेणाऱ्यांची तसेंच प्रापंचिक समस्या विचारणारांची तर तोबा गर्दी उडाली होती.

श्रीमन्महाराज तेथून निघाले ते बैलगाडींतून मुळगुंदला आले. तेथें परम भाविक गंगाधरपंत आठवले या नांवाचे सद्गृहस्थ रहात होते. श्रीमन्महाराजांच्या तब्येतीच्या अस्वास्थ्यामुळे वाटेंत श्रीमन्महाराजांना त्रास होऊं नये म्हणून श्रीमन्महाराजांची उतरणेची सोय आठवले यांचेकडे श्रीगुरुंनीं आगाऊच करून ठेविली होती. त्यानुसार श्रीमन्महाराजांचा मुक्काम गंगाधरपंताकडे दोन दिवस होता. तेथून निघून ते शिरहट्टीस आले. शिरहट्टींत मंगसूळी घराण्यांत धोंडाप्पा आडवेप्पा हुचाप्पा या नांवाचे श्रीगुरुंचे परमभक्त होते. ते श्रीमंत असून श्रध्दावान भाविक होते. श्रीगुरुंवर त्यांचा फार विश्वास असलेनें त्यांच्याकडे श्रीमन्महाराज फक्त १ दिवस होते. पुढील प्रवासाठीं ३२ बैलगाड्या तयार ठेवण्यांत आल्या होत्या. श्रीमन्महाराजांसाठी पृथक् अशी धमणीगाडी आंत मऊ मखमलीची गादी पसरून, उशा ठेऊन त्यांत श्रीमन्महाराजांस सुखानें झोपतां येईल अशा व्यवस्थेनिशीं तयार ठेवण्यांत आली होती.

शिरहट्टीहून बिदरहल्ली हे खेडेगांव सुमारे २५ मैल अंतरावर आहे. वाटही त्यावेळीं बेताचीच होती. प्रवास बैलगाडीचा तेव्हां त्रास हा होणारच हें गृहीत धरून शक्यतोंवर कोणालाही कोणत्याही प्रकारचा त्रास होऊं नये, विशेषत: श्रीमन्महाराजांना तो होऊं नये म्हणून श्रीगुरुंनी विशेष खबरदारी घेतली होती. एका गाडींत लाडू, पोहे, करंज्या, चकल्या असे फराळाचे सामान ठेवले होते. तसेंच दुसऱ्या एका गाडींत पिण्याच्या पाण्याचे दोन मोठे हांडे उत्तम पाण्यानें भरून ठेवले होते. या दोन गाड्या व श्रीमन्महाराजांची धमणी बत्तीस गाड्यांच्यामध्ये ठेवण्यांत आली होती. शिवाय गाड्यांबरोबर पायी प्रवास करणारांची संख्या अगणित होती. दर दोन तासांनीं एखादी झाडांची गर्द छाया आल्यावर गाड्या थांबवून थोडी विश्रांति घेण्याची सूचनाही देऊन ठेवलेली असल्याने त्याप्रमाणें गाड्या थांबत असत. विश्रांतीचेवेळी फलहाराची व्यवस्था चोख ठेवण्यांत येत

असे. शिरहट्टीहून प्रवास सुरू करतांना 'रघुपति राघव राजाराम। पतीत पावन सीताराम' असा जो नामघोष सुरू झाला, तो प्रवास संपेपर्यंत अव्याहत मुक्तकंठाने चालला होता.

बेळहट्टी हें गांव शिरहट्टीपासून १२ मैलावर बिदरहळ्ळीच्या वाटेवर आहे. तेथें गाड्या पोंचण्यास सायंकाळ झाली. त्या गांवच्या भाविक लोकांनीं श्रीमन्महाराजांस आपले गांवीं त्यारात्रीं वस्ती करून गांव पावन करावा अशी विनंति केल्यानें, श्रीमन्महाराजांनी ती मान्य केली व तेथें त्या रात्रीं वास केला. दुसरे दिवशीं म्हणजे शके १८३० फाल्गून वद्य १४ दिवशीं सूर्योदयापूर्वीच तेथून प्रयाण केले व दुपारीं सुमारें १ वाजणेचे सुमारास हा सर्व लवाजमा बिदरहल्लीस येऊन पोंचला.

श्रीमन्महाराजांचे दर्शनासाठीं त्यावेळेपर्यंत सुमारे पंधरा ते वीस हजारपर्यंत जनसमूह जमला होता. दर्शनासाठीं अधीर झालेले लोक दोन कोसापर्यंत पसरले होते. रस्त्यावर तर इतकी गर्दी झाली होती कीं, वाटच दिसत नव्हती. अधीर झालेल्या लोकांना श्रीमन्महाराजांचे दर्शन सुलभपणें व्हावें, कोणाचीही निराशा होऊं नये म्हणून श्रीब्रह्मानंदगुरुंनी मखमलीच्या गादीनें मढविलेली एक खुर्ची गाडीवर बांधून श्रीमन्महाराजांच्यासाठीं सिंहासन तयार केलें होते. श्रीमन्महाराजांस ऊन लागूं नये म्हणून श्रीरामसंस्थान बेलधडीहून जरतारी मोठी छत्री आणविली होती. लोकांच्या उत्साहाला इतकी भरती आली होती कीं, श्रीमन्महाराज सिंहासनावर विराजमान होतांच लोकांनीच ती गाडी ओढून बिदरहळ्ळीला नेली.

त्यावेळीं श्रीमन्महाराजांचा पोषाख म्हणजे अंगात एक पायघोळ निळा जरतारी फरगोल, डोकीस तांबडी जरीची लांब गणेश टोपी व पायांत पादुका असा होता. भालप्रदेशावर कोरीव उभे केशरी गंध होते व त्यामध्यें काळा टिळा शोभून दिसत होता. ती भव्य मनोहर मूर्ति सर्वांनीं डोळेभरून पाहून हृदयसंपुटांत सांठवून ठेवली. मिरवणुकीपुढे ४।५ भजनी मेळे, चारसहा ढोल वादक होते. वाजंत्र्यांच्या ताफ्याच्या थाटांत, प्रचंड जनसमूहानें वेष्टित अशा त्या मिरवणूकीस दोन कोस अंतर कापून गांवीं येऊन पोंचण्यास जवळ जवळ चार तास लागले. सर्व बिदरहळ्ळी गांव तोरणांनीं शृंगारलेले होते. जनसमूह इतका अपरिमित होता कीं त्या गांवांतील सर्व घरें, मठ वगैरे इमारती लोकांनीं गच्च भरल्या होत्या. जिकडे दृष्टिक्षेप करावा तिकडे मुंग्यांप्रमाणे हालचाल करणाऱ्या लोकांखेरीज दुसरें कांहींच दिसत नव्हते. जमलेल्या लोकांची त्यांतल्या त्यांत लेंकुरवाळ्या बायकांची राहण्याची सोय व्हावी म्हणून श्रीगुरुंनीं तुंगभद्रेचे कांठीं विशाल असा मंडप उभारला होता. नदीतीरीं पुरातन दगडी विशाल मंडप आहे. त्यांत सामानाच्या कोठीची व स्वयंपाकाची व्यवस्था होती.

श्रीब्रह्मानंदगुरुंची कोठी सामान्य नव्हती. तो एक अजबखानाच होता. त्यांत अमुक एक पदार्थ नाहीं असे कधींच होत नसे. ती न संपणारी, सदैव अक्षय अशी कोठी होती.

श्रीमन्महाराजांबरोबर आलेल्या तीनशें लोकांपैकी एक गृहस्थ एक दिवस आजारी झाला. त्याला औषधासाठी सुंठ व मिरे यांची गरज होती. म्हणून कोठींत जाऊन त्यानें त्या दोन जिनसांची मागणी केली. कोठीवर नेमलेल्या माणसास कांहीं केल्या ते जिन्नस लवकर सांपडेनात, तेंव्हा तो गृहस्थ श्रीमन्महाराजांकडे

गेला व कोठींत मिरे व सुंठ मिळत नाहीं म्हणून सांगू लागला. तें ऐकून श्रीमन्महाराजांनीं स्मित हास्य केले व ''मिरे व सुंठच काय, जो जिन्नस ब्रह्मानंदबुवाचे कोठींत मिळणार नाहीं तो जगांत कोठेंही मिळणें शक्य नाहीं'' असें त्यास म्हटले. इतक्यांत कोठींतील माणसानें पळत येऊन त्यास मिरे व सुंठ आणून दिली. यावरून कोठी कशा प्रकारें सुसज्ज होती याची यथार्थ कल्पना वाचकांस येईल. त्याचबरोबर आपल्या शिष्याच्या दूरदर्शीपणाबद्दल श्रीमन्महाराजांच्या मनांत दृढ विश्वास किती ओतप्रोत भरला होता याचीही खात्री पटेल.

स्वयंपाकाची व्यवस्था तर वाखाणण्यासारखी होती. अश्वत्थपूरचे श्रीगुरुंचे दोड्डुरामय्या, सण्णरामय्या, फणियप्पा आदि निस्सीम भक्त आपल्या पठडीतील इतर १००|१५० लोकांसह रात्रंदिवस खपत होते. स्वयंपाक, पाणी, वाढप व उष्टेखरकटे याचा जणूं त्यांनीं मक्ताच घेतला होता. मोतीचूर, दळे व बेसन वगैरे प्रकारच्या लाडवांनीं एक संबंध खोली भरून ठेवली होती. दररोज नवीन नवीन पंचपक्वान्नें तयार होतच होती.

इ.स. १९०९ शके १८३१ सौम्य नाम संवत्सराच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून श्रीमन्महाराजांच्या आज्ञेनुसार १३ कोटि रामनामाच्या जपाच्या सांगतेस प्रारंभ झाला. तदंगभूत दररोज कीर्तन, पुराण, प्रवचन, अखंड नामस्मरण, वेदांचे पारायण, गायत्री पुरश्चरण, होमहवन वगैरेस प्रारंभ झाला. 'रघुपति राघव राजाराम । पतीत पावन सीताराम' हा नामघोष चालूं नाहीं असें ठिकाणच हुडकून देखील सांपडत नसे. स्वयंपाकघरांत तोच नामघोष, भाजीपाला चिरण्याचे जागीं तोच नामघोष, पाणी आणतांना तोच नामघोष, वाढतांना तोच नामघोष, एवढेंच नव्हें तर जेवतांनादेखील तोच नामघोष अहर्निश, अखंड ऐकूं येत असे. त्या नामघेषाच्या तंद्रीतच न दमतां सर्व कार्ये तत्परतेनें होत असलेली दिसत.

दररोज सकाळी ११ वाजतां पुराण संपतांच श्रीरामाला, श्रीमुरलीधराला नैवेद्य दाखवून आरती होत असे. नंतर सिंहासनावर विराजमान झालेल्या श्रीमन्महाराजांची अर्ध्यपाद्यांनी पूजा करून, तुळशी व फुलें यांच्या माळा त्यांस घालून त्यांची आरती करण्यात येत असे. त्यानंतर ब्राह्मण, सुवासिनींची पंगत ज्या जागीं बसविणेची त्या जागीं रांगोळीचे पट्टे ओढून पानें मांडली जात असत. पंक्तींच्या वरचे जागीं सर्वांना दिसेल अशा ठिकाणीं श्रीमन्महाराजांचे रांगोळी काढून पाट मांडून पान ठेवण्यांत येत असे. त्यांच्या जवळच रंगापूरच्या महापुरुषांचें पान मांडण्यांत येत असे. मात्र त्यांस टेकण्यासाठीं मागें उभा पाटही ठेवण्यांत येत असे.

प्रत्येक पंक्तींत ७ ते ८ हजारापर्यंत ब्राह्मणांचे भोजन होत असे. एकेक दिवस ब्राह्मण सुवासिनींच्या अशा ३|४ पंक्ति उठत असत. एवढेंच नव्हे तर गावातील सर्वांच्याच पंक्ति अहोरात्र चालत असत. गोरगरीबांवर श्रीगुरुंचे लक्ष फार असे. त्यांना ते स्वत: आग्रहानें वाढीत असत. 'गोरगरीब संतुष्ट झाले तर भगवंत संतुष्ट होतो. तरी प्रथम त्यांस संतुष्ट केलें पाहिजे' असें श्रीगुरु नेहेमीं म्हणत असत. त्यांच्या उक्तीला अनुरूप अशीच नेहमीं त्यांची कृति असे याचा प्रत्यय पुष्कळांना वेगवेगळ्या प्रसंगीं येऊन चुकला आहे. येणेप्रमाणें दुपारीं १२ वाजलेपासून रात्रीं १२ वाजेपर्यंत भोजनाच्या पंक्तीवर पंक्ती दररोज उठत असत.

श्रीब्रह्मानंदगुरु हे शिस्तीचे भोक्ते होते. स्वच्छता व शिस्त यांत बिघाड होऊं न देण्याची ते स्वत: कटाक्षानें खबरदारी बाळगीत असत. हा उत्सव अभूतपूर्व असाच झाला. मागें असा कधीं झाला नाहीं व पुढें

ही होणार नाहीं असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति ठरणार नाहीं.

श्री. होसूर मास्तर यांनी श्रीब्रह्मानंद महाराजांचे जे कानडी चरित्र लिहिले आहे, त्यांत या उत्सवासंबंधी जे वर्णन केले आहे त्यांत या समारंभाची एकंदर व्यवस्था पाहतां राजर्षि विश्वामित्र, ब्रह्मर्षि वशिष्ठाकडे गेल्यावेळीं कामधेनू यांचे सहाय्यानें त्यांच्या ठेवलेल्या व्यवस्थेची, अथवा छत्रपती शिवप्रभू ससैन्य अकस्मात् श्रीसमर्थ रामदासांचे भेटीस गेल्यावेळीं त्यांनीं अष्टसिद्धींच्या सहाय्यानें त्यांच्या ठेवलेल्या व्यवस्थेची आठवण, श्रीब्रह्मानंदगुरुंनीं आरंभिलेला समारंभ, त्यांतील स्वच्छता, त्यांतील शिस्त, त्यावेळचे अन्नदान, हें पाहून झाल्याशिवाय रहात नसे. त्या समारंभात स्वयंपाक करणाऱ्यांची मजुरीच तशा स्वस्ताईच्या काळांत साडेदहा हजार रुपये झाली असा त्यांनीं उल्लेख केला आहे. यावरून साहित्य संग्रहाचे अनुमानाचा व जेवण करणाऱ्यांचे संख्येचा अंदाज करता येईल.

त्याचप्रमाणें श्रीरामभक्त प्राध्यापक केशवराव बेलसरे यांनींही कांहीं प्रसंगानें या बिदरहळ्ळीच्या महोत्सवाचे वर्णन आपल्या 'श्रीगोंदवलेकरमहाराज यांचे चरित्र आणि वाङ्मय' या पुस्तकांत केले आहे. ते मराठींत असल्यानें त्याचा येथें उहापोह न करतां जिज्ञासू वाचकांनीं तें मुळांतूनच वाचावें अशी आम्ही त्यांस शिफारस करतो. अशा प्रकारें अत्यंत उत्साहानें व वैभवानें सदरहूचा उत्सव आठदिवस चालला होता.

उत्सवाच्या पांचव्या दिवशीं मध्यान्हपुराण संपतांच श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांची पूजा व नैवेद्य, आरति संपविली. पानें मांडली गेली. सर्वजण पानावर बसले ''जानकी जीवनस्मरण जयजयराम' अशी गर्जना झाली. श्रीगुरु श्रीमन्महाराजांचे हातांवर आपोशन घालीत असतां एक भाविक श्रीगुरुंच्या जवळ पळत येऊन भीतीनें थरथरत 'महाराज, जवळच्याच कुलकर्ण्यांच्या घरची, तीन दिवस तापानें अंथरूण धरलेली बाई नुकतीच वारली. भोजनांत विघ्न आले' असें सांगू लागला. तें ऐकून श्रीगुरुंनीं हांसून 'छी खुळ्या ! तसं कसं होईल. मंगल कार्यात अमंगल शब्द उच्चारूं नकोस. शुभाची इच्छा करणाऱ्यांनीं नेहमीं शुभवार्ताच बोलावी' असें म्हटले. ''अघटित घटना सामर्थ्य असलेले श्रीमन्महाराज प्रत्यक्षांत हजर असतांना ब्राह्मण भोजनांत विघ्न उद्भवणें कदापि शक्य नाहीं. श्रीमन्महाराजांच्या अनुज्ञेशिवाय ती मरणें शक्य नाहीं. तूं तेथें परत जा. मी श्रीमन्महाराजांस भोजनास बसवून तेथेंच येतो, 'असें सांगून त्यांनीं त्यास परत पाठविले. श्रीमन्महाराजांना आपोशन घालून सर्वांना त्यांनीं भोजनास बसविलें व श्रीमन्महाराजांना सर्व हकीकत निवेदन करून त्यांच्या परवानगीनें त्यांचे चरणतीर्थ व त्यांच्या पानांतील प्रसादाचा थोडा भात घेऊन घाईघाईनें त्या गृहस्थाचे घरीं श्रीगुरु गेले. तोपर्यंत प्रेत जमिनीवर ठेऊन सर्व आप्त मंडळींनी भोंवती बसून मोठमोठ्यानें रडण्यास सुरवात केली होती.

तें करूणाजनक दृश्य पाहतांच श्रीगुरुंचे अंत:करण हेलावले. त्या बाईच्या मृत देहाकडे त्यांनीं कृपाकटाक्ष टाकला. आणलेल्या तीर्थाचे सर्वांगावर सिंचन करून थोडेसें त्यांनी त्या बाईच्या तोंडांत आपल्या अमृतहस्तानें घातले. 'बाई, सर्व लोक भोजनास बसले आहेत. श्रीमन्महाराजांनी परत येण्यास तुला निरोप दिला आहे. तरी लवकर ऊठ' असें म्हटले मात्र, लगेच त्या बाईच्या शरीरांत प्राणवायूनें संचार केला. ती बाई श्वासोच्छ्वास करूं लागली. सर्व लोकांस 'भीऊं नको. श्रीमन्महाराजांच्या कृपेनें विघ्न टळले. श्रीरामनामाचे स्मरण करा'

असें अभय देऊन तेथील एकास पाक शाळेंत जाऊन एकशेर तांदुळाचा भात, एक तांब्याभर ताक लवकर घेऊन येण्याच त्यांनीं सांगितले. त्यानें ते आणतांच भातांत ताक घालून आणलेला प्रसादाचा भात त्यांत मिसळून सर्व कालवून त्या बाईस सावकाश उठवून, धरून बसवून आपल्या अमृतहस्तानें तिचे तोंड उघडून, दोन घांस तिच्या तोंडांत घातले. प्रथम ते अन्न तिच्या पोटांत जाईना. तें पाहून आपल्या हाताच्या बोटांनीं तें ढकलून घशांतून खालीं घालविलें. अशा तऱ्हेनें पांच घांस पोटात जातांच पंचप्राण परत आले. तिनें डोळे उघडले. समोर आलेली श्रीगुरुंची हंसतमुखमूर्ती दृष्टीस पडतांच तिनें हात जोडले व कृतज्ञता व्यक्त केली. श्रीगुरुंनीं कालविलेल्या ताकभाताचे पातेले पुढें ठेऊन तो भात खाण्यास सांगतांच ती पातेल्याजवळ सरकत गेली. तिनें दोन घांस खाल्ले व यांत मीठ नाहीं असें सांगून ते मागून घेतले.

नंतर श्रीमन्महाराजांचे कृपेनें अरिष्ट टळले असें तेथील लोकांस सांगून ते पंक्तीत आले व कोणतेही विघ्न राहिलेले नाहीं. स्वस्थ चित्तानें भोजन करा. आज इच्छा भोजन आहे. पाहिजे असेल ते पक्वान्न मागून घ्या असें सर्व पंक्तींत हिंडून त्यांनीं सांगितले व सर्वांस एक एक रुपया दक्षिणा दिली व असंख्य गोरगरिबांस वस्त्रे दिली.

श्रीमन्महाराजांचे जे रोज निरूपण होत होते तें ऐकून पुष्कळ साधकांचे सकल संशय आपोआप निवारण झाले. त्या निरूपणाच्या श्रवणानें पुष्कळांस आपोआप सन्मार्गाची माहिती झाली. त्यांच्या उपदेशाचें सार थोडक्यांत खालीलप्रमाणें असे. ''श्रीरामावर अवश्य भक्ति असावी पण ती सहेतुक नसावी. दिवसांकांठचा जास्तींतजास्त वेळ त्याच्या नामस्मरणांत घालवावा. कलियुगांत भगवंताची कृपा संपादन करण्याचें सुलभ साधन म्हणजे भगवंताचे नाम. भगवंताच्या अनुसंधानांत सदा असावे. व्यर्थ काळ घालवूं नये.''

संसार म्हटला कीं तापत्रय आलाच. सुखाचा अभावच असावयाचा. असले रंजले गांजलेले साधुसंताचा अनुग्रह घेण्यास फार धडपडतात. असे लोक, तसेंच पिशाच्च पीडाबाधित लोक व रोगजर्जर लोक श्रीमन्महाराजांना घेराव घालून, उपायांच्या अपेक्षेनें बसत असत. श्रीमन्महाराजही कल्पतरूप्रमाणें सर्वांचे समाधान करीत असत. अशाप्रकारें आठवडा बिदरहळ्ळींत घालवून श्रीमन्महाराज तेथून निघून रामनवमीस हुबळीस आले. कारण बिदरहळ्ळीस जातांना केलेल्या राममूर्तीच्या जन्मोत्सवास आपल्या कडेच आलें पाहिजे असा दत्तोपंत तबीब यांचा आग्रह होता. त्याप्रमाणें हुबळीस जन्मोत्सव साजरा करून श्रीमन्महाराज एकादशीच्या दिवशीं सायंकाळीं कूर्तकोटीस गेले. श्रीमहाभागवतांच्या उपनयन समारंभासाठीं ते तेथें गेले होते. त्रयोदशीस उपनयन होतांच चतुर्दशी दिवशीं श्रीगुरुंच्या विनंतीवरून ते हनुमान जयंतिसाठीं श्रीक्षेत्र बेलधडीस गेले.

श्रीमन्महाराजांना वर उल्लेखिल्याप्रमाणें श्रीरामनवमी उत्सवात हुबळीस जावयाचे असल्यानें, बिदरहळ्ळी समारंभाची सांगता होईपर्यंत ते तेथें राहिले नाहींत. श्रीब्रह्मानंदगुरुनीं बिदरहळ्ळी येथील श्रीरामनाम-जप-यज्ञमहोत्सव चैत्र शुद्ध दशमी रोजीं संपविला व एकादशीस मोठ्या थाटानें तुंगभद्रा नदींत अवभृत स्नानाचा सोहळा पार पाडला. सगळ्या ब्राह्मणांना फल, तांबूल दक्षिणा दिली. सुवासिनींना लुगडे व खण दिला. गोरगरीबांना ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणें द्रव्य, वस्त्र, धान्य देऊन सर्वांस संतुष्ट केले व श्रीमन्महाराजांस

बेलधडी येथील हनुमान जयंतीचे आमंत्रण दिले असल्यानें, ते शिष्य परिवारासह बेलधडीस येण्यापूर्वीच श्रीगुरु उरलेल्या सर्व सामुग्रीसह श्रीमन्महाराजांच्या आगमनापूर्वीच बेलधडीस येऊन त्यांची वाट पहात बसले होते.

श्रीमन्महाराज बेलधडींत ८ दिवस होते. या काळांत श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांस धमणीगाडींतून वेंकटपुरास नेले. श्रीवेंकटपतीला पंचामृताभिषेक पूजा करवून भोजनोत्तर परत बेलधडीस आणले. या सफरींत श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांस श्रीक्षेत्र वेंकटापूरचा सर्व पूर्व वृत्तांत साद्यंत कथन केला, आणि त्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्याची अनुज्ञा मिळविली. सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेशिवाय कोणतीही गोष्ट करावयाची नाहीं असा त्यांचा दृढनिश्चय होता. हेंच सच्छिष्य लक्षण होय. पुढे दोन दिवस बेलधडीस राहून श्रीमन्महाराज मलसमुद्राला गेले. तेथें एक दिवस राहून गदगला भाऊसाहेब केतकर इंजीनियर यांचेकडे गेले. ते त्यांचे एकनिष्ठ भक्त होते. यावेळीं श्रीगुरुही त्यांचे बरोबर होते.

श्रीमन्महाराज कर्नाटकांत आल्यावेळीं श्रीगुरुंनी त्यांच्या कार्यक्रमाचा, मुक्कामाचा, भोजनाचा वगैरे आराखडा पूर्वीच तयार केला होता. त्याबरहुकूम त्यांनीं तो तंतोतंत अमलांतही आणून दाखविला. श्रीमन्महाराज आगाऊ माहीत असल्याप्रमाणें आचरण ठेवीत असत.

एकदां गदग मुक्कामांत श्रीमन्महाराजांचा फलाहार गदग येथें व झोंपण्याची व्यवस्था बेटगिरींतील भाविकांकडे अशी श्रीगुरुंनी आखणी केली होती. गदग येथील फलाहार उरकण्यास फार रात्र झाली. श्रीगुरु व तो भाविक बेटगिरींत श्रीमन्महाराजांची वाट पहात होते. तो भाविक कंटाळून झोंपण्याच्या विचारांत होता इतक्यांत दोघां शिष्यास बरोबर घेऊन श्रीमन्महाराज तेथें दाखल झाले. त्यांस गदगलाही मुक्काम करतां आला असता. पण शिष्याची इच्छा मोडावयाची नाहीं या भावनेनेंच ते बेटगिरीस आले. गुरु-शिष्यांची मनोमनीं पटणारी साक्ष सामान्य जनांना कशी समजणार ?

श्रीमन्महाराज गदग बेटगिरी येथे ४।५ दिवस होते. त्या मुक्कामांत लकुंडीच्या एका भाविकाच्या आमंत्रणांवरून ते एक दिवस तेथें जाऊन आले. तसेंच बिसरहळ्ळी देसायांच्या प्रार्थनेनुसार ४।५ शे लोकांच्या शिष्य परिवारासह जाऊन दोन दिवस तेथें मुक्काम करून आले. पुढे चिक्कहंदिगोळ, होंबळ, यावगल वगैरे गावीं जाऊन विजापूरमार्गे ते सोलापूरास गेले. तेथें भाऊसाहेब जवळगीकर नांवाच्या भक्तानें मंदिर बांधले होते. त्या मंदिरांत आपल्या अमृतहस्तानें श्रीमन्महाराजांनीं श्रीराममूर्तीची स्थापन केली. तेथून ते पंढरपुरास गेले. दोन दिवस तेथें राहून श्रीपांडुरंगाचें दर्शन घेऊन ते गोंदवलेस गेले.

या सर्व फिरतींत श्रीगुरुही त्यांच्याबरोबर होते. परत जाण्याची आज्ञा न झाल्यानें ते तेथेंच होते. थोड्याच दिवसांत भक्त परिवारासह श्रीमन्महाराजांनीं काशी क्षेत्राकडे प्रयाण केले. बरोबर येण्यास श्रीगुरुंना आज्ञा झाल्यानें तेही त्यांचेबरोबर काशीस गेले. काशीक्षेत्रीं श्रीमन्महाराजांचा महिनाभर मुक्काम होता. त्यामुळें गुरुपौर्णिमा तेथेंच झाली. त्या दिवशीं श्रीमन्महाराजांना सुवासिक तेल लावून उष्ण गंगोदकानें अभ्यंगस्नान घालून सर्व भक्तांनीं अभिषेक केला. नंतर नवीन जरीकांठीं कफनी परिधान करून केशरी गंधाचे लेपन करून, संध्यादि नित्य कर्म उरकून, श्रीमन्महाराज शिष्यांनीं तयार केलेल्या सिंहासनावर विराजमान झाले.

सर्व भक्तांनीं भक्तिपूर्वक त्यांची पूजा केली व त्यांस पुष्पमाला अर्पण केल्या. श्रीगुरूंनी मनोवाक्काय कर्मे करून एक तुलसीदल श्रीमन्महाराजांच्या पायावर वाहिले व दूर मागे सरून उभे राहून, ती मनमोहक मूर्ति तादात्म्य पावून निरखीत उभे राहिले. त्यांना श्रीमन्महाराज म्हणजे प्रेमाचा जणू पुतळाच भासत होते. असें त्या दिवशीं त्यांनीं उद्‌गारही काढले.

दुसऱ्या एके प्रसंगी श्रीमन्महाराज शिष्य परिवारासह बसले असतांना, त्यांनीं पाठीमागे हात जोडून उभे असलेल्या गुरूंना हांक मारून हास्य वदनानें ''बुवा हे सर्व लोक मला समर्थांचाच अवतार म्हणतात तरी श्रीसमर्थांत व माझ्यांत साम्य कोठें आहे हें सांग'' असा प्रश्न केला. अत्यंत विनयानें श्रीगुरूंनी श्रीमन्महाराजांस नमस्कार केला व खालीं मान घालून उभें राहून ''महाराज, श्रीसमर्थांत व आपल्यांत प्रत्येक बाबतींत साम्य आहे पण तुमच्याजवळ कल्याणाच्या तोडीच्या सच्छिष्याचा अभाव मात्र आहे,'' हेंच काय ते एक न्यून्य मला दिसतें '' असे उत्तर दिलें. श्रीगुरूंचे हे मार्मिक उत्तर ऐकून श्रीमन्महाराज प्रसन्न चित्तानें उद्‌गारले, ''समर्थ ते समर्थच. त्यांच्यासारखे दुसरे कसे होतील. ते केव्हांही शक्य नाहीं. तरीपण ब्रह्मानंदबुवाची योग्यता कल्याणाइतकी आहे, यांत तिळमात्र सशय नाहीं.''

आणखी एके प्रसंगी, काशी मुक्कामांतच एक दिवस श्रीगुरू, श्री. भाऊसाहेब केतकर, श्री गणपतराव दामले, असे बोलत बसले असतां, श्रीमन्महाराज स्नान करून फक्त कौपीन धारण करून समोरून येत होते. त्यांस पाहून सर्वजण उठून उभे राहिले. श्रीगुरू भाऊसाहेबांना, ''समोरून येत असलेले कोण ते पाहिलेत का ? प्रत्यक्ष श्रीरामच येत आहेत.'' असे बोलले. तें ऐकून, तुम्हांला ते श्रीरामासारखे दिसत असतील, परंतु आम्हाला ते 'सामान्य माणसासारखेच दिसत आहेत, ''असें भाऊसाहेबांनीं श्रीगुरूंस सांगितले. ही त्यांच्यातील सहज कौतुकाची भाषा श्रीमन्महाराजांनीं ऐकिली. श्रीमन्महाराज भाऊसाहेबांजवळ गेले व ''भाऊसाहेब, खरोखर माझें स्वरूप अद्याप कोणालाही समजलेले नाहीं. यदाकदाचित् थोडेफार कळले असेल तर ते या ब्रह्मानंदबुवालाच,'' असे उद्‌गार श्रीमन्महाराजांनीं त्यास ऐकविले.

अशा प्रकारें श्रीमन्महाराजांच्या सान्निध्यसुखाचा लाभ श्रीगुरूंनी ३/४ महिने घेतला. त्याकाळांत आनंदामृताचे भरपूर सेवन केले व श्रीमन्महाराजांच्याबरोबर सकल तीर्थयात्रा संपवून त्यांच्याबरोबर ते गोंदावलेस परत आले. पुढें लवकरच श्रीगुरूंना परत जाण्याची आज्ञा झालेनें त्यांनीं तेथून आपला मोर्चा तेरदाळकडे वळविला.

**॥ श्रीसद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण विसावे

## श्रीब्रह्मानंदगुरूंचें तेरदाळास प्रयाण

श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचे बरोबर काशीयात्रा करून गोंदावलेस परत आल्यावर श्रीमन्महाराजांची त्यांना परत जाण्यास आज्ञा झाली. दरखेपेस आज्ञा होतांच श्रीगुरू कर्नाटक प्रांत बेलधडीस, अगर वेंकटापुरास प्रथम जात असत. पण या खेपेस मात्र ते गोंदावलेहून जे निघाले ते सांगली संस्थानांतील तेरदाळ तालुक्याचे गांवी प्रथम गेले.

मागील प्रकरणांत श्रीमहाभागवतांची वाचकांस ओळख झालीच आहे. ते श्रीब्रह्मानंदगुरूंचे गुरूबंधू होत हे वाचकांच्या ध्यानांत येऊन चुकलेच असेल. बिद्रहळ्ळीच्या नामजपयज्ञाच्या महोत्सवांत ते जातीनें उपस्थित होतेच. त्यानींच श्रीब्रह्मानंदगुरूंस तेरदाळास १९१० सालीं आणून सोडले.

श्रीमहाभागवतांची एक मुलगी, रा. रा. विष्णूपंत मरळीकर, ज्यांस लोक तेरदाळगांधी म्हणत असत, त्यांच्या थोरल्या मुलास दिली होती. त्या मुलास म्हणजे श्रीमहाभागवतांचे जांवयास क्षयाची व्यथा असलेनें, बहुधा त्यांनीं श्रीगुरूंस तेथें नेले असावे. विष्णूपंत मरळीकर हे सुविचारी, सद्वर्तनी, देवधर्मावर आस्था असलेले, स्पष्टवक्ते व कोणाचीही भीडभाड न ठेवणारे, नेहमी सत्याची बाजू घेणारे होते. ते श्रीगुरूंच्या भजनीं लागले व आस्ते आस्ते त्यांचा शिष्यसांप्रदायही तेथें खूप वाढला.

तेरदाळास ते गणेशचतुर्थीच्या सुमारास आले. व लागलीच तेथील ग्रामस्थामध्यें प्रेरणा प्रसारित करून तेथें भाद्रपद शु॥८ पासून पौर्णिमेपर्यंत श्रीरामनामसप्ताह त्यांनीं साजरा केला. तेरदाळच्या लोकांनीं त्या सप्ताहाचे वेळीं नामावर जे प्रेम दाखविले त्यानें श्रीब्रह्मानंदगुरू खरोखर भारावून गेले व त्यांनीं कर्नाटकस्थ मंडळीस त्याबाबत एक पत्र पाठविले. त्यांत ते तेरदाळांतील लोकांच्या नामावरील प्रेमाचे उत्तम वर्णन केले आहे ते असे.

॥ श्रीराम ॥

मु. तेरदाळ

''आम्ही तेरदाळला येऊन तीन दिवस झाले. कालचे गुरूवारीं अखंड नामस्मरणाला प्रारंभ झाला. येथील सप्ताहाचे वर्णन करणें अशक्य. संध्याकाळपासून सहा तास रात्रीपर्यंत शेकडो लोक प्रेमानें नाचत नामस्मरण करतात. देवळांत मावणार नाहींत इतके स्त्रीपुरूष जमतात. सारखे नामस्मरण चाललेले आहे. हे सर्व पाहतां श्रीमहाराजांची कृपा तेरदाळ येथील लोकांवर पूर्ण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या लोकांना कृतार्थ होण्यास हरकत नाहीं. बेटगिरीच्या लोकांस आशीर्वाद.''

ब्रह्मानंद.

अशा तऱ्हेने श्रीरामरायाच्या नामावर तेथील लोकांत भक्तियुक्त अभिरूचि श्रीब्रह्मानंदगुरूंनीं उत्पन्न केली. तेथील सप्ताह संपविला व कर्नाटकीं प्रयाण केले. कर्नाटकांत आगमन होतांच ठिकठिकाणच्या भक्तांच्या इच्छेप्रमाणें छब्बी, आरळीकट्टी, अलबाळ, सांवशीं, कुंदगोळ, गामनगट्टी, आडनूर, खन्नोस, हरीहर दावणगिरी वगैरे गांवीं व

आणखी अनेक लहान सहान खेड्यांतून सुध्दां नामसप्ताह केला. अनेकांना जेवणाने तृप्त केले जनसामान्यांत भगवंताविषयीं आस्तिक्यजागृति केली. श्रीरामनामांत प्रेम उत्पन्न केले. अशा रीतीनें सुमारें एक वर्षाचा काळ या खटाटोपांत श्रीगुरूंनीं व्यतीत केला असेल नेसल तोंच तेरदाळच्या भाविक भक्तांनीं श्रीरामनामतारक जपयज्ञ आपल्या गांवीं झाला पाहिजे असा आग्रह धरल्यानें श्रीगुरूंनी तो तेथेंच करण्याचा निश्चय केला.

कोणतेही महत्वाचे सत्कार्य हातीं घेण्यापूर्वी श्रीमन्महाराजांचे चरणीं ते निवेदन करून त्यांची अनुज्ञा घेण्याचा श्रीगुरूंचा दंडक असल्यानें श्रीगुरूंनी प्रथम तेरदाळच्या भाविक भक्तांस श्रीमन्महाराजांकडे पाठविले. त्या भाविक भक्तांनीं गोंदावलेस जाऊन श्रीमन्महाराजांकडे दर्शन घेऊन आपली मनीषा त्यांचेपुढें व्यक्त केली. ते ऐकतांच श्रीमन्महाराजांचे चित्त प्रसन्न झाले. प्रसन्न चित्तानें श्रीरामनामतारक जपयज्ञास प्रारंभ करावा म्हणून फल व मंत्राक्षता देऊन, आशीर्वादपूर्वक त्यांस परत पाठवून दिले. अनुज्ञा मिळतांच त्या भक्तांस आनंदाचे भरते आले. परत येऊन त्यांनीं ब्रह्मानंदगुरूंस सर्व वृत्तांत्त कथन केला व बरोबर आणलेले फल व मंत्राक्षता श्रीगुरूंस समर्पण केल्या.

आपल्या गुरूमहाराजांची आज्ञा होऊन आशीर्वाद मिळतांच श्रीगुरूंनी कार्यारंभास बिलकूल विलंब लावला नाहीं. तात्काळ त्यांनीं सगळीकडे कळविण्याची व्यवस्था केली. श्रीशके १८३२ साधारण नाम संवत्सराच्या भाद्रपद शुध्द अष्टमी दिवशीं श्रीमन्महाराजांच्या पादुकांवर अभिषेक करून, पादुकांना आरति करून श्रीरामनाम सप्ताहाला प्रारंभ केला. तेरदाळ गांवीं गांवचे वेशींत असलेल्या विशाल दत्तमंदिरांत प्रारंभ केला. ठिकठिकाणच्या भाविक भक्तांना आमंत्रणें पाठवून बोलावून घेण्यांत आले होते. पौर्णिमेच्या म्हणजे समाप्तीचे दिवशीं ठीक अरूणोदयास श्रीगुरूमहाराजांच्या पादुकांना तसेंच श्रीगुरुदत्तास अभिषेक व आरति करून तेरा कोटी श्रीरामनामतारकमंत्राच्या जपाचा संकल्प करणेंत आला. श्रीमन्महाराजांनीं दिलेले महाफल श्रीगुरूदेवापुढें ठेऊन, आधीं जपाला प्रारंभ करून, नामसप्ताह संपविणेंत आला.

तेरदाळ ग्रामीं श्रीमन्महाराजांकडून अनुग्रह घेतलेले सुमारें वीस लोक तेथें उपस्थित होते. जपसंख्येसाठीं परगांवाहूनही मंडळी जमविली गेली होती. या सर्वांची राहण्याची व जेवण्याची व्यवस्था शिरस्त्याप्रमाणें उत्तम रीतीनें करण्यांत आली होती. श्रीरामसंस्थान बेलधडी येथें अनुसरिल्या जाणाऱ्या भजनीपध्दतीप्रमाणें दररोज सर्व कार्यक्रमांची प्रथा श्रीगुरूंनी सुरु करून दिली. श्रीरामरायाची उपासना फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागली. त्यासमयीं श्रीगुरूंच्या सुखसानिध्यांत असणाऱ्या लोकांना पारच नव्हता. तेरदाळच्या नामजपयज्ञाच्या वेळीं जप करणाऱ्यांची संख्या वाढत वाढत किती पर्यंत गेली हें त्यावेळी श्रीगुरूंनी पाठविलेल्या एका पत्रावरून सहज समजण्यासारखी आहे.

॥ श्रीराम ॥

मु. तेरदाळ

''श्रीरामभक्तपरायण रा. रा. रंगाप्पा कुलकर्णी होंबळ यांस ब्रह्मानंदकृत अनेक आशिर्वाद. क्षेम कारण, मी तेरदाळास आल्यावर जप सुरू झाला आहे. दर दिवशीं जप करण्यास ६० लोक आहेत. आणखी २० लोक पाहिजे असल्यानें, हे पाहतां क्षणींच, तुम्ही खालीं लिहिलल्या सर्वांना बोलावून घेऊन आलें पाहिजे.

१) तिरकंभट काशीकर २) मूडलप्पा बेटगिरी (त्यांच्या वडिलांची परवानगी मिळाल्यास) ३) श्रीपादभट्ट गदग. ४) श्रीपादभट्ट गुडगेरी ५) महादेवप्पा चिक्कहंदिगोळ, (सवड असल्यास) ६) हणमंतप्पा चिक्कहंदिगोळ ७) जीवणराव देशपांडे धारवाड ८) दत्तंभट्ट जोशी धारवाड ९) गुरूनाथ धारवाड, अशा लोकांना बोलावून घेऊन तीव्र यावें. कुडची स्टेशनवर उतरून ५ कोस गाडी करून यावे. चार महिने येथें राहून जप करण्यास आणखी कोणी कबूल असतील तर त्यांनाही बरोबर घेऊन यावें. आशीर्वाद.''

ब्रह्मानंद

अशा प्रकारें अनेक गांवांतील भक्त लोकांना पत्रें लिहून शेकडो लोकांना बोलावून त्या सर्व लोकांचा योगक्षेम श्रीगुरू पहात असत. खरें सांगावयाचे झाल्यास श्रीगुरूंची ही कृति त्यांच्या विश्वकुटूंबत्वाची प्रत्यक्ष साक्षच नव्हे काय ? ज्या भक्तांना या संबंधांत श्रीगुरूंकडून पत्ररूपाने आज्ञा होत असे व अशा पत्रांत ज्या ज्या भक्तांचा उल्लेख येत असे ते खरोखर धन्य होत. पत्राप्रमाणें अशा प्रसंगीं प्रत्यक्ष हजर राहून त्यांत भाग घेण्याचें भाग्य ज्यांस लाभले त्यांच्यावर श्रीगुरूंची पूर्ण कृपा होती असेच म्हणावयास नको काय ? व अशा सुसंधीचा बोलावून देखील लाभ घेतां आला नसेल त्यांच्यासारखें दुर्दैवी तेच.

तेरदाळ येथील श्रीरामनाम जपयज्ञ किती थाटांत झाला याचा वृत्तांत श्रीगुरूंनी श्रीमन्महाराजांस कळविला होता. त्यावेळीं श्रीमन्महाराजांकडून श्रीगुरूंच्या पत्रास आलेले उत्तर खालीलप्रमाणें होते :-

''श्रीरामपरायण सर्व उपमायोग्य, राजमान्य, राजेश्री श्री ब्रह्मानंदबुवा यांसी - अनेक आशीर्वाद विशेष. कारण आपले पत्र पोंचले. जपाचे सुरवातीबद्दल आनंद जाहला. असाच अखंड जप व रामाची सेवा करत असावी. 'सोडुनि काम, क्रोध, लोभ, अभिमान । स्वानंदांत करावे चिंतन । हेंच ऐकावे वचन । तुम्ही माझे जीवाचे जीव प्राण । शेवटची सांगितली खूण ।' कळावें, हा आशीर्वाद, जप करणारे सर्वत्र मंडळीस आशीवार्द.''

- ब्रह्मचैतन्य

प्रतिदिनीं जप करणाऱ्यांची संख्या वाढतच राहिली त्यामुळें अल्पावधींतच ती पूर्ण होत आली. नरगुंदच्या व बिदरहळ्ळीच्या नाम जपयज्ञाच्या सांगतेस श्रीमन्महाराजांना बोलावून त्यांच्या अधिष्ठानाखालीं सांगता करणेंत आली, तसेंच या खेपेसही घडावे अशी श्रीगुरूंची इच्छा होती. म्हणून त्यांनी अनेक भक्तांना श्रीमन्महाराजांस आमंत्रण देण्यासाठीं गोंदावलेस पाठविले. अनेक अडचणीमुळें व श्रीमन्महाराजांच्या प्रकृति अस्वास्थ्यामुळे त्यांना त्यावेळीं येणें झाले नाही. जपसंख्येचे पूर्ततेनंतर श्रीमन्महाराज सांगता उत्सवास आज येतील उद्यां येतील म्हणून तब्बल वर्षभर लोकांनी व श्रीगुरूंनीं त्यांची वाट पाहिली. ते येऊं शकले नाहीत. अखेरीस सांगता महोत्सव उरकून घ्यावा अशी जेंव्हा श्रीमन्महाराजांकडून स्पष्ट आज्ञा आली तेंव्हा अनिवार्य पक्षीं श्रीगुरूंनी श्रीशके १८३४ परिधावी नाम संवत्सर इ. स. १९१२, भाद्रपद शुध्द अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत नामसप्ताह, कीर्तन, पुराण, प्रवचन, वेद पारायण, होमहवनादि कार्यक्रमांनी सांगता महोत्सवास प्रारंभ केला. दररोज हजारों लोकांनी श्रीगुरूंच्या अमृततुल्य प्रसादाने तृप्तता अनुभवली.

तेरा कोटि रामनाम जपयज्ञ व त्याचा सांगता महोत्सव श्रीगुरूंनीं तेरदाळांत पौर्णिमेपर्यंत अतिशय थाटानें पार पाडला व त्याच दिवशीं श्रीमन्महाराजांच्या पादुका, शृंगारलेल्या पालखींत ठेऊन, हजारो स्त्रीपुरूषांसमवेत वाद्य वैभवांत भजन करीत श्रीगुरूंनी जवळच्या हळींगळी गांवीं कृष्णानदींत अवभृथ स्नान केले. महोत्सवास दूरदूरच्या आलेल्या पण्डितांना तसेंच पामरांना ज्याच्या त्याच्या योग्यते प्रमाणें द्रव्य, वस्त्र, शालजोडी वगैरे देऊन आनंदित केले व श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें ते बेलधडीस रवाना झाले. त्या वेळेच्या स्वस्ताईच्या दिवसांतही ८००० रू. खर्च झाला म्हणतात.

तेरदाळ गांवीं श्रीगुरूंनी प्रथम १९०९ सालीं पदार्पण केलें. लागलीच तेथील लोकांकडून एक श्रीरामनाम सप्ताह करविला. तेथील लोकांवर अशी मोहनी घातली की एक वर्षाचे आंत श्रीरामनाम तारक जपयज्ञ आपले गांवीं करावा अशी लालसा त्यांचेंत निर्माण झाली. श्रीमन्महाराजांची अनुज्ञा मिळून कार्यास आरंभ झाला व मोठ्या थाटानें सांगताही झाली. या वरून या जगांत जी महत्कार्य घडतात ती महानुभावांच्या प्रेरणेनेंच घडतात. श्रीगुरू तर राजेमहाराजांसही अशी महत्कार्ये केवळ आपल्या सद्‌गुरूनाथांच्या कृपाबलावर त्यांच्याच आज्ञेनुसार सहज रितीने पार पाडीत असत असें स्पष्टच म्हणावेसें वाटते.

श्रीब्रह्मानंदांची शिकवण, उपदेशावर केवळ आधारलेली नव्हती तर त्यांच्या उच्चतम वागणुकीच्या प्रात्यक्षिक आचरणावर आधारित होती . आपल्या श्रीसद्‌गुरूनाथांच्या सान्निध्यांत कसें वागले पाहिजे हे श्रीगुरूंच्या वागणुकीवरून इतर लोकांस स्पष्टपणें दृग्गोचर होत असे. श्रीसद्‌गुरूनाथांच्या घरची सर्व कामे करण्यास श्रीगुरू कंबर कसून तयार असत. श्रीगुरूंचा शब्द ऐकणारे त्यांचे हजारो शिष्य अंवती भक्ती असले तरी श्रीमन्महा राजांचे पाद प्रक्षालन, मुख प्रक्षालन यासाठी श्रीगुरू स्वत तापविलेले ऊन पाणी घेऊन सदैव उभे असत. सूर्योदयापूर्वी स्नान आटोपून श्रीमन्महाराजांच्या शय्यास्थानाचे दरवाजाबाहेर दर्शनासाठीं नम्रपणें हात जोडून ते उभे असत. श्रीरामरायाच्या उपासनेचा क्रम आपण स्वत: प्रथम आचरणांत आणून त्या जोरावर सर्वांस श्रीरामनामास लावीत असत. अशा प्रकारें त्यांनीं लोकसंग्रहाचें काम तर केलेंच. एवढेंच नव्हे तर त्या निमित्तानें त्यांनीं कर्नाटकांत संपूर्ण व महराष्ट्रांतही थोडा फार संचार करून तो भाग पवित्र केला.

यानंतर सद्‌गुरूनाथांच्या आज्ञेनुसार श्रीगुरू बेलधडीस गेले व त्यांनीं श्रीवेंकटेशाचा जीर्णोध्दार करण्याचा निश्चय केला. शके १८३४ सालीं प्रथमच आश्विन शुध्द प्रतिपदेपासून विजयादशमीपर्यंतच्या नवरात्राचे उत्सवास प्रारंभ केला. अवघ्या १०/१२ लोकांना बरोबर घेऊन अल्प प्रमाणांत त्यांनीं तो पार पाडला. कारण सखूबाईच्या लहान खोली खेरीज व महाव्दाराखेरीज तेथे कांहीच नव्हते. खोली सभोंवती एक मंडप उभारून काम भागविण्यांत आले. तेथे देखील उत्सवाच्या शेवटच्या दिवशीं सुमारे २०० लोक जमले होते. याच विजयादशमीस श्रीगुरूंनी श्रीवेंकटपतीच्या झोपडीवजा असलेल्या देवळाच्या गाभाऱ्याच्या बांधणीचा मुहूर्त करून जीर्णोध्दाराचे कामास सुरूवात केली. शके १८३५ चा श्रीरामनवमी उत्सव तेथेंच पार पाडला. तो मोठ्या थाटानें झाला. पण पुढें ज्येष्ठ महिन्यांत श्रीमन्महाराजांच्या आज्ञेवरून त्यांस श्रीमन्महाराजांकडे पंढरपुरास जावें लागले.

**।। श्रीसद्‌गुरू ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण एकविसावें
## श्रीगुरूंचा पंढरपुरीं वास

शके १८३५ च्या वैशाख मासाच्या अखेरीस पंढरपूर क्षेत्रस्थ श्रीमन्महाराजांच्या सद्भक्तांच्या, विशेषत: अप्पासाहेब भडगांवकरांच्या आग्रहावरून, श्रीमन्महाराज पंढरपुरास गेले व भडगांवकरांच्या राममंदिरांत वास करूं लागले. नेहमीप्रमाणें त्यांच्याबरोबर शिष्यांस पत्र घालून त्यांनीं बोलावून घेतले होते. तसेंच श्रीगुरूंनाही त्यांनी बोलाविले होते. त्यांच्या आज्ञापत्रानें श्रीगुरूंना संतोष झाला व ते पंढरपूरी वास करण्यास गेल्याचे मागील प्रकरणाचे शेवटीं आलेच आहे. मात्र जातांना श्रीगुरूंनी बेलधडी, बेटगिरी, गदग, होंबळ, चिक्कहंदिगोळ, हुबळी वगैरे गांवचे भाविक भक्तांना आपल्याबरोबर नेले होते. श्रीमन्महाराजांचा पंढरपुरांत साधारणपणें ३॥-४ महिने मुक्काम होता. श्रीमन्महाराजांच्या पंक्तीस दररोज हजारो लोक असत. भोजनाची व्यवस्था श्रीगुरूंकडेच होती. ब्राह्मण भोजन घालणें हा श्रीगुरूंचा आवडीचा विषय. मोठ्या दक्षतेनें उजाडेपर्यंत लोकांना भजनांत गुंतवून उजाडणेचे सुमारास भोजनाची जय्यत तयारी ठेवण्याचा त्यांचा परिपाठ असे. ब्राह्मणांना वेगवेगळी पक्वान्ने खाऊं घालण्यांत त्यांना अत्यानंद होत असलेनें, दररोज वेगवेगळी पक्वान्ने ते करवीत व आकंठ तृप्ति होईपर्यंत स्वत: सर्वांस वाढीत असत. हा सोहळा पाहण्याचे भाग्य लेखकास लाभले आहे. सतत चार महिने लेखक आपल्या वडिलांबरोबर दर शनिवारीं मंगळवेढ्याहून सायंकाळी तेथें येत असे व रविवारीं दुपारी प्रसाद ग्रहण करून परत मंगळवेढ्यास जात असे.

एके दिवशीं श्रीमन्महाराजांच्या मनांत पंढरपुरांतील दरोबस्त सगळ्या ब्राह्मणांना व भिक्षुकांना भोजन घालावें असें आले. यासाठीं श्रीमन्महाराजांनीं क्षेत्रस्थ मक्ता घेणाऱ्या सर्व बडव्यांस बोलावून घेतले व या प्रस्थास खर्च किती येईल अशी पृच्छा केली. त्या बडव्यांनीं ब्राह्मण व भिक्षुक यांची संख्या किती होईल याबाबत विचारविनिमय करून १४०० रूपये खर्च येईल असा आपला अंदाज सांगितला. तेंव्हा श्रीमन्महाराजांनीं उद्यांचे हे सेवाकार्य कोण पत्करणार असा प्रश्न जमलेल्या सर्व भक्तमंडळींस केला. भक्तगण नुसते एकमेकांकडे पहात स्वस्थ बसून राहिले. मी करतो असें पुढें होऊन कोणीच म्हणेना. तें पाहून श्रीमन्महाराजांनीं ब्रह्मानंदबुवांस हांक मारली. ''ब्रह्मानंदबुवा' अशीं हांक ऐकतांक्षणींच श्रीगुरू 'जी' असें म्हणून हात जोडून त्यांचे उजवे बाजूस नम्रपणें खाली मान घालून येऊन उभे राहिले. ते नेहमीं सद्गुरूनाथांच्या हांकेच्या टप्यांत, बैठकीच्या दालनाचे बाहेर सदैव हात जोडून उभे असत. भडगांवकर राममंदिरांत सभामंडपांत श्रीमन्महाराजांचे आसन असे. त्याच्या पाठीमागे एक गवाक्ष आहे. त्या गवाक्षाजवळ सहसा व विशेषत: निरूपणाचे वेळीं हात जोडून श्रीगुरू उभे असत. श्रीगुरू विश्रांतिस्थानीं आडवे झाल्याप्रसंगीं श्रीमन्महाराजांच्या आसनस्थानाकडे पाय लांब न करण्याचे कटाक्षानें पाळीत असत. असो. श्रीमन्महाराजांनीं श्रीगुरूंना 'उद्याची व्यवस्था कर' असें सांगितले व आपण झोपण्यासाठी खोलींत निघून गेले.

वाचक हो ! ज्यावेळीं श्रीमन्महाराजांनीं श्रीगुरुंस उद्याच्या व्यवस्थेची आज्ञा केली, त्यावेळीं चार तास रात्रीचा समय झाला होता. बरें, दुसरें दिवसाचे भोजन म्हणजे ते काम हलके सलके नव्हते. श्रीगुरु तर गुर्वाज्ञेला प्राणापेक्षा जास्त जपत असत. इतरांना द्रव्याच्या अडचणीचे भय. श्रीगुरुंना द्रव्याची अडचण कधींच भासत नसे. ही सर्वांच्या अनुभवाचीच गोष्ट होऊन राहिली होती. श्रीमन्महाराज झोंपण्यास जातांच श्रीगुरुंनी

कर्नाटकांतील एका शिष्यास कंदील घेऊन आपल्याबरोबर येण्यास सांगितले व त्याला घेऊन ते श्रीपांडुरंगाच्या दर्शनास निघाले.

श्रीपांडुरंगाच्या देवळाच्या वाटेवर आकाश मारुतीचे देवालय आहे. ते ओलांडून श्रीगुरु थोडे पुढे गेले तोंच एका सात्विक गृहस्थानें त्यांचेजवळ येऊन त्यांस नमस्कार केला. जवळच असलेल्या आपल्या घरीं त्यांस बोलावून नेले. श्रीगुरुंना एका पाटावर बसविले व एक कागदाचे पुडके त्यांच्या हातांत दिले. साष्टांग नमस्कार घातला व काल रात्री श्रीपांडुरंग माझ्या स्वप्नांत आला व "उद्या संध्याकाळचे आंत तूं एक हजार रुपये बेलधडीच्या ब्रह्मानंदबुवास अर्पण कर म्हणजे तुझी सेवा संपूर्णपणे मला पावेल असें सांगून अदृश्य झाला. मी दृष्टांताप्रमाणे संध्याकाळचे आंत पैसे जमविण्याचा प्रयत्न केला. पण पैसे लवकर जमले नाहींत. त्यामुळे श्रीपांडुरंगाची प्रत्यक्ष आज्ञा मोडण्याचा प्रसंग येतो कीं काय म्हणून मनांत निराश झालो असतां, त्याच्याच कृपेने आतां एक तासापूर्वी पैसे मिळाले. तुम्हांस अर्पण करावें म्हणून तुम्हालाच हुडकण्यास निघालो होतो. पण भगवंताच्या कृपेनें अनायासें वाटेंतच दर्शनलाभ झाला. करितां कृपा करून याचा स्वीकार करून मला कृतार्थ करावें" अशी त्यानें प्रार्थना केली.

हें ऐकून श्रीगुरुंनीं हंसतमुखानें "उद्यां १० वाजणेचे सुमारास श्रीराममंदिरात ये, म्हणजे श्रीमहाराजांचे दर्शन होईल. शिवाय श्रीरामाचा प्रसादही मिळेल" असें सांगून त्यास आशीर्वाद दिला व ते श्रीपांडुरंगाच्या दर्शनास गेले. तो गृहस्थही त्यांस पोंचविण्यास देवळापर्यंत गेला व तेथून त्यांची रजा घेऊन घरीं परतला.

श्रीगुरु श्रीपांडुरंगाचे दर्शन घेऊन श्रीराममंदिरांत परत आले. श्रीगुरुंनीं शिष्यास पुडके सोडून पहाण्यास सांगितलें. पुडके सोडून पाहतांच दुसरें दिवशींच्या प्रयोजनास श्रीगुरुंना जेवढ्या रकमेची गरज होती तेवढ्या रुपयांच्या नोटा त्यांत असल्याचें पाहून त्या शिष्याच्या आनंदास व आश्चर्यास पारावारच राहिला नाही. त्याला श्रीगुरुंचा महिमा पटून त्याची तो मनांत प्रशंसाच करीत राहिला.

दुसरे दिवशीं चार तास दिवस वर येण्यापूर्वीच स्वयंपाकाची सर्व सिद्धता करून पात्रें मांडण्यांत आली व श्रीमन्महाराजांची पंढरपूरक्षेत्रस्थ सर्व ब्राह्मणांना व भिक्षुकांना भोजन घालण्याची इच्छा तृप्त करण्यांत आली. त्यादिवशी जिलबी व मोतीचुराचा बेत होता. पंक्तीची व्यवस्था श्रीगुरुंनी उत्तम ठेवली होती. स्वतः श्रीगुरुंनीं सर्वांची आकंठ तृप्ति होईपर्यंत वाढप केले.

भक्तजनहो ! या घटनेचा सूक्ष्म विचार केल्यास असें दिसून येईल कीं, श्रीपांडुरंगाच्या मनांतून पंढरपुरच्या ब्राह्मणांना व भिक्षुकांना जेऊं घालावयाचें होते. म्हणून श्रीपांडुरंगानें श्रीमन्महाराजांस प्रेरणा करून पुढे केलें व त्यांनीं श्रीब्रह्मानंदबुवाचें हस्तें ते पार पाडलें. हें सर्व घडण्यास व घडविण्यास कांहींतरी कार्यकारणभाव हा असलाच पाहिजे. तो म्हणजे श्रीपांडुरंगाचे सेवेकरी बडवे व रखुमाईचे सेवेकरी उत्पात यांच्यांत वाद माजला होता. सरकारी दरबारीं काम चालू होते. श्रीमन्महाराजांच्या तेथील मुक्कामांत श्रीमन्महाराजांकडे तें प्रकरण सोंपविण्यांत आले होते. श्रीमन्महाराजांनींही दोन्ही गटांत सलोखा निर्माण करून ते तडजोडींनें कायमचे मिटविले होते. हाच आनंद प्रत्यक्ष श्रीपांडुरंगास होऊन त्यानेंच हें अशा तऱ्हेनें घडवून आणले व आपल्या भक्तांचा महिमा जगाच्या निदर्शनास आणून दिला असें म्हणावेसें वाटतें.

पंढरपुरांत साधुसंतांचा मेळा नेहमींच असतो. त्यांत कांही खरे साधू असतात व पुष्कळसे नामधारी साधू असतात. लक्ष्मणबुवा वारकरी नांवाचे खरे साधू फार दिवस पंढरपुरांत रहात असत. ते श्रीगुरुंची योग्यता ओळखून होते. त्यामुळें ते श्रीगुरुंवर फार प्रेम करीत असत. मात्र त्यांच्या प्रेमाची तऱ्हा न्यारी होती. कधीं ते श्रीगुरुंशी विशेष बोलतही नसत. दोघांची कधीं बैठकही होत नसे. एकत्र जेवणखाण तर कधींच नाहीं. ज्या ज्या वेळीं श्रीगुरु पंढरपूरला येत त्या त्या वेळीं आगाऊ पत्रानें कळविल्याप्रमाणेंच जणूंकांही ते गाडींतून उतरून स्टेशनाबाहेर येत त्यावेळेस लक्ष्मणबुवा बाहेर रस्त्यावर हजर असत. श्रीगुरु बाहेर येतांच त्यांना न्याहाळून ''पंढरीस आला'' एवढेंच विचारून हंसत हंसत निघून जात. आणि ज्या दिवशीं गुरुंचे प्रयाण असेल त्यादिवशीं स्टेशनच्या वाटेवर उभें राहण्याचा त्यांचा शिरस्ताच होता. आणि स्टेशनकडे निघालेल्या श्रीगुरुंची दृष्टभेट होतांच, ''कर्नाटकात चालला'' एवढें म्हणून हंसत निघून जात असत. श्रीगुरुंचे पंढरपुरीं येणे व तेथून जाणें त्यांस कसे समजत होते देवालाच माहीत. यावरून त्यांच्यांत अतींद्रियशक्ति होती हें मानावें लागते. उच्च कोटीला पोंचलेल्या ज्ञानी लोकांचा महिमाच अगाध. जाणणारेच जाणूं शकतील. इतरांचे तें काम नव्हे. सर्वज्ञाच्या उक्तींतील (मर्म) रहस्य आमच्यासारख्या पामरांना कसें कळणार ? लक्ष्मणबुवांनीं देह ठेवल्यानंतर त्यांच्या शिष्यांनीं चंद्रभागा नदीच्या कांठी त्यांची समाधि बांधली आहे. त्यानंतर मात्र श्रीगुरु पंढरीला गेल्या वेळीं लक्ष्मणबुवांचे समाधीजवळ ते एकदोन तास बसून राहिलेले पाहिल्याचे लोक सांगतात. आहे कीं नाही आश्चर्य!

श्रीगुरुंच्या कारभारांत एकादशीचे फार मोठे प्रस्थ असे. यांच्या मतें तीर्थाशिवाय वास्तविक कोणी कांहीं प्राशन करूं नयें असें होते तरी पण सामान्य जनासाठीं वऱ्याचे तांदूळ उकडण्यांत येत असत. कर्नाटकी मंडळींना ते तांदूळ आवडत नसत. करतां ते खाऊं नयेत. त्या ऐवजीं उतरल्या ठिकाणींच दहीपोहे खावे असें त्यांनीं वाटाघाट करून आदल्या रात्रीं आपआपसांत ठरविलें. कारण कर्नाटकात एकादशीस पोहे खाण्याचा सर्रास प्रघात आहे. ही हकीकत त्यांनीं अगदीं सुप्त ठेवली होती. त्रिकाल ज्ञानी श्रीगुरुंनीं एकादशीच्या दिवशीं सकाळीं उठतांच कर्नाटकस्थ त्या सर्व लोकांना ''श्रीमन्महाराजांच्या सान्निध्यांत रहात असतांना त्यांचे परवानगीशिवाय दही-पोहे खाऊं नका ते केव्हांही बरें नव्हे'' असें अचानकपणें बजावले. तें ऐकून सर्वास परमाश्चर्य वाटले. तरी पण त्यांनीं आपला निश्चय न बदलण्याचेंच ठाम ठरविले.

श्रीमन्महाराजांचा कांकडारती संपतांच थोडेसें प्रवचन सांगण्याचा परिपाठ होता. त्यावेळीं हे सर्व कर्नाटकी लोक एकगटानें श्रीमन्महाराजांच्या मागच्या बाजूस प्रवचन ऐकण्यास बसत असत. त्याप्रमाणेंच त्या एकादशीच्या दिवशींही ते सगळे श्रीमन्महाराजांच्या मागें प्रवचनास बसले होते. प्रवचन चालूं असतांनांच मधेंच श्रीमन्महाराजांनीं हळूंच एक चिठी त्या लोकांपैकीं एकाचे हातांत कोणास नकळत दिली. त्यानें ती घेऊन एकट्यानेंच वाचली. वाचतांक्षणींच त्याला हसूं येऊं लागले. हंसूं झांकण्यासाठी त्यानें अंगावरील उपरण्यानें तोंड झांकले व ती चिठी त्यानें दुसऱ्याकडे दिली. दुसऱ्याकडून तिसऱ्याकडे, तेथून चवथ्याकडे या क्रमानें त्या चिठीनें आपला प्रवास संपविला. सर्व कर्नाटकी लोक आश्चर्यानें थक्क झाले होते. सूज्ञ वाचकहो ! त्या चिठींत काय होते असें तुम्हांस वाटते ? त्या चिठींत तुमचा मनोदय आम्हांस समजला आहे. तसें धाडस करूं नका. पस्तावाल असा इशारा होता. चिठींतील प्रत्येक शब्द ''एथें वऱ्याच्या तांदुळाखेरीज असले तसले पदार्थ पचणार नाहींत. हवा वाईट आहे म्हणून सगळ्यांनीं एथेंच फराळास

यावें'' असा मजकूर होता. अर्थात ठरविलेला बेत त्या मंडळीस रद्द करावा लागला. ते सर्वजण वऱ्याचा तांदुळाच्या फराळास मठांत गेले.

भाविक जनहो ! यावरून काय बोध घ्याल ? बोध हाच कीं साधुसंत हे परमेश्वराचेच अंश असतात. आपल्या मनांतील ते जाणू शकतात. त्यांच्यामध्ये एवढी प्रचंड शक्ति सामावलेली आहे तर मग अशा अनंत अंशांनीं नटलेल्या त्या अनंतामध्ये केवढी प्रचंड शक्ति सामावलेली असेल ? हा भाव ध्यानांत घेऊन आमच्यासारख्या घुंगुरट्यांनीं आपला बडेजाव बाजूस ठेऊन त्या अनंतशक्ति परमेश्वरास अनन्य भावानें शरण जावयास नको काय ? साधुसंत, महात्मे ज्यांच्यामध्यें 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्' शक्ति असते ते सुद्धां जेथें त्या अंनतशक्ति परमेश्वरापुढें नतमस्तक होतात व त्यास अनन्यभावानें शरण जातात, तेथें आपणही सामान्यांनी त्यांचे ऐकावे व जीवनात वागावे.

श्रीगुरुंबरोबर पंढरपुरी आलेली ती भाविक मंडळी येथें इतकी रमली कीं श्रीगुरुंनी त्यांना हसत हसत पण आनंदाने उचंबळून, एकदां ''काय मंडळी ! गांवाला विसरला काय ? येऊन दोन महिने होऊन गेले तरी गांवाकडे जाण्याची एकदां देखील भाषा काढीत नाहीं कीं ?'' असें विनोदानें म्हटले होते.

श्रीमन्महाराजांचा पंढरपुरच्या मुक्कामांत दररोज सायंकाळीं न चुकतां श्रीविठ्ठलाच्या दर्शनास जाण्याचा प्रघात होता. बहुश: ते एकटे कधींच जात नसत. आपल्या सर्व शिष्य परिवारासह जात असत. नित्याप्रमाणें एक दिवस ते श्रीविठ्ठलाच्या दर्शनास निघाले असतां निम्या वाटेवर अकस्मात् 'ब्रह्मानंद' अशी त्यांनीं श्रीगुरुंस हाक मारली. श्रीगुरु लागलीच त्यांचेजवळ हात जोडून गेले. त्यावेळीं श्रीमन्महाराजांनी त्यांना बोलावून रस्त्याच्या उजव्या बाजूस असलेल्या एका घरांत प्रवेश केला. तेथील एका लहान खोलींत ते गेले व त्यांनीं दरवाजा लावून घेतला. ते जे एकदां आंत गेले ते सुमारें दीड तासानें बाहेर आले. तोपर्यंत बरोबरचे सर्व लोक रस्त्यावर तटस्थ उभे राहिले होते. आंत त्यांची काय चर्चा चालली होती याचा कोणासही मागमूस लागला नाहीं. ते बाहेर आल्यावर श्रीगुरुंचे मुख मात्र कोमेजल्यासारखे दिसत होते. त्यांच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वहात होत्या. इतरांस ते दिसू नये म्हणून कांही तरी निमित्त करून वरचेवर ते आपले डोळे पुसत होते. श्रीमन्महाराजांच्या बरोबर ते श्रीविठोबाच्या दर्शनास जरी चालले होते तरी अनिच्छेनें म्हणण्यापेक्षा महाप्रयासानें ते जात होते असें म्हणणेंच जास्त सयुक्तिक होईल. अनेकांच्या मनांत अनेक तऱ्हेच्या भावना उमटल्या असतील, अनेक शंका चाटून गेल्या असतील. पण पुढें श्रीमन्महाराजांच्या निर्याणानंतरच श्रीगुरुंच्या त्यावेळच्या परिस्थितीचा यथार्थ उलगडा झाला. श्रीमन्महाराजांनीं त्यावेळींच श्रीगुरुंना आपल्या निर्याणाची सूचना देऊन, त्यानंतर त्यांनीं काय करावें या सूचना दिल्या असाव्या व श्रीगुरुंचे सर्वतोपरी सांत्वन केले असावें. श्रीगुरु मात्र श्रीमन्महाराजांबरोबर श्रीपांडुरंगाचे दर्शन घेऊन जे परतले ते त्यानंतर दुसरे दिवशीं सकाळपर्यंत कोणाच्याही दृष्टीस पडले नाहींत. चंद्रभागेच्याकांठीं एकट्यानेंच त्यांनीं एकांतांत रात्र कंठली असें सांगतात.

त्या वर्षीची गुरूपौर्णिमा पंढरपुरींच झाली. त्यादिवशीं तर पूजा-समारंभाच्या व्यवस्थेच्या व तयारीच्या अट्टाहासाला सीमाच नव्हती. श्रीमन्महाराजांच्या पूजेला केशर, कस्तुरी, परिमल गंध, अनेक तऱ्हेची सुवासिक फुलें, तुळशीची श्रीगुरुंनीं स्वत: केलेली माळ, नवी जरीची कफनी, टोपी पादुका अशी सर्व तयारी करून ठेऊन, श्रीगुरुंनीं पक्वान्नांचा बेत करविला होता.

श्रीमन्महाराज सहजा पूजा करून घेण्यास बसत नसत. पण त्यावर्षी ते पूजा करून घेण्यास बसले. सर्व भक्तगणांची पूजा त्या दिवशीं त्यांनीं स्वीकारली. हा पूजा समारंभाचा सोहळा दोन तासपर्यंत चालला होता. तेवढा वेळ श्रीमन्महाराज त्या दिवशीं मंदहास्य वदनानें सगळ्यांकडे कृपादृष्टीनें पहात स्वस्थ बसले होते. त्यादिवशीं श्रीमन्महाराजांच्या पूजेचा ज्यांना लाभ झाला ते लोक भाग्याचे यांत शंकाच नाहीं.

हजारो स्त्रीपुरुषांची दाटी झाली होती. सर्वजणांनीं श्रीमन्महाराजांची पूजा केल्यावर सर्वात शेवटीं श्रीगुरुंनी स्वत: तयार केलेली तुळशीची माळ व त्याबरोबर सुवासिक फुलांचीही माळ श्रीन्महाराजांच्या गळ्यांत प्रेमानें घातली. त्यांच्या चरण-कमलांवर कोमल तुलसीदल अर्पण केले. साष्टांग नमस्कार केला. त्यानंतर श्रीगुरुंनीं आपले मस्तक श्रीमन्महाराजांच्या पायावर ठेऊन अश्रूंनीं अक्षरश: त्यांचे पाय भिजवून टाकले. यापुढें सद्‌गुरुनाथांचे सुंदर, सगुण रूप दिसेनासे होणार व ते निर्गुण रूप धारण करणार अशी भावना मनश्चक्षुंपुढें उभी राहतांच त्यांचा सर्व देह कांपूं लागला. नेत्रांतून अविरत अश्रुधारांचा प्रवाह सुरुं झाला. कंठ सद्‌गदित झाला व खालीं उद्धृत केलेला अभंग भावनेनें त्यांनीं म्हणण्यास सुरवात केली.

सद्‌गुरु स्वरूप आहे परिपूर्ण । फुलें आवाहन कैसे करूं ॥१॥
सर्वाधारा तुम्हां आसन म्हणणें । देवा लाजिरवाणे वाटे मज ॥२॥
समर्था आपण स्वच्छ आहे सदा । अर्ध्य आणि पाद्य अर्पूं कैंचे ॥३॥
नलगे आचमन शुद्ध स्वरूपासी । संशय मानसीं कासयासी ॥४॥
स्नान निर्मलासी वस्तुव्यापकाशी । गंध निर्लेपासी अर्पूं कैसे ॥५॥
पुष्पें निर्वासासी धूप सुगंधासी । दीप स्वप्रकाशी कैसें शोभे ॥६॥
नित्य तृप्त यासी नैवेद्य अर्पण । केवढे मूर्खपण पहा माझे ॥७॥
शुचिर्भूत समर्था तांबुलाची वार्ता । कैसे सद्‌गुरुनाथा काढूं आतां ॥८॥
दक्षिणा आर्तिक्य मंत्र पुष्प नमन । निरवयव लागून कैसे शोभे ॥९॥
अन्तर्बाह्य पूर्ण दीनदयाळ । उद्वासन सोहळा वाहूं कैसे ॥१०॥
दीन ब्रह्मानंद विनवितो पायीं । सगुणाची देई पूजा मज ॥११॥

व्यक्त स्वरूपांत असलेली सद्‌गुरुनाथांची सुंदर, सगुण, साकार मूर्ति यापुढें अव्यक्तांत जाणार, दिसणार नाहीं. तसेंच सर्वांगसुंदर असे त्यांचे साकार स्वरूपच आपल्याला प्रिय आहे अशा तळमळीनें फार बहारीचें वर्णन वरील अभंगांत केल्याचें जें दिसून येते त्यावरून श्रीगुरुंचे सद्‌गुरुनाथांवर किती अपरंपार प्रेम होते हेंच स्पष्ट दिसत नाहीं काय ?

श्रीगुरुपौर्णिमेचा उत्सव संपल्यावर थोड्याच दिवसांत श्रीमन्महाराजांनीं श्रीगुरुंना कर्नाटकांत जाण्यास अनुज्ञा दिली. श्रीगुरुंना पोंचविण्यास स्वत: श्रीमन्महाराज चंद्रभागेपर्यंत आले होते. श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांच्या चरणांवर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार घातल्यावेळीं श्रीमन्महाराजांनीं आपल्या दोन्ही हातांनीं श्रीगुरुंस प्रेमानें वर उठविले व दृढ आलिंगन देऊन "बाळ, राम तुझे कल्याण करील" असा आशिर्वाद देऊन श्रीगुरुंचे पाठीवरून हात फिरविला. श्रीगुरुंनीं डोळ्याच्या पापण्या न हलवितां एकटक लावून एकाग्रमनानें व एकाग्रदृष्टीनें जणूकांहीं एक क्षणभर श्रीमन्महाराजांचे मुखावलोकन करून त्यांस डोळ्यांत सांठविले व महत्प्रयासानें जाण्यासाठीं

पाय उचलला. श्रीमन्महाराजांनीं श्रीगुरुंस एवढ्या थाटानें दिलेला हाच पहिला व शेवटचा निरोप. तसेंच आलिंगनानंतर दिलेला प्रेमाचा व अर्थपूर्ण असा आशिर्वादही पहिलाच व शेवटचाच.

श्रीगुरु जरी निघाले तरी गुरुमहाराजांकडे वारंवार वळून पहात होते व दीर्घ उच्छ्वास टाकीत होते. ते तसें कां करीत होते याचे मर्म मात्र त्यावेळीं कोणाच्याच लक्षांत आले नाहीं. इतरेजनांना श्रीमन्महाराजांचे ठायीं असलेल्या श्रीगुरुंच्या अकृत्रिम प्रेमाचा तो एक मासला एवढेंच वाटले. सगुण सद्गुरुमूर्ति लवकरच कायमची डोळ्याआड होणार आहे ही कल्पना आली नाहीं. त्याची पुरेपूर कल्पना श्रीगुरुंस श्रीमन्महाराजांनीं देऊन ठेविली असल्यानें श्रीगुरुंची अवस्था तशी झाली होती. जितेंद्रिय अशा गुरुंची देखील तशी अवस्था झाली यावरून परमेश्वरी माया किती बिकट आहे याचा सूज्ञ वाचकानींच विचार करावा. फरक एवढाच कीं, ज्ञानी जन जरी मोहबद्ध झाले तरी ते त्यांत गुरफटत नाहींत. विवेकाच्या बळावर लवकरच ते मार्गावर येतात व त्यांतून ते पार होतात. आमच्यासारखे मूढमति त्यांतच गोते खात खात पार रसातळास जातात.

श्रीगुरु आपल्या शिष्यपरिवारासह पंढरपुराहून निघाले पण वाटेंतच सीतीमनी स्टेशनवर उतरले. बरोबरीच्या सर्वांस त्यांनीं आपापल्या गांवास जाण्यास सांगितले. त्या ठिकाणीं कांहीं दिवस ते एकांतात होते.

श्रीगुरु पंढरपूरहून परत गेल्यानंतर श्रीमन्महाराजही फार दिवस पंढरपुरांत राहिले नाहींत. श्रावण महिन्याच्या प्रारंभीच आपल्या परिवारासह श्रीमन्हाराजांनीं गोंदावल्यास प्रयाण केले व तेथेंच ते वास करूं लागले. मग मात्र अखेरपर्यंत ते तेथून हालले नाहींत.

**॥ श्री सद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण बाविसावें

## सद्गुरुनाथांची समाधि, मंदिर उभारणी व श्रीब्रह्मानंदकृत व्यवस्था

श्रीगुरु जरी सीतीमनीला रहात होते तरी श्रीक्षेत्र वेंकटापूर येथें आधींच प्रारंभ केल्या गेलेल्या बांधकामाच्या बाबतीत पुढील सल्ला घेण्यासाठीं तेथील लोक श्रीगुरुंना वारंवार पत्रें पाठवूं लागले. अखेर श्रीगुरु वेंकटापुराला गेले. प्रत्यक्षांत झालेलें काम त्यांनीं नजरेखालीं घातले. कांहीं दिवस आपला मुक्कामही तेथेंच ठेवला. पुढील बांधकामासंबंधी सर्व सूचना त्यांस दिल्या व भाद्रपद महिना सुरू होतांच प्रौष्ठपदीचा सप्ताह सुरू करण्याचे इराद्यानें ते बेलधडीस आले. प्लेगच्या उपद्रवामुळें बेलधडीचे सर्व ग्रामस्थ गांवाबाहेर शेतांत झोंपड्या घालून राहिले होते.

अशा परिस्थितींत बेलधडीस सप्ताह करणें हे भाविकांना जिकीरीचें वाटेल, तरी पण त्यांची नाडी अजमावण्यासाठीं भाविक भक्तांजवळ "येथें सप्ताह केला तर त्रास होईल नाहीं ? तेव्हां मलसमुद्रांस करावा म्हणतो. तुम्ही सर्व तेथें या म्हणजे झाले" असा प्रस्ताव मांडला. तेव्हां भाविक भक्तांनीं "महाराज, तुम्ही असतांना आम्हांस बिलकूल भय वाटणार नाहीं. उलट नामस्मरणानें रोगराई नाहिशी होईल, असा तुमचा अनुग्रह झाला पाहिजे. तुमच्या आज्ञेंत आम्ही सर्व वागण्यास तयार आहों," असें सांगितले.

श्रीगुरुंनीं हंसतमुखानें "येथेंच नामसप्ताह करण्याचा आग्रह असेल तर रामतीर्थांत पादुकासमोर मांडव घाला. तेथें नामस्मरण करूं" असे म्हणतांच तेथील सर्व लोकांस आनंदाचें भरतें आले. सर्वांनीं अति उत्साहानें श्रीगुरुंच्या आज्ञेनुसार रामतीर्थाच्या कांठावर असलेल्या पादुकांसमोर भव्य मंडप उभारला. तीर्थाच्या डाव्या बाजूला स्वयंपाकाकरतां व उजव्या भागांत भोजनासाठीं व राहण्यासाठीं मांडव तयार केले. श्रीगुरुंनी एका दिवसांत तांदूळ, डाळ, गहूं, पीठ वगैरे साहित्य जमवून अक्षय कोठी तयार केली. आणि आगाऊ आमंत्रण देऊन ठेवल्याप्रमाणें एकदोन दिवसांतच खूप लोक जमले व दिवसेंदिवस जनसमूह वाढतच राहिला.

भाद्रपद शुद्ध अष्टमीच्या दिवशीं अरुणोदयाच्यावेळीं श्रीरामंदिरांत श्रीरामाला व श्रीमन्महाराज यांच्या पादुकांना अभिषेक करून काकडारति करण्यांत आली. नंतर विघ्ननाशक मंगलमूर्तीचे पूजन करून, क्रमानें गणपती, श्रीराम, शंकर, गोपालकृष्ण, मारुति व सद्गुरु यांची आरति करून श्रीरामरायापुढें श्रीफल ठेऊन, तेथेंच मंदिरांत किंचित्काल "रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम" असा भजनारंभ करून, त्यानंतर श्रीरामरायाची उत्सवमूर्ति, श्रीमन्महाराजांच्या पादुका व फोटो पालखींत ठेऊन, वाद्यांच्या गजरांत भजन करीत, रामतीर्थावर उभारलेल्या भव्य मंडपांत त्यांची स्थापना करण्यांत आली. नामस्मरणालाही लागलीच तेथेंच प्रारंभ झाला.

तिन्ही त्रिकाळ प्रथम श्रीराममंदिरांत आरति व नंतर मंडपांत आरति असा कार्यक्रम चालत असे. प्लेग असूनही न कळवितां चारपांचशे लोक जमले होते व सप्ताह उत्तम तऱ्हेनें चालला होता.

हीन, दीन, दरिद्री लोकांवर श्रीगुरुंचे फार प्रेम. ते धनगर, कुंभार, बारकेर, लमणी वगैरे लोकांच्या घरीं

जाऊन आपुलकीनें त्यांची विचारपूस करीत असत. त्यांनीं आपल्या शुद्धप्रेमानें सर्वांस जखडले होते. म्हणून अजून श्रीगुरुंच्या दिव्य गुणांची प्रशंसा होत आहे.

बेलधडीचा उत्सव संपवून श्रीरामरायाची भक्ति जनमानसांत वाढवीत कांही काल संचार करून, श्रीगुरुंनीं श्रीक्षेत्र वेंकटापूर येथील नवरात्राचा उत्सव मोठ्या थाटानें पार पडला. पुढें हुबळीजवळ असलेल्या अरळी, छब्बी या गांवी कार्तिक महिन्यांत नामसप्ताह करण्यांत आले. यानंतर कुंदगोळ, यलिवाळ येरेबुद्धिहाळ, हरकुणी, बरद्वाड, गामनगट्टी वगैरे गांवांतून संचार करीत असतां अकस्मात् शके १८३५ च्या मार्गशीर्ष वद्य दशमी रोजीं सकाळीं श्रीगुरु ५ वाजतां उठले व त्यांनी न्हाव्याला बोलावून क्षौर करवून घेतले. त्यानंतर स्नान करून एका खोलींत जाऊन ते दार लावून बसले, ते सूर्योदय झाल्यानंतर बऱ्याच वेळानें दार उघडून बाहेर आले.

खोलींतून बाहेर येतांच तेथें हजर असलेल्या भक्तांना उद्देशून ''मला ताबडतोब हुबळीला जाणेचें आहे'' असें त्यांनीं सांगितलें. श्रीमन्महाराजांच्या फोटोला त्यांनीं स्वत: आरति केली, साष्टांग नमस्कार घातला व श्रीगुरु तेथून निघून गेले.

श्रीगुरुंनी पहाटे क्षौर कां करवून घेतले ? दार लावून खोलींत ते कां बसले ? या श्रीगुरुंच्या वर्तनाचा संशय भक्तगणास आला. त्यांतून श्रीगुरु कधीं नव्हे ते एकटेच निघाले. त्यामुळें तर तो दुणावला पण विचारण्याचे धाष्ट्र्य कोणास होईना. म्हणून कांहीं भाविक त्यांस हुबळीपर्यंत पोंचविणेच्या इराद्यानें त्यांच्यांबरोबर गेले.

श्रीशके १८३५ प्रमाथी नामसंवत्सर, मार्गशीर्ष वद्य १० सोमवार ता. २२-१२-१९१३ रोजीं पहाटे ५.५५ वाजतां श्रीक्षेत्र गोंदावले येथे श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्य महाराज हे आपले सगुण, साकार रूप सोडून निर्गुणांत एकरूप झाले आणि असें करून आसेतुहिमाचलापर्यंत पसरलेल्या आपल्या भक्तवृंदांच्या दृष्टीआड झाले. जवळचा शिष्यपरिवार दु:खसागरात बुडून दिङ्‌मूढ झाला. श्रीब्रह्मानंद हे श्रीमन्महाराजांचे प्राण. तेंव्हां ते येईपर्यंत पुढील कोणतेही कार्य करूं नये असें त्यांनीं ठरविले. पण ब्रह्मानंदगुरुंचा नक्की ठावठिकाणा कोणासच माहित नसल्यानें त्यांनीं अजमासानें गदग, हुबळी, धारवाड वगैरे गांवीं तारा केल्या व श्रीगुरुंची वाट पहात बसले.

सर्वांनीं कढिलिंबाच्या पाल्याचे सिंहासन तयार केले. त्यावर श्रीमन्महाराजांना बसविणेंत आले. व त्यांच्याजवळ ''रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम'' हें भजन आळीपाळीने भक्तजनांनीं चालूं ठेवले. सोमवार उलटून मंगळवार मध्यान्ह झाली. श्रीगुरु येण्याचे लक्षण दिसेना. मग मात्र मृत देह यापुढें तसाच ठेवणें इष्ट नव्हे असा विचार करून त्याच दिवशीं म्हणजे मंगळवारीं अंत्यसंस्कार उरकणेचा त्यांनीं निश्चय केला. महात्मे नेहमीं युक्तीप्रयुक्तीनें कांहीं भाव सूचना देत असतात. त्या श्रीमन्महाराजांच्या सूचित आदेशाप्रमाणें गोशालेंत मंगळवारीं सायंकाळी पांच वाजणेचे सुमारास सद्‌गुरुनाथांच्या जडदेहाला अग्निसंस्कार करण्यात आला.

श्रीगुरु हुबळीला येऊन पोंचलेच होते. बरोबर जे भाविक लोक होते त्यांना बरोबर घेऊन ते धारवाडला आले. इतक्यांत श्रीमन्महाराजांचे देहावसानाची वार्ता गोंदवलेहून आली. त्यावेळीं मात्र श्रीगुरुंना दु:खाचा आवेग सहन झाला नाहीं. आईच्या मायेस आंचवलेल्या लहान पण प्रेमळ मुलाप्रमाणें हुंदके देवून ते मुसूमुसून

रडू लागले. तेथील लोकांना उद्देशून ''माझा बोलका रामच निघून गेला हो'' असें अति करुणार्द वाणीनें म्हणाले. श्रीमंत जीवणराव देशपांडे यांच्या घरांतील श्रीमन्महाराजांचा फोटो श्रीगुरुंनीं लागलीच सिंहासनावर ठेवला. पुष्पमालांनी शृंगारला. जरीच्या पितांबरानें तो झांकून ''रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम'' असें भजन करण्यास त्यांनीं सुरवात केली.

सत्पुरुषांच्या लीला खरोखर अगाध असतात हें खोटें नव्हे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे दुसरें दिवशीं मंगळवारीं सायंकाळीं गोंदावल्यात श्रीमन्महाराजांचे देहाला ज्यावेळीं अग्निसंस्कार करण्यात आला. त्याचवेळीं धारवाडमध्ये श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांना आरति केली. भजन संपविले व सर्वांबरोबर विहिरीवर जाऊन स्नान करून भोजन केले. ज्ञानी लोकांचे नित्यव्यवहार आमच्या सारख्या अज्ञ लोकांचा सूचक ठरतात, महिमारुप भासतात हें यावरून दिसतें. त्यांचे सहज बोल हितोपदेशकारी असतात व परिणामकारी ठरतात.

त्याच्या दुसरे दिवशीं म्हणजे बुधवारी १०-२० शिष्यांना बरोबर घेऊन ते धारवाडहून निघून बेलधडीला आले. तेथें श्रीराम मंदिरापुढील सर्व पटांगणांत मंडप घालवून श्रीमन्महाराजांच्या देहावसानाच्या पांचव्या दिवसापासून बाराव्या दिवसापर्यंत नामसप्ताह, कीर्तन, पुराण, अन्नसंतर्पणाला त्यांनीं प्रारंभ केला. भक्त लोकांनीं जमावे म्हणून सगळीकडे पत्रें धाडण्यात आली. एक दोन दिवसांतच हजारोनीं लोक जमले. दररोज पंचपक्वान्ने होऊं लागली व इच्छा भोजनेही सुरू झाली.

महाराजांच्या आराधनेच्या प्रसंगीं दुधातुपाच्या नद्या वाहू देत ही त्यांची भावना ते अश्रुपूर्ण नयनांनीं आनंदानें बोलून दाखवीत होते. ब्राह्मण, ब्राह्मणेतर सर्वांना पंचपक्वान्नांचे जेवण घालून, दक्षिणा दान देऊन त्यांनीं संतुष्ट केले. कितीतरी गोरगरिबांना वस्त्रें दिली. शेवटच्या दिवशीं ५००० पर्यंत पान झाले. त्या दिवशीं श्रीगुरुंनीं प्रत्येकास एकेक रुपयाप्रमाणें दक्षिणा दिली व प्रत्येक गर्भिणी स्त्रीस दोन रुपयेप्रमाणें दक्षिणा दिली.

यानंतर देखील श्रीगुरु लवकर गोंदावलेस गेलेच नाहींत. त्यांनीं गोंदावलेस केव्हां जावें हें ही श्रीगुरुंच्या व श्रीमहाराजांच्या १॥ तासाच्या पंढरपुरीं घडलेल्या गुप्त चर्चेत ठरले होते कीं काय कोण जाणे. श्रीसद्‌गुरुनाथांच्या देहावसानानंतर तीन महिने पर्यंत श्रीगुरु तिकडे फिरकले नाहींत. श्रीरामनवमी उत्सव जसा जवळ आला तसे श्रीगुरु तो उत्सव यथासांग पार पडावा या इच्छेनें उत्सवात लागणारी सर्व सामुग्री बरोबर घेऊन, तसेंच अश्वत्थपूरचा निस्सीम भक्त दौडु रामैय्या वगैरेना, तसाच कांही शिष्यपरिवार बरोबर घेऊन दाखल झाले.

श्रीक्षेत्र गोंदावले येथें श्रीमन्महाराजांनीं दोन श्रीराम मंदिरें, एक दत्त मंदिर, एक शनिदेवाचें मंदिर वगैरें मंदिरें बांधविली होती. प्रतिवर्षी दोन्हीं श्रीराम मंदिरांत नवमी उत्सव मोठ्या थाटानें श्रीमन्महाराज करीत असत. तसेंच दत्त जयंति, गुरु प्रतिपदा, दासनवमी वगैरे उत्सव देखील करीत असत. श्रीमन्महाराजांच्या देहावसनानंतर तें बंद पडू नयेत, अव्याहत चालू रहावेत म्हणून, तसेंच श्रीमन्महाराजांच्या वियोगानें दु:सह विरह दु:खात असलेल्या तेथील लोकांच्या मनाचे समाधान करण्यास, मुमुक्षू जनांस सुलभ व्हावें म्हणून तसें त्या महनीयांचे स्मरण 'यावश्चंद्र दिवाकरौ' राहील असें समाधि मंदिर स्थापण्याचें कार्यास लवकर प्रारंभ करण्याचें ठरवूनच त्यांनीं गोंदावले क्षेत्रीं पदार्पण केलें.

चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून दशमीपर्यंत श्रीरामजन्मोत्सवाचा सोहळा मोठ्या थाटानें पार पाडण्यांत आला. गोंदावलेचा टापू म्हणजे अति रूक्ष प्रदेश. बाजरी व ज्वारी हा तिथला मुख्य आहार. राहणी खेडवळ. अर्थात् तेथील लोकांस पक्वान्नांची तोंडओळख बेताचीच. आणि श्रीगुरुंनीं तर दररोज वेगवेगळ्या पक्वान्नांचा सपाटा चालू केला. दररोज केल्या जाणाऱ्या पक्वान्नांचीं नांवें देखील तेथील लोकांना माहीत नव्हती. त्यामुळें त्या भागांतील जनता श्रीगुरुंच्या अन्नसंतर्पणानें पुरेपूर संतुष्ट झाली. एकंदरीनें त्यासालीं तऱ्हतऱ्हेचें लाडूच फार करण्यांत आलेनें तेथील लोकांनी श्रीगुरुंचे नांव 'लाडूबुवा' असें ठेविलें.

त्या महोत्सवांत चैत्र शुद्ध दशमीच्या दिवशीं सद्‌गुरुनाथांना ज्या ठिकाणीं अग्निसंस्कार करणेंत आला त्या जागेवर मंदिर बांधून आंत श्रीमन्महाराजांच्या निर्गुण पादुका स्थापन करणेच्या उद्देशानें मुहूर्त पाहून मंदिर उभारणीच्या कामास प्रथम प्रारंभ करणेंत आला. सज्जनगडावर श्रीसमर्थांचें समाधीचें बांधकाम ज्या प्रकारचे आहे त्या धर्तीवरच येथेंही बांधकाम करावें असा निर्धार करून, सद्‌गुरुनाथांचें परमशिष्य पंढरपूरचे अप्पासाहेब भडगांवकर यांचेवर श्रीगुरुंनीं ती कामगिरी सोपविली. पुढे येणाऱ्या मार्गशीर्ष महिन्याचे आंत कामगिरी पूर्ण झाली पाहिजे. त्यासाठीं लागणारे द्रव्यसहाय्य आपण करतो असेंही त्यांस बजावण्यांत आले. अप्पासाहेबांनींही ती कामगिरी महदानंदानें स्वीकारली. कारण श्रीगुरुंचें पूर्ण पाठबळ असल्यानें आपल्या कामांत कसलीच अडचण भासणार नाहीं ही त्यांस मनोमन खात्री होती.

श्रीमन्महाराजांच्या वियोगानें त्यांचा शिष्यपरिवार अतिशय दु:खी झालेला होता. त्यांच्या दृष्टीनें श्रीमन्महाराजांची उणीव, अंशत: का होईना, भरून काढील इतक्या योग्यतेचा श्रीगुरुंशिवाय दुसरा कोणीही त्यांच्या दृष्टीपथांत नसल्यानें ते शिष्यपरिवार संसारांतील आपल्या अनेकानेक अडचणी श्रीगुरुंस सांगत असत. श्रीगुरुही आस्थापूर्वक सर्व अडचणी ऐकून, त्यांस त्या अडचणींचें निवारणार्थ चार हिताच्या गोष्टी सांगून सर्वांचें समाधान करीत असत. त्यामुळें त्या लोकांना दिलासा वाटून श्रीगुरुंवरील त्यांची निष्ठा अधिक दृढ होऊं लागली.

श्रीमन्महाराज म्हणजे कितीतरी लोकांचीं, विशेषत: त्या भागांतील लोकांची चालती बोलती बँक होती. कित्येकांनीं विश्वासानें आपल्या जवळील द्रव्य सुरक्षित राहावें म्हणून श्रीमन्महाराजांच्या स्वाधीन केलें होतें. श्रीमन्महराजांनींही कोणी, किती रक्कम, केव्हां ठेवावयास दिली याचा हिशेब ठेवलेला नव्हता. या गोष्टीचा मात्र कितीतरी भक्त लोक गैरफायदा उठवीत असत. श्रीमन्महाराजांनीं देह ठेवतांच रक्कम ठेवलेल्या जवळ जवळ सर्व लोकांनीं, बँक बुडणार म्हणून कळतांच आपापली रक्कम काढून घेण्यासाठीं जशी लोकांचीं भाऊ गर्दी उडते, तद्वत् आपल्या द्रव्याच्या मागणीची धांदल सुरुं केली. या मागणीदारांत श्रीमन्महाराजांकडून कांहीं येणें नसणारे लोकांनींही भाग घेतला होता.

श्रीक्षेत्र गोंदावले येथील सर्व व्यवस्था अप्पासाहेब भडगांवकर हे पहात असल्यानें लोकांनीं पैशाच्या मागणीचा लकडा त्यांचे मागें लावला. त्यांनीं कोणासही द्रव्य देण्यास संमति न दिल्यानें त्या सर्व मागणेकरी लोकांनीं आपली तक्रार श्रीगुरुंपुढे मांडली. श्रीगुरुंनीं अप्पासाहेबांस बोलावून त्यांच्याशीं जो युक्तिवाद केला तो खरोबर बोधप्रद आहे. त्यानीं अप्पासाहेबांस पहिला प्रश्न केला तो असा, ''काय हो, बाप मेल्यानंतर

मुलांनीं वडिलांनीं काढलेले कर्ज फेडले पाहिजे ना ? वडिलांनीं मिळविलेल्या संपत्तीचा उपभोग घेण्यासच फक्त ते लायक ठरतात काय ?'' ''लोक मागत असलेली रक्कम देऊन टाकलीच पाहिजे. त्यांतून महाराजांचे नांवावर ते मागतात म्हटल्यावर त्यांची मागणी सत्य कीं असत्य, वाजवी कीं गैरवाजवी हें पाहण्याचें आपणास प्रयोजनच काय ? श्रीमन्महाराजच ते पाहून घेऊं देत. मागणारांचा पैसा देऊन टाकणें हे श्रीमन्महाराजांच्या मागें राहणाऱ्या आपल्या सारख्या त्यांच्या शिष्यांचे पवित्र कर्तव्य ठरत नाहीं काय ? शिवाय आपण कां काळजी करावी ? आपल्याला काय कमी आहे ?'' असें म्हणून श्रीगुरुंनी आपल्या वांटणीचे म्हणून ५०० रुपये एका पिशवींतून काढून अप्पासाहेबांचें स्वाधीन केलें. व ''तुम्हीही आपल्या वांटणीचे पैसे द्या'' असे सांगितले. श्रीगुरुंच्या या विचारसणीनें भारावून जावून सर्वांनीं आपापली देणगी दिली. तेव्हां त्या बसल्या बैठकीत ३००० रु. जमलें. सर्वानुमतें ते श्रीगुरुंनीं आपल्या जवळ ठेवावें असे ठरले. परंतु श्रीगुरुंनीं त्या रकमेचे २०० मोहरांत रुपांतर करवून त्या मोहरा सोलापूरकर मास्तरांचे स्वाधीन केल्या.

कांहीं दिवसानंतर त्या रकमेची जेव्हां आवश्यकता भासूं लागली तेव्हां श्रीगुरुंनीं सोलापूरकरांकडे मागणी केली. सोलापूरकरांकडे ठेवावयास दिलेला ऐवज मोहरांच्या रुपांत होता. वास्तविक मागणी होतांच त्यांनीं २०० मोहराच परत करावयास पाहिजे होत्या. परंतु सोलापूरकर मास्तरांनी मोहरा ठेऊन घेऊन ३००० रुपयांच्या नोटा दिल्या. श्रीगुरु त्यावेळीं कांहीं बोलले नाहींत. पण त्यांनीं ती गोष्ट लक्षांत मात्र ठेवली.

याही गोष्टीस कांहीं दिवस होऊन गेले. एके दिवशीं गोंदावले येथें श्रीगुरु, परिवारांतील कांहीं लोकांबरोबर सहज बोलत बसले असतां, सोलापूरकर मास्तरांनीं श्रीगुरुंना, ''महाराज, प्रपंचावर जडलेली आमची आसक्ति आम्हीं कशी कमी करावी ? कितीही प्रयत्न केले तरी ती कमी न होतां वाढतच जाते. तरी कृपा करून यास योग्य उपाय सांगावा.'' असा प्रश्न केला श्रीगुरुंनीं मंदहास्य करून, ''त्यांत काय आहे. आसक्ति सोडणें अगदी सुलभ आहे. लोकांनीं ठेवण्यास दिलेल्या सोन्याच्या मोहरा आपल्याजवळ ठेऊन त्याच्याबद्दल नोटा देऊं नयेत म्हणजे झाले'' असें उत्तर दिलें. उत्तरांतील खोंच सोलापूरकर मास्तरांस बोंचली एवढेंच नव्हे तर तेथें बसलेल्या सर्वांस ती पटली. सर्वजणांची हंसून हंसून मुरकुंडी वळली.

वास्तविक श्रीमन्महाराजांजवळील ठेवीची रक्कम अडीच हजार रुपयेपर्यंत होती. पंढरपूर मुक्कामींच सर्व लोकांना बोलावून श्रीमन्महाराजांनी ती परत केली होती. पण त्यावेळीं श्रीमन्महाराजानीं आतां देहाचा भरंवसा नाहीं असें उद्गार काढले होते. तरी फक्त दोघांनींच आपली रक्कम काढून घेतली व बाकीच्यानीं घेऊन पुन्हां त्यांचेकडेच ठेविली. ही हकीकत श्रीगुरुंना विदित होतीच. त्यावेळीं श्रीमन्महाराज चेष्टेनें सर्वांस ''पुढें तुम्हीं माझ्यासाठीं जरी रडला नाहीं तरी माझ्या मरणानंतर आपल्या रकमेसाठीं तुम्हांस रडावे लागेल'' असें चेष्टेनें म्हणाल्याचेंही श्रीगुरुंस माहीत होते. पूर्वी रक्कम घेतलेल्या दोघांनींही यावेळीं आपले हात धुवून घेतलेच. हे श्रीगुरुंस कळून देखील आपण आपले कर्तव्यांतून मुक्त झालो याच आनंदांत श्रीगुरु होते.

श्रीमन्महाराजांनीं देह ठेवण्यापूर्वीच दोन वर्षाखालीं एक व्यवस्थापत्र तयार करून ठेवले होते. एकंदर इस्टेटीचे वडिलार्जित व स्वसंपादित असे दोन भाग त्यांनीं केले होते. वडिलार्जित भाग त्यांनीं भाऊबंदांस सोडला व स्वसंपादित

इस्टेटीचा "श्रीराम देव संस्थान गोंदावले" या नांवानें ट्रस्ट करून चार लोकांची पंच म्हणून नेमणूकही त्यांनीं केली होती, १) ब्रह्मानंद २) अप्पासाहेब भडगांवकर ३) भाऊसाहेब साठे ४) तात्यासाहेब चपळगांवकर हे ते पंच होत. पांचवे नांव त्यांनीं आपले स्वत:चे नाव दाखल केले होते. त्या ट्रस्टचा मुख्य उद्देश श्रीमन्महाराजांनीं स्थापन केलेल्या सर्व देवस्थानांची पूजा, अर्चा, धूप, दीप, नैवेद्य, नंदादीप, उत्सव वगैरे उपासना, तसेंच गोरक्षण, अन्नदान हें व्यवस्थित रीतीनें वरील पंचांनीं जबाबदारीनें चालवावें हा होता. तसा स्पष्ट उल्लेखही त्यांत असून, श्रीब्रह्मानंदगुरुंना मुख्य पंच म्हणून सर्वाधिकार दिल्याचाही उल्लेख त्यांत आहे.

श्रीगुरुंनीं रामनवमी उत्सव पार पडतांच तेथील सर्व भाविक भक्तांना बोलावून, "मी कर्नाटकांत राहणारा. सवडीप्रमाणें केव्हां तरी इकडे येणार. अशा परिस्थितींत येथील व्यवस्था सुव्यवस्थित रीतीनें पार पाडणें माझें हातून होणार नाहीं. तरी, मी माझें जागीं सांगलीचे बळवंतराव पागा फडणीस यांस नेमून, मुख्य पंचाचे जागीं अप्पासाहेब भडगांवकर यांस नेमून. सर्वाधिकार त्यांस देऊन राजीनामा देतो" असें सांगितले व नुसते सांगून न थांबता राजीनामा लिहवून त्यावर सही करूनही ते मोकळे झाले.

वाचक हो, येथे श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांच्या आज्ञेचा अवमान केला असें स्वाभाविक सामान्यजनांना वाटेल. पण खरोखर तसें करण्यांत त्यांचा हेतू जबाबदारी अंगावर घेऊन, पुढें होऊन, काम करणारी मंडळी तयार करणे हाच पवित्र हेतू असला पाहिजे. नि:स्वार्थी कसें बनावे याचे हे डोळे दिपवून टाकणारे उदाहरण होय. अधिकार लालसेचा गंधही त्यास नव्हता हेंच यावरुन स्पष्ट होत नाहीं काय ? चराचरावर अधिकार चालविण्याचे सामर्थ्य ज्यांचे अंगीं होते त्यांना सर्वसाधारण मानवावर अधिकार चालविणेची लालसा कशी असणार ? सर्व उपाधींतून बाहेर राहणें पण त्यांतच असणें हेंच परमार्थाचें खरे रहस्य आहे. चिखलावर आकाशाचे रूप दिसतें म्हणून कधीं आकाश चिखलमय झाल्याचें ऐकिवांत तरी आहे काय ? त्यांनीं राजीनामा दिला. बाह्यजगाच्या दृष्टीनें ते मोकळे झाले पण सर्व कांहीं करणारे व करविणारे तेच होते हें मात्र विसरून चालणार नाहीं. हें जो विसरला त्याचा जन्मच व्यर्थ गेला. त्यास पारमार्थिक दृष्टीच प्राप्त झाली नाहीं असें महत्खेदानें म्हणावें लागेल.

श्रीगुरुंनीं संपूर्ण चैत्र महिना गोंदावले येथें वास्तव्य केले. त्या मुक्कामांत त्यांनीं समाधिमंदिराच्या बांधकामांस सुरवात लावून दिली व तेथील सर्व व्यवस्था बरोबर चालेल अशी त्यांनीं शिस्त करून दिली. पुढें वैशाख महिन्यांत हर्दा, इंदूर वगैरे उत्तरेकडील भागांत श्रीमन्महाराजांचा संचार असे, तिकडे जाऊन, त्यांनीं तेथील श्रीमन्महाराजांच्या भक्तजनांचे सांत्वन केले. त्याचबरोबर श्रीमन्महाराजांच्या समाधीच्या बांधकामासाठी प्रचार करून त्यांचेकडून द्रव्य सहाय्यही त्यांनीं जमविले. तेथून श्रावण अखेर जालन्यास जाऊन ते पुण्यास आले व पुण्याहून सोलापूर मार्गे तेरदाळास गेले. तेथें भाद्रपद शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत नामसप्ताह साजरा करून कर्नाटकांत गेले. पुढें अश्विन महिन्यांत श्रीक्षेत्र वेंकटापूर येथील नवरात्रोत्सव छत्रचामरादि राजवैभवानें त्यांनीं पार पाडला. अर्थात हे राजवैभव त्यांना बेलधडीहून तिकडे न्यावे लागले होते. या उत्सवास दोन हजारांवर लोकसमुदाय जमल्याची नोंद सांपडते.

श्रीक्षेत्र गोंदावले येथें आरंभिलेले श्रीमन्महाराजांच्या समाधीचे बांधकाम संपूर्णतया तयार झाल्याचा वृत्तांत तेथील व्यवस्थापक आप्पासाहेब भडगांवकर यांनीं श्रीगुरुंस धाडल्यानें श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांच्या आराधना उत्सवाची व समाधीवर त्यांच्या पादुका स्थापन करण्याच्या तयारीस सुरवात केली. कर्नाटकांतच सर्व सिद्धता करून सर्व साहित्य त्यांनीं गोंदावलेस रवाना केले. अश्वत्थपूरचे निस्सीम भक्त दोड्डुरामय्या, सण्णरामय्या, शामय्या, फणियप्पा वगैरे एका पठडीचे २० ते ३० लोक व कर्नाटकांतील सुमारे १०० शिष्यांचा परिवार बरोबर घेऊन मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीच्या दिवशीं श्रीगुरुंनीं श्रीगोंदावले क्षेत्रीं पदार्पण केले.

मागें श्रीमहाभागवतांनी बिद्रहळ्ळीचा नामजपयज्ञ इ. स. १९०९ मध्यें संपतांच श्रीमन्महाराजांना त्यांनीं आपले गांवीं कूर्तकोटीस बोलावून नेल्याचें वाचकांच्या स्मरणांत असेलच. त्यावेळीं श्रीमारुतिरायाची मूर्ति व सिंहासनारूढ पादुका त्यांनीं श्रीमन्महाराजांस अर्पण केल्यावेळीं श्रीमन्महाराजांनीं श्रीमारुतीच्या मूर्तीची तेथें स्थापना करण्याची आज्ञा केली होती. सिंहासनारूढ पादुकांवर प्रसन्न वदनानें उभें राहून श्रीमन्महाराजांनीं श्रीमहाभागवतांचे हस्तें पूजेचा स्वीकार केला होता. व सध्यां या पादुकांची स्थापना करूं नये. ४-५ वर्षानंतर करूं. तोंवर त्या तुमच्याकडेच ठेऊन दररोज पूजा करावी असे सांगितले होते. श्रीमन्महाराजांचा आशय श्रीगुरुंशिवाय कोणालाही समजला नव्हता. श्रीगुरुंनीं गोदावलेस समाधिस्थानीं स्थापणेसाठीं त्याच पादुका आणवून घेऊन श्रीमन्महाराजांची इच्छा खात्रीशीरपणें सर्वांस दृग्गोचर होईल असा सुयोग घडवून आणला.

या महोत्सवास येण्याबद्दल सगळीकडील भक्तजनांना पत्रें पाठवून आमंत्रण करण्यांत आले होते. समक्ष आपल्या फिरतींतही गोंदावलेच्या उत्सवास येण्यास चुकूं नका असें आवर्जून ते स्वत: सांगत सुटले होते. गोंदावलेसारखे पुण्य क्षेत्र, श्रीमन्महाराजांचा उत्सव व श्रीब्रह्मानंद गुरुंसारखे पुण्यपुरुष त्याचे अध्वर्यू मग थाट काय विचारावा. महाराष्ट्र, कर्नाटक, इंदूर, ग्वाल्हेर, हर्दा, जालना या भागाचे लोक तर आले होतेच. थोडक्यांत सांगावयाचे झाल्यास आसेतुहिमाचलापर्यंतचे श्रीमन्महाराजांचे भक्तगण उपस्थित झाले होते. साखरेवर मुंग्यांच्या झुंडीच्या झुंडी जशा जमतात त्याप्रमाणें गोंदावलेस लोकांची गर्दी झाली होती.

मार्गशीर्ष पौर्णिमेस श्रीदत्तमंदिरांत दत्तजयंति उत्सव यथासांग उरकण्यांत आला होता. त्याच्या जवळच पाकशालेची व सामानाच्या कोठीची व्यवस्था केली होती. आठ, दहा हजारापर्यंत जनसमुदाय जमला असावा सर्वांना स्वास्थ्य लाभेल अशी श्रीगुरुंनीं सर्वांची उतरणेची सोय लावून दिली होती. गोंदावलेतील यच्चावत् लोक, श्रीगुरुंच्या आज्ञेप्रमाणे व आपापल्या योग्यतेप्रमाणें कटिबद्ध होऊन उत्सवाच्या कार्यांत तत्परतेनें मदत करीत होते. श्रीगुरुंच्या आज्ञेप्रमाणें गोंदावलेतील यच्चावत लोकांनीं उत्सव संपेपर्यंत अक्षरश: घरीं कधींच चूल पेटविली नाहीं. एवढेच काय अद्याप देखील तेथील काहीघरी श्रीगुरुंच्या या आज्ञेचे काटेकोरपणे पालन होत असल्याचें दिसून येतें.

श्रीशके १८३६ मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेच्या दिवशीं शुभमुहूर्तावर श्रीगुरुंनीं शास्त्रविहित होमहवन, जलाधिवासादि कृत्यें संपवून आपल्या अमृतहस्तानें विधिपूर्वक श्रीमन्महाराजांच्या समाधीवर त्या नयनमनोहर पादुकांची चिरप्रतिष्ठापना केली. त्यावेळीं तेथें उपस्थित असलेल्या जनसमूहानें आनंदोत्सवानें व अंत:स्फूर्तीनें

नभोमंडल भेदून जाईल असा ''अनंतकोटि ब्रह्मांडनायक राजाधिराज सच्चिदानंद सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज की जय'' असा जयघोष उच्चरवानें केला.

श्रीगुरु अतिशय भावविव्हल झाले व त्यानीं सद्‌गुरुनाथांच्या त्या निर्गुण पादुकांवर आपले मस्तक ठेऊन आनंदोदकानें अभिषेक केला. आपल्या जवळच्या भक्तगणांकडे वळून उभे राहून सर्वांना उद्देशून सद्‌गदित कंठानें ते म्हणाले, ''आपल्या सद्‌गुरुनाथांनी जड देहाचा त्याग केला व त्यामुळें जरी ते आपल्याला दिसत नसले तरी कोणीही निरुत्साही होण्याचें कारण नाहीं. या पादुकांच्या प्रतिष्ठापनेनें त्या महात्म्याचा अजर, अमर असा जन्म झाला असें समजा. पूर्वी देहधारी अवस्थेंत गोंदावलेस वास करून श्रीमन्महाराज आपल्या भक्तांचे अभीष्ट चिंतन करीत असत. आतां निर्गुण स्वरुपांत राहून, जगभर व्यापून, भक्तरक्षणाकरतां भाविक भक्तांच्या हृदयांतच ते निरंतर वास करीत आहेत व पुढेंही करणार आहेत. पूर्वी चैतन्यस्वरूप असलेली लीलामूर्ति व्यक्त स्वरूपांत एकाच ठिकाणीं आपल्यास दिसत होती. पण आतां तेच चैतन्यस्वरूप अव्यक्त स्वरूपसागरांत विलीन झाल्यानें प्रत्येकाच्या आत्मज्योतींत प्रकाशमान झाले आहे. सद्‌गुरुनाथ आपल्याला सोडून गेले या भावनेनें कोणीही उदास होऊं नका. दयामय अशा सद्‌गुरुनाथांच्या सुंदर, सगुणरूपाचे सदासर्वकाल ध्यान करीत, ह्या निर्गुण पादुकांची आराधना करीत, त्यांच्याकडून घेतलेल्या श्रीरामनाम तारक मंत्राचा रात्रंदिवस जप करा म्हणजे सद्‌गुरु निश्चितपणें तुमचे कल्याण करतील याची खात्री बाळगा.'' अशा तऱ्हेचा उपदेश करून त्यांनीं श्रीमन्महाराजांची आरति केली व स्वत: रचलेलें श्रीगुरुपरंपरेचे स्तोत्र त्यांनीं म्हणण्यास सुरवात केली. ते खालीलप्रमाणे :-

''नारायणं त्वादिगुरुं परेशं । चतुर्मुख तत्सुतमप्रमेयम् ।।
श्रीमद्वसिष्ठं खलु ब्रह्मनिष्ठं । श्रीरामभूपं हृतभक्ततापम् ।।१।।
श्रीरामदासं भवबंधनाशं । कल्याणमीडयं गुरुबालकृष्णम् ।।
चिंतामणिं रामपदाब्जभृंग । श्रीरामकृष्णं परत: परं च ।।२।।
श्रीमत्तुकाराममनंतशक्तिं । सच्चिद्‌घनं लोकमलघ्नकीर्तिम् ।।
मत्सद्‌गुरुं राघवरूपमीशं । श्रीब्रह्मचैतन्यमगाधबोधम् ।।३।।
अखंडनामामृतपानतृप्तं । दयाघनं पावितशिष्यवृंदम् ।।
श्रीरामभक्तं प्रणमामि नित्यं । अखंडभक्त्याहमनंतसागरम् ।।४।।

जय जय श्रीसच्चिदानंद ब्रह्मचैतन्य सद्‌गुरुनाथ महाराज कीं जय'' ही गुरुपरंपरा प्रत्येक भक्तानें सकाळ संध्याकाळ अवश्य म्हणावी. हे स्तोत्र भावभक्तीनें जे पठण करतील ते श्रीमन्महाराजांचे कृपेस पात्र तर होतीलच व संसारांतील सर्व तापत्रयापासून मुक्त होतील असें श्रीगुरुंचे सांगणें असे.

स्तुति संपवून त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला व ''रघुपति राघव राजाराम । पतीत पावन सीताराम'' या नामस्मरणास त्यांनीं प्रारंभ करून दिला. त्या दिवसापासून दशमीपर्यंत नामस्मरण, पुराण, पारायण, प्रवचन, कीर्तन वगैरे कार्यक्रमही उत्सवांत आखण्यांत आले. त्या उत्सवाचे यथार्थ वर्णन करणें मतिमंद अशा मजसारख्या पामराला शक्य नाहीं.

गोंदावले क्षेत्रीं पहावें तिकडे आनंद परिपूर्ण ओसंडून जात होता. श्रीरामनामाच्या गर्जनेनें भूमंडलच काय पण नभोमंडलही अहोरात्र व्यापून टाकले गेले होते. ब्राह्मण भोजनाचा आनंद कुठवर वर्णावा. अन्नसंतर्पणाची थोडक्यांत परिपूर्ण कल्पना करून द्यावयाची म्हटल्यास प्रतिपदेच्या दिवशीं प्रात:काळीं पाकशाळेंत स्थापन केलेल्या अग्नीचे विसर्जन वा समाप्ति एकादशीच्या दिवशीं सकाळींच झाली. ज्यांना श्रीगुरुंचे प्रत्यक्ष दर्शन घडून, ज्यांनी त्यांच्या सान्निध्यांत कांहीं काळ घालविला असेल, त्यांना श्रीगुरुंच्या अन्नसंतर्पणाच्या हौसेची यथार्थ कल्पना आहेच. त्यांना नव्यानें सांगण्याचें कारणच नाहीं. इतर अभाग्यांना नुसते सांगून तरी काय उपयोग ? तरी पण या महोत्सवांत ४ ते ८ हजारापर्यंत ब्राह्मण व सुवासिनींच्या पंक्ति, २ ते ३ हजारापर्यंत इतर सर्व जातीच्या लोकांच्या पंक्ति अहोरात्र एकसारख्या चालत असत. व दररोज पंचपक्वान्नांचा बेत असे. एवढे सांगितले म्हणजे पुरे. अद्यापही त्याच धर्तीवर गोंदावलेस अन्नसंतर्पण होत असते याचा प्रत्यक्ष अनुभव लोकांस आहेच.

दशमी दिवशीं उजाडण्यापूर्वी पहाटें ५ वाजणेचे आंत श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांच्या निर्गुण पादुकांना पंचामृत, सुगंधी तेल यांनी स्नपन करून, उष्णोदकानें अभिषेक केला. नवे जरीचे वस्त्र घातले. समाधी, गंध व पुष्पमालांनीं सुशोभित केली. समाधीच्याजवळ सर्वांना दिसेल अशा ठिकाणीं स्वत: श्रीगुरु उभे राहिले. त्यांनीं श्रीमन्महाराजांच्या अगाध लीलांचे वर्णन केले. त्यावेळीं त्यांचा कंठ दाटून आला. देहाची खबर नाहींशी झाली होती. त्यावेळीं त्यांनीं खालील ५ श्लोक म्हटले :-

ब्रह्मेंद्रमुख्यामरदुर्लभं श्रीरामस्य नाम प्रतिपादयंतम् ।
भक्ताय रामार्पितचित्तवृत्तिं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥१॥
ब्रह्मप्रतीपाक्षरवाच्यमायागुणैरलिप्तं स्वमिवाम्बुपंकात् ।
श्रीसच्चिदानंदघनं प्रशान्तं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥२॥
चैलादि सर्वान् विषयान् विहाय कौपीनमात्रेण विभांतमच्छम् ।
विपक्षमित्रादिविभेदहीनं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥३॥
तपो न जाने न हि चास्मि सिद्धो न राजयोगीति निगर्वभावम् ।
गिरा वदंतं सकलार्थविज्ञं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥४॥
न्यग्रोधपन्नस्थितरामभद्रसमं समस्तात्मानिरीक्षणेन ।
अनंतमत्संसृतिदावनीरं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥५॥

यानंतर भक्त जर खरोखर भक्ताच्या भूमिकेंत मुरलेला असेल तर त्याचेवर श्रीमन्महाराजांचा अनुग्रह होतांच तो ताबडतोब जीवनमुक्त होतो असें सांगून श्रीगुरुंनीं ''जानकी जीवन स्मरण जयजयराम'' असा नामघोष करून गुलाला उधळला आणि वाद्यांच्या गजरांत निर्याण महोत्सव पुरा केला. त्यावेळच्या त्या परमानंदसुखाचा अनुभव घेणारे खरोखर धन्यतम होत.

एकादशीचे दिवशीं ललिताचा कार्यक्रम झाला. जमलेल्या विद्वानांना, तसेंच ब्रह्मवृंदाला संभावना व दक्षिणा व वस्त्रें देण्यांत आली. जमलेल्या सर्व भाविकांची त्यांनीं रात्रंदिवस घेतलेल्या परिश्रमाबद्दल श्रीगुरुंनीं

शब्दांनीं त्यांची पाठ थोपटली. व दरवर्षी याप्रमाणेंच सर्वांनीं जमून तनु, मन धनानें श्रीमन्महाराजांचा आराधना उत्सव यथासांग पार पाडावा अशी आपली इच्छा व्यक्त केली. ''असे केले असतां तुमच्या जन्माचें सार्थक झाल्याशिवाय राहणार नाहीं असा आशीर्वाद पण दिला. श्रीमन्महाराजांनीं उपदेशिलेला श्रीरामनाम तारकमंत्र रात्रंदिवस जपत जा. आपला उद्योगधंदा, प्रपंच श्रीरामनामाच्या गजरात सुखरूपपणें करा. 'जेथें सदानाम आहे तेथें मी आहे' हा नेम असें श्रीमन्महाराज पदोपदीं सांगत असत ते विसरू नका.'' असा गोड उपदेश केला.

त्याच बरोबर ''स्नान, संध्या, जप भजन व पूजा आदि नित्य नेम न चुकतां आचरणांत आणा. वडील माणसांशीं तसेंच ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध माणसांशीं आज्ञाधारकपणानें वागा. कामक्रोधादि षडरिपूंच्या जाळ्यांत सांपडूं नका. भूतदयेनें प्रेरित होऊन हांतून होईल तितके अन्नदान करा. गाईचे रक्षण करा व सदा सर्वकाळ श्रीरामनामांत दंग व्हा. कली मातला आहे. त्याचा प्रभाव यापुढें फार वाढणार आहे. कलीच्या कचाट्यांतून पार होण्यास श्रीरामनामाखेरीज अन्य श्रेष्ठ उपाय नाहीं. दृढ निश्चयाचें व्रत अंगीं बाणवा. नामाव्यतिरिक्त अन्य साधनांचे नादीं लागणें म्हणजे वाऱ्याशीं झगडून अंग दुखवून घेण्यासारखें आहे. श्रीसद्गुरुनाथांवर दृढ श्रद्धा ठेवा व श्रीरामनाम जपून देहाचे सार्थक करा'' असा बहुमोल उपदेश श्रीगुरुंनीं आपल्या मधुरवाणीनें केला.

श्रीगुरु ब्रह्मानंदसुखाचा अखंड अनुभव घेत होते. श्रीब्रह्मचैतन्य महाराजांच्या पूर्णकृपेनेंच ते तो अनुभव घेत होते. तसा तो आम्हासारख्या पामरांनाही घेतां यावा, त्यांचे चित्त तिकडे खेंचलें जावें या उत्कट भावनेनेंच त्यांनीं श्रीब्रह्मचैतन्य महाराजांच्या निर्गुण पादुकांची स्थापना समाधिमंदिर बांधून केली. तेथें त्रिकाल पूजा, आरति, नैवेद्य, प्रदक्षिणा वगैरे नित्य नेम श्रीगुरुंनीं आंखून दिले व ते व्यवस्थित चालावे अशी व्यवस्था पण केली. दरवर्षी मार्गशीर्ष वद्य प्रतिपदेपासून दशमीपर्यंत अखंड नामस्मरण, कीर्तन, पुराण, पारायण, प्रवचन, सकाळ संध्याकाळ प्रदक्षिणा, अन्नसंतर्पण वगैरेसारख्या कार्यक्रमांनीं आराधना उत्सव साजरा करणेंत यावा असा नियम घालून दिला. बहुतांशीं त्याप्रमाणें कार्यक्रम आजतागायत होत आहेत. त्यांनीं घालून दिलेली घडी न विस्कटतां आजवर टिकून आहे हा त्या महात्म्याचाच महिमा नव्हे काय ?

पूर्वी एका प्रसंगी श्रीगुरुंनीं आपले पंचांतील नांव राजीनामा देऊन कमी करून घेतल्याची हकीकत आलीच आहे. आपल्या गैरहजेरींत बाकी पंचांनीं उत्सव कसा करावा याबद्दल अगदीं व्यवहार्य मार्गदर्शन त्यांनीं केले. ''दरवर्षी सांप्रदायिक भक्तांकडून येणाऱ्या गुरुदक्षिणेंतूनच आराधना, उत्सव करावा. लाडू, पोळी आदि पक्वान्नें केलीच पाहिजेत असा अट्टाहास धरूं नका. सारभात वाढलात तरी चालेल. पण तो पोटभर वाढा. अंथरूण पाहून पाय पसरा. ऋण काढून सण करूं नका. म्हणजे तुम्हांला कधींच कांही कमी पडणार नाहीं.'' किती व्यवहार्य उपदेश आहे हा !

पहिला आराधना उत्सव संपल्यानंतर सुमारें एक महिना श्रीगुरु गोंदावलेस राहिले. घालून दिलेल्या नियमाबरहुकूम व्यवस्था चालू झाल्याची त्यांनीं खात्री करून घेतली. समाधीजवळ एक विहीर खोदवून बांधली. त्यास लागूनच अन्नछत्र व गोशाला बांधून घेतली. सेवा करणेसाठीं राहणाऱ्या भक्तांच्या जेवणाची सोय अन्नछत्रांत करून दिली. आतां तर आराधना उत्सवात येणाऱ्या बऱ्याच भक्तांनीं उत्सवाचे वेळीं तेथे उतरण्याची गैरसोय

होऊं नये म्हणून आपल्यासाठीं व इतरांसाठींही बऱ्याच खोल्या बांधल्या आहेत. त्या सर्व इमारती संस्थानच्या मालकीच्या आहेत. त्याचा फायदा इतरवेळी सेवेस राहणाऱ्या भक्तांस संस्थेमार्फत मिळत असतो.

दासनवमीच्या सुमारास श्रीगुरु जे तेथून निघाले ते गदग बेटगिरीला गेले. तेथें त्यांनीं दासनवमीचा उत्सव मोठ्या थाटानें श्रीरामनामसप्ताहाच्या गजरांत पार पडला.

शके १९३७ या वर्षी म्हणजे पहिल्या आराधना उत्सवाचे दुसरेच वर्षी श्रीगुरु स्वतः गोंदावले क्षेत्रीं उपस्थित राहिले व आदले वर्षीप्रमाणेंच त्यांनीं आपल्या देखरेखीखालीं तो उत्सव पार पाडला. पुढें २ वर्षे म्हणजे शके १८३८ व ३९ या वर्षी श्रीगुरु स्वतः उत्सवास हजर राहिले नाहींत. त्यांनीं सर्व साहित्य, शिधा, सामुग्री वगैरे पाठवून देऊन नेमलेल्या पंचांकडून उत्सव करवून घेतला. आपल्या हयातींत पण आपल्या गैरहजरींत पंच लोक उत्सव कशा प्रकारें पार पाडतात याजबद्दल त्यांस संधी देऊन त्यांनीं तो सुव्यवस्थित पार पाडला जातो अशी आपली खात्री करून घेतली. पुढच्या उत्सवास आपले अस्तित्व नाहीं हे ओळखूनच श्रीगुरु तसे वागले असतील काय ? या त्यांच्या वागण्यांतील इंगित तेच जाणोत.

कर्नाटकांतील ज्या भक्तांस वारंवार आराधना उत्सवास हजर राहणें शक्य नसेल त्यांस आराधना उत्सवाची पद्धत समजावी म्हणून श्रीगुरुंनीं शके १९३८ व ३९ या वर्षी श्रीवेंकटापूर येथेंच रामनामसप्ताहासह आराधना उत्सव उत्तम रीतीनें पार पाडला. त्यासाठीं कर्नाटकांतील चहूंकडील लोकांस आमंत्रणें पाठवून त्यांनीं बोलावून घेतले होते. अलीकडे कर्नाटकांतील लोक श्रीमन्महाराजांचा आराधना उत्सव आपल्या प्रांतींच करू लागले आहेत. सध्यां तर बंगलोरला एक भव्य मंदिर बांधण्याचे काम सुरु असून तेथें श्रीमन्महाराजांच्या पादुका स्थापन होणार आहेत.

श्रीगुरुंनीं श्रीमन्महाराजांच्या आज्ञेप्रमाणें श्रीवेंकटापूर क्षेत्रांतील जीर्णोद्धाराचे कार्य यापूर्वीच हांतीं घेतले होते. ते लवकर संपविण्याची श्रीगुरुंना अलीकडे निकड लागली होती. म्हणून बहुधा त्यांचा मुक्काम श्रीवेंकटापुरांतच असे. तरी जीर्णोद्धाराची पूर्तता कशी झाली हे आतां आपण पुढील प्रकरणांत पाहूं या.

॥ श्रीसद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण तेविसावें

## श्रीवेंकटेश देवालयाचा जीर्णोद्धार

शके १८३४ आश्विन शुद्ध १०, विजयादशमीच्या सुमुहूर्तावर श्रीगुरूंनी श्रीवेंकटपतीचे गर्भालयाचे बांधकामास सुरवात केली होती. श्रीगुरूंनी येथेच घोर तप करून श्रीवेंकटेशास प्रसन्न करून घेतले. त्याच्याच कृपाप्रसादाने श्रीगुरूंस सद्‌गुरूचा लाभ झाला. सद्‌गतीचा मार्ग त्यांस सापडला. अर्थात् श्रीवेंकटेशाच्या ऋणातून अल्प स्वल्प का होईना मुक्त व्हावे या इच्छेने श्रीवेंकटपतीच्या जीर्णोद्धाराकडे त्यांनी संपूर्णपणे वाहून घेतले. शिवाय सदरहू जीर्णोद्धारासंबंधी श्रीमन्महाराजांची श्रीगुरूंस आज्ञा झाली असल्यानें ते महत्कार्य लवकरांत लवकर पूर्ण झाले पाहिजे अशा आंतरिक ओढीने श्रीगुरूंनी त्या कामीं जोरकस खटपट सुरू केली.

या पवित्र क्षेत्राच्या उपपत्तीचा पूर्वेतिहास पूर्वीच येऊन गेला आहे. तसेंच पूर्वी शिरहट्टीची जोगळेकर सखूबाई येथें सेवेस राहिली होती. तिचे मनांत या देवस्थानाचा जीर्णोद्धार करण्याचें फार होते. तिनें सुरवातही केली होती. तिच्या प्रयत्नाने फक्त महाद्वार तयार झाले व काम थांबले. कदाचित् पैशाची कमतरता, कदाचित् बाई माणूस असल्याने तिची असहाय्यता, कदाचित् पुढे लवकरच तिचे निर्वाण यापैकी कुठल्यातरी कारणानें ते काम थांबले असावे. 'भगवदिच्छा बलीयसी' या न्यायानें श्रीपतीच्या मनांतून ती कामगिरी श्रीब्रह्मानंदगुरूंच्या हातूनच पुरी करून घ्यावयाची असेल.

श्रीगुरूंच्या मनांतून साध्वी सखूबाईचे महाद्वार उखडून टाकून त्याहीपेक्षां भव्य व सुंदर महाद्वार बांधवावे असें होते. पण भगवंताच्या संकेतानें त्यांनीं तो विचार रद्द केला असा एक प्रवाद क्वचित् ऐकूं येतो. परंतु एका भक्ताने भक्तिभावानें बांधलेले महाद्वार उखडून टाकण्याचा दुष्ट विचार सुष्ट श्रीगुरूंच्या मनांत कालत्रयीं येणें शक्य नाहीं. श्रीगुरूंनी आपण होऊनच पूर्णविचारांती ते राखले असले पाहिजे.

प्रथम श्रीगुरूंनी श्रीवेंकटपतीचे गर्भालय व त्याच्यापुढील तीर्थमंडप याची दगडी सुंदर इमारत तसल्या डोंगर प्रदेशांत महत्प्रयासपूर्वक मजबूत अशी बांधविली. त्यानंतर त्याच्या भोंवती त्यांनी पोवळी बांधणेस सुरवात केली. श्रीवेंकटेशाच्या गाभाऱ्याच्या मागें असलेल्या कमानीच्या दगडी ओंवऱ्याप्रमाणें सभोंवार तसल्याच नमुन्याची पोवळी बांधणेचा विचार कायम करून प्रथम उजवे अंगाची पोवळी बांधणेस त्यांनी सुरवात केली. अर्धें अधिक बांधकाम झाले आणि जोराच्या पावसाने सर्व बांधकाम जमीनदोस्त झाले. वित्तहानी झाली असती तर श्रीगुरु डगमगले नसते पण प्राणहानी झाल्यानें त्यांचे मन कच खावूं लागले. वास्तविक कितीही अडीअडचणी आल्या तरी हातीं घेतलेले काम हर प्रयत्नाने शेवटास न्यावयाचे हा मोठ्या व्यक्तींचा विशेष असतो. 'न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः' असें वचन आहे. श्रीगुरु कच खात आहेत हें श्रीमन्महाराजांच्या कानांवर जाताच त्यांनी श्रीगुरूंस ''श्रेयांसि बहु विघ्नानि- चांगल्या कामास हजारो विघ्ने येणे सहाजिक आहे. तरी आरंभिलेले जीर्णोद्धाराचे काम अर्धवट सोडणें बरें नव्हें. पुन्हां पोवळी बांधा.'' असें सांगून पाठविल्यानें श्रीगुरु तें कार्य अधिक तत्परतेनें करूं लागले.

श्रीगुरूंच्या मनाने पोवळीचे काम बदामीहून तांबडा दगड आणून पुरें करण्याचे होते. पण ते त्रासाचे आहे या भीतीनें, त्यांनी कपत डोंगरांत सांपडणाऱ्या काळ्या दगडांनी ओवऱ्या बांधण्याचा विचार केला. परंतु तो विचार श्रीवेंकटपतीस न रुचल्यानें बांधकाम ढासळलें. एकदां नव्हे तर दोनदां असें झालें. मग मात्र श्रीगुरूंनी स्वतः बदामीस जाऊन मोठमोठे दगडी खांब, तुळया, माळ्यावरील फरशी सर्व तेथेंच तयार करवून घेऊन ते पाठवूं लागले. ते पाठविणें तसें सोपें नव्हते. महिना महिना वाट पाहून देखील वाघिणी मिळत नव्हत्या. तशातून हर प्रयत्नानें वाघिणी मिळवून, ते दगड रवाना करीत असत. ते दगड गदगला येत. पण तेथून १५ मैलावर श्रीवेंकटपुरास नेणें हें फार कष्टाचें काम होते. ते दगडी खांब काय किंवा तुळया काय सर्व साधारण चौकोनी असत. ६-७ हात लांबीचे, एक हात रुंदीचे व एक हात जाडीचे ते दगड असत. त्यांची वहातूक करून नेणें अतिशय दुर्धर कार्य होते.

आसपासच्या कोणत्याही बाजूनें वेंकटपुरास जाण्यास वाट नाहीं अशा डोंगराळ भागांत ते असल्यानें प्रथम श्रीगुरूंना त्यासाठीं गदग-कळसापूर-नागावी-बेलधडी-कबलायतकट्टी असा गाडीमार्ग तयार करावा लागला. त्यालाच हजारो रुपये खर्च आला. वडारी लोक बैल व रेडे जुंपून आपल्या गाड्यातून युक्ती प्रयुक्तीने सावकाशपणें दगड आणीत असत. १५ मैल अंतर तोडून मालाची एक खेप करणेस त्यांस दोन क्वचित्प्रसंगी तीन दिवसही लागत. अशा तऱ्हेने अतिप्रयासाने त्यांनी ती कामगिरी पुरी केली. त्याकडे नजर टाकली असतां असल्या अरण्यांत एवढ्या प्रचंड शिला गुरूंनी कशा आणविल्या असतील या विचारांनी कल्पनातीत आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

श्रीगुरूंनी जरी एवढ्या अचाट कामाचा बोजा शिरावर घेतला होता तरी ते त्यापासून पूर्ण अलिप्त असल्यासारखें वागत होते हे त्यांच्या इतर हालचालींवरून सुस्पष्ट होण्यासारखे आहे. आपल्या सच्छिष्यांच्या अनेक प्रापंचिक अडचणींचे निवारण करण्यासाठी, त्यांच्या अभिलाषा फलद्रूप करण्यासाठी, तसेंच आपल्या सद्‌गुरूमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें श्रीरामनामाचा प्रसार करण्यासाठीं त्यांचा संचार चालूच असे. म्हणून तर त्यांनी आपल्या गैरहजेरीत बांधकामाची हेळसांड होऊं नये व ते सुगमरीतीनें चालू रहावे एवढ्याचसाठीं श्रीगुरूंनी कर्तव्यदक्ष, कार्यकुशल व निष्ठावान अशा वे. तिरकंभट काशीकर या नांवाच्या होंबळच्या सद्‌भक्तांची त्या कामीं नियुक्ति करून त्यांस वेंकटापुरांतच रहाण्यास सांगितले होते. श्रीगुरूंवर त्यांची अचल श्रद्धा व भक्ति होती. त्यांनी आपले तन, मन, धन, श्रीगुरूंस अर्पण केले होते.

वे. तिरकंभट यांची श्रद्धा व निष्ठा श्रीगुरूंवर जडण्याचे बाबतीतील घटना जरा अतर्क्यच म्हटली पाहिजे. वे. तिरकंभट होंबळ येथे रहात असत. त्यांचे आराध्य दैवत श्रीशंकर. दररोज भक्तिभावाने ते शंकर लिंगाची आराधना करीत असत. दररोज उद्धाराचा मार्ग दाखीव म्हणून त्यास प्रार्थना करीत असत. एके दिवशी शंकरलिंग त्यांचे स्वप्नात आले व श्रीगुरूला शरण जा म्हणजे तुझी इच्छा पूर्ण होईल असा त्यांस दृष्टान्त झाला. तेथपासून वे. तिरकंभट श्रीगुरूंच्या शोधात होते. एक दिवस श्रीब्रह्मानंदगुरु होंबळला आले ते वे. तिरकंभटांस नांवाने हांक मारीतच आले. श्रीगुरूंचे झळकणारे तेज पाहून त्यांचे डोळे दिपले व त्यांनी हेच आपले उद्धारकर्ते असें दृढ ठरविले व सर्वस्व श्रीगुरूंस अर्पण करून श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे साधनतत्पर बनून ते अखंड श्रीगुरूंच्या सेवेत राहू लागले.

श्रीगुरूंची वेंकटापुरी राहण्याची आज्ञा होताच वे. तिरकंभटजी वेंकटपुरांत राहून जीर्णोद्धाराचे कामी अतिशय दक्ष राहू लागले. इतकें की, वडारी, लोणारी लोकांबरोबर दगड फोडणे, बांधकामाचे वेळी चुन्याच्या व दगडाच्या पाट्या उचलून देण्याचे श्रमाचे कामी देखील ते आत्मीयतेनें वागत असत. एक-दोनदा तर त्यांस बदामीला जाऊन दगडदेखील आणावे लागले. एका खेपेस गुर्वाज्ञेप्रमाणें बदामीस जाऊन त्यांनी मापाप्रमाणे दगडी खांब व तुळया तयार करवून घेतल्या. पण माल चढविण्यास रेल्वेच्या वाघिणी उपलब्ध नसल्याने ते विवंचनेत होते. त्याच सुमारास श्रीगुरु गदगहून पंढरपुरास चालले होते. बदामी स्टेशनवर त्यांनीं श्रीगुरूंचे दर्शन घेऊन त्यांस नमन करून सर्व वृत्तांत निवेदन केला. त्यांचे मनांतून माल रवाना करून पंढरपूरला जावयाचे होते. पण त्यांनी ते मनांतच ठेविले. श्रीगुरूंनी ते जाणून ''विचार कसला करतोस ? श्रीराम तुला अनुकूलता करून देईल. त्यानंतर तू पंढरपुरास निघून ये'' असे सांगितले.

श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे दुसरेच दिवशीं भरपूर वाघिणी मिळाल्या व सर्व दगड त्यांत लादले गेले. पुढील गाडीनें पंढरपुरला जावयाची त्यांची तयारी झाली. पण खर्चास पुरेशी रक्कम जवळ नसल्यानें ते विवंचनेत असतां गदगहून येणाऱ्या गाडीत श्री. भीमराव गाडगोळी वकील होतें. त्यांनी बदामी स्टेशनवर वे. तिरकंभटास हांक मारून श्रीगुरूंनी तुम्हाला पंढरपुरास आणण्यास मला बजावले आहे. तुम्ही गाडींत बसा. मी तिकीट काढून आणतो असें सांगितले. तें ऐकून श्रीगुरूंचें अंतर्ज्ञान व त्यांचा अगाध महिमा याचा प्रत्यक्ष अनुभव पटल्यानें ते मनाशीच आश्चर्य करूं लागले.

श्रीवेंकटापुरचे बांधकाम भव्य असे आहे. भोंवतालीची पवळी व श्रीगुरूंचे मंदिर अत्यंत प्रेक्षणीय आहे. देवालयाला लागून सभामंडप तयार झालेला आहे. ते सर्व कार्य भक्त मंडळींच्या उदार आश्रयावर पार पडले आहे. श्रीब्रह्मानंद महाराजांच्या हयातींत देवालयाचे व पवळीचें काम संपूर्णपणें संपलेले होते. शंकर व वराह या देवळांच्या लगतचा महाद्वाराजवळील सभामंडप, श्रीगुरूंच्या समाधीचे बांधकाम, श्रीमारुतीचे, श्रीदेवीचे व श्रीगोविंदराजाचे अशीं देवळे श्रीगुरूंच्या हयातीतच झाली होती. दक्षिणेकडील बाजूस असलेला पांथस्थ लोकांना उतरण्यासाठी बांधलेला मंगलोरी कौलांचा बंगला, पत्र्याचे स्वयंपाकघर, जनावरे बांधण्याचा गोठा वगैरे इमारती जवळ जवळ श्रीगुरूंचे हयातीतच तयार झाल्या होत्या म्हटले तरी चालेल. देवळाचे शिखर मात्र त्यांनी बांधले नव्हते. ज्यांनी देऊळ बांधले त्यांनी शिखर चढवू नये असे श्रीगुरू वरचेवर बोलून दाखवीत असत. मात्र त्यासाठी त्यांनी ६००० रु. चा निधि जमवून व्यवस्था करून ठेवली होती. ती रक्कम त्यांनी आपले पुतणे श्री. भीमराव गाडगोळी वकील यांच्या हवाली केली होती. त्याप्रमाणें शिखराचें काम आतां पूर्ण झाले आहे.

श्रीवेंकटापूर संस्थेच्या व्यवस्थेकरतां श्रीब्रह्मानंदगुरूंनी पंचांची नेमणूक केली होती. त्यांत (१) श्रीपादभट्ट गुडगेरी (२) शिरहट्टीचे श्री. आडवेप्पा मंगसुळी सावकार व (३) सोरटूरचे श्री. बंडेप्पा कुलकर्णी यांचा समावेश होता. श्रीपादभट्ट हे बालब्रह्मचारी होते. सुमारे ३० वर्षांहून अधिक काळ ते गुरूंचे शिष्य होतें. तेच वेंकटापुरचा सर्व कारभार जबाबदारीनें पहात असत. सध्यां ते हयात नाहींत. श्री. आडवेप्पा हे श्रीब्रह्मानंदगुरूंविषयीं तसेंच श्रीवेंकटापूर क्षेत्राविषयी अत्यंत श्रद्धा बाळगणारे व तनुमनधनानें मदत करणारे सद्‌गृहस्थ होते. तेही हयात नाहीत. या तिघांच्या संमतीनें वेंकटापूर संस्थेचे नित्य नैमित्तिक कार्य व ने-आण व्यवस्थित तऱ्हेने चालून हिशोबाचे कामही चोख ठेवले जात असे.

श्रीवेंकटेश देवालयाकरतां डंबळच्या देसायांनी २०० रु. उत्पन्नाच्या जमिनी कूडलगी मठपतीच्या स्वाधीन केल्या असल्याचा वृत्तांत वाचकांच्या लक्षातं असेलच. श्रीगुरूंच्या हयातीतच त्या त्यांचेकडून देवस्थानच्या नांवें परत करून घेण्यात आल्या. या देवस्थानचे जुन्या मानानें, वार्षिक कायम उत्पन्न सरासरीनें ५००-६०० रूपयापर्यंत होते. आतां ते वाढलें असेल. श्रीवेंकटापुरास येणाऱ्या भक्तांच्या निमित्ताने होणाऱ्या दैनंदिन अन्नसंतर्पण खर्चासाठी मुळगुंद, शिरहट्टी, सोरटूर वगैरे गांवचे प्रमुख लोकांनी तांदूळ, डाळ वगैरे कच्ची शिधासामुग्री पुरविण्याचा श्रीगुरुमहाराजांसमोर तोंडी करार केला होता. त्याचे पालन आजतागायत त्या ग्रामस्थानी चालविले आहे. हे खरोखर अभिनंदनीय व भूषणावह आहे. नित्य नैमित्तिक उत्सवाकरितां वर्षासनाची पद्धत आंखून दिल्याने येथील सेवा कार्यास खरोखरच ती फार अनुकूल आहे. हल्लीं पंच मंडळी बदलली आहेत. ती पुढीलप्रमाणे - (१) विरुपाक्ष धोंडे मंगसुळी वकील, मॅनेजिंग ट्रस्टी, शिरहट्टी (२) रामचंद्र चिदंबर कुलकर्णी, चिकहंदिगोळ (३) तिरको लक्ष्मण वैद्य, सोरटूर.

येथें दररोज पहाटें कांकड आरति होते. दुपारीं महाभिषेक, महापूजा, नैवेद्य, आरति असा कार्यक्रम असतो. नैवेद्याचे वेळीं केलेला सर्व स्वयंपाक, भांड्यासह श्रींपुढे मांडण्यात येतो. त्यानंतर भक्त, सेवेकरी, अतिथि अभ्यागतासह भोजनप्रसादाचा कार्यक्रम असतो. संध्याकाळी भजन, आरति वगैरे नित्य उपासना चालते. प्रत्येक शुक्रवारी पालखीसेवेचा सोहळा असतो. येथील सोवळे कडक असते. सायंकाळी भोजन नसते. श्रीगुरूंनी जीर्णोद्धाराचे निमित्ताने विशेष वास्तव्य वेंकटापुरातच ठेवल्याने बेलधडी भजनी पद्धतीप्रमाणे तेथेही त्यांनी नित्य नेमास सुरवात करून दिली आहे.

येथील स्वयंपाक पाण्याची व्यवस्था येथे सेवेकरिता येऊन राहिलेल्या बायका व श्रीगुरूंचे शिष्य मोठ्या दक्षतेने करतात. भाद्रपद वद्य पक्षांत निर्वाणदिनाच्या निमित्ताने श्रीब्रह्मानंदगुरूंची आराधना होते. त्यावेळीं श्रीगुरूंच्या पादुका व फोटो स्थापलेल्या सभामंडपात भाद्रपद वद्य अष्टमीपासून भाद्रपद वद्य अमावस्येचे दुपारपर्यंत सतत भजन चालू असते व अन्नसंतर्पणही बरेंच होते. पुन्हा आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून आश्विन शुद्ध दशमी, विजयादशमीपर्यंत श्रीवेंकटपतीचा नवरात्रोत्सव मोठ्या थाटाने होतो. त्यावेळी तेथें दररोज ५००-६०० लोकांस अन्नसंतर्पण होते. मकर संक्रमणाचे पूर्वी येणाऱ्या द्वादशीस (हिला मुक्कोट द्वादशी असें म्हणतात) येथे धनुर्मासाचे निमित्त खिचडीचा नैवेद्य असतो. त्या दिवशीही सुमारें ५०० पर्यंत पान होते. दर शुक्रवारच्या पालखी सोहाळ्यास मुळगुंद, शिरहट्टी व सोरटूर येथील लोक फार करून येतात. तेथें कायम राहणाऱ्या लोकांची संख्या ८-१० पेक्षा जास्त नसते. पण रोज येणारे जाणारे भक्त प्रत्यहीं असतातच. पांथस्थांच्या येथे कित्येक इमारती झाल्या आहेत. विशेषतः कर्नाटकातील सगळ्या भागांतील लोक येथें वरचेवर येत असतात. वेंकटापूर हे शिरहट्टी पोष्टाच्या कक्षेखाली येणारे गांव आहे. हे गदगपासून बेलधडीमार्गे १५ मैल अंतरावर असून शिरहट्टीपासून अवघ्या ४ मैलावर आहे.

श्रीवेंकटापूरचे देवालय फार भव्य आहे. ते निसर्ग सौंदर्याने नटलेले आहें. शिखर फार मनोहर आहे. पवळीचा प्राकार फार सुंदर आहे. देवस्थानच्या समोर ज्या काही पवळ्या आहेत त्या वेगवेगळ्या भक्त लोकांनी बांधलेल्या आहेत. उत्तर भागाची पवळी मलीकवाडच्या देशपांड्यांनी बांधविली असून दक्षिण भागाची पवळी होंबळचे बसनगौडा यांनी बांधलेली होती. येथें देवस्थानचें पटांगणांत एक मोठा अश्वत्थवृक्ष होता. इमारतीचे कामास जेव्हां

सुरवात झाली तेव्हां त्या वृक्षापासून अडचण होऊ लागल्यामुळे श्रीब्रह्मानंदगुरूंनी तो तोडविला. त्यावेळी त्या अश्वत्थवृक्षाच्या बुंध्यात एक गणपतीची मूर्ति सांपडली होती. ती देवालयात ठेवण्यात आली असून अद्यापही तो तेथें आहे. पुढच्या बाजूला गोविंदराजाचे देऊळ आहे. ते पूर्वाभिमुखी आहे. या देवळाजवळच गोशाला व सूपशाला आहे. त्या लगतच उत्सव काळांत गरज भासल्यास ब्राह्मण भोजनासाठीं विस्तृत पटांगण आहे. तेथें मांडव उभारण्याची सोय आहे. श्रीवेंकटेशाचे स्थान खरोखर इतके रमणीय आहे कीं पाहतां क्षणींच प्रत्येक भाविक माणसाचे मनांत भक्तिभाव उचंबळून आल्याशिवाय रहात नाहीं. तसेच येथें राहून साधन करावें असेंही वाटल्याशिवाय रहात नाहीं. कारण साधन करणेंसं हें स्थान रम्य, अतिशय शांत, जगाच्या गजबजाटापासून दूर असल्याने अत्यंत पोषक असें आहे.

श्रीगुरूंचे वेंकटापूरच्या वातावरणांत जसजसें अधिक वास्तव्य होऊं लागले तसतसें तेथील थंडीतापाने त्यांच्यावर आक्रमण करण्यास सुरवात केली. अखेरीस थंडीतापानें त्यांस चांगलेच पछाडले. तरी देखील त्यांनी आपला नित्य नेम, भजन, आरति व संचार यथाप्रकार चालूंच ठेवला. ते बहुत करून गांवोगांवी पायींच संचार करीत असत. पायांत पादुका देखील घालीत नसत. दिवसें दिवस थंडीतापानें त्यांची अशक्तता वाढत होतीच. त्यांतच अशक्तता वाढणेस आणखी एक कारण घडले. एकदां बल्लारी, होसपेठ या भागांतील त्यांच्या शिष्यांच्या आग्रहामुळे ते तिकडे गेले होते. पुष्कळ भक्त लोक अत्यंत आदरानें त्यांस आपल्या घरीं नेत व त्यांची पूजा करीत. एका अभक्ताच्या मनांत कुकल्पना शिरली व त्यानें खाण्याच्या पदार्थांत वीष कालविले. श्रीगुरूंच्या समोर कोणताही पदार्थ ठेवून तो त्यांस अर्पण केला असतां ते त्याचा श्रीसद्‌गुरुनाथांस नैवेद्य दाखवून नंतर तो सर्वांस वांटून मग आपण सेवन करीत असत. या त्यांच्या पद्धतीची जाणीव त्यास नसावी. कारण त्या नास्तिकानें तो विषमिश्रित पदार्थ त्यांचेसमोर ठेवला व भाविक माणसाप्रमाणे श्रीगुरूंस नमस्कार करून तो लोकांच्या घोळक्यांत लांब, मागें जाऊन उभा राहिला. आतां श्रीगुरु तो पदार्थ स्वत: खातात कीं सर्वांस वाटतात इकडे त्याचे लक्ष एकवटले होते. त्या दिवशी श्रीगुरूंनी नेहमीप्रमाणे श्रीमन्महाराजांना नैवेद्य दाखविला. पण नंतर कोणासही त्यांतील प्रसाद न वाटतां त्यांनी एकट्यांनीच तो भक्षण केला. ते पाहतांच आपलें इच्छित कार्य पार पडले या समाधानात तो दुष्ट नास्तिक लगेच तेथून निघून गेला. इतर लोकांस मात्र आश्चर्य वाटल्यावांचून राहिले नाही.

त्यानंतर एकदोन दिवसांतच श्रीगुरूंनी तेथून तळ हलविला व ते वेंकटापुरास आले. थोडेच दिवसांत ते वीष त्यांच्या सर्वांगात भिनले व त्यांचे अंगावर मोठमोठे फोड उठूं लागले. वरचेवर पोटही झाडूं लागले. अशक्तता वाढली. हातापायांच्या काड्या होऊ लागल्यानें पोटही मोठे दिसू लागले. त्यांच्याजवळची मंडळी त्यांस औषध घ्या म्हणून आग्रह करूं लागली. त्यांना उद्देशून एक दिवस श्रीगुरु म्हणाले, ''आम्हाला संन्याशाला कशाला औषध ? तुमच्यासारखे आम्ही प्रापंचिक थोडेंच आहोंत ? आम्ही मेल्यांस आमच्यामागं रडणारे तरी कोण आहे ? श्रीमन्महाराजांनी दिलेले आहे ना रामनाम औषध, ते औषध सामान्य समजू नका. ते किरकोळ रोगांचे तर भस्म करतेच शिवाय भवरोगसुद्धा घालविते.'' तेव्हांपासून स्नान होताच श्रीवेंकटपतीच्या चरणावरील गंध घेऊन ते तीर्थांत कालवून त्या गंधाने आधीं आपल्या वक्ष:स्थळावर 'श्रीराम' असें लिहून मग कपाळावर त्याच गंधाने नाम लिहिण्यास त्यांनी सुरवात केली. आश्चर्याची गोष्ट अशी की, या त्यांच्या विश्वासपूर्वक केलेल्या गंधलेपनाने विषबाधा नाममात्रसुद्धां शिल्लक राहिली

नाही. वयोमानानुसार व देहधर्माला अनुसरून अशक्तता मात्र कायम घर करून राहिली. अशांतच ते प्रचारकार्यासाठी गांवोगांव हिंडत असत. श्रीब्रह्मानंदगुरूंना विषबाधा झाली ही हकीकत कोणासच माहीत नव्हती. परंतु बल्लारीचे व होसपेठकडील शिष्य-मंडळी दर्शनास आल्यावर श्रीगुरू गमतीनें हांसत हांसत त्यांना ''आम्हाला विष घालणेकरतां आपल्या गावीं घेऊन गेला होता नव्हे का ? परंतु श्रीमन्महाराजांच्या कृपेनें त्यातूनही आम्ही पूर्ण बरे झालो.'' असे म्हणत असत. हे उद्‌गार नेहमी श्रीगुरुंच्या सान्निध्यांत असणाऱ्या श्रीपादभट गुडगेरी यांनी ऐकले होते. त्यांच्या तोंडून ही हकीकत पुढें सर्वत्रांस ज्ञात झाली.

ज्यावर्षी श्रीगुरूंनी स्वयंपाकघर व गोशाला बांधविली त्या वर्षी त्यांनी वेंकटरमणाला लक्ष तुलसी वाहिल्या. तो कार्यक्रम सुमारे पंधरा दिवस चालला होता. अर्थात् वहिवाटीप्रमाणे यावेळीही हजारो लोक जमले होते. कीर्तन, पुराण दररोज होत होते.

दररोज तुळशी आणणेसाठी १५-२० भक्तगण त्यासाठी दोन तीन कोस लांब जात असत. त्या लोकांपैकी छब्बीचे ३-४ भाविक भक्त दररोज पहाटे उठून, प्रातर्विधी आटोपून देवाची कांकडारति होतांच तुळशी आणण्यासाठी तेथून बेलधडीस जात असत. श्रीगुरूंची दक्षता एवढी असें की, निघण्यापूर्वी त्यांस ते पुरेसा फराळ बांधून देत असत. तो घेऊन डोंगरातील पायवाटेने दोन तास दिवस येण्यापूर्वी ते बेलधडीस पोंचत असत. जातांच, श्रीरामचंद्राचे दर्शन घेऊन नंतर रामतीर्थाला जात असत. रामतीर्थ हा मळा आहे. तेथें नाना तऱ्हेची फुलें व तुळशी पुष्कळ असत. श्रीगुरूंनीच ही व्यवस्था रामदेवासाठी करविली होती. दोन तासपर्यंत ते लोक आपल्याला पाहिजे तितक्या तुळशी व फुले घेऊन नंतर स्नान करीत. संध्या व जप करून, रामतीर्थाच्या कांठावर असलेल्या पादुकांवर तुळशी वाहून बरोबर आणलेला फराळ पोटभर खात असत. नंतर तेथून निघून १२ वाजणेचे आंत वेंकटापुरास परत येत असत.

एके दिवशी तुळशी घेऊन परत जातांना प्रखर उन्हानें त्यांस फार तहान लागली. तहानेने कांसावीस होऊन मार्ग कष्टाने आक्रमीत असतां त्यापैकी एकजण दुसऱ्यास, नारायणभट्टास, ''तहान फार लागली आहे. जवळपास पाणी नाहीं. ऊन तर मी म्हणत आहे. पुढे पाऊल टाकणे मुष्कील झाले आहे'' म्हणाला. नारायणभट्टही ''मलाही तसेच झाले आहे. यावेळी श्रीगुरूंनी आम्हांस येथे दोन लाडू व पाणी पाठवून दिल्यास बरें होईल'' असे म्हणाला. बरोबरचे दुसरे दोघे ''आतां वेंकटापूर फार दूर नाहीं. एक मैलसुद्धा नाही. आधींच रोजच्यापेक्षा उशीर झाला आहे. तरी लवकर जाऊ या'' म्हणाले. सर्वजण हळूहळू थोडे गेले असतील नसतील इतक्यांत समोरून श्रीगुरु एका शिष्यास बरोबर घेऊन त्यांच्याकडे येत असलेले पाहून, ''हा स्नान करून तुळशी घालण्याचा समय असतां यावेळी हे इकडे कोठें निघालें असावेत'' असा आश्चर्यचकित होऊन विचार करू लागले. तोंच श्रीगुरु लिंबाच्या झाडाच्या सावलीत बसल्याचे त्यांस दिसल्याने तेही गडबडीनें तेथवर गेले व त्यांनी श्रीगुरूंच्या पायावर डोकें ठेवून नमस्कार केला.

श्रीगुरूंनी मंद हास्य करीत बरोबरच्या शिष्यास ''ए रामभट्टा ! उगीच उभा काय राहिलास ? हे उन्हांत तहानेनें मरत आहेत. लवकर पाणी आणून त्यांना लाडू व पाणी दे'' अशी आज्ञा केली. श्रीगुरूंचे हे भाषण ऐकून, त्यांचे भक्तावरील वात्सल्य आठवून प्रत्येकांस दुःखाचा उमाळा आला. तोंडातून शब्द बाहेर फुटेना. अवाक् होऊन ते श्रीगुरूंच्या पायावर लोळू लागले. श्रीगुरूंनी ''खुळ्यासारखे काय करतां ? प्रथम हे घ्या'' म्हणून प्रत्येकास दोन-

दोन लाडू व पाणी दिले. 'एका क्षणापूर्वीच तुम्ही (श्रीगुरूंनी) मी येथें येऊन तुम्हांस लाडू व पाणी दिले तर ठीक होईल असे म्हटले होते ना ? त्यावेळी लाडू व पाणी याच्यावर तुमची वासना गेली होती. ते पदार्थ तुम्हाला मिळालेही. असले जड पदार्थसुद्धा उत्कट इच्छेने जर स्मरण करतांच मिळतात तर सगळीकडे सचेतन रूपांत भरून उरलेल्या त्या भगवंताचे स्मरण करताच तो कां मिळणार नाही ? याचा विचार करा. तो मिळावा अशी उत्कट इच्छाच मुळी आपल्यांत नसते. म्हणून तो मिळत नाही. एवढेंच.'' ''तुळशी वाहण्यास उशीर होत आहे. लवकर चला.'' असे म्हणून श्रीगुरु उठून चालू लागले व ते सर्व लोक मनांत खजील होत्साते त्यांचे मागोमाग गेले.

आपल्याला कष्ट पडले तरी उपदेश पटवून तो गळी उतरविण्याची एकही संधी श्रीगुरु फुकट दवडीत नसत. श्रीगुरु लाडू व पाणी घेऊन आले नसते तरी ते लोक तुळशी घेऊन गेल्याशिवाय रहात नव्हते. श्रीगुरूंची तऱ्हाच अशी होती की, लोकांना जेऊ खाऊं घालून, हसत खेळत ते त्यांना परमार्थाच्या मार्गास लावीत असत. असे प्रसंग वरचेवर घडवून आणीत असल्याने त्यांच्या प्रत्येक प्रसंगीच्या वागणुकीवरून अनेक तऱ्हेचा बोध लोकांच्या हृत्पटलावर कोरला जात असे व स्वाभाविकच त्यांच्यात सद्भावना निर्माण होत असे.

त्या पुण्यक्षेत्रीं वेंकटपुरांत दोन वेळां तुळशीअर्चन, कोटिनामजप, अनेकवार नामसप्ताह वगैरे धार्मिक कृत्यें श्रीगुरूंच्या हयातीत झाली. येथें सुद्धां श्रीगुरूंनी श्रीरामसंस्थान बेलधडी येथें असते त्याप्रमाणें प्रत्यक्षांत छत्र, चामर, मकर, तोरण, पालखीवाहन रथ, चौघडा, ताशे वाजंत्री वगैरे राजवैभव वाढविले होते. येणाऱ्या जाणाऱ्या भक्तांसाठी अन्नछत्राचाही प्रारंभ केल्याचें पूर्वीं आलेच आहे. उत्सवप्रसंगी लागणाऱ्या मोठमोठ्या भांड्यांचा, तसेंच दररोजच्या अन्नछत्राच्या कामीं उपयोगी पडणाऱ्या लहान भांड्यांचाही श्रीगुरूंनी संग्रह केला होता. अलीकडे तर बेलधडी, बेटगिरी, अश्वत्थपूर, हंदिगोळ, छब्बी, होंबळ, मुळगुंद, शिरहट्टी, सोरटूर वगैरे आसपासच्या अनेक गांवचे भाविक भक्तांनी आपआपल्या गांवचे वतीनें एक एक खोली देवालयाच्या प्राकाराभोवती बांधण्याचा मनोदय व्यक्त केला.

श्रीगुरूंच्या अखेरच्या वास्तव्यात तर बहुश: दररोज १५-२० येणारे जाणारे लोक असत. शिवाय नामस्मरणाचे निमित्ताने श्रीगुरू लोकांना वरचेवर पाचारण करून जमवीत असत ते वेगळेच. धनुर्मासात तर श्रीगुरूंच्या हौसेला पारच रहात नसे. एक महिनाभर दररोज, गिरी येथील श्रीवेंकटपतीला अरुणोदयापूर्वी अभिषेक, महापूजा, महानैवेद्य होत असे. नैवेद्यास दररोज खिचडी, चिंचेचे सार, बाजरीची भाकरी, वांग्याचे भरीत तसेंच ताजे लोणी असा नेम होता. त्याप्रमाणें आजवर तो चालत आला आहे.

देवास पृथक् असें मनोहर शय्यागृह, पुष्करणीचे वाटेवर दीपमाळ असून देवाच्या मागील पोवळींत श्रीदत्तगुरूंच्या पादुका स्थापन केलेल्या आहेत. वास्तविक जीर्णोद्धाराचे वर्णन येथे संपले असले तरी त्या देवस्थानातील स्वयंभूमूर्तीबद्दल यथासांग वर्णन येथें करणे अनुचित होणार नाही या आत्मविश्वासाने तें येथें करीत आहे.

पूर्वी शेणाच्या व कचऱ्याच्या ढिगाऱ्याखाली श्रीवेंकटरमणाची ताज्या फुलांचा हार घातलेली, रेखांकित मूर्ती खणतांना मिळाल्याचे वर्णन येऊन गेलेच आहे. त्यावेळी श्रीलक्ष्मीदेवीची स्वयंभूमूर्ति जवळ नव्हती. गाभाऱ्याचे बांधकामाचे वेळीं श्रीवेंकटपतीच्या डावे बाजूस जमिनीच्या थोडा वर आलेला एक काळा दगड वाईट दिसतो म्हणून

तो फोडून जमीन सारखी करण्याचे ठरविले होते. हें श्रीगुरूंस समजताच त्याच दगडांतून पुढें श्रीलक्ष्मीदेवीचा उद्भव होणार आहे हे अंतर्ज्ञानानें ओळखून, श्रीगुरूंनी तो दगड फोडूं नका असे निक्षून सांगून तहकूब करविले होते. अजाणतेपणानें कितीतरी दिवस येथील पुजारी भाविक भक्तांचा नारळ त्या दगडावर वाढवून प्रसाद देत असत. ही सांगोवांगी गोष्ट नसून लेखकाने स्वतः पाहिलेली 'चक्षुर्वैसत्यम्' हकीकत आहे. एक दिवस जेव्हां हे श्रीगुरूंच्या दृष्टोत्पत्तीस आले, तेव्हां त्यांनी "लक्ष्मीदेवीच्या डोक्यावर नारळ फोडतां की रे ! किती धड्ड तुम्ही ! यापुढे तसें करूं नका" असें सांगून टाकल्यापासून ती प्रथा बंद पडली. तेव्हांपासून श्रीवेंकटरमणाबरोबर दगडाची - श्रीलक्ष्मीचीही पूजा त्यांनी सुरूं करविली. सर्वांस श्रीगुरूंच्या उक्तीचे आश्चर्य वाटून जेव्हां त्यांनी त्या दगडाचे सूक्ष्म निरीक्षण केले तेव्हां श्रीलक्ष्मीदेवीची रेखांकित रूपरेषा त्यांच्या नजरेस पडली. तो दगड आतां जमिनीतून बराच वर आला असून त्यावर श्रीलक्ष्मीदेवीचे सर्व अवयव सुस्पष्ट दिसत आहेत. श्रीवेंकटपतीच्या मूर्तीचे सर्व अवयव सुस्पष्ट दिसत असून त्याचे पाय जे पूर्वी जमिनीलगत होतें ते आतां चांगले चार बोटे वर आले असल्यानें पायावर डोके ठेवून उत्तम दर्शन घेता येते. कले-कलेने दररोज वाढणाऱ्या या श्रीवेंकटपतीच्या व श्रीलक्ष्मीदेवीच्या मूर्ती कुशल कारागिरानें मेहनतपूर्वक घडवून तयार केलेल्या मूर्तीपेक्षा नयनमनोहर व सुबक दिसत आहेत.

येथील पूजा आदि सेवेकरितां श्रीगुरूंनी काहीं भाविक लोकांस तेथे कायम ठेवले. तेथील सेवेकऱ्यांनीं विशिष्ट प्रकारानें वागावें म्हणून त्यांनी त्यांस काहीं नियम घालून दिले. एवढ्यावरच न थांबतां स्वतः तेथें राहून त्या नियमाबरहुकूम त्यांनी आचरण करून दाखविले. त्या नियमांचा तपशील खालीलप्रमाणे -

रोज अरुणोदयापूर्वी उठून प्रातःस्मरण व मुखमार्जनादि संपवून देवाच्या शय्यागृहाजवळ यावें. सुस्वर कंठाने 'उठि उठि' हे पद्य चौघडादि वाद्यांच्या गजरांत म्हणून देवाला जागें करून मग गाभाऱ्याचे दार उघडावे. त्यानंतर देऊळ स्वच्छ झाडून, सारवून, रंगावलीने सुशोभित करावे. नंतर देवाला काकडारति करावी. काकडारति संपताच सगळ्यांनी मिळून 'जयराम सिताराम' म्हणून देवळाभोवती ५ प्रदक्षिणा घालाव्यात. त्यानंतर क्रमानें श्रीमारुति, श्रीदेवी, श्रीगोविंदराज, श्रीवराह, श्रीशंकर, श्रीसद्गुरू, श्रीदत्तात्रेय, श्रीगणपति अशा सर्व देवांचे दर्शनास जावें. मुखाने अखंड श्रीराम नामस्मरण करीत जावें. या कार्यक्रमाचे वेळी एकाने पुढे जावून प्रत्येक ठिकाणीं लोटून, सारवून रांगोळी घालावी व बाकीच्यांनी क्रमाने सर्व देवांची कांकडारति करावी.

इतका कार्यक्रम पार पडल्यानंतर 'राम राम' म्हणत मळ्यांत जाऊन फुले, तुळशी काढून आणाव्या. देवाचे सकल पूजासाहित्याची यथासांग सिद्धता करून, आंघोळ करावी. संध्यादि नित्यकर्म पुरे करून देवावरील निर्माल्य, वस्त्रालंकार वगैरे काढून पंचामृतानें व सुगंधी तेलाने स्नपन करून अभिषेक करावा. शुद्ध व स्वच्छ अशा वस्त्राने देव पुसून कोरडा करावा. गंध लेपन करून, वस्त्रालंकार घालून, पुष्प मालांनी देवास सजवावा. हा कार्यक्रम मध्यान्हीं १२ वाजणेचे आंत संपला पाहिजे. त्यानंतर धूपदीप ओवाळून शिजविलेले सर्व अन्न अगोदरच देवापुढे सारवून रांगोळी घातलेल्या जागीं ठेवावें आणि महानैवेद्य दाखवावा. त्यानंतर क्रमानें श्रीगणपति, श्रीमारुति, श्रीसद्गुरु यांची आरति करावी. दरम्यानच्या काळांत भोवतालीं असलेल्या श्रीमारुति, श्रीदेवी वगैरे सर्व देवळांत जाऊन पूजा उरकून यावें. सर्व देवांची पूजा झाल्यानंतर तीर्थप्राशन करावे व आलेल्या अतिथी अभ्यागतांचे बरोबर भगवंताचें स्मरण करीत भोजन करावें.

भोजनोत्तर थोडी विश्रांति घेऊन संध्याकाळी ४ वाजतां नित्यनेम आटोपून ५ ते ६ वाजेपर्यंत देवापुढें बसून 'राम, राम' म्हणावें. संध्यासमय होतांच हातपाय धुवून भोवतालच्या देवळांत जाऊन आरती करून यावे. त्यानंतर सायंसंध्या करून सगळ्यांनी मिळून देवापुढे बसून भजनीपद्धतीनें भजन करावें. भजन सुमारे दोनतासपर्यंत करावें. नंतर देवाला धूप, दीप, नैवेद्य करून मागें सांगितल्याप्रमाणे क्रमानें आरति करावी. पद्धतिप्रमाणे सर्व सेवा, स्तोत्रपाठ म्हणून देवाला शेजारति करून झोंपवावें. हें झाल्यानंतर तीर्थप्रसाद घेऊन सगळ्यांनी मिळून जेवण करावे. भोजनोत्तर परमार्थासंबंधी चर्चा करून १० वाजलेनंतर भगवंताचे ध्यान करतां करतां विश्रांति घ्यावी. आयुष्य वाया न घालविता सदासर्वदा रामनामांत असावें हाच या सर्वाचा इत्यर्थ नाही काय ?

श्रीगुरूंनी आखून दिलेली दैनंदिन पद्धति आजतागायत अव्याहत चालू असलेली दिसते. ती श्रीगुरूंच्या तपोबलाच्या जोरावरच नव्हे काय ? आमच्यासारख्या मतिमंद पामरांचे इच्छेने ती चालू राहणें अशक्य आहे. कारण ठरविलेली कोणतीही साधी गोष्ट ओळीनें तीन दिवसदेखील सुव्यवस्थितपणें आम्हांस पार पाडतां येत नाहीं. याचा पदोपदी आपण अनुभव घेतच असतो. पूर्वीं याच वेंकटपुरी कोणीही मनुष्य काही तासांपेक्षा जास्त येथें स्थिरावत नसे. मग वस्ती करण्याचे नांवच नकों. तेंच वेकटापुरास भूवैकुंठाची शोभा प्राप्त झाली आहे. यांस कारणीभूत श्रीगुरु, त्यांचे तपोबल, त्यांनी लोकांच्या मनांत विश्वास निर्माण होण्यासाठी घेतलेले परिश्रम व त्यांचे शुद्ध व सदाचरणी आचरण हेंच होय. त्यामुळे मुमुक्षूंना श्रीवेंकटपूर क्षेत्र हें नवविधाभक्तिचे माहेरघर वाटत असल्यास, तसेंच साधकांस निवांतपणें आपलें साधन चालू ठेवून मोक्षप्राप्ति करून घेण्याचे अत्युत्तम स्थान वाटल्यास काय नवल ?

ह्या सुंदर भव्य मंदिराचे व त्यांतील स्वयंभू श्रीवेंकटपति व श्रीलक्ष्मी यांचे दर्शन घडण्यास खरोखरच भाग्य असले पाहिजे. कसल्याही नास्तिकाचे या दर्शनाने हृदय परिवर्तन होऊन त्याचे मनांत भक्तिविश्वास ठाण मांडल्याशिवाय राहणार नाहीं. या स्थानांत अशी काही आकर्षक शक्ति आहे कीं एकदां पाहिल्यानंतर पुनः पुनः तेथे जाण्याची इच्छा लोकांच्या मनांत बळावल्याखेरीज रहात नाही. श्रीशृंगेरी कूडलीमठाचे जगद्‌गुरु श्रीशंकर भारती स्वामी यांनी या रम्यस्थळी एका चातुर्मास्यांत चार महिने मुक्काम ठेविला होता. श्रीगुरूंनी त्यांची व्यवस्थाही चोख ठेविली होती. संतोषित होऊन त्यांनी श्रीगुरूंची प्रशंसा केली व नित्यपूजा, नैवेद्य, नंदादीपासाठी काही जमिनी व संस्थानकडून दरसाल कांही रोख रक्कम श्रीगुरूंना दान दिली.

**।। श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ।।**

# प्रकरण चोविसावें

## अश्वत्थपूरचे राममंदिर व इतर

दक्षिण कन्नड प्रांतांत कारकळ नांवाचा जिल्हा आहे. त्यांत मंगळूर नांवाचा तालुका आहे. तेथील देशस्थ ब्राह्मण पहिल्यापासूनच अत्यंत गरीब स्थितींत होते. साहजिकच त्यांस अत्यंत कष्टाळू जीवन जगावें लागत असे. त्यांचा तेथें चरितार्थ चालत नसल्याने गदग, हुबळी, धारवाडसारख्या शहरांत पोटासाठी स्वयंपाक-पाण्यासारखे जीवनाचे साधन पत्करून ते रहात असत. कर्नाटक प्रांतात श्रीब्रह्मानंदगुरूंचे नांव सर्वतोमुखी झाले असल्याने स्वयंपाकी, पाणके या नात्यानें त्यांना श्रीगुरूंच्या दर्शनाचा लाभ झाला. श्रीब्रह्मानंदगुरूंचे अगाध ज्ञान, उच्च प्रतीचे वैराग्य, दया, शांति वगैरे सद्गुण पाहून ते त्यांच्याकडे आकर्षिले गेले व ते श्रीगुरूंच्या सेवेत निरत झाले. श्रीगुरूंना उत्सवप्रसंगी, यज्ञप्रसंगी, सप्ताहप्रसंगी, हरघडी भोजनाचे कामीं या लोकांचे अपरंपार साह्य होत असल्यानें श्रीगुरूंच्या ते विशेष नजरेंत भरले. पर्यायाने श्रीगुरु त्यांचेवर फार प्रेम करूं लागले.

बिदरहळ्ळी येथील तेरा कोटि श्रीरामनामजपयज्ञाचे प्रसंगी श्रीब्रह्मचैतन्यमहाराज तेथें आल्यावेळीं स्वयंपाक-पाण्यासाठी दोड्डुरामय्या, सण्णरामय्या वगैरे प्रमुख मंडळी आपआपल्या शे-दोनशे हस्तकांसह तेथें उपस्थित झाली होती. त्यापैकीं गुत्ती रामय्याने आपल्या समाजाचे उद्धारार्थ आपण श्रीमन्महाराजांपुढें हट्ट धरला पाहिजे. श्रीगुरु मनावर घेत नाहींत. श्रीमन्महाराजांकडे बोट दाखवितात. ही संधि गमावतां कामा नये असा विचार सर्वांपुढे मांडला व तो सर्वांस पटला.

एके दिवशीं श्रीमन्महाराजांना सुगंधी तेलानें अभ्यंगस्नान घालून श्रीगुरु परत येत असतां तुंगभद्रेच्या वाळवंटात ही मंडळी श्रीगुरूंच्या पायांवर लोळूं लागली. ''काय पाहिजे, काय झाले'' असें विचारतां ''आमचा उद्धार करा. आम्ही गरीब, मागासलेले. उद्धाराचा मार्ग आम्हांस मुळींच माहीत नाहीं. आमच्या गांवी येऊन देवस्थान बांधवून श्रीरामाची स्थापना आपल्या हातांने केली पाहिजे'' अशी विनंती केली. ''बरें आहे. करूं या'' असें श्रीगुरूंकडून त्यांस आश्वासन मिळाले.

सांगतामहोत्सव संपताच अश्वत्थपूरची मंडळी जरी आपआपल्या गांवी गेली तरी गुत्तीरामय्या श्रीगुरूंच्या सेवेस तेथेंच राहिला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे एक दोन वेळा गुत्तीरामय्यानें गांवीं गेल्यावेळीं आपण प्रत्यक्षांत अनुभविलेल्या श्रीमन्महाराजांच्या व श्रीगुरूंच्या अगाध महिम्याचे इतके रसाळ वर्णन केलें की त्यामुळे त्या सर्व लोकांच्या मनांत भक्ति व प्रेम निर्माण होऊन ते श्रीरामनामस्मरण करूं लागले.

त्यावेळीं अश्वत्थपूर एक डोंगराळ वस्तीचा जवळजवळ निर्जन प्रदेश होता. त्यांत नुई महादेवभट्टाचे एकमेव दुकान होते. शेकडो गगनचुंबी अश्वत्थवृक्ष पसरले होते. एक मोठा पिंपळकट्टाही होता. या गांवास पूर्वीचें नांव पिंपळ होते. वृक्षांनी गजबजलेले हे स्थानच देऊळ बांधण्यास योग्य असें ठरवून पी नारायण अप्पांच्या आईचे वडील सुब्बरायभट्ट यांच्या अंगणातील कट्ट्यावर गुत्ती रामय्यांनी श्रीमन्महाराजांचा फोटो व बिदरहळ्ळीस त्यांचे हस्ते मिळालेले आशीर्वाद फळ ठेवून व मंत्राक्षता ठेवून नामसप्ताह सुरू केला व त्याचे पाठोपाठ आपल्या स्वतःच्या खर्चाने हल्लीच्या

देवळाचा गाभारा त्याने बांधला. त्यास सुमारें २०० रु. खर्च आला. मग मात्र गांवचे पुढारी लोकांस या कृत्याने चालना मिळून, त्यांनी देऊळ बांधणेचा निर्धार केला व कार्यास प्रारंभही केला. देवस्थानचे बांधकाम १९१० मध्ये संपले. गांवच्या इतर विघ्नसंतोषी लोकांनी नाना प्रकारे विघ्ने उपस्थित करून विरोध केला. ते रात्रीं लांकडे चोरण्यास गेल्यावेळी दोन वाघांनी त्यांस पळवून लावले. त्यांनी दिवसा प्रयत्न केले वेळी ज्या लाकडाखाली हात घालावा तेथे नाग निघू लागला. अखेर त्यांना तो नाद सोडावा लागला. श्रीमन्महाराजांच्या व श्रीगुरूंच्या पाठबळानेच विघ्नांचे परस्पर निराकरण होत असे. पुढें १-२ वर्षांत गाभाऱ्यावरील व भोवतालच्या पवळीचे बांधकाम संपले. काळ्या शिलेच्या श्रीराम, श्रीसीता, श्रीमारुति, श्रीलक्ष्मण यांच्या प्रतिमा तयार करण्याबद्दल सूचनाही गेली. शिलेचे उत्तम सिंहासन तयार झाले. देवालयाच्या इमारतीसाठीं कायमची जागाही दान म्हणून मिळविली गेली होती.

याप्रमाणे सिद्धता करून गुत्ती रामय्याने प्रतिष्ठापनेबाबतचा श्रीगुरूंजवळ आग्रह धरिला. त्यांनी ''गडबड करूं नकोस. श्रीमन्महाराजांनाच बोलावूं या'' असे त्यांस सांगून गप्प केले.

शके १८३५ च्या वैशाख महिन्यांत श्रीमन्महाराज पंढरपुरास आल्यावर त्यांचा मुक्काम तेथें ३-४ महिने होणार होता. म्हणून त्यांनी श्रीगुरूंस तिकडे बोलावून घेतले होते. श्रीगुरूंनी जातांना आपल्याबरोबर १०० लोक नेले होते. त्यांत गुत्ती रामय्या वगैरे अश्वत्थपूरची मंडळीही होती. श्रीगुरूंनी तेथें गेल्यावर गुत्ती रामय्यास श्रीमन्महाराजांना विनंति कर व मागून घे म्हणून भर दिली. ''सगळ्या लोकांना घेऊन आलेच पाहिजे असा हट्ट धरून पाय धर. तुझे काम होईल'' असे सांगितले. त्याप्रमाणें वेळ साधून गुत्ती रामय्याने श्रीमन्महाराजांनी श्रीब्रह्मानंदगुरूंना बोलावून घेऊन गुत्ती रामय्यास उद्देशून ''मी तेथपर्यंत येण्याचा काही योग दिसत नाही. म्हणून हा ब्रह्मानंदबुवा तुमच्या येथे येऊन तुमचे कार्य करून देईल. तुम्ही काळजी करूं नका. बुवा आला म्हणजे मीच आलो असे समजा,'' असे सांगितले. पण हे कधी घडणार हे मात्र त्यांनी सांगितले नाही. या नंतर थोड्यांच महिन्यांनी श्रीमन्महाराज समाधिस्थ झाले. श्रीगुरूंकडे बघून त्यांच्या आधारावर वरील मंडळींनी आपलें दुःख दडपले. श्रीमन्महाराजांचे निर्वाणानंतर एक वर्षानि आराधना व पादुका स्थापन करून श्रीगुरु वेंकटापूरला येऊन राहिले. गुत्ती रामय्या त्यांच्याबरोबर काही दिवस तेथेंच होता.

गुत्ती रामय्या अजून आपल्या गांवी श्रीरामप्रतिष्ठा झाली नाहीं या दुःखाने मनांत झुरत होता. कारण मंदिर तयार होऊन दोन वर्षे होऊन गेली होती. मूर्तीही तयार होऊन पडल्या होत्या. श्रीगुरु तर तेथील लोक दुष्ट आहेत. त्यांना भक्तिमार्ग नको. मलाही ती प्रतिष्ठा नको. तूंच गांवी न जातां येथेच राहून टाक असें सांगत. त्यामुळे गुत्ती रामय्या मनांतून श्रीगुरूंवर थोडा रुष्ट झाला होता. म्हणूनच की काय एकदां श्रीगुरु वेंकटापुराहून पायीं बेलधडीस चालले असतां त्यांनी गुत्ती रामय्यास आपल्याबरोबर चलण्यास आज्ञापिले असतां देखील त्याने साफ येत नाहीं म्हणून सांगितले व तो तेथेंच राहिला. श्रीगुरु आपली प्रार्थना मनावर घेत नाहींत. आतां गांवातील लोकांस तोंड तरी कसे दाखवायचे असा त्यास खेद होऊन, डोंगरातील गुहेंत उडी घेऊन प्राणत्याग करण्याचा त्याने निश्चय केला. सर्वान्तिर्यामी वास करणाऱ्या श्रीगुरूंना हा त्याचा संकल्प ज्ञात झाला. लागलीच एका रोजगारी गड्याबरोबर त्यांनी रामय्यास ''उद्या सकाळपासून तीन दिवस नामस्मरणाला आरंभ करणार आहे. स्वयंपाक करावा लागेल. तरी आलेल्या गड्याबरोबर असशील तसा निघून ये'' असा निरोप पाठविला.

निरुपायाने रामय्या गड्याबरोबर बेलधडीस गेला. त्यानें श्रीगुरूंस नमस्कार करतांच ''वेड्या, तुझ्यासाठींच तीन दिवस नामस्मरण करावें लागत आहे'' असें म्हटलें. रामय्यास पाहून श्रीगुरूंस संतोष झाला व त्यांचे उद्‌गार ऐकून रामय्यास समाधान वाटले. तीन दिवसांचा नामस्मरणाचा कार्यक्रम थाटानें पार पडला. शेवटच्या दिवशीं मंगलारतीनंतर रामय्याला घेऊन ते श्रीराममंदिराकडे गेले. तेथें श्रीरामाच्या पायांवर मंत्राक्षतांसह नारळ ठेवून, तो पुन्हां हातीं घेऊन 'प्रसाद घे' असे म्हणून मंत्राक्षता, नारळ व ५ मोहरा श्रीगुरूंनी त्याच्या पदरांत बाधल्या. रामय्याने आनंदाश्रूपूर्ण नयनांनी त्याचा स्वीकार करून श्रीगुरूंच्या पायावर मस्तक ठेवले. ही आनंदाची वार्ता त्याने आपल्या गांवी कळविल्यानें तेथील भक्तांनाही अपूर्व उत्साह वाटला.

तेथून श्रीगुरूंनी वेंकटापुरी रामय्यासह प्रयाण केले व एके दिवशी ''तुम्ही तयार करविलेल्या मूर्तींना अलंकार, पोषाख कांहीच घालता येत नाहीं तरी त्या रद्द करून मुंबईहून दुसऱ्या आणवू या'' असे श्रीगुरूंनी त्यांस सांगितले. मुंबईस दुसऱ्या मूर्ती तयार करून घेऊन पाठविण्यास सांगितले. थोड्याच दिवसांत सीता, राम, लक्ष्मण यांच्या सुंदर मूर्ती पिंपळास आल्याचे समजतांच रामय्याने श्रीगुरूंशीं प्रतिष्ठापनेविषयीं बोलणें काढलें. तेव्हां श्रीगुरूंनी ''वैशाख शुद्ध पंचमी अभिजित् मुहूर्त फार चांगला आहे. किंवा वैशाख शुद्ध दशमी चांगला आहे. या दोन मुहूर्तांपैकी एका मुहूर्तावर प्रतिष्ठा करू यां. गाजावाजा फार नको'' असे त्यांस सांगितले. रामय्याने तात्काल ही वार्ता गांवी कळविली. सगळ्या भाविक भक्तांनी मोठ्या उत्साहाने सिद्धता सुरू केली. अभक्तांनी आपल्या कारवायां सुरू केल्या. त्यांनीं प्रथम वाजंत्री व दिवटी धरणाऱ्या लोकांस नवीन स्थापना होणाऱ्या देवालयांत वाजंत्री वाजविल्यांस व दिवटी पाजळल्यास तुम्हांस गांवातून हाकून देऊ अशी तंबी दिली. ते सर्वजण भ्याले.

अश्वत्थपुरास (पिंपळास) वैशाख शुद्ध तृतीयेस पोंचण्याचा संकल्प करून श्रीगुरु मुळगुंद व शिरहट्टी येथील वैदिकांस, गुत्ती रामय्या वगैरे अश्वत्थपुरचें लोकांस बरोबर घेऊन अधिक वैशाख वद्य त्रयोदशीचे दिवशीं वेंकटपुराहून निघाले. शिरहट्टीस मुक्काम करून दुसरे दिवशी लक्ष्मेश्वरावरून निघाले. गुडगेरीस पोंचलें व रेल्वे गाडींत चढले. दावणगिरीचे अलीकडे कनकराव अण्णेगिरी या भक्तांच्या आग्रहावरून त्यांच्या घरी गेलें व दुसऱ्या गाडीनें निघून बिदरभद्रावतीला आलें. तेथील स्टेशनमास्तर अत्यंत भाविक असल्यानें त्याचे घरीं श्रीगुरूंनी पूजा, आरती, नैवेद्य संपवून भोजन केले. त्यावेळी एक चमत्कृतिजन्य घटना घडली.

श्रीगुरु ज्या दिवशीं स्टेशनमास्तराकडे आलें त्या दिवशीं सकाळपासून ३-४ वेळा एक म्हातारा ब्राह्मण श्रीगुरु आलें काय?' असें विचारून गेला होता. श्रीगुरु आल्यावर थोड्याच वेळांत जवळ जवळ सत्तर वर्षांचा तो म्हातारा पुन्हा आला. आसनावर बसलेल्या श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार करून ''१२ वर्षांपासून तुमच्या दर्शनाची वाट पाहून पाहून थकलों. आज इच्छा पूर्ण झाली'' असे म्हणून उभा राहिला. भक्तगणांनी अर्पण केलेल्या फळफळावळ व खडीसाखर या पदार्थांवर श्रीगुरूंनी सांकेतिक भाषेत त्यास काहीतरी विचारलें. आनंदबाष्पपूर्ण नयनांनी त्या ब्राह्मणाने मान हालवून ''आपल्या आज्ञेप्रमाणें वागतो'' असें उत्तर दिलें. श्रीगुरूंनी पण ''खरोखर वागणार ना'' असे त्रिवार विचारलें. तीन्ही वेळा 'वागतो' असे त्याचेकडून उत्तर मिळतांच, 'प्रसाद घे' असें म्हणून श्रीगुरूंनी त्यास आपले मुठीत आली तेवढी फळे व खडीसाखर दिली. ''आताच्या आतां निघून जा'' अशी ताकीद दिली. त्या ब्राह्मणानें लगेच श्रीगुरूंस एक नमस्कार केला व तो निघून गेला. पुन्हा तो कधीही कोणांस आढळला नाही. तो

कोण होता हें कोणांस समजले नाही. तसेच श्रीगुरूंनी त्यास काय सांगितलें हेंही समजलें नाही. तो समंध होता की ब्रह्मसमंध होता ? श्रीगुरूंनी त्याला मुक्तीचा मार्ग दाखविला कीं कसें ? ते सर्वज्ञ श्रीगुरूच जाणोत.

बिदरभद्रावतीहून निघून श्रीगुरु कारकळपर्यंत बैलगाडीनें गेलें. दुसरे दिवशी सकाळी ते तीर्थहळ्ळीजवळील मंडगद्देला आले. पूजा नैवेद्य आटोपून भोजनोत्तर थोडी विश्रांति घेऊन तेथील नदी ओलांडून ते पलीकडच्या तीराला गेले. वेलीतून व काटेरी झुडपांतून ३-४ फर्लांग अंतरापर्यंत वाट काढीत गेले. तेथील सपाट प्रदेशांत एका वृक्षाखालीं एक मोठी फरशी होती. त्यांस श्रीगुरूंनी नमस्कार केला व सर्वांकडून करविला. हा मांडव्यऋषींचा आश्रम. अति पवित्र स्थान आहे. अशी त्यांनी माहिती दिली. त्या फरशीची पूजा करून, नारळ फोडून, नैवेद्य दाखवून, घटकाभर 'जयराम सीताराम' असें भजन करून ते परत मुक्कामास आलें.

रात्रीं मूळबागलला जाऊन ते द्वारकापीठाच्या श्रीशंकर मठांत उतरले. दुसऱ्या दिवशीं रात्रीं वैशाख शुद्ध द्वितीयेचे रात्रीं नालूरला आलें. तेथून सोमेश्वरला येऊन पोंचले. रात्रीं फार पाऊस पडला. श्रीगुरु रामय्याला ''विपरीत पाऊस पडत आहे. पंचमी साधते कीं नाहीं. दशमी केली तरी चालेल'' म्हणाले व पाऊस थांबताच गाडींत चढलें. तृतीयेस कारकळला आलें. मिजारचे पाटलांनी तेथे गाडी पाठविली होती त्यांतून दुपारी नाकूटला आले. तेथें शानबाग यांच्याकडे मध्यान्हस्नान, पूजा, नैवेद्य, आरति व भोजन झाले. सायंकाळी निघून संपिगे गांवाला त्यांनी मुक्काम केला.

पिंपळहून रामण्णामास्तर, शानभाग वगैरे शेंकडो लोक वाजंत्र्यांच्या ताफ्यासह श्रीगुरूंना सामोरे जाण्यास निघाले होते. चार मैल गेल्यावर संपिगेहून येणाऱ्या एका व्यक्तीकडून ''श्रीगुरु निघाले आहेत. अद्याप तीन चार फर्लांग मागें आहेत'' अशी बातमी त्यांना कळली. हर्षोत्फुल्ल अंतःकरणानें तेथेंच सर्वांनी श्रीगुरूंचा व श्रीरामाचा जयघोष केला. थोड्याच वेळात श्रीगुरूंची मूर्ति दिसू लागतांच सर्वांनीं त्यांस साष्टांग वंदन केले व 'रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम' असें भजन करीत वाद्यघोषांत त्यांस पिंपळास आणले. श्रीगुरूंची राहण्याची व्यवस्था महादेवभट्टाचे दुकानांतच करण्यांत आली होती.

दुसरे दिवशीं म्हणजे वैशाख शुद्ध चतुर्थीस प्रतिष्ठाकार्याच्या होमहवनास प्रारंभ झाला. सकाळीं सर्वांनी श्रीगुरूंच्या दर्शनाचा लाभ घेतला. शृंगेरी संस्थानाहून वे. सितारामशास्त्री यांस बोलावून घेण्यांत आलें होते. वे. सितारामशास्त्र्यांनी येऊन श्रीगुरूंचे दर्शन घेतलें. नमस्कार करीत असतां श्रीगुरूंनी त्यांना 'जगद्‌गुरु क्षेम आहेत नां ?' असे विचारले व 'माझा त्यांस नमस्कार सांगा व त्यांस विचारीत होतो असें त्यांस कळवा' असें सांगितलें.

प्रतिष्ठेचें सर्व कार्य जगद्‌गुरु संस्थानच्या गौरवासाठी वे. सितारामशास्त्र्यांस पुढारीपण देऊन करा असें बरोबरीच्या वैदिक ब्राह्मणांस श्रीगुरूंनी बजावले व सर्वांनी श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणें विधिपूर्वक सर्व कार्यक्रम पार पाडला.

मुंबईहून आणविलेल्या मूर्ति बाहेर काढण्यांत आल्या. धान्याधिवास, जलाधिवास, शय्याधिवास तसेंच होमहवनादि सर्व कार्यक्रम विधिपूर्वक पण थाटानें उरकल्यानंतर, राक्षसनाम संवत्सर निज वैशाख शुद्ध पंचमी या दिवशी दुपारी बरोबर १२ वाजतां, अभिजित् मुहूर्तावर अतिशय थाटानें श्रीगुरूंच्या अमृतहस्तांनी श्रीसीता,

श्रीराम, श्रीलक्ष्मण, श्रीमारुति यांच्या चिरप्रतिष्ठापनेचें कार्य पार पडलें. पिंपळच्या आसपास त्यावेळी सगळीकडें आनंदच आनंद भरला होता व सर्व आबालवृद्ध, स्त्रीपुरुष परमानन्दभरित होऊन सारखा जयघोष करीत होतें. दुपारचें कडक ऊन असूनदेखील हजारों लोक समारंभास उपस्थित झाले होते. उन्हाच्या तिरपेने सर्वांचाच घसा तहानेनें कोरडा पडला होता. त्यांची असमर्थता पाहून श्रीगुरूंनी सर्वांस गूळ व पाणी देण्याची आज्ञा केली. लगेच त्याचा अंमल करण्यात आला. त्या प्रसंगी तीन ढेपा गूळ लागला म्हणतात.

वैदिकांनी पुढील सर्व कार्ये संपवून श्रीरामरायाला उत्तम पोषाख घातला व किरीट चढवून सुशोभित केले. इतर मूर्तींसही यथोचित वस्त्राभरणें व अलंकार घातलें. श्रीगुरूंनी स्वतः आपल्या अमृतहस्ताने मूर्तींवर तुळशी व फुलें चढविलीं. नंतर महानैवेद्य व आरती झाली. भोजनाची तयारीं सुरू होताच श्रीगुरूंनी तीं देण्यास सुरवात केलेवेळी एक विशेष घटना घडली.

श्रीगुरु स्वतः तीर्थ देऊं लागले व सर्व लोक पुढें येऊन ग्रहण करूं लागलें . त्यांतील नोरी सितारामभट्ट याचे मनांत 'श्रीगुरूंना कुष्ठरोग आहे. त्यांचे हातून तीर्थाचे ग्रहण कसें करावें' असा विकल्प आल्यानें तो मागे सरून दूर उभा राहिला. तेव्हां एकट्यानेंच तीर्थ न घेणें योग्य नव्हें असें वाटून तो श्रीगुरूंजवळ आला. त्रिकालज्ञानी श्रीगुरूंनी त्यांस स्वतः तीर्थ न देतां वे. हणमंतभट्टांना बोलावून "तुम्हींच यांना थोडे तीर्थ घाला" असें सांगितलें. तें पाहून सितारामभट्ट पश्चात्तापदग्ध झाला. मनांतल्या मनांत "मीच घोर अपराध केला. मी अल्पमति. मला क्षमा करावी" असे विनवूं लागला. श्रीगुरूंचा महिमाच अगाध. दयामय श्रीगुरूंनी त्याला बोलावून स्वतः तीर्थ देऊन त्याचें समाधान केले.

पुढे सायंकाळी श्रीरामरायापुढे उभे राहून तेथें जमलेल्या शेकडो भाविक भक्तांना उद्देशून आशीर्वादात्मक बहुमोल मार्गदर्शनपर उपदेश केला. "श्रीरामरायाची या डोंगरावर तुम्ही प्रतिष्ठापना केली आहे. तुम्हीच सर्व खरोखर भाग्यशाली. तुमच्यावर श्रीमन्महाराजांची पूर्ण कृपा असल्यानें हा सुदिन तुम्हीं पाहिला. तुम्ही सर्वांनी आपापल्या हातानें होईल तेवढे श्रीरामाच्या सेवेंत तत्पर असावें व देहाचें सार्थक करून घ्यावें. प्रभू श्रीरामचंद्रांच्या आगमनाने हें क्षेत्र आतां अधिक पवित्र झाले आहे. यापुढें या जागेला महान महान सत्पुरुष, योगी, यति व पंडितवरांचे पाय लागणार आहेत. श्रीरामाच्या कृपेनें आतां असलेली तुमची दारिद्र्यादि दुःखे संपूर्ण नष्ट होऊन उत्तरोत्तर तुमची अभिवृद्धि होईल. एवढेच नव्हे तर यापासून तुमचे कल्याण होईल. कोणत्याही कार्यास तुम्हीं हात घातलात तर त्यात तुमचा लाभच होईल हे निश्चित समजा. पण केव्हांही या अशाश्वत सुखाच्या मागें लागून श्रीरामरायाला कदापि विसरूं नका. रामनामाचें स्मरण केव्हांही करीत जा. श्रीरामरायाच्या सेवेंत सदैव तत्पर असा. श्रीरामसेवा चुकवू नका. जे काहीं आहे तें सर्व त्याचेच माना. तसेंच श्रीरामरायाची त्रिकालपूजा, नैवेद्य, नंदादीप, उत्सव वगैरे न चुकतां चालतील अशी व्यवस्था करा. त्यासाठीं तुमच्यातील पंच कोण होणार ? पांच लोक पंच म्हणून मिळाले तरी बस" असे त्यांनी सांगितले.

सर्व जण स्तब्ध उभे राहिलेले व पंच होण्यास कुणीच पुढे होत नसल्याचे पाहून श्रीगुरूंनी त्यांस तुमच्यापैकी १०-२० जणांच्या नांवच्या चिठ्या लिहा. श्रीरामरायालाच कौल विचारूं या व तो मागू या असे सांगितले. रामण्णामास्तर यांनी श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे व प्रमुख लोकांच्या सूचनेप्रमाणे १५ लोकांच्या नांवच्या चिठ्या लिहून,

त्या सर्व एका ताटांत ठेवून, ते ताट श्रीरामाच्या पायाजवळ ठेवलें. नंतर श्रीगुरूंनी श्रीरामरायाच्या पायाला हात लावून नमस्कार करून त्या सर्व चिठ्या आपल्या ओंजळीत घेतल्या व 'सिताराम, सिताराम' असें भजन सांगत श्रीरामरायाच्या पुढे थोडें नाचून एक चिठी रामण्णा मास्तरकडे दिली. उघडून पाहतां ती त्यांचे नांवचीच होती. अशा प्रकारें दुसरी मळिये गोंविदप्पा, तिसरी कोंडेबिट्ट वेंकप्पनवर, चवथी कांतावर सुब्बराय व पांचवी केंची संकप्पयनवर यांच्या नांवच्या निघाल्या.

रामण्णा मास्तरांनी 'मी एकटा, मला माहीत नसलेले हें कार्य माझ्याच्यानें होणार नाहीं. मला क्षमा करा' म्हणून श्रीगुरूंची प्रार्थना केली. तेव्हां श्रीगुरूंनी 'खुळ्या, तुझी नेमणूक करणारा मी नव्हे. ती रामरायानेंच केली आहे. म्हणून तूंच त्या कामास योग्य आहेस. रामसेवा आपण होऊन चालत आलेली आहे. नाहीं म्हणू नकोस. आपली सेवा तुझ्या हातानेंच करून घेण्याचा श्रीरामरायाचा संकल्प आहे. सर्व त्याची इच्छा. माझें यांत काहीही नाहीं. कां भितोस ? तुझ्या ऐपतीप्रमाणे तूं सेवा कर. तूं जेवशील ते तत्पूर्वी श्रीरामरायाला अर्पण करून सेवन कर जे पिशील तेही त्याला समर्पण करून प्राशन कर. यांत घाबरण्यासारखें काही नाहीं.' असे सांगून त्याचे व सर्वांचेच समाधान केले. शेवटी 'तुम्ही पांच माणसांनी मिळून श्रीरामरायाची सेवा भक्तीने करावी. यापुढें तुमच्या समाजाची ऊर्जितावस्था होण्यास प्रारंभ झाला असे समजा. एवढेंच नव्हे तर तुमचा उद्धार होणार आहे' असा आशीर्वाद दिला.

त्यानंतर श्रीबेलधडी भजनीपद्धतीप्रमाणे दररोज तिन्हीं–त्रिकाल पूजा, भजन वगैरेचा श्रीगुरूंनी त्यांस यथार्थ मार्गदर्शनपर बोध केला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे त्या अश्वत्थपुरांत आजयागायत उत्तमप्रकारें व व्यवस्थित रीतीनें श्रीरामरायाची उपासना चालली आहे. श्रीगुरूंचे ठायीं त्या समाजातील लोकांची भक्ति अवर्णनीय अशी आहे. त्यामुळेच श्रीगुरूंची कृपा त्या समाजावर संपूर्ण आहे हे निर्विवाद आहे. कारण एकेकाळी अत्यंत हलाखीच्या स्थितींत असलेले हे लोक सांप्रत तितक्याच ऊर्जितावस्थेप्रत पोंचले आहेत ही आजची वस्तुस्थिति आहे. असें असले तरी ते श्रीगुरूंस विसरलेले नाहींत. ज्या निष्ठेनें त्यांनी पूर्वी श्रीगुरूंची सेवा केली तीच सेवा फलद्रूप झाल्यानें त्यांस ऊर्जितावस्था प्राप्त झाली हीच त्यांची दृढधारणा असल्यानें त्या समाजातील लोक वेंकटपुरात श्रीगुरूंच्या आराधना दिवसापासून नवरात्रोत्सव पुरा होईपर्यंत विनामूल्य राबून अद्याप सेवा करतात. त्यांची एकनिष्ठ सेवा व त्यास मिळालेले फल पाहतां 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ' या श्रीमद्भगवद्गीतेंतील उक्तीची आठवण होऊन पडताळा पटल्याची जाणीव झाल्याशिवाय रहात नाही. यावरून सद्गुरूकृपेची महती कळून येते.

दुसरे दिवशीं श्रीगुरूंस वंटीमूरचे रामय्या मास्तरांनी आपल्या घरीं नेले. भोजनोत्तर श्रीगुरूंनी मंजिनबेट्ट महादेवप्पाचे घर किती दूर आहे अशी चवकशी केली. अवघ्या अर्ध्या मैलावर आहे असें समजतांच श्रीगुरु तिकडे गेले. कारण तो श्रीगुरूंचा निष्ठावंत भक्त होता. श्रीमन्महाराजांचे वर्षान्ताच्या आराधनेसाठीं श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे तो गोंदावलेस गेला असतां एकाएकीं आजारी पडला. उत्सव चालू असतांनाच वास्तविक तो मरणार पण उत्सव पाहण्याची त्याची जबर इच्छा जाणून, ती त्याची इच्छा पुरी करण्याकरतां श्रीगुरूंकडून त्याचे मरण सहा दिवस पुढें ढकललें गेलें. उत्सव संपल्यावर एकादशीचे दिवशीं सकाळीं श्रीगुरूंनी त्याच्याजवळ जाऊन, ''काय महादेवा, आज जाण्यास काय हरकत आहे ?'' असे विचारले. महादेवाप्पा उठून बसला व श्रीगुरूंच्या पायावर मस्तक ठेवून, 'जाणेस परवानगी देऊन मला पाठवा' असे म्हणाला. 'तसेंच कर' असें म्हणून श्रीगुरूंनी श्रीमन्महाराजांचे

चरणतीर्थ आपल्या हातानें त्याला दिले. त्यानंतर महादेवाप्पा डोक्यावरून पांघरूण घेऊन झोंपला. थोड्याच वेळांत त्यास ऊर्ध्व लागला व तो स्वर्गस्थ झाला. खरोखर तो पुण्यात्मा म्हणून त्यास असें मरण लाभलें. श्रीगुरूंनी स्वतः उभे राहून त्याचा अंत्यसंस्कार करविला. जमलेल्या लोकांस उद्देशून ''महादेवाप्पा निष्ठावंत भक्त म्हणून श्रीमन्महाराजांनी त्याच्यावर कृपा केली व आपल्याकडे नेले'' असे सांगितले. आणि म्हणूनच श्रीगुरू महादेवाप्पाचे घरी गेले. त्याच्या बायकोने आपल्या लहान मुलांना श्रीगुरूंच्या पायावर घातले व आपणही पायावर मस्तक ठेवून ती शोक करूं लागली. दयासागर श्रीगुरूंनी मधुर वाणीने त्या साध्वीचे सांत्वन केले व तिच्यावर अनुग्रह करून आपल्या अक्षय पिशवींतून एक मूठभर सोन्याची नाणी तिला दिली. तसेंच तीर्थ, फल, मंत्राक्षता देऊन ते अश्वत्थपूरला परत आले.

प्रतिष्ठापनेच्या दिवसापासून अश्वत्थपूर सोडीपर्यंत श्रीगुरूंनी आसपासच्या हजारो ब्राह्मणेतरांकरतां जेवणाची सोय केली होती. अष्टमीच्या दिवशीं जेवण करून श्रीगुरु तेथून निघाले. त्यापूर्वी त्यांनी सर्वांना दर्शन दिले. श्रीरामरायाची व श्रीमन्महाराजांची आरति केली. सर्वांना काजूचा प्रसाद दिला. तेथून केंजे संकपय्यनवर यांचेकडे जाऊन तेथून रात्री काळीवाडी मठापर्यंत ते चालत गेलें. दुसरें दिवशीं बैलगाडीने उडपीस गेले. एक दिवस तेथे राहिलें. श्रीकृष्णदर्शन घेतले. तेथील अष्टमठांचे स्वामींचेही दर्शन घेऊन आगम्बी मार्गाने ते श्रीक्षेत्र वेंकटापूरला आले.

प्रिय भाविक गुरूबंधूंनो ! श्रीगुरूंनी अश्वत्थपूर व तेथील लोकांसंबंधी ५० वर्षांपूर्वी काढलेले उद्गार तंतोतंत फलद्रूप झाले असल्याचे पटत आहे. तेथील समाज उन्नतीच्या शिखरावर पोंचला आहे. देवालयाचा विस्तार झाला असून ते बंदिस्त आहे. श्रीशृंगेरीजगद्गुरु, अनेक यतिमुनि, केडगांवचे श्रीनारायणमहाराजांसारखे अनेक भगवद्भक्त व थोर पंडितांनीं अश्वत्थपुरास भेटी दिल्या आहेत. तेथील देवालयाभोंवतीं श्रीमदाचार्यांचे मठ, श्रीमारूति मंदिर, श्रीगुरूमंदिर वगैरे देवालयें तशीच अनेक घरें झाली आहेत.

गजेंद्रगड येथे गोविंद दीक्षित या नांवाचे एक अग्निहोत्री ब्राह्मण रहात असत. श्रीगुरूंवर त्यांची अत्यंत भक्ति व विश्वास असलेनें ते श्रीगुरूंवर दर्शनाकरितां वरचेवर बेलधडीस व वेंकटपुरास जात असत. श्रीगुरूंचेही त्यांच्यावर तसेच प्रेम असल्याने त्यांनी त्यांस गोंदावलेस नेऊन श्रीमन्महाराजांकडून अनुग्रह देवविला होता.

शके १८३५ मध्यें श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे दीक्षित अग्निहोत्री श्रीमन्महाराजांच्या दर्शनास गोंदावल्यास गेले असतां त्यांस श्रीमन्महाराजांनी आदरपूर्वक चार दिवस ठेवून घेतले होते. एके दिवशीं श्रीमन्महाराजांनी 'इतक्या लांबवर कां येणे केले होते ?' असा त्यांस प्रश्न विचारला. त्यांनी अत्यंत नम्रतेनें 'केवळ आपल्या दर्शनासाठी' असें उत्तर दिलें. तेव्हां श्रीमन्महाराजांनी मंदहास्य करीत 'ब्रह्मानंद हा माझा केवळ प्राण आहे. तुम्हां लोकांकरिताच मी त्यास तिकडे पाठविले आहे' असें सांगितले व 'तुमच्या घरांत अग्निहोत्र आहे. आपल्या वयस्कर मातापित्यांची शुश्रूषा पण तुम्हीं चालवितां. यावरून तुम्हीं कृतार्थ आहांच. तरी पण आपले घरीं श्रीरामाची स्थापना करून खऱ्या अर्थाने कृतार्थ व्हा'' असे म्हटलें. त्यावर ''आपल्या आज्ञेप्रमाणे सिद्धता करतो. आपल्या अमृतहस्तांनीच प्रतिष्ठापना करणेची कृपा व्हावी'' अशी प्रार्थना त्यांनी केली.

श्रीमन्महाराजांनी आपल्या हातानें एक पत्र लिहून ते श्रीब्रह्मानंदबुवांसाठी दिलें व त्यांना 'समक्षांत मी येण्याचा योग दिसत नाहीं. थोड्याच दिवसांत मी नैमिषारण्याला जाणार आहे. ब्रह्मानंदबुवांकडून तुमच्या मनासारखें काम होईल'' म्हणून सांगून आशीर्वाद देऊन पाठविलें. पुढें थोड्याच काळांत श्रीमन्महाराज समाधिस्थ झाले.

गोविंद दीक्षितांनी गांवीं जाऊन श्रीगुरूंची गांठ घेऊन, पत्र देऊन निरोप कळविला. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे घरांतच मंदिर बांधण्यास त्यांनी सुरवात केली. मंदिर तयार होतांच मूर्तींही त्यांनी आणविल्या. शके १८३८ चे रामनवमी उत्सवास जाऊन दीक्षितांनी मंदिराची सर्व हकीकत निवेदन करून 'माझा उद्धार करावा' अशी श्रीगुरूंस प्रार्थना केली.

श्रीगुरूंनी ''वैशाख वद्य सप्तमी हा मुहूर्त बरा आहे. श्रीराम सिंहासनावर बसण्यास शुभ दिन आहे. त्याच दिवशीं प्रतिष्ठापना करा'' असें त्यांस सांगून पाठविले.

गोविंद दीक्षित नाराज झालें. वेंकटापुरास जाऊन श्रीगुरूंचे दर्शन घेऊन पायावर मस्तक ठेवून, ''तेथवर येऊन आपल्या हातानें प्रतिष्ठापना करून मला कृतार्थ करा'' असें त्यांनी मागून घेतले. त्यावेळीं श्रीगुरूंना थंडीताप आला होता. घोंगडे पांघरून थडथडत ते अंथरुणावर झोंपले होते. दीक्षितांची विनंति ऐकून ''थंडीने मी मरायला लागलो आहे. तापाने फणफणत आहे. असल्यांत मला ये म्हणतोस. दररोज येणाऱ्या थंडीने मी अशक्त झालो आहे. मला येतां येणार नाही. एखादेवेळी वाटेंतच आटोपेन. माझ्यावर विसंबून राहू नकोस. तूंच उरकून घे.'' असे सांगताच तुमच्याशिवाय ते होणार नाही. तसेंच राहून जाईल' असे दीक्षितांनी सांगितले. त्यावर श्रीगुरूंनी ''हट्ट धरूं नकोंस. थंडी कमी झाल्यास मी येतोच. नच आल्यास अशा प्रकारे उरक'' म्हणून त्यांस त्यांनी सर्व विधि समजावून सांगितला.

गोविंद दीक्षित श्रीगुरूंची आज्ञा प्रमाण मानून पण खिन्न अंतःकरणाने गांवी देले. दयानिधि श्रीगुरूंनी प्रतिष्ठेच्या आदल्या दिवशीं वेंकटापूर सोडले व ते गदगला आले व बरोबर दोन शिष्यांना घेऊन भाड्याचा झटका करून गजेंद्रगडला जाण्यास रात्री निघाले. श्रीगुरूंची जाण्यासारखी परिस्थिति नसतांना देखील, श्रीमन्ममहाराजांचे आज्ञापत्र असल्याने, ते देहाची पर्वा न करतां निघालें. श्रीगुरूंना श्रीसद्गुरु आज्ञेपेक्षा या जगांत जास्त श्रेष्ठ काहीं दिसत नव्हतें हे जसे खरें तसेंच श्रीमन्महाराजांच्या आज्ञेशिवाय ते कोणतीही गोष्ट करीत नसत हेही तितकेंच खरें. याचे प्रत्यंतर म्हणजे तोपिनकट्टीच्या भक्ताने श्रीरामरायाच्या मूर्ती आणवून प्रतिष्ठापनेस त्यानें श्रीगुरूंस असंख्य वेळीं पाचारण करूनही श्रीमन्महाराजांची आज्ञा नसल्याने श्रीगुरु प्रतिष्ठेस बिलकूल गेले नाहीत हे होय. श्रीब्रह्मानंदगुरूंच्या समाधिकालानंतर ती प्रतिष्ठा उरकली गेली.

गदगहून निघून श्रीगुरूंनी नरेगलला मुक्काम केला व तेथून पहाटें निघून अरुणोदयापूर्वी दीक्षितांच्या दरवाजांत येऊन उभे राहिले. आदले रात्रीं १० वाजेपर्यंत दीक्षितांनी श्रीगुरूंची वाट पाहिली. ते न आल्यानें खिन्न होऊन दीक्षित अंथरुणावर पडले. पण त्यांस झोप लागली नाही. अकस्मात् श्रीगुरूंचे आगमन झालेले पाहून दीक्षित आश्चर्यचकित झालें. तसेंच त्यांच्या आनंदास पारावार राहिला नाही. फक्त वाद्यघोषांत श्रीगुरूंना गांवांत मिरवत आणण्याची इच्छा फलद्रूप झाली नाही म्हणून त्यांस विषाद मात्र वाटल्याखेरीज राहिला नाही.

प्रिय सज्जन हो ! श्रीगुरूंनी दीक्षितांस चाळविण्या कां दाखविल्या ? खरोखर त्यांच्या मनांतून जावयाचे नव्हते कां ? तें कसें शक्य आहे ? मग अकस्मात् दत्त म्हणून उभें राहण्यांतील हेतू काय असावा असें तुम्हांस वाटतें ? असें करण्यात श्रीगुरूंचा एकमेव हेतू जर कोणता असेल तर तो हाच की, त्यांना स्वत:चे अवडंबर माजविलेले खपत नव्हते व कोणत्याही गोष्टीचा अवास्तव गाजावाजा करण्याच्या ते विरुद्ध होते.

प्रतिष्ठेपनेबाबतचें होमहवन संपवून श्रीगुरूंनी स्वत: श्रीरामरायाला अलंकारांनी सजविले. राजोपचारांनी पूजा करून, महानैवेद्य, मंगलारति केली. त्या दिवशीं श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणें मुक्तद्वार अन्नसंतर्पण झालें.

दुसरे दिवशीं सकाळी स्नानसंध्या उरकून, श्रीरामरायाच्या पायावर तुळशी चढवून, अग्निहोत्र्यांच्या होमशालेतील अग्निनारायणासमोर श्रीगुरूंनी १०० रुपये दक्षिणा ठेवली, तीन प्रदक्षिणा घालून नमस्कार केला. दीक्षितांच्या मुलांना ''दर वर्षी रामनवमी उत्सव भिक्षा मागून कां होईना पण न चुकतां करां. वर्षातून एकदां तुलसीदलांनी व बिल्वदलांनी पूजा झालीच पाहिजे. कसल्याही प्रसंग धर्म, नीति, श्रीराम यांवरील विश्वास ढळूं देऊ नका. शक्त्यनुसार अन्नदान करा. सदा नामस्मरण करीत जा. म्हणजे श्रीरामराय तुमचे कल्याण करील'' असा उपदेश करून ते जाण्यास सिद्ध झालें. तेव्हा गांवांतील अनेकांनी श्रीगुरूंना आपापल्या घरी बोलावून नेऊन, पूजा करून श्रीगुरूंचा अनुग्रह घेतला. यांतच दिवस गेल्यामुळे श्रीगुरूंचा त्या दिवशीं तेथें मुक्काम झाल्यानें लोकांना फार आनंद झाला. दुसरें दिवशीं सर्व भाविकांना आशीर्वाद देऊन, श्रीरामरायाचा उत्सव तुम्ही सर्वांनी मिळून न चुकतां केला पाहिजे' असे सर्वांस बजावून श्रीगुरु वेंकटापुरास आलें.

**॥ श्रीसद्गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण पंचविसावें

## श्रीब्रह्मानंदगुरूंच्या लीला व आठवणी

साधुसंत म्हटले की तेथें चमत्कार हे असतातच. याचें कारण 'चमत्काराशिवाय नमस्कार असत नाही' हें असू शकेल काय ? खरें पाहतां तें तसें असावें असें वाटतें. पण तें पूर्णपणे खरें असत नाही. कारण साधुसंतांच्या चरित्रांत जे चमत्कार वा लीला दिसतात त्या लोकांकडून नमस्कार मिळविण्यासाठी नसतात. साधुसंताचा जन्म केवळ लोककल्याणासाठी असतो. या जगातील जनमानसाचे विश्लेषण करू गेल्यास लोकांचे ज्ञानी, अज्ञ व मूढ असे तीन प्रकार आढळतात. ज्ञान्यांची भूमिका तयार असल्यानें साधुसंतांचे बाबतींत साधुसंतांची ओळख त्यांस तेव्हांच पटतें. त्यांना चमत्कारांची अगर लीलांची गरजच भासत नाहीं. अज्ञ जे असतात त्यांना स्वतःला ज्ञान नसते पण ते आपल्याला ज्ञानी समजतात. साधुसंतांकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोन हेटाळणीच्या स्वरूपाचा असतो. अशांच्या बाबतींत लीलांनी भारावून जातात व त्यांचे डोक्यांत विचारमंथन चालू होऊन ते सन्मार्गाकिडे आकर्षिले जातात. मूढांचे बाबतीतील तऱ्हाच न्यारी असते. ते एकदम एका टोकास जातात. परंतु संतांची खरी लीला जर कोणती असेल तर त्यांचे नित्याचरण. संतांचे खरे वैशिष्ट्य म्हणजे सहज बोलणें व त्यातून बाहेर पडणारा, हित साधणारा उपदेश हें होय. सद्गुरु ब्रह्मानंदगुरूंनी लोकोद्धाराकरितां व आपल्या भक्तांच्या कल्याणाकरितां अनेक अद्भुत लीला दाखविल्या.

**(१) परिशुद्ध भावनेचे फळ** - गामनगट्टी येथें निर्मल अंतःकरणाची एक बाई रहात असे. त्या बाईची श्रीगुरूंवर निस्सीम भक्ति होती. त्या वृद्ध बाईने एके दिवशीं आपल्या घरी दुपारचे वेळी शाळूच्या कण्या व अंबाड्याची भाजी केली होती. हे दोन्ही पदार्थ श्रीगुरूंना अत्यंत आवडत असत हे त्या बाईस माहीत होते. त्यामुळे देवास नैवेद्य दाखविणेचे वेळी त्या बाईच्या मनात 'आज श्रीगुरु येथें असते तर फार बरें झाले असतें' असा विचार आला. कदाचित् संध्याकाळपर्यंत ते आल्यास त्यांस हे पदार्थ अर्पण करतां यावेत या सद्हेतूने त्या बाईने एका भांड्यात थोड्या कण्या व दुसऱ्या भांड्यात थोडी भाजी काढून झाकून ठेवली व नंतर सर्वांना वाढून मग ती आपणही जेवली. संध्याकाळचेवेळी अकस्मात् श्रीगुरु गामनभट्टीस आले ते थेट त्या भाविक बाईच्या घरी गेले. जातांच त्या बाईस 'संध्याकाळचा फराळ येथेंच करणार आहे. दुपारी तूं काढून ठेवलेल्या कण्या व भाजीच वाढ. दुसरे काही करू नकोस' असे सांगितले. ते ऐकून त्या बाईच्या आनंदास व आश्चर्यास पारावारच राहिला नाही. श्रीगुरूंनी संध्याकाळचे भजन व आरति त्या बाईचे घरीच उरकली व बरोबरच्या दोघां शिष्यांबरोबर त्या बाईने काढून ठेवलेल्या कण्या, भाजीचा फराळ केला. मौज अशी की, तिघांनाही ते पदार्थ पोटभर झाले.

**(२) भक्ताच्या अंतरीची तळमळ आवश्यक** - श्रीगुरूंचा लहानपणापासूनचा त्यांच्याबरोबर खेळलेला, बागडलेला एक स्नेही होता. श्रीगुरूंची योग्यता त्यास मनोमनीं पटली असल्याने त्यांचे ठायी त्याची विशेष भक्ति जडली होती व त्यांच्यावर नितांत विश्वासाने भार टाकून त्यांच्या सेवेत तो सतत मग्न असे. यामुळे सहज बोलता बोलता श्रीगुरूंनी त्यास 'तुझ्यावर कसलाही प्रसंग येवो, मी तुझ्या पाठीशीं आहे असे समज' असे सांगितले होते.

बरेच दिवस गेले. एकदां संसारातील अडचणींत सापडून त्याच्यावर घनघोर असे संकट आलें. त्याने तो

बावचळला, अतिशय घाबरा झाला व वेड्यासारखे चाळे करूं लागला व विव्हळूं लागला. एक दिवस एकाएकी त्यांस श्रीगुरूंनी दिलेल्या अभिवचनाची आठवण झाली. त्यावेळी तो श्रीगुरूंस अनन्यभावाने शरण गेला. त्यानें श्रीगुरूंचे मनापासून स्मरण केले व आपल्या संकटाची त्यास जाणीव दिली. त्यावेळी त्याच्या मनास थोडे समाधान वाटले. पुढे १–२ दिवसांतच श्रीगुरू अकस्मात् त्या गृहस्थाचे घरी आले. "काय बाबा! तोंड वाळल्यासारखे दिसतें. इतका का घाबरला आहेस ?" असें श्रीगुरूंनी हांसत म्हणन त्याला धीर दिला व त्याच्या संकटाचे निवारण केले.

**(३) अचल विश्वासाचे फळ** - होंबळ या गांवी श्रीगुरूंचा एक भक्त रहात असे. त्याच्याकडे श्रीगुरू वरचेवर जात असत. होंबळच्या लोकांवर त्यांचे इतके प्रेम असें की कोठेंही उत्सव असो, कोठीवर होंबळच्या लोकांची नेमणूक होत असे.त्यांची कार्यकुशलता, उच्च प्रतीची दक्षता व श्रीगुरूंचे ठायी असलेल्या त्यांच्या एकनिष्ठेचेच हे फल असावयास पाहिजे. अशाच भाविक भक्तांकडून श्रीगुरू वाटेल तसली कामें विनासायासानें करून घेत असत.

त्याच होंबळमधील एका विश्वासू भाविक भक्ताचा मुलगा कुलकर्णीपण करीत होता. अकस्मात् त्याचेवर एक सरकारी प्रसंग गुदरला. त्यांत त्याचे कुलकर्णीपण जाऊन त्यास शिक्षा होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. वास्तविक तो मुलगा निरपराधी होता. निरपराधी मुलावर गुदरलेला तो कठीण प्रसंग पाहून त्या भाविकाचा धीर खचला. गांव सोडून तो श्रीगुरूंना हुडकीत हिंडू लागला. गदग, बेटगिरी, बेलधडी वगैरे गांवी पायीं प्रवास करून शोध घेत घेत तो वेंकटापुराला आला. तेथें श्रीगुरूंची गांठ पडताच त्याने त्यांच्या पायावर लोळण घेतली व रडू लागला. त्या भाविक भक्ताची ती दीन अवस्था पाहून श्रीगुरू कळवळले. त्यांनी "अरे, असे काय करतोस ? तुला काय पाहिजे ?" असें म्हणत त्यास दोन्हीं हातांनी वर उठविले. त्यावेळी अश्रूपूर्ण नयनांनी त्याने "महाराज, मी तर मरतो. श्रीसमर्थरामदासस्वामींनी विजापूरहून जसें कुलकर्णीपण सोडवून आणले तसें माझ्या मुलाला तुम्हीं पार करून कुलकर्णीपण वाचविलें पाहिजे" असें म्हणून हंबरडा फोडला. साधूंच्या मनांत दया उत्पन्न झाली म्हणजे त्यांस अशक्य असे काहींच नसते. परमेश्वरी सूत्रें फिरविण्याची त्यांची ताकद असते. मग मानवी सूत्रांचा त्यांच्यापुढें काय पाड ?

श्रीगुरूंचे हृदय द्रवले. त्यांनी हसतच त्या भाविकाला 'अरे, हाच का तुझा परमार्थ ? कां रडतोस ? वैकुंठात देवाजवळ बसून रडतात होय ? किती धड्ढ रे तूं ! वेंकप्पाला मागून घे. पार करील.' असे सांगून त्याचे सांत्वन केले. त्याला गांवाकडे पाठविले. चमत्कार असा झाला की, कोठून यक्षिणीची कांडी फिरली कुणास ठाऊक. तो भाविक गांवी जाऊन पोंचणेपूर्वी त्याचा मुलगा निर्दोष सुटून गांवी येऊन कामावर रुजूही झाला होता. एवढेंच नव्हे तर पुढेदेखील त्यांच्या मनाप्रमाणे सर्व कामें होत गेली.

**(४) चराचरावर गुरुंची सत्ता** - एकदां मेणसगी गांवी ग्रामदेवतेच्या देवळांत तम्मणराव कुलकर्णी, रामभट्ट जोशी वगैरे मंडळी जैमिनी वाचत बसले होते. गोष्टीवरून गोष्ट निघून आपले श्रीब्रह्मानंदगुरु बरेच दिवसांत इकडे आलेले नाहींत. फार दिवस होऊन गेले. तरी आपणच वेंकटापूरला त्यांच्या दर्शनास जाऊन येऊं या असें त्यांचे बोलणे झाले. त्यांवेळी श्रीगुरु यावगलहून कांही लोकांबरोबर निघून कोण्णूरकडे चालले होते. अंतर्ज्ञानानें त्यांना ही हकीकत समजतांच बरोबरच्या लोकांस श्रीगुरूंनी 'तुम्हीं कोण्णूरकडे चला, मी मागाहून येतो' असें सांगून

पाठविले व आपण अजून तम्मणराव, रामभट्ट वगैरे देवळांत होते तोपर्यंतच सुमारें अर्ध्या तासांत तेथें दाखल झालें. अकस्मात् श्रीगुरूंचे आगमन झालेले पाहून मेणसगीच्या मंडळींस आश्चर्य वाटून सर्वांनी श्रीगुरूंच्या पायावर मस्तक ठेवून त्यांस नमस्कार केला व आतां कोठून येणें झालें अशी त्यांनी विचारपूस केली. तेव्हां श्रीगुरूंनी मंदहास्य करीत ''आतांच थोड्या वेळापूर्वी तुम्हीं माझी आठवण काढलीत ना ? म्हणून बरोबरचे लोकांस कोण्णूरकडे रवाना करून मी इकडे आलो'' असें त्यांस सांगितले.

ते ऐकून तर सर्व लोक अत्यंत आश्चर्यचकित झालें . कांहीं मंडळींनी श्रीगुरूंना आपले घरीं चलण्याची विनंति केली. तेव्हां श्रीगुरूंनी ''आमचे यजमान तम्मणराव यांचेकडेच जातो'' असे सांगितले व तम्मणरावांस उद्देशून 'तम्मण्णा ! आज घट्ट तूप व तळलेले कडबू करीव. रामाच्या प्रसादाला सगळे इकडेच येऊं देत' असें म्हणालें. त्याप्रमाणे दुपारचे जेवण तम्मण्णाकडे सगळ्यांचे बरोबर झाले. नंतर ग्रामपुरोहितांनी संध्याकाळचा फराळ आमच्याच घरी व्हावा अशी श्रीगुरूंस प्रार्थना केली. त्यावर 'उद्या तुमच्याकडे येतो' असें सांगितले. दुसरे दिवशी पुनः श्रीगुरूंनी तम्मणरावांस बाजरीची भाकरी, भरल्या वांग्याची भाजी व साईसकट दही, लोणी असा बेत करण्यास सांगितले. त्याप्रमाणें जेवण तयार होतांच सगळ्यांबरोबर नानाविध विनोदाच्या गोष्टी बोलत त्यांनी जेवण संपविले. भोजनोत्तर तांबूलभक्षण करीत बसल्यावेळी ग्रामपुरोहितांनी 'निदान आज संध्याकाळी तरी आमच्याकडे फराळास यावें' अशी पुनः हात जोडून श्रीगुरूंस प्रार्थना केली. सगळे लोक आपआपल्या घरी निघून गेल्यावर श्रीगुरूंनी थोडा वेळ विश्रांति घेतली. संध्याकाळी ४–५ चे सुमारास 'आज मला कोण्णूरला गेले पाहिजे' असें सांगून ते जाण्यास सिद्ध झालेले पाहू तम्मणरावांनी 'पोंचविणेस गाडी आणतो, थोडे थांबा' अशी विनंती केली व गाडी हुडकू लागले. गाडी मिळाली पण जुंपणेस बैल मिळेनात. कारण त्यावेळी गांवातील सर्व बैल रानांत होते. एका शेतकऱ्याचे घरांत गाडीस कधीही न जुंपलेले दोन खोंड होते. तेच खोंड आणले गेले व तशी जाणीवहि श्रीगुरूंना देण्यात आली. 'कांही हरकत नाहीं. लवकर गाडी जोडा' असे सांगून श्रीगुरु गाडीत बसले. गाडीला खोंड जुंपले गेले.

श्रीगुरूंना निरोप देण्यास जमलेल्या सर्व लोकांनी गाडीवानास 'गुरूंना जपून घेऊन जा. खोंड नवीन आहेत. गाडी सावकाश चालीव' असे बजावलें. श्रीगुरूंनी हसत ''बाबांनो ! हा देह नश्वर आहे. केव्हां ना केव्हां तरी जाणारच. मरण कुणाला चुकलेले नाही. त्यांत आम्हीं ब्रह्मचारी. जगलो काय, मेलो काय, सारखेंच.'' असे म्हणून सगळ्यांना थांबणेस सांगून, त्यांनी गाडीवानास गाडी हांकणेस सांगितले. तो सावकाश हाकू लागला.

गांव सोडून थोडें पुढें गेल्यावर श्रीगुरूंनी गाडीवानास मागें सरकून बसण्यास लावले व 'तूं गाडीचा बावखडा धरून बैस' असे सांगून श्रीगुरूंनी स्वतः आपल्या हातानें दोन्हीं खोंडांच्या पाठीवर एक एक सपाटा दिला. लागलीच ते खोंड बेफाम उधळूं लागले. पुढें मल्लव्वाच्या ओढ्यांत एक भयंकर ओहळ आहे. त्यांतील कलंडतीतूनही खोंड धूम पळत गेले व थोड्याच वेळांत कोण्णूरला येऊन पोंचले.

गाडी थांबताच श्रीगुरु खाली उतरले. गाडीवानास ''मुला ! खोंड फार दमले. त्यांना या दोन रुपयांची सरकी घेऊन घाल. तसेच तूही दोन रुपये घे'' असे म्हणून आपल्या हातातील मोकळ्या व लहान 'अक्षय' पिशवीतून चार रुपये काढून श्रीगुरूंनी त्यांस दिले. ते घेऊन, तो गाडीवान श्रीगुरूंस नमस्कार करून, त्यांचा निरोप घेऊन गांवाला

परत आला. त्याने तम्मणराव वगैरे लोकांसमोर 'अप्पा, ते फार थोर आहेत. मी बावखडे धरून डोळे मिटून स्वस्थ बसलो होतो एवढेच मला माहीत आहे. गाडी कशी पोचली हे मला समजले नाहीं' असा वृत्तांत त्यानें सांगितला. तो ऐकून तेथील सर्व भाविक आश्चर्यचकित झाले व श्रीगुरूंच्या अगम्य लीलेचे कौतुक करूं लागले. चराचरावर सत्ता चालविणाऱ्या श्रीगुरूंना कसले भय ?

**(५) डळमळीत भक्ती दृढ केली -** चिक्कहंदिगोळ गदगच्या अगदी जवळ आहे. तेथें श्रीगुरूंचे अनेक कट्टर शिष्य असल्यानें, तेथेंदेखील श्रीगुरूंचे जाणे-येणे फार होते. तेथील सर्व भाविक भक्त श्रीगुरूंच्या प्रीतिविश्वासाला पात्र झाले होते.

वेंकटापूरचे जीर्णोद्धाराचे बांधकामास सुरवात झाल्यावेळीं एकदां श्रीगुरूंस पैशाची अडचण भासूं लागली. तेथील व्यवस्थेस रहात असलेले होंबळचे गु. भ. वे. तिरकंभट्ट हे श्रीगुरूंच्या आज्ञेवरून चिक्कहंदिगोळला गेले. तेथील कुलकर्णी गु. भ. श्री. चिदंबरप्पनवर यांना वेंकटापूर येथे चाललेल्या बांधकामाचे खर्चास पैशाची नड असून, ती दूर न झाल्यास बांधकाम थांबणार आहे. म्हणून श्रीगुरूंनी एक दोन महिन्यापुरते १००० रुपये हातउसने तुमचेकडून मागून आणण्यास मला पाठविले आहे असे त्यांनी त्यास कळविले. त्यावेळी चिदंबरप्पनवर यांचेजवळ रोकड तितकी रक्कम नसल्याने त्यांनी आपल्याजवळील दोन शेर सोन्याचे दागिने वे. तिरकंभट्टाजवळ देऊन त्यांस पाठविले. वे. तिरकंभट्टांनी ते श्रीगुरूंना नेऊन दिल्यानें नड भागून पुढील काम सुलभ झाले. इकडे चिदंबरप्पनवर यांना श्रीगुरूंना अडचणीचेवेळी सोने दिल्याबद्दलचे समाधान न लाभतां उलट त्यांच्या मनांत 'कौपीन धारण करणाऱ्या श्रीगुरूंकडून आपले दागिने कसे परत मिळणार' असा विकल्प उभा राहिला. शिवाय देवाच्याकामी वेचलें गेलेले तें दागिने आपण परत तरी कसे मागावयाचे अशी अडचण भासूं लागलीं. या व अशा अनेक कल्पनांच्या गोंधळात ते सापडले. मन ही चीजच अशी आहे की ती चंचलतेने सदोदित लिप्त असते. संसारासक्त माणसांबद्दल तर बोलूच नका. त्यातून तो संसारासक्त मनुष्य रजोगुणी असेल तर त्याचे मन अत्यंत चंचल असणे अगदी स्वाभाविक आहे.

त्या भाविकाच्या चिंतेची धांव तेवढ्यावरच न थांबतां ती दीर्घस्वरूप धारण करूं लागली. हळूंहळूं त्याला हठाचे स्वरूप येऊं लागले. एक दिवस चिदंबरप्पवर यांनी असा निश्चय मनांत केला की, ''एक दोन दिवसांत श्रीगुरूंकडून आपण दिलेले सोन्याचे जिन्नस परत आले तर श्रीगुरू खरोखर देवासमान आहेत असे मी मानीन.'' गरीब बिचारा मंदमति चिदंबरप्पनवर, त्यांस श्रीगुरूंचा महिमा कळला नव्हता हेच खरें. नाहींतर तो असा निश्चय करता ना !

त्यावेळी श्रीगुरूंचा मुक्काम गदगजवळील मलसमुद्र या गांवी होता. पहाटें उठताक्षणींच त्यांनी चिठी देऊन एका गड्यास होंबळला पाठविले. कारण त्यावेळी वे. तिरकंभट्ट होंबळ येथे होते. चिठीप्रमाणे ते येतांच भोजनानंतर श्रीगुरूंनी त्यास जवळ बोलावून ''तिरकंभट्ट ! चिदंबरप्पनवर यांचेकडून आणलेले सोने तसेंच पडून आहे. दुसरीकडून आमचे काम भागल्याने तें लागले नाहीं. तरी आतांचे आतां तुम्हीं चिक्कहंदिगोळला जाऊन त्यांचे सोने त्यांस परत करून या. उगीच कशास ठेवून घ्यायचें ?'' असें सांगून ते सोन्याचे दागिने त्यांचेकडे देऊन पाठवून दिले.

वे. तिरकंभट्ट दागिने घेऊन सायंकाळी चिकहंदिगोळला आले. गु. भ. चिदंबरप्पनवर यांचे पुढे सर्व जिन्नस ठेवून ''पाहून घ्या तुम्ही दिलेले सर्व डाग आहेत की नाहींत ते'' असे म्हणाले व श्रीगुरूंचा निरोप त्यांस कळविला.

एकाएकी आपले दागिने कसे आले म्हणून त्या भाविकास महदाश्चर्य वाटले. आपला संकल्प व इतर अनेक कल्पना त्याने वे. तिरकंभट्टास प्रांजलपणे सांगितल्या व डोळ्यांत अश्रू आणून ''तिरकंभट्ट ! आपले गुरु सामान्य नाहींत. ते साक्षात् देवच आहेत यांत तिळमात्र शंका नाही. माझी तर पक्की खात्री होऊन चुकली आहे. अशांच्या बाबतींत मी चांडाळानें किल्मिष मनांत आणले. त्यांचे दर्शन घेऊन त्यांची क्षमा मागितल्याशिवाय माझें समाधान होणार नाही'' असे म्हणून दुसरे दिवशीं सकाळीं उठताच वे. तिरकंभट्टांना बरोबर घेऊन ते मलसमुद्राला आले. पण श्रीगुरु तेथे नव्हते. गदगला गेले. अखेर बेटगिरीत त्यांना श्रीगुरूंचे दर्शन झाले. लगेच श्रीगुरूंच्या पायांवर काही सोने अर्पण करून 'पामरावर कृपा करावी' असे म्हणत त्यांनी श्रीगुरूंना साष्टांग नमस्कार घातला.

श्रीगुरूंनी मंदहास्य केले. पायावर अर्पण केलेले सोने त्यांनी हातात घेतले व आपल्या लहान पिशवींतून एक कागदाचे पुडके चिदंबरप्पनवर याला ''हा वेंकप्पाचा प्रसाद घे. तुला राम, लक्ष्मण असे दोन मुलगे होतील. त्या मुलांच्या हातांत ही घाल'' असा आशीर्वाद देऊन त्यांनी ती कडी त्याच्या हातांत दिली.

खरी हकीकत म्हणजे त्याला पुत्र नव्हता. पुढे लवकरच श्रीगुरूंच्या आशीर्वादाने त्याला दोन मुलगे झाले.

**(६) भक्तांचे कल्याण करण्याचा हेतू** - एक कुटुंबवत्सल गृहस्थ गरीबींत कालक्रमणा करीत होता. श्रीगुरूंवर त्याचा अत्यंत विश्वास होता. तो वरचेवर त्यांच्या दर्शनास जात असे. एकदा गरीबीने होरपळलेल्या स्थितीत तो श्रीगुरूंच्या दर्शनास वेंकटापुरास गेला होता. त्या भाविक भक्ताची व श्रीगुरूंची फार सलगी होती. श्रीगुरूंच्या सान्निध्यात तो गृहस्थ १-२ दिवस राहिला असतां एके रात्री श्रीगुरूंनी स्वप्नांत दर्शन देऊन दोन पैसे दिल्याचा त्यास भास झाला. पुढे उजाडल्यावर तो रोजच्याप्रमाणे श्रीगुरूंच्या दर्शनास गेल्यावेळी श्रीगुरु ''ए नारायणभट्टा, आज विहिरीच्या कांठावर हांडा भरून ठेवून पाणी तापीव म्हणजे तुला दोन पैसे देतो'' असें म्हणत मोठ्यानें हांसूं लागले. तें ऐकून त्यास आश्चर्य वाटून तो अनन्यभावाने श्रीगुरूंच्या पाया पडला. पुढे जसजसे दिवस जाऊं लागले तसतशा त्याच्या संसारातील सर्व अडचणी दूर होऊन त्याचे दिवस सुखांत जाऊं लागले.

**(७) गुरुंची आत्मीयता** - इ. स. १९११ सालची गोष्ट. लेखकाचे वडील सांगलीस सिटी पोलीस लाइनीत रहात असत. ते फौजदार होते. इ. स. १९१० साली शिरहट्टीस असतांना जरी ते मूळचे नास्तिक होते तरी श्रीगुरूंच्या महात्म्याने प्रभावित होऊन त्यांनी श्रीब्रह्मानंदगुरूंचा अनुग्रह घेतला व ते निस्सीम भक्त बनले. इ. स. १९११ सालीं ते आजारी पडले, त्यांना डबल न्युमोनिया झाला होता. त्यावेळचे सांगलीचे सिव्हिल सर्जन डॉ. देव यांनी त्यांची आशा सोडली होती. लेखक त्यावेळी अवघा सात वर्षांचा होता. आम्हां कुटुंबियांच्या तोंडचे तर पाणीच पळाले होते.

एक दिवस असा चमत्कार झाला की, रात्रीं श्रीगुरु वडिलांच्या स्वप्नात आले. वडिलांच्या अंगावरून त्यांनी हात फिरविला व ''अंताजीपंत, घाबरू नका. संकट टळले. आता तुम्हांस बरें वाटू लागेल'' असे सांगून ते जाण्यास उठले. वडील त्यांच्या पायावर डोके ठेवण्यासाठी प्रयासाने वळून सरकण्याचा प्रयत्न करू लागले. ही त्यांची धडपड

पाहून लेखकाची माता घाबरली व तिने काय पाहिजे ? असे कां करतां' म्हणून विचारले. तेव्हां ते श्रीब्रह्मानंद महाराज आले होते. त्यांचे दर्शन घेत होतो म्हणाले. आम्हां सर्वांस वडिलांना भ्रम झाला असावा असें वाटले. आतां तुला बरें वाटेल असें श्रीगुरु सांगून गेले असे जरी वडिलांनी आम्हांस सांगितले, तरी आमचा विश्वास बसेना. पण आश्चर्य असें की दुसरे दिवशीं सकाळी डॉ. देव रोजच्याप्रमाणे तपासणीस आले त्यावेळी त्यांनी आता पेशंट हातचा खास जात नाहीं असें आपण होऊन जेव्हां सांगितले तेव्हां वडिलांची हकीकत आम्हांस पटली. तेव्हांपासून जो उतार पडला त्यानें तब्येत झपाट्याने सुधारली. तेव्हापासून लेखकाचे वडील श्रीगुरूंचे कट्टर भक्त बनले.

**(८) श्रीगुरुंना अन्नपूर्णा वश** - धुंडशीजवळ अरण्यात गोमुखातून पाणी पडत असलेली एक पुष्करणी आहे. तेथे एक पुरातन शिवमंदिर आहे. हे स्थान 'गंगीभावी' या नावाने प्रसिद्धीस आलेले पुण्यतम क्षेत्र आहे. अनेक भाविक लोक सूर्यग्रहणाचे व चंद्रग्रहणाचे वेळीं पर्वकाळांत स्नानासाठी तेथे जात असतात. म्हणून त्या भागांत त्या जागेला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

एकदा सूर्यग्रहणाचे वेळी श्रीगुरु हे हुबळीजवळील छब्बी गांवी मुक्कामास होते. श्रीगुरु १०-२० लोकांना बरोबर घेऊन बैलगाडीतून पर्वकाळात स्नान करण्यासाठी गंगीभावी क्षेत्रास गेले होते. सकाळीं १० वाजतां ग्रहण सुटताच स्नान करून बरोबरच्या लोकांनी स्वयंपाकाच्या सिद्धतेस सुरवात केली होती. मसाल्याचे तळलेले कडबू, रावण भात आणि सार भात असा स्वयंपाक होता. देवास नैवेद्य, आरति वगैरे करून सर्वांनी दुपारीं ३ वाजतां जेवण उरकले. आतां भांडी घासण्याचा कार्यक्रम हातीं घेण्याचा लोकांनी विचार केला मात्र, इतक्यांत भुकेने व्याकूळ झालेले १०-२० लमाण तेथे आले. श्रीगुरु एका झाडाखाली बसले होते. त्यांना पाहून त्या सर्वांनी त्यांस नमस्कार केला व 'आम्हांस फार भूक लागली आहे, जेऊ घाला' अशी त्यांस विनंती केली. तेव्हां श्रीगुरूंनी आपल्या परिवारांतील मंडळीस हांक मारून या लमाणांना पोटभर जेऊ घाला असें सांगितले.

तें ऐकून परिवारातील मंडळींनी विनयानें 'शिल्लक राहिलेला स्वयंपाक फार थोडा आहे. तो कसा पुरणार ? लोक जास्त आहेत' अशी चिंता व्यक्त केली. श्रीगुरूंनी ''असू दें. तुम्हीं वाढून टाका. श्रीराम समर्थ आहे''एवढेंच म्हटले.

झाले. परिवारातील भाविक मंडळींनी त्या लमाण लोकांस पानांवर बसविले व शिल्लक अन्न त्यांस वाढले. आश्चर्य असे की ते सर्व लोक पोटभर जेवून संतुष्ट तर झालेच. शिवाय आणखी ३-४ लोकांना पुरेल इतके अन्न शिल्लक राहिले.

**(९) ऋद्धी-सिद्धींचे दर्शन व गुरुनिष्ठा** - शके १८३८ सालचा श्रीरामनवमी उत्सव मोठ्या वैभवांत पार पडला. सप्तमीच्या दिवशीं सकाळीं श्रीगुरु श्रीरामरायाची कांकडारति संपवून कोठीत गेले. कोठीवाल्यानें फार थोडे तूप शिल्लक असल्याचे श्रीगुरूंच्या निदर्शनास आणले. श्रीगुरूंनी लगेच ३-४ गड्यांना आसपासच्या खेड्यांतून लोणी घेऊन येण्यास पाठविले.

दुपारचे बारा वाजून गेले तरी लोणी आणण्यास गेलेले गडी परतले नाहींत. इकडे सर्व लोक भुकेंने गांजलेले पाहून श्रीगुरूंनी श्रीरामरायाला नैवेद्य समर्पण करून आरति केली व पाने मांडवून वाढण्यास सांगितले.

कोठींत एका डब्यांत थोडें तूप होते. तो डबा बाहेर आणवून, त्यांतील तूप श्रीरामरायाच्या नैवेद्यास वाढवून तो डबा तापविणेस त्यांनी ठेवविला. तूप वाढण्याचे वेळी श्रीरामरायाचे तीर्थ, तसेच श्रीमन्महाराजांचे चरणतीर्थ आणून त्यांत घालून मग वाढणेस सांगितले. साधारणतः ३-४ हजार लोक पंक्तीत बसले होते. श्रीगुरूंच्या नेहमीच्या शिस्तीप्रमाणे माहीतगारच तूप वाढीत होते. तूप वितळविण्याचे कामीं उमचगीच्या नाइकांची नेमणूक झाली होती. डब्यांतील तुपाचा घट्ट गोळा, डब्यांतून तूप कितीही ओतून घेतले व वाढले तरी अखेरपर्यंत न वितळतां तसाच होता हे पाहून नाइकांस फार नवल वाटले व श्रीगुरूंबद्दलची आदराची त्यांची भावना दुणावली.

इकडे श्रीगुरू पंक्तीमध्ये धांवत पळत सर्वांस आग्रह करकरून तूप वाढीत होते. थोड्याशा तुपांतच श्रीगुरूंनी ३-४ हजार लोकांस तृप्त केले. तसेंच ज्या डब्यांत अजून तूप शिल्लक होते तो तुपाचा डबा सर्वांचे जेवण झाल्यावर श्रीगुरूंनी देवळापुढे असलेल्या तुळशीकट्ट्यावर ठेवून ''श्रीमन्महाराज आज या डब्यात आले'' असें सांगून त्या डब्याची गंध, अक्षता, फुले यांनी पूजा करून, आनंदाने नाचत, सर्वांसह एक तास भजन केले व नंतर सर्व वाढप्यांस जमवून त्यांच्याबरोबर भोजन केले.

**(१०) कुटुंबवत्सलाने सांभाळून वागावे** - होंबळचे वे. तिरकंभट्ट काशीकर हे बहुशः श्रीगुरूंच्या सुखसहवासात असत. अर्थात् श्रीगुरूंच्या अनेकानेक अगम्य लीला प्रसंगोपात त्यांच्या निदर्शनास येत असत. त्यामुळें श्रीगुरूंवरील त्यांच्या भक्तीने अत्युत्कट रूप धारण केले. जरी वे. तिरकंभट्टांनी श्रीगुरूंना पूर्वी कांही जमिनीं अर्पण केल्या होत्या तरी एकदां परत आणखी काही जमिनी गुरूंस अर्पण कराव्यात असें त्यांच्या मनात आले. पण याची त्यांनी कोणापुढेंही वाच्यता केली नव्हती. पुढे थोड्याच दिवसानंतर ते बेलधडीस श्रीरामनवमीउत्सवास गेले. एके दिवशीं वे. तिरकंभट्ट एकटेच आपल्याजवळ आहेत असें पाहून श्रीगुरूंनी त्यास ''काय हो ! श्रीरामरायाला या खेपेस आणखीं काहीं जमिनी अर्पण करण्याचे ठरविलेले दिसते.'' असा प्रश्न केला. गुलदस्त्यात ठेवलेली गोष्ट श्रीगुरूंनी बोलून दाखविल्याचें पाहून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटले. वे. तिरकंभट्टांनी 'होय, जंतली येथील दोन डाग, तसेंच आलूर येथील दोन डाग, अशी एकूण ७२ एकर जमीन अर्पण करण्याचें ठरविलें आहे' असे सांगितले.

तें ऐकून श्रीगुरूंनी ''तुम्हीं कुटुंबवत्सल, असे सारखे देत राहिलांत तर इतरांस ते रुचणार नाही''असे म्हटले. लागलीच वे. तिरकंभट्टांनी 'इतरांशी मला काय करावयाचे आहे ? आपण स्वीकारीत असाल तर आजच दानपत्र करून देण्याची माझी तयारी आहे' असे नम्रपणे सांगितले. त्यावर श्रीगुरू ''निदान घरीं तुमच्या बायकोला तरी विचारा. मुलेबाळे असलेल्यांनी एकदम घाईनें कांही करूं नये. उद्या तीच मुलेबाळें अडथळा आणावयाची'' असे हसत म्हणाले.

या श्रीगुरूंच्या उक्तीचा वे. तिरकंभट्टांस विस्मय वाटला व त्यांच्या अंतर्ज्ञानाची ते मनांत प्रशंसा करू लागले. कारण अगदीं हाच विचार त्यांच्या मनास चाटून गेला होता. निदान बायकोला तरी विचारले पाहिजे असे त्यांस वाटत होते. तरी पण केवळ संकोचाने त्यांनी ते न बोलता मनांत दडपून ठेवले होते. आपल्या मनांतील भाव श्रीगुरूंच्या मुखांतून बाहेर पडतांच वे. तिरकंभट्टांनी श्रीगुरूंच्या चरणावर मस्तक ठेविले व 'मी आजच दानपत्र करून देतो' असे सांगून श्रीगुरूंना गदगला घेऊन जाऊन, त्या चार जमिनी दानपत्राने त्यांनी श्रीगुरूंच्या पदरांत टाकल्या.

वे. तिरकंभट्ट गावीं गेल्यावर त्यांनी ही वार्ता आपल्या बायकोस सांगितली. तेव्हां त्या साध्वीने 'उत्तम केलेत. परोपकारमूर्ति अशा त्या थोर महात्म्याला आपली सर्व मिळकत जरी अर्पण केलीत तरी मला त्यांत आनंदच वाटेल' असे उद्‌गार काढले. धन्य ती साध्वी. तिचे उद्‌गार ऐकून वे. तिरकंभट्टास परम संतोष झाला.

**(११) भागीरथीच्या उदकाचे श्रेष्ठत्व –** एका खेपेस श्रीगुरु होंबळला गेल्यावेळी वे. तिरकंभट्ट त्यांच्या दर्शनास गेले. नमस्कार करून ''उदईक आपण माझ्याकडेच भोजनास या' अशी त्यांनी श्रीगुरूंस विनंति केली. श्रीगुरूंनी पण ''हो, हो, अनायासें उद्यां गुरुवार आहे. अवश्य येतो'' असें सांगून 'शंकरभट्ट, उद्यां मी यांच्या घरी जेवावयाला जात आहे. तुमच्या घरी स्वयंपाक करवू नका'' असें शंकरभट्टास तात्काळ बजावले.

वे. तिरकंभट्ट हे मधुकरी अन्न सेवन करीत असल्याने मधुकरी अन्न श्रीगुरूंस कसे घालावे, असा त्यांच्या मनांत संकोच येऊन 'आपल्या जेवणाकरितां कोणत्या प्रकारची व्यवस्था ठेवावी ?' असे ते विचारू लागले. श्रीगुरूंनीपण त्यांची अडचण जाणली. ''मीही मधुकरी अन्नच सेवन करीन. वेगळा स्वयंपाक करण्याच्या भानगडीत सर्वथा पडू नका'' असें सांगितले.

दुसरे दिवशी वे. तिरकंभट्ट हे दुपारीं १२ वाजता नित्याप्रमाणे मधुकरीभिक्षान्न घेऊन घरी परतले. ते फार तर तिघा–चौघांना पुरेल इतके होते. तितक्यांत श्रीगुरूही त्यांच्या घरी दाखल झाले. त्यावेळी वे. तिरकंभट्ट यांचे घरीं गु. भ. हणमंतराव कुलकर्णी हंदिगोळ, रंगाप्पा कुलकर्णी होंबळ, वे. बिष्टभट्ट वगैरे ७–८ मंडळी श्रीगुरूंच्या दर्शनाकरतां मार्गप्रतीक्षा करीत आधीपासूनच येऊन बसली होती. श्रीगुरु येतांच त्यांनी दर्शन घेतले व आपापल्या घरी जाण्यास ते उठले. ते पाहून श्रीगुरूंनी त्यांस ''सगळे मिळून येथेंच जेऊं या. चला, या'' असे म्हणून आग्रहानें त्यांस ठेवून घेतले. श्रीगुरु त्या सर्वांसह आंत गेले व वे. तिरकंभट्टांस ''सर्वांची पानें मांड'' म्हणाले.

त्या सर्व लोकांना पाहून व श्रीगुरूंचे उद्‌गार ऐकून, 'दोघांना पुरेल इतकी माधुकरी, या ७–८ जणांना कशी पुरणार' या चिंतेने वे. तिरकंभट्टांची छातीच फुटली. श्रीगुरूंना त्यांच्या मनातील शंका समजली. ''एवढे संशयग्रस्त कां होता ? काशीहून तुम्हीं भागीरथी आणली आहे नां ? ती इकडे द्या'' असे म्हणून श्रीगुरूंनी गंगोदक घेऊन त्या मधुकरीअन्नावर प्रोक्षण केले व वाढा म्हणाले.

श्रीगुरूंच्या महिम्यानें दोघांना पुरेल एवढें असलेले ते मधुकरीभिक्षान्न त्या सर्व लोकांना तर पुरलेच, उलट आणखी शिल्लक राहिले. सर्वजण यथेच्छ भोजन करून तृप्त झाले व श्रीगुरूंच्या अगम्य लीलेची प्रशंसा करू लागले.

वाचक हो ! वे. तिरकंभट्ट मधुकरी अन्न सेवन करतात. गुरुवार श्रीदत्तप्रभूचा वार. असा अनायासें पवित्र अन्नाचा लाभ होणार म्हणून श्रीगुरूंनी आमंत्रण अत्यानंदाने स्वीकारलें अशी माझी स्वतःची धारणा आहे. तसेंच श्रीगुरूंना कोणत्याही गोष्टीचा मोठेपणा आपणांकडे घेणें बिलकूल आवडत नसें. दोघांचे अन्न दहाजणांस केवळ श्रीगुरूंच्या प्रभावानेंच पुरले हें खरें असले, तरी तो मोठेपणा त्यांनी भागीरथीच्या उदकास दिला. यातील तिसरें व महत्त्वाचे तत्व म्हणजे भोजनाच्या वेळीं आलेल्या माणसास तसेंच जाऊं देऊं नये. आपल्याबरोबर अवश्य भोजनास बसवावें हे होय.

**(१२) व्याधींवर श्रीगुरूंची हुकुमत** - बेलधडी येथें प्रतिवर्षी होणाऱ्या श्रीरामनवमीच्या उत्सवांत कीर्तन करण्यासाठी रामदुर्गचे प्रसिद्ध कीर्तनकार वे. बाबा दीक्षित दरवर्षी येत असत.

एका वर्षी त्यांना थंडीताप येत होता. तरीदेखील उत्सवास आलेच पाहिजे असें श्रीगुरूंनी त्यांस लिहिले होते. दररोज थंडीताप येत असल्यामुळे ते अशक्त झाले होते. कीर्तन करणेस असमर्थ होते. प्रतिपदेचे म्हणजे सुरवातीचे दिवशी पहिली पंगत उठली व वे. बाबा दीक्षित थंडीतापानें थडथडत तोंडावरून पांघरूण घेऊन निजले. श्रीगुरूंनी त्यांच्याजवळ जाऊन ''काय हो हरिदास, प्रकृती कशी आहे ? कीर्तन करण्यासारखी आहे कीं नाहीं ?'' असें विचारून बरोबर आणलेले श्रीरामरायाचे तीर्थ त्यांना दिले. दीक्षितांनी तीर्थ घेतले व ''महाराज, आतां थंडी आली आहे. अशक्तता फार वाढत आहे. कसें करूं ?'' असे विचारले.

ते ऐकून श्रीगुरूंनी हास्य वदनानें, काळजी करूं नकां, तुमच्या देहातील सर्व आळस, रोग या घटकेला पळून गेला. माझ्याबरोबर येऊन रामाचा प्रसाद घ्या व रामासमोर उभे राहून न भितां कीर्तन करा'' असें आश्वासन देऊन आपल्या हाताने त्यांस वर उठविलें व आपल्याबरोबर नेऊन त्यांस आपल्या शेजारी भोजनास बसविले. जरी त्यावेळी दीक्षितांच्या अंगात भयंकर ताप होता तरी श्रीगुरूंच्या आज्ञेनुसार त्यांनी पोटभर जेवण केले व ते कीर्तनास तयार झाले.

**(१३) भूतबाधेचे निरसन** – होंबळ येथील शंकरव्वा नांवाचे बाईस भूतबाधा झाली होती. ती अतिशय दुःखी कष्टी होती. भूतबाधेचे निवारण कसें करावें या विचारानें घरची मंडळी चिंताक्रांत झाली होती. हरतऱ्हेचे उपाय करून सर्व थकली होती.

एकदां श्रीगुरु होंबळला गेल्यावेळीं गु. भ. गोविंदप्पनवर कुलकर्णी हे गुरूंकडे गेले व त्यांनी नम्रपणे ''शंकरव्वाला भूत लागले असून ते तिला अतिशय छळीत आहे. त्याचे निवारण करण्याची कृपा व्हावी'' अशी श्रीगुरूंस प्रार्थना केली. तें ऐकून श्रीगुरु ''चिंता करू नका. ते आपोआप जाईल'' असे म्हणाले व लागलीच त्यांच्याबरोबर त्या घरीं गेले व त्यांनी खोलीत बैठक घालण्यास सांगितली. त्याप्रमाणें बैठक घातली गेल्यावर श्रीगुरु त्यावर कांबळे पांघरून डोक्यावरून घुंगट घेऊन स्वस्थ निजून राहिले.

इकडे शंकरव्वाच्या अंगातील भूत मोठमोठ्याने किंकाळ्या मारीत, ''गुरुमहाराजांना मुस्कट काढण्यास लावा. मी जाते. आता पुन्हा कधी येणार नाहीं'' असे ओरडत, हातपाय झाडीत झाड मोकळे सोडून पळून गेले. अशा तऱ्हेनें कांहीही न करतां केवळ श्रीगुरूमहाराजांच्या भीतीनें तें भूत आपोआप झाड सोडून गेलेले पाहून तेथील सर्व लोक 'श्रीगुरू सामान्य मनुष्य नाहींत, भगवत्स्वरूपच आहेंत' असे मानू लागले व त्यांच्याठायी त्यांच्यात विशेष भक्तिभाव निर्माण झाला.

**(१४) सद्पुरुषांचे ठिकाणी अविश्वास** - दुसऱ्या एका खेपेस चिरपरिचित असलेल्या एका भक्ताच्या मुलीला भूतबाधा होऊन तिला अत्यंत त्रास होत होता. एकदा त्या मुलीनें आपण होऊन श्रीगुरूंच्या पायावर लोळण घेतली व ''या भूतबाधेच्या त्रासातून मला मुक्त करा'' अशी प्रार्थना केली. श्रीगुरूंनी त्या मुलीला एक चिठी लिहून दिली व ''ही तू आपल्या डाव्या दंडात बांध.तसेंच होईल तेवढा जप कर. आता यापुढे दुसरा कोणताही उपाय करू

नको'' असे सांगितले.

त्या दिवसापासून त्या मुलीची बाधा हळूहळू कमी होऊ लागली. पण पुढें काहीं दिवस गेल्यानंतर त्या गावी एक मांत्रिक आला असतां, ती मुलगी त्याच्याकडे गेली व आपल्या मनाच्या समाधानासाठी तिने त्याच्याकडून एक यंत्र करून घेऊन ते बांधले.

पुढे थोड्याच दिवसात कमी झालेली बाधा पहिल्यापेक्षा जास्त होऊ लागली. तेव्हा पुन्हा एकदा त्या मुलीने श्रीगुरूंना त्यासंबंधी विचारले असता त्यांनी ''हा प्रारब्ध भोग. हा भोगलाच पाहिजे. याबाबतीत कोणताही उपाय चालणार नाही'' असे सांगून तिचे समाधान करून पाठविले.

बाधा कमी झाली असता दुसरा कोणताही उपाय करू नको असे श्रीगुरूंनी बजावले असता, तिला मांत्रिकाकडे जाऊन उपाय करून पाहण्याची दुर्बुद्धि झाली. तो उपाय शेवटी अपाय ठरला. श्रीगुरूंविषयी त्या मुलीने कृतीने गैरविश्वास दाखविला. हाच तिचा प्रारब्धभोग असे म्हणावेसे वाटते.

**(१५) रामभाऊंवर कृपा** - तेरदाळ या गावी गणेश फडणीस या नावाचे एक सुखवस्तु पण करारी सद्‌गृहस्थ रहात होते. त्यांचे रामभाऊ नावाचे चिरंजीव बी.ए., एल.एल.बी. होते. सांगली संस्थानमध्ये त्यांनी मामलेदार व प्रांताधिकाऱ्याचे पद भूषविले होते. ते एकदा तेरदाळ गांवी टॉयफॉइडने (विषमज्वरानें) आजारी पडले. त्यावेळी हल्लीप्रमाणे त्या रोगावर अचूक गुणकारी औषधें निघाली नव्हती. एकंदरीने त्यांची जगण्याची आशा दिसत नव्हती. शंकर, गणेश, ज्यास सर्व गांव मामा या नांवाने संबोधित असत, हे एक दिवस सायंकाळी घरातून बाहेर पडले ते श्रीगुरूंचा मुक्काम तेव्हा तेरदाळ येथे असल्यानें त्यांच्याकडे गेले. श्रीगुरूंच्या चरणी मस्तक ठेवून मामांनी आपली व्यथा निवेदन केली. श्रीगुरू तात्काळ 'चला, पाहूं या'' असे म्हणून उठले ते मामांबरोबर त्यांच्या घरी गेले. रामभाऊंजवळ बसून श्रीगुरूंनी आपला अमृतहस्त त्यांचे अंगावरून फिरविला. रामभाऊंस श्रीरामरायाचा अंगारा लावला व काहीं काळजी करू नकां. दोन दिवसांनी बरे वाटूं लागेल असें सांगून निघून परत आपल्या बिऱ्हाडी गेले. आश्चर्याची गोष्ट अशी की खरोखर दोन दिवसांनंतर उतार पडून रामभाऊ लवकरच खडखडीत बरे झाले.

**(१६) मृत्यूपाशातून सुटका** - श्रीमन्महाराज शके १८३१ सालीं बरोबर दोनशे लोक घेऊन काशीयात्रेस गेले होते. श्रीगुरूंनाही आज्ञा केल्याप्रमाणे तेही कर्नाटक भागांतील बऱ्याच भक्तांना बरोबर घेऊन त्यांत सामील झाले होते.

त्या खेपेस श्रीमन्महाराजांचा काशीत दीड महिना मुक्काम होता. त्या सुमारास श्रीगुरूंबरोबर गेलेल्या कनकराव अण्णेगिरी नांवाच्या इसमास विषमज्वर झाल्यानें तो अतिशय त्रासला होता. खरोखर पाहतां त्याची प्राणांतिक अवस्था झाली होती. तो जगेल अशी यत्किंचितही आशा नव्हती. सर्व लोकही हा जगत नाहीं असें उघड प्रतिपादूं लागलें होते. अशा स्थितीत बरोबरच्या कितीतरी लोकांना श्रीमन्महाराजांनी परवानगी देऊन पाठवून दिले होते. कनकरावास तसेंच श्रीगुरूंस त्यांनी जाऊ नकां असें सांगून ठेवून घेतले होते. दररोज कनकरावाचा आजार वाढतच राहिला.

अशा स्थितीत तापाच्या फणकाऱ्यानें कनकराव रात्रीं विवळत पडला असतां त्यांस थोडी झोंप लागली. झोंप

कसली, ती ग्लानीच होती. तशांत त्याला स्वप्न पडले. स्वप्नांत एक भयंकर अक्राळविक्राळ पुरुष त्याचे जवळ आला व त्याचे मानेस फांस घालून त्यास ओढूं लागल्याचे दृश्य त्यांस दिसल्याचा भास झाला. ते पाहून तो भयानें कापू लागला व त्यानें श्रीगुरूंना हाक मारली. इतक्यांत श्रीगुरु जवळ आल्याचा भास होऊन ''का घाबरतोस ? महाराज येत आहेत. पाहिले नाहींस काय ?'' असे शब्द त्याच्या कानावर पडले न पडले तोंच श्रीमन्महाराजांनी जवळ येऊन त्या अक्राळ विक्राळ पुरुषाला परत पाठविल्यासारखे त्यास भासले.

पुढें त्याला जाग येणार इतक्यांत उजाडले. त्यावेळी श्रीगुरु खदखद हंसत समोर उभे होते. जागा झालेल्या त्याला श्रीगुरु ''का रे कनका ! चिठी परत गेल्यासारखी दिसते'' असें म्हणत त्याच्या अंगावरून हात फिरवून निघून गेले. श्रीगुरूंचे उद्‌गार ऐकून, त्यानें स्वतः स्वप्नात पाहिलेले व श्रीगुरु प्रत्यक्ष बोललेले तंतोतंत जुळलेले पाहून, तो आनंदपुलकित झाला व त्यानें श्रीगुरूंना मनांत, पण मनापासून शतशः वंदन केले. त्या दिवसापासून त्याला पुढे क्रमाक्रमाने बरें वाटू लागले व तो श्रीमन्महाराजांची अनुज्ञा मिळून काहीं दिवसांनी सुखरूपपणे आपल्या गावी गेला.

**(१७) श्रीरामाला काळजी -** एकदां श्रीगुरू आपला शिष्य श्रीपादभट्ट गुडगेरी यांस बरोबर घेऊन नेहमीच्या परिपाठाप्रमाणें नवरात्राच्या उत्सवाची वर्गणी जमविण्याकरिता निघालें होते. ८-१० गांवांत संचार करून ठिकठिकाणच्या ठरावीक भक्तांकडून जमलेले देणगीधन घेऊन सूर्यास्ताचे वेळीं ते बेलधडीस आलें. तेथें श्रीरामाचे दर्शन घेऊन अंधार पडत चालला होता तरी, बेलधडीस न थांबता, डोंगरामधील पायवाटेनें ते वेंकटापुरास जाण्यास निघालें. अमावस्या जवळ आली असल्यानें थोड्याच वेळांत चोहोंकडे काळाकभिन्न अंधार पसरला. नीट वाट देखील दिसेना अशी अवस्था झाली.

त्यावेळी त्यांच्याबरोबर असलेले श्रीपादभट्ट यांचेजवळ वर्गणींचे ४००-५०० रूपये असल्यानें मनांत भिऊं लागले व श्रीगुरूंना उद्देशून ''अंधार फार पडला. मला भीति वाटू लागली आहे'' असे म्हणालें. श्रीगुरु त्यांना ''कां भितोस ? भिऊ नकोस. राम राम म्हणत चल'' असे म्हणून पुढेंच चालले. श्रीपादभट्ट गुर्वाज्ञेप्रमाणे राम राम म्हणत श्रीगुरूंच्या मागें सावकाश जाऊं लागले. ८-१० पावलें अशा रीतीनें गेले असतील नसतील तोंच एक चमत्कार घडला.

श्रीपादभट्टांच्या दोन्हीं बाजूंस, उजवीकडून व डावीकडून दोन महान सर्प (नाग) फार जवळून त्यांच्याबरोबर जात असल्याचे तारकांच्या प्रकाशात श्रीपादभट्टांना दिसले. त्यामुळे तर ते जास्तच घाबरले व थरथरां कांपत, ही हकीकत त्यांनी श्रीगुरूंना हळूंच सांगितली.

''जवळ पैसे असल्यानें भ्यालेल्या तुझ्या रक्षणाकरिता म्हणून श्रीरामरायानेंच हे सर्प पाठविलें आहेत. त्यांना इतके का भितोस ? काळजी करूं नकोस'' असें त्यावर श्रीगुरूंनी त्यांना सांगितले.

हे महासर्प श्रीपादभट्ट व श्रीगुरु वेंकटापुरास येईपर्यंत त्यांच्याबरोबर होते. दीपस्तंभाजवळ आल्यावेळी श्रीपादभट्टांनी जेव्हा पाहिले तेव्हां ते महासर्प अदृश्य झाल्याचे त्यांच्या लक्षात आले.

**(१८) साक्षात् मारुती दर्शन -** एकदा श्रीगुरु गावच्या ४-५ लोकांस बरोबर घेऊन बेलधडीहून पंढरपुरास निघालें होते. ते गदग स्टेशनवर आले व एकाला 'सोलापूरचे तिकीट काढ' असे सांगून त्यांनी आपल्या अक्षय

पिशवींतून रुपये काढून त्यास दिले. तिकिटें काढून झाल्यावर सगळे गाडीत बसले. सकाळी ८ वाजता गाडी सितीमनी स्टेशनवर आली. तेव्हां श्रीगुरूंनी बरोबरच्या लोकांस 'आज येथेंच उतरून कृष्णा स्नान करू. रात्रीं येथून पुढें गेले तरी चालेल' असे सांगितले व सर्वांसह ते सितीमनी स्टेशनवर उतरले.

नंतर आपल्याबरोबर असलेल्या लोकांपैकी एकाला "तूं याच गाडीने बागलकोटला जाऊन ५०० उत्तम मोठे आंबे घेऊन, तिकडून दिवसास येणाऱ्या गाडीने परत ये" असे सांगून बागलकोटला पाठविलें. राहिलेल्या लोकांसह श्रीगुरु तेथील एका धर्मशाळेंत उतरले. त्यांच्याबरोबर गुत्ती रामैय्या होताच. त्यास श्रीगुरूंनी २५ लोकांचा स्वयंपाक करण्यास सांगितले. स्वयंपाकास लागणारी डाळ, तांदूळ, कणीक, गूळ इत्यादि सर्व सामग्री आणणेकरितां म्हणून काही जणांना गांवात पाठवून, सर्व सामान आणवून दिले.

रामैय्याने श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणे भात सार, वांग्याची भाजी, चपाती वगैरे पदार्थ बनविण्यास सुरवात केली. पण ते सर्व पदार्थ तयार होण्यापूर्वी बागलकोटला धाडलेला शिष्य श्रेष्ठ प्रतीचे आंबे घेऊन दुपारी ११ वाजतां परतही आला. तेव्हां श्रीगुरूंनी ते आंबे पिळण्यास ४-५ लोकांना बसविले व ते स्नानासाठी नदीस गेले.

आंबे पिळताना त्यांच्यापैकी एक "या डोंगरांत कोणी रहात नाहीत, आम्ही तर सारे ७-८ जण आहोत. मग अशा प्रकारचा इतका स्वयंपाक व इतक्या आंब्यांचा रस कां करण्यास सांगितला आहे समजत नाहीं" म्हणाला. त्यावर "गावातील लोकांना जेवावयास बोलावणार असतील" असे दुसरा म्हणाला. अशा त्यांच्या आपापसांत गोष्टी चालल्या असतां, एक प्रचंड धष्टपुष्ट काळा ब्राह्मण हातांत फक्त एक धोतर धरून त्यांच्याजवळ आला व त्यांना "येथें ब्रह्मानंद नांवाचें असतात नां ? ते कोठे आहेत ?" असे विचारूं लागला.

त्यावेळी त्यापैकी एकांने "होय, असतात. आतां ते नदीवर स्नानास गेले आहेत. थोड्याच वेळांत परत येतील. येथे घोंगडीवर तोपर्यंत बसा" असे म्हणून आंथरलेल्या घोंगडीकडे अंगुलिनिर्देश केला. तो ब्राह्मणही तोंडाने 'राम, राम' म्हणत त्या घोंगडीवर बसला.

पुढें थोड्याच वेळात श्रीगुरू स्नानसंध्या आटोपून धर्मशाळेकडे परत आले. येताच त्या आजानुबाहू ब्राह्मणाला पाहून श्रीगुरूंनी प्रथम त्याला नमस्कार केला. त्या ब्राह्मणानेंही श्रीगुरूंस प्रतिनमस्कार केला व "बेलधडींचे ब्रह्मानंद म्हणविणारे तुम्हींच काय" असा प्रश्न केला. श्रीगुरूंनी विनयानें 'होय' असें सांगून, "माझ्याकडून तुम्हांस काय पाहिजे आहें ?" असें विचारलें. त्यावर तो ब्राह्मण अतिशय गंभीरपणें "अन्नसंतर्पण करणाऱ्यांत तुमचे नांव महशूर झाले आहे असे मी ऐकले आहे. तुम्हीं यावेळी येथे असल्याची बातमी लागल्यानें तुम्हांला हुडकीत येथें आलो आहे. कारण कोणीही मला आजपर्यंत पोटभर अन्न वाढलें नाही. त्यांतून या दोन दिवसांत तर मला मुळीच अन्न मिळालें नाही. तुम्हीं तरी मला पोटभर अन्न वाढाल या विश्वासावर मी आलो आहे" असे म्हणाला. त्याचे बोलणे ऐकून श्रीगुरूंना परम खेद झाला व "छे, छे, तर मग तुम्ही फार भुकेलेले असाल. प्रथम जेवावयास बसा" असें ते म्हणाले. लगेच आपल्या परिवारांतील लोकांना उद्देशून "आंबे पिळून झालें की नाही ? लवकर संपवा श्रीरामाला नैवेद्य समर्पण करून प्रथम भुकेलेल्यांचे जेवण उरकून घेऊं या" असें म्हणत गडबड करून त्यांनी नैवेद्य दाखवला व आपण स्वतः त्या ब्राह्मणास बसणेस पाट मांडला. मोठमोठी ४ पाने निवडून घेऊन ती

जोडून मांडली व त्या ब्राह्मणास त्या पाटावर येऊन बसण्यास सांगितले.

ब्राह्मण पाटावर बसला. श्रीगुरूंनी रामैय्यास वाढावयास सांगितले. आपण स्वत: त्याच्यासमोर बसून आग्रहानें त्यास आमरस वाढीत होते. तो ब्राह्मण वाढलेले सर्व आनंदाने भक्षण करीत होता.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे केलेला सर्व स्वयंपाक व ५०० आंब्यांचा आमरस संपला. नांवालादेखील शिल्लक राहिला नाहीं. ब्राह्मण तृप्त झाला व त्याने ढेकर दिली. श्रीगुरूंच्याकडे कृतज्ञतेने पाहून ''मला पोटभर जेवूं घालणारे आजमितीस तुम्हीं एकटेच'' असें सांगून, हात तोंड धुवून तेथून निघून गेला. तो पुन्हां कोणाचेही दृष्टीस पडला नाही.

आमरस खायला मिळणार या आशेवर आंबे पिळतांना जरी त्या लोकांचे हात दुखूं लागले होते तरी ते दु:ख त्यांनी गिळले होते. माणसाच्या उंचीच्या कळग्यात कोळगा भरून काढलेली आंब्याची शिक्रण त्या ब्राह्मणानें फस्त केलेली जेव्हां त्यांनी पाहिली, चव बघण्यापुरतीदेखील शिल्लक नसल्याचे जेव्हां त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें तेव्हां मात्र त्यांचे कष्ट आठवून त्यांचे दु:ख दुणावले.

इकडे तो ब्राह्मण जेवण संपवून हात धुण्यास उठतांच, इतके शिष्य बरोबर होते तरी त्यांच्यावर न सोपविता श्रीगुरूंनी त्याची खरकटी पानें स्वत: काढून गुंडाळून घेतली व कोणालाही न समजेल अशा तऱ्हेने नदीत नेऊन सोडली. पुढे गडबडीनें सार, भात करवून श्रीगुरूंनी सर्वांसह भोजन केले व त्या रात्रींच पंढरपूरला प्रयाण केले.

केवळ त्या ब्राह्मणासाठीच श्रीगुरु तेथें उतरले असावेत असेंच सर्वांना वाटले. तो केवळ ब्राह्मण नव्हता तर तो श्रीमारुतिराय होता अशी सर्वांची खात्री झाली. श्रीगुरूंचा महिमा अगाध म्हणून त्यांना ते समजले व ते वाटेंत उतरले.

**(१९) संत गूढ बोलतात** - होंबळ येथील वे. तिरकंभट्टाला पुत्रसंतति नव्हती. ४-५ मुलीच होत्या. कालांतरानें त्यांना एक मुलगा झाला. त्यानंतर एकदा श्रीगुरु वे. तिरकंभट्टाचे घरीं गेलें असता त्यांच्या बायकोने श्रीगुरूंकडे ''अपूर्वाईच्या या मुलाच्या हातात दोन कडी करून घालवा म्हणून यजमानाजवळ दातांच्या कण्या केल्या पण ते मनांवरच घेत नाहींत'' अशी तक्रार केली व ''तुम्ही तरी त्यांना कडी करून मुलाचे हातांत घालणेस सांगा'' म्हणून विनंति केली. त्या मातेचे ते बोल ऐकून श्रीगुरु हांसले व ''यंदा पीक चांगले आलेले नाहीं. तरी पुढच्या पिकाचे वेळीं कडी करून घालण्यास सांगतो'' असे आश्वासन देऊन श्रीगुरूंनी त्या साध्वीचें समाधान केले. हें. श्रीगुरूंचे आश्वासन द्व्यर्थी (द्वंद्वार्थी) होते. त्या गरीब, भोळ्या साध्वीस त्याचा अर्थबोध कसा होणार ! पुढे थोड्याच दिवसांत तिचा तो मुलगा वारला.

श्रीगुरूंनी दिलेल्या उत्तराचा अर्थ या खेपेचा हा मुलगा जगणार नाही असा होता. पण त्याच उत्तरातील उत्तरार्धात पुन्हां मुलगा होणार असल्याचा भाव स्पष्टपणे व्यक्तविलेला होता. त्याप्रमाणें पुढें मुलगा झाला व त्या साध्वीचा मनोरथही पूर्ण झाला.

एकूण संतांच्या बोलण्यांत गूढार्थ असतो. तो समजण्याची आपल्या अंगीं पात्रता असावी लागते. ती पात्रता सहवासानें, ईश्वर ध्यानांत मग्न असणाऱ्यांचे व श्रीगुरूंवर पूर्ण निष्ठा ठेवणाऱ्यांचे अंगी बाणते.

**(२०)** होंबळची एक मुलगी हंदिगोळ येथें दिलेली होती. तेथें तिची सासू तिला फार छळीत असे. एकदां श्रीगुरू होंबळला आल्यावेळी ती मुलगी तेथे होती. श्रीगुरूंनी त्या मुलीच्या योगक्षेमाची चौकशी केल्यावेळी तिच्या आईनें श्रीगुरूंना सर्व हकीकत कथन केली व ''महाराज, मुलीला सासूचा जाच फार आहे. पुढें कसें करावें ?'' असा प्रश्न केला. त्यावर श्रीगुरूंनी ''याची एवढी काळजी उगींच का करतां ? आणखी थोड्याच दिवसांत ती काशीला जाईल'' असे सांगितले. खरोखर पुढें थोड्याच दिवसांत त्या मुलीची सासू मरून गेली. ती मुलगी जांचातून सुटून सुखी झाली व तिच्या माहेरच्या सर्व मंडळींची काळजीही दूर झाली.

**(२१) गुरु-शिष्य एकरुपता** - श्रीमन्महाराज समाधिस्थ होण्यापूर्वी ४-६ महिनें अगोदर पुण्यास गेलें होते. पुण्यात त्यांचा जवळजवळ आठवडाभर मुक्काम होता तरी श्रीमन्महाराजांनी आपला तळमळीचा भक्त श्री. गणपतराव दामले, यांच्या घरी जाणे जमले नाही.

पुढे ज्यावेळी श्रीमन्महाराजांनी तेथून प्रयाण केले त्यावेळी त्यांना पोचविण्यास सगळी भक्त मंडळी पुणे स्टेशनवर गेली होती. त्यांत गणपतराव दामलेही होते. श्रीमन्महाराज हे रेल्वेच्या डब्यात खिडकीजवळ बसले होते व सर्व भक्तांकडे कृपापूर्णदृष्टीनें पहात होते. श्रीमन्महाराज आपले घरी आलें नाहीत या विचारानें व्यथित झालेले गणपतराव डब्याच्या पायरीवर पण श्रीमन्महाराजांजवळ उभे होते. त्यावेळी श्रीब्रह्मानंदगुरू तेथें नव्हते. अशा स्थितीत गाडी निघाली. तेव्हां श्रीमन्महाराजांनी गणपतरावांच्या तोंडावरून हात फिरवून,''बाळ, मनाला वाईट वाटून घेऊ नकोस. मी पुन्हां इकडे येईन तेव्हां तुझ्या घरी येऊन चटणी-भाकरी खाऊन जाईन'' असे सांगून त्यांचे सांत्वन केले. गणपतरावांना गहिवरून आले व ते डोळे पुशीत पायरीवरून उतरले व श्रीमन्महाराजांना वंदन करून घराकडे गेले.

पुढे थोड्यांच दिवसांत श्रीमन्महाराजांनी देह ठेवला. गणपतरावांना श्रीमन्महाराजांनी दिलेले वचन अपूर्ण स्वरूपातच राहिले असें वाटलें.

आश्चर्याची गोष्ट अशी की पुढें दोन वर्षांनंतर ब्रह्मानंदगुरू अकस्मात् एकदा पुण्यास गेले. ते थेट गणपतरावांच्याच घरी गेले व हसत हसत ''काय रे, तुझ्या घरची चटणी-भाकरी खाणेचे तसेंच राहून गेले आहे की'' असें म्हणाले. ते ऐकताच दोन वर्षांपूर्वी श्रीमन्महाराजांच्या मुखातून निघालेले बोल पूर्णपणें विसरून गेलेल्या गणपतरावांना त्याची आठवण झाली व त्यांचा कंठ दाटून आला व श्रीमन्महाराजांच्या मुखांतून निघालेलेच शब्द श्रीगुरूंनी उच्चारलेले ऐकून त्यांना आश्चर्य वाटले.

श्रीगुरूंनी त्यादिवशी गणपतरावांचे घरी अक्षरशः चटणी-भाकरीच खाल्ली व त्या भक्ताचे मनोरथ पूर्ण केले.

वास्तविक श्रीमन्महाराजांनी गणपतराव यांनी स्टेशनवर दोन वर्षांपूर्वी दिलेल्या अभिवचनाची श्रीगुरूंना तिळमात्रही माहिती नव्हती. असें असतानाही ही घटना घडली. ती कशी असा विचार करूं गेल्यांस गुरुशिष्यांमधील एकात्मता व अनन्यता ती हीच असें म्हटल्यावाचून राहवत नाही.

**(२२) भक्तहितकारक** - सांगली संस्थानांत गणपतराव सहस्त्रबुद्धे या नांवाचे एक पोलीस जमादार होते.

ते शिरहट्टी तालुक्यात हवालदाराचे नोकरीवर असतांना त्यांचेजवळ एक घोडे होते. श्रीगुरु वरचेवर गणपतरावांकडे जात असत. एकदां असेंच श्रीगुरु त्यांचेकडे गेले असतां त्यांनी ते घोडे पाहिले. श्रीगुरू गणपतरावांस ''अरे गणू, हे घोडे कोणाचे ?'' असे विचारले व लगेच ''हे बिलकूल ठेवून घेऊं नकोस'' असे सांगितले. गणपतरावांनी का ठेवून घेऊ नको वगैरे न विचारतां दुसरेच दिवशी त्यांनी ते रणतुरास आपल्या श्वशुरांकडे पोंचते केले. तेथे ते ३-४ दिवसच असेल. एके दिवशीं डोंगरात चरत असतां अकस्मात् वाघानें त्यास खाल्ले. पुढे ४-६ दिवसांत गणपतराव रणतुरला गेल्यावेळीं त्यांस ही हकीकत समजली. रणतुरच्या त्यांच्या श्वशुरांस आपले हातून जांवयाचे घोडे दगावले हे बरें नाहीं असे वाटून त्यांनी आपल्याकडे असलेल्या २-३ घोड्यांपैकी एक घोडे जावयांस देऊन त्याची भरपाई केली. गणपतरावांना पदरचा पैसा खर्च न करतां, श्वशुरांपुढे तोंड न वेंगाडता घोडे मिळाले.

**(२३) संतांचिया खुणा संतचि जाणती** - श्रीब्रह्मचैतन्य महाराज यांचा मुक्काम श्रीक्षेत्र वेंकटापूर येथें होता. श्रीगुरूही त्यांचेबरोबर तेथें होते. एके दिवशी सायंकाळी दिवे लावणीनंतर मद्रासकडील बाजूचे शंभर असामी वेंकटापुरास आले. त्यांनी ब्रह्मचैतन्य महाराजांचे दर्शन घेतले, थोडा वेळ वाट पाहिली व श्रीगुरूंस 'आम्हांस जेवावयांस वाढा' म्हणू लागले. तो दिवस एकादशीचा असल्यानें श्रीगुरूंच्या पद्धतीप्रमाणें जेवावयाची काहींच व्यवस्था नव्हती. श्रीगुरूंनी त्यांस तेथील नियम सांगितला व 'पहाटे ५ वाजतां पाहिजे तर पाने मांडतो' म्हणून सांगितले. पण ते लोक ऐकेनात. अखेर त्यांनी ती तक्रार श्री ब्रह्मचैतन्यांकडे नेली. ब्रह्मचैतन्य महाराजांस कांही झाले तरी ब्रह्मानंदबुवा त्यावेळी त्यांस जेऊ घालणे शक्य नाही याची खात्री असूनदेखील श्रीमन्महाराजांनी त्या लोकांस ''तुम्ही जेऊ न घातल्यास आम्हांस तुमचेपुढे बोंबलण्यास सांगितले आहे'' असा निरोप ब्रह्मानंदबुवांस सांगा म्हणून परत पाठविले. त्याप्रमाणे त्या लोकांनी श्रीगुरूंस सांगितले. श्रीगुरूंनी निरोप ऐकला. त्यातील आशय समजून घेतला व त्या लोकांस ''बरे आहे. अन्नाची सिद्धता होईपर्यंत आपण जरा भजन करूं या'' असे म्हणून त्यांना मारुतीच्या देवळासमोरील पटांगणात नेऊन वर्तुळाकार बसविले. आपण स्वत: मध्यभागी बसून भजन सांगू लागले. भजन इतके रंगले की, ती मंडळी देहभान विसरली. रात्रीचे २-२॥ वाजून गेले असतील. श्रीगुरूंनी भजन थांबविले व 'तुम्हांस भूक लागली आहे नां ? चला हणमप्पाचे पाठीमागें काय सापडते ते पहा' असे म्हणाले. मारुतिरायाच्या पाठीमागे जाऊन पाहतां एक लहानसे भाताचे तपेले व एक लहानसे झुणक्याचे पातेले झांकून ठेवलेले आढळले. भजन चालू असतां कोणी आले गेले नव्हते. मग ही दोन भांडी येथे कशी आली ? याचे त्या मंडळींस आश्चर्य वाटले. त्याचबरोबर एवढेसे अन्न इतक्या मंडळींस पोटभर कसें होणार अशी धास्तीही त्यांस वाटली. पण तसे कोणी बोलून दाखविले नाहीं. श्रीगुरूंनी पत्रावळी मांडावयास लावल्या व सर्वांस भोजन घातले. सर्वांची आकंठतृप्ति होऊन शिवाय अन्न शिल्लक राहिलेले जेव्हा त्या मंडळींनी पाहिले तेव्हा तर ते अवाक् झाले. श्रीगुरूंनी त्यास विश्रांति घेण्यास सांगितले आणि 'द्वादशीचा प्रसाद सकाळीं बरोबर ७ वाजता आहे. तत्पूर्वी स्नान करून हजर रहा' असे श्रीगुरूंनी बजावण्यास कमी केले नाही.

॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण सव्विसावें
## श्रीगुरूंचे निर्याण

श्रीब्रह्मानंदगुरू अलीकडे दोन वर्षें थंडीतापानें बेजार होऊन अशक्त झाले होते. आता त्यांना साठावें वर्ष लागले होते. अशा अशक्तावस्थेतदेखील ते ज्या प्रकारें कष्ट करीत असत, सतत संचार करीत असत, उपवासादि व्रतें चालवीत असत, त्यावरून इतक्या लवकर ते आपणांस सोडून जातील अशी शंकाही सामान्य माणसास कधीं शिवणें शक्य नव्हते व तशीं कधी कोणास शिवलीही नाहीं. त्रिकालज्ञानी अशा त्यांना मात्र काळाची चाहूल लागली असावी असें वाटते. याची जाणीवही हसत खेळत मधून मधून आपल्या भक्तांस देण्याचा ते प्रयत्न करीत. पण कोणासही त्यावेळी त्यांच्या बोलण्यातील उद्दीष्टांचे ज्ञान होत नव्हते व झालें नाही.

काही वेळेस श्रीगुरु 'मी आश्रम घेतो म्हणजे पुढे तुम्हांला कोणाला त्रास होणार नाही' असे म्हणत. नुसते म्हणून ते थांबले नाहींत तर एकदां बेलधडी येथील दासनवमीचे उत्सवप्रसंगी तेथें ब्रह्मश्री गुरुनाथशास्त्री, श्री. वासुदेवशास्त्री, कुरुंदवाडचे श्री. बनूशास्त्री वगैरे विद्वानांच्या मेळाव्यात श्रीगुरूंनी तो प्रश्न उपस्थितही केला होता. श्रीगुरूंनी सर्व तयारीही करवून उत्तम अशा दोन छाट्याही आणविल्या. परंतु जेव्हां त्या विद्वानांनी आश्रम घेण्याचा विधि श्रीगुरूंना समजावून सांगितला, तेव्हा प्रणवोपदेशाला अधिकारी स्वामींस बोलावून आणावें लागेल, त्यांच्याकडूनच प्रणवोपदेश व आश्रमदीक्षा घ्यावी लागेल असें श्रीगुरूंस कळून चुकलें. तेव्हां ''मग आम्हांस दुसरा गुरु करून घेतला पाहिजे तर ? हें तर माझ्या हांतून कालत्रयीं घडणार नाही. एकदां केलेल्या गुरूस सोडून दुसरा गुरु करून घेणे म्हणजे एकदां करून घेतलेल्या नवऱ्यास सोडून दुसरा नवरा करून घेऊन व्यभिचारदोष पदरीं बांधून घेण्यासारखें आहे'' असें विनोदानें म्हणाले व मला आश्रमच घेणेचा नाहीं असे म्हणून त्यांनी आश्रम घेण्याची गोष्टच मनातून काढून टाकली.

केव्हा केव्हा तर ''जो मनुष्य देऊळ बांधतो तो ते पुरें होईपर्यंत जगत नाहीं'' असें म्हणत. श्रीवेंकटपतीचा जीर्णोद्धार जवळ जवळ पुरा झाला होता. यदाकदाचित् अल्पस्वल्प भाग राहिला असल्यास तो पुरा होणेचे आंतच आपला अवतार आटोपणार असें ध्वनित करण्याचा श्रीगुरूंचा मानस असावा. केव्हा केव्हा तर ''उत्तरोत्तर काळ फार कठीण येणार आहे. यापुढे आपल्यासारख्यांनी न जगणे बरे'' असेंही उद्गार श्रीगुरू काढीत असत. काही वेळा ''आता माझी प्रकृती चांगली आहे. आतां फार वर्षे जगणार आहे'' असेही म्हणत. एका वेळी तर ''आपल्याला पटकी झाली आहे'' असे सर्व भक्तांस त्यांनी सांगून पाठविले. घाबरून जाऊन त्यांचे अनेक शिष्य जमतांच ''काल जास्त होते आतां जरा कमी आहे'' असे सांगून त्यांस श्रीगुरूंनी परत पाठविलें.

एवढे मात्र खरे की आजवर श्रीगुरूंनी ज्या कांही उपाधी आपल्यामागें लावून घेतल्या होत्या, त्या सर्व उपाधींची उत्तम व्यवस्था लावून नेमलेल्या पंचांच्या देखरेखीखाली स्वतंत्रपणे व्यवस्थित कार्य चालू शकते याची आपण गैरहजर राहून श्रीगुरूंनी खात्री करून घेतली होती व अशा रीतीनें त्या उपाधीतून ते मुक्तही झाले होते. बेलधडी, वेंकटापूर व गोंदावले ही त्यांची खरी उपाधिस्थानें होत. तीही सोडण्याचा त्यांचा कायमचा निर्धार होऊन आपल्या अंतकाळास, यथायोग्य स्थान ते हुडकत होते असें दिसते.

शके १८४० सालचा श्रीरामनवमीचा उत्सव श्रीगुरूंनी अत्यंत थाटानें पार पाडला. उत्सवाच्यापूर्वी दरसालचे वहिवाटीप्रमाणें आसपासच्या सर्व गांवी श्रीगुरूंनी सर्व भक्तमंडळींस ''यावर्षी उत्सवास चुकू नका. ही शेवटची रामनवमी. यानंतर मी विश्रांति घेणार आहे'' असे स्पष्ट बजावल्याचे सांगतात. म्हणून त्यावर्षी रामनवमीच्या उत्सवास ७-८ हजारावर लोक जमले होते.

यावर्षी अपरिमित अन्नदान झाले. भक्तांच्या इच्छेनुरूप रोज पक्वान्ने बनविली जात. अठरापगड जातीस पुरेशी होतील अशी बनविली जात. गोरगरिबांना यावर्षी श्रीगुरूंनी विपुल धान्य, वस्त्र व द्रव्य दिले व त्यांस तृप्त केले आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांनी श्रीरामरायाच्या पुढील व्यवस्थेसाठीं व्यवस्थापक पंचाकडे आपल्या 'अक्षय' अशा लहान पिशवीतून १००० रूपये काढून दिले.

वैशाखमासीं श्रीलक्ष्मीवेंकटेशाचा विवाहमहोत्सव संपवून आषाढमासातील गुरुपौर्णिमेचे उत्सवास गोंदावलेस जातो असें सांगून श्रीगुरु तेथून निघाले. याखेपेस त्यांचेबरोबर बेलधडीचे वे. नारायणभट्ट हरलापूर हे होते. गदग, हुबळी, धारवाड, बेळगांव अशा वाटेवरील गांवी थांबत थांबत श्रीगुरु गुरुपौर्णिमेचे सुमारास सांगलीस आले. सांगलीसही श्रीगुरूंचा शिष्य समुदाय बराच होता. श्रीगुरूंनी नामसप्ताह व श्रीगुरुपौर्णिमेचा उत्सव सांगलीस उरकला.

श्रीगुरुंच्या मनांतून कृष्णाकांठी कायमचा वास करावा असें होतें असें दिसतें. म्हणून कृष्णेचे काठीं असलेल्या ८-१० खेड्यांत संचार करून अखेर ते उगारला आले. तेथे श्रीगुरूंनी एक नामसप्ताह केला. त्यानंतर श्रीगुरु कागवाडला आले. ४-६ दिवस तेथें राहिलें. त्यावेळी श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन यांस ''आमच्याकडे तुम्ही कांही दिवस या अथवा आम्हींच तुमच्या गांवाला येतो'' असे सहजगत्या म्हणाले होते. अशा रीतीनें कागवाडचा कृष्णाकाठ श्रीगुरूंनी मुक्रर केला व श्रावणमासाच्या सुरवातीला ते वेंकटापुरला परत गेले.

श्रावणमासी संपूर्णपणें तेथे राहून श्रावणांतील सणवार कसें साजरे करावयाचे या बाबतच्या सेवेकऱ्यांस साद्यंत सूचना श्रीगुरूंनी दिल्या. भाद्रपदमास सुरू होतांच नवरात्रोत्सवाचे आमंत्रणाचे निमित्ताने श्रीगुरूंनी पुन्हां सर्व गांवी संचार केला व आपल्या सर्व भक्तांस कळवू न देतां त्यांस अखेरचे दर्शन दिले. अशा रीतीनें हिंडत हिंडत ते होंबळला आले. दर्शनार्थ भक्तपरिवार जमतांच ''प्रौष्ठपदीचा उत्सव तुमचे गांवी केल्यास कसें ?'' असा प्रश्न श्रीगुरूंनी त्यांस विचारला. तो त्या मंडळींस त्यांच्यावर श्रीगुरूंचा अनुग्रहच असें वाटले असल्यास नवल नाही. सर्वांनीं अनुमोदन देतांच भाद्रपद शु॥ अष्टमीस मोठ्या थाटानें नामसप्ताहास प्रारंभ झाला. भाविक भक्तांनी श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणें एकेकानें एकेक दिवशी प्रस्थ केले. हा सोहळा पौर्णिमाअखेर चालला. भाद्रपद वद्य द्वितीयेच्या दिवशीं तेथून श्रीगुरु निघाले. श्रीगुरूंना निरोप देण्यास बहुसंख्येने लोक जमलेले पाहून श्रीगुरूंनी उपदेश केला तो खालीलप्रमाणें -

''खरोखरच आपल्या हातांत काहींच नसते. सर्व कांहीं श्रीरामरायाच्या प्रेरणेने होत असते व तोच करवून घेत असतो. आपले मरण आपल्यास समजते. ज्यास समजत नसेल त्यास एवढे तरी खास माहीत असतें की ज्याअर्थी आपण जन्मास आलो आहों त्याअर्थी केव्हा तरी एक दिवस मरणार. तो दिवस नजीक आहे या भावनेने

मरण येण्यापूर्वी आपण श्रीरामरायाच्या कृपेला हर प्रयत्नानें पात्र झाले पाहिजे. तसें झाल्यास भयानक अशा भवसागरातून पार होणे शक्य होते. परंतु प्रपंचाच्या व्यामोहानें आम्हीं तिकडे लक्ष देत नाहीं. माझे बोलणे लक्षपूर्वक ऐका. यापुढे एवढ्या कळकळीनें सांगणारे तुम्हांस कोणी भेटणार नाहींत. पुढें फार विचित्र काळ येणार आहे. आम्हां ब्राह्मणांनाही लोकांची सेवा करावी लागणार आहे. म्हणून सदासर्वदा श्रीरामनामजप विसरूं नका. श्रीरामरायावर व श्रीमन्महाराजांवर दृढ विश्वास ठेवा. पुढें केंव्हाही कोणीही, कांहीही तुम्हांस सांगितले तरी सर्वथा रामनामजप सोडू नकां. कोणत्याहीं परिस्थितीत स्वधर्म सोडू नकां. 'स्वधर्मे निधनं श्रेयः' हे वचन उराशी बाळगा. अल्पसंतुष्ट व्हा. जास्त आशा करूं नका. शक्य तितक्या उदार बुद्धीने दानधर्म करा. म्हणजे श्रीमन्महाराजांच्या कृपेने तुम्हांला कोणत्याही प्रकारचे भय बाळगण्याचे कारण नाही'' असा अखेरचा बहुमोल उपदेश करून श्रीगुरु स्टेशनकडे गेले.

आबालवृद्ध, स्त्रीपुरुष, अशी सर्व भक्त मंडळी भजन करीत श्रीगुरूंस पोंचविणेस गेली. गाडी येतांच श्रीगुरू गाडीत चढले. सर्वांनी श्रीगुरूंस नमस्कार केला. श्रीगुरूंनी सर्वांस आशीर्वाद देऊन ''सर्वजण मला नीट पाहून घ्या. नीट दर्शन घ्या. पुन्हां मिळणार नाहीं'' अशा अर्थगर्भपूर्ण वाणीनें भक्तवृंदास जागें केले व लगेच ते विसरले जावें म्हणून् की काय ''वेंकटापुराला नवरात्रांत येण्याचे कोणीही चुकवूं नका'' असे श्रीगुरू सांगत असतानाच गाडी निघून गेली.

श्रीगुरु बेटगिरीला १-२ दिवस राहिले. बेटगिरीतील एक भाविक स्त्री श्रीगुरूंचा तेथें मुक्काम असलेवेळी त्यांची फार सेवा करीत असे. संसारात सर्व प्रकारची अनुकूलता तिला होती. तिचा मरणकाळ जवळ आला आहे असें जाणून व तिच्या सेवेचे फल तिला देऊन तिच्या जिवाचे सोने करावे या उद्देशाने श्रीगुरु तिच्याजवळ जाऊन बसले व त्यांनी नामस्मरण चालूं ठेवले. त्याचा परिणाम असा झाला की ती स्त्री प्राणोत्क्रमण होईपर्यंत शुद्धीवर होती व मुखाने श्रीगुरूंबरोबर 'राम राम' म्हणत होती. रामनामांत ती तल्लीन झाली होती. अंती त्रिदोष होतो व रामनामावरील लक्ष उडते. श्रीगुरूंनी तसे होऊ न देतां तिला सद्‌गति दिली. लोकांना फार आश्चर्य वाटले.

श्रीगुरु बेटगिरीहून वेंकटापुरला गेले. तेथें दोन दिंवस बोलता बोलता एक दिवस तेथे सेवेस राहिलेल्या श्रीपादभट्टांना ''मला आतां सगळ्याचाच कंटाळा आला आहे. राम राम म्हणत एकांत करावा म्हणतो. तुम्हीं शेती मोडूं नका'' असें म्हणाले. लगेच बोलणे फिरवून श्रीगुरूंनी ''मी पुन्हा येईन, भिऊ नका'' असें म्हटले व दुसऱ्या प्रसंगी ''पैसा जवळ असणें फार वाईट. नाही ते बखेडे निर्माण होतात. मरताना जवळ पैसा शिल्लक ठेवू नये. देवाच्या कामाला खर्च करून टाकावा. काहीही उरवू नये'' असें देखील त्यांनी सांगितले. तेथें उप्पार गणपती नावाचा इसम रहात असे. त्यास ''देऊळ बांधणारानी शिखर चढवूं नये'' असे सहजच सांगितले. याच सुमारास बिदरहळ्ळीचे कांही भाविक श्रीगुरूंच्या दर्शनास आले होते. त्यांनी आपल्या गांवातील मुरलीधराचे देऊळ बांधण्याची गोष्ट श्रीगुरूंजवळ काढली. श्रीगुरूंच्या नजरेखाली ती कामगिरी व्हावी अशी त्यांची इच्छा होती. त्यावेळी श्रीगुरूंनी त्यांना 'घागर भरत आली, आता कसचें देऊळ'' असें सांगितले. परोपरीने श्रीगुरू आपली निर्याण घटका भरत आली असे आडमार्गानें सुचवीत असूनदेखील मोहांध भाविकांना त्यांच्या बोलण्याचा अर्थ समजू शकला नाहीं हे केवढे आश्चर्य !

श्रीगुरूंनी भाद्रपद वद्य सप्तमी दिवशीं, श्रीवेंकटपतीला दुपारचा अभिषेक, अलंकारपूजा, नैवेद्य, आरति स्वतः केली. भोजनोत्तर अर्धा तास विश्रांति घेऊन श्रीलक्ष्मीव्यंकटेशाला साष्टांग नमस्कार घालून श्रीगुरूंनी त्यांचा निरोप घेतला व "मी बेलधडीला जातो" असे तेथील लोकांस सांगून श्रीगुरू तेथून निघाले. तरीपण श्रीगुरूंचे हे प्रयाण शेवटचेच आहे असा श्रीगुरूंच्या वागणुकीवरून कोणालाही संशय आला नाहीं.

वेंकटापुराहून श्रीगुरु निघाले ते सायंकाळच्या सुमारास बेलधडीस आले. येतांच त्यांनी श्रीरामरायाचे दर्शन घेतले. त्याची परवानगी घेतली व गांवातील सर्व भाविकांच्या घरीं जाऊन त्या सर्वांस, न कळत आपल्या दर्शनाचा लाभ श्रीगुरूंनी प्राप्त करून दिला. दिवेलावणीच्या सुमारास श्रीरामसंस्थानचे कारकून श्री. दामाजीपंत वझे यांना बरोबर घेऊन बिंकदकट्टीला जाऊन श्रीगुरूंनी मुक्काम केला. जाताना वाटेत श्री. वझे यांस "तुला कोणी काही सांगितले तरी हे काम सोडूं नकोस. यांतच तुझे कल्याण आहे." असे बजावले.

दुसरे दिवशीं सकाळी दामाजीपंतांना परत पाठवून मुडलेप्पा नावाचे भाविकास बरोबर घेऊन श्रीगुरु गदगला आले. भाविक भक्तांना दर्शन देऊन नवमीच्या दिवशी सायंकाळी रेल्वेने हुबळीस आले. दशमीच्या दिवशी तबीब यांचे घरी श्रीगुरूंनी श्रीमन्महाराजांचा पक्ष उरकला. संध्याकाळी धारवाडला जातो म्हणून निघाले पण अमरगोळ स्टेशनवर श्रीगुरूंनी शेडबाळची तिकिटे काढली व तेथून ते रात्री १२ च्या गाडीनें मुडलेप्पासह ते शेडबाळकडे रवाना झाले.

एकादशीच्या दिवशी दुपारी ११ ।। वाजतां श्रीगुरु कागवाडला पोचले. कागवाडला त्यावेळी प्लेग होता. गांव फुटले होते. लोक रानात वस्ती करून होते. श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन कागवाडकर मिरजेस जाऊन राहिले होते. श्रीमंतांचे दिवाणजी व गणपतीच्या देवळाचे पुजारी श्रीगुरू आल्यावेळी श्रीमंतांच्या नवबाग नावाच्या मळ्यात राहण्यास निघाले होते. पण श्रीगुरु आलेले दिसतांच त्यांनी आपला निघण्याचा बेत स्थगित केला. परंतु श्रीगुरूंनी "माझ्याकरितां प्लेगच्या भागांत तुम्हीं राहूं नका. मी आवसेपर्यंत येथे राहणार आहे. या निवांत जागेत राहून विश्रांति घेण्याकरतां मी आलो आहे. तुम्हीं ज्या मळ्यात आहां तेथेच मी रोज जेवावयास येईन" असे त्यांनी सांगून त्या दोघांस नवबाग मळ्याकडे पाठवून दिले.

श्रीगुरु कागवाडला आल्याची बातमी गांवात पसरली. पुष्कळ भक्तांनी त्यांचे दर्शन घेतले. श्रीगुरूंनी सगळ्यांच्या योगक्षेमाची चौकशी केली. तेथील लोकांनी मात्र श्रीगुरूंना "हें काय ? नवरात्र महोत्सव जवळ आला असतां आपण इकडे कसें येणें केले ?" असा प्रश्न केला. त्यावर श्रीगुरूंनी "कंटाळा आला म्हणून आलो. चार दिवस विश्रांति घेऊन शुक्रवारी परत जात आहे" असे सांगितले. त्या दिवशीं एकादशी असलेनें श्रीगुरु दुपारीं २-३ चे सुमारास कृष्णास्नानास नदीवर गेले. कागवाडपासून नदी किमान अडीच मैल दूर आहे. स्नान करून श्रीगुरु सायंकाळी कागवाडला आले. त्यांनी भजन, आरति केली. त्यांनी फक्त रामाचे तीर्थ तेवढे प्राशन केले व 'राम, राम' म्हणत गणपतीचे देवळांत झोपले.

दुसरें दिवशीं सकाळी मात्र मुडलेप्पास 'येथे प्लेग आहे. तूं मुलाबाळांचा मनुष्य. तरी निष्कारण जीव धोक्यात घालूं नकोस, गावाकडे परत जा' असे सांगितले. ते ऐकून "महाराज, आपण फार अशक्त झालां आहांत. मी आपल्या सेवेस येथेंच राहतो तसें घरांत सांगून आलो आहे" असें मुडलेप्पा नम्रपणे म्हणाला. तरी पण "तुला गेलेच

पाहिजे. तू जातोस की नाही ? माझे ऐकत नाहींस काय ?'' असें जेव्हा श्रीगुरु म्हणाले तेव्हां त्याचा निरुपाय झाला. श्रीगुरूंच्या पिशवीत काहीच पैसे नसल्याचे त्यांस माहीत असल्याने तो आपल्याजवळील शंभर रुपयांची नोट श्रीगुरूंस देऊं लागला. तेव्हां श्रीगुरु फक्त हंसले व ''माझ्याजवळ पैसे नाहींत काय ? अजुनी तुझा खुळेपणा गेलेला दिसत नाही'' असें म्हणून श्रीगुरूंनी आपली अक्षय पिशवी उलटी धरून ओततांच त्यांतून शेकडो मोहरां खाली पडल्या. ते पाहून तो खजील झाला.

निघणेस तयार झालेल्या मुडलेप्पास श्रीगुरूंनी ''मुडलेप्पा, तिरकंभट्टाच्या मुलीचे लग्न वेंकटापुरास आश्विन शुद्ध पंचमीच्या दिवशीं करणेचे ठरले आहे. मी कदाचित् आलो नाहीं तरी माझ्याकरतां न थांबतां कार्य उरकून घेण्यास मी सांगितले आहे असें त्यांस सांग. नवरात्राच्या उत्सवाला तू न चुकता जा. मला येण्यास कदाचित् १-२ दिवस उशीरही होईल. तरी माझी वाट पाहूं नका. सगळ्यांनी मिळून उत्सवास प्रारंभ करा'' अशी श्रीगुरूंनी त्यास आज्ञा केली व एक नारळ व एक मोहोर प्रसाद म्हणून देऊन त्याला आशीर्वाद देऊन पाठविले. अशा तऱ्हेने आपल्याबरोबरच्या मुडलेप्पासही परत पाठवून श्रीगुरू महाप्रयाणाच्या तजविजीस मोकळे झाले. श्रीगुरूंची ही निरवानिरव पाहून मुडलेप्पा मनांत चरकला.

वास्तविक श्रीगुरूंनी एकादशीचे रात्रीं झोपणेपूर्वी श्रीमंत अप्पासाहेब यांचे दिवाणजी बाबूराव यांना आपण आलेली हकीकत अप्पासाहेबांना कळवूं नका असे सांगितले होते, तरी सेवक या नात्याने श्रीमंतास कळविणे आपले कर्तव्य आहे हे जाणून दिवाणजी बाबूरावांनी आधींच पत्र लिहून श्रीमंतास कळविणेची तजवीज केली होती. त्याप्रमाणे दुसरे दिवशीं म्हणजे द्वादशीच्या दिवशीं श्रीमंत अप्पासाहेब मिरजेहून आले. अकस्मात् आलेल्या त्यांना पाहून श्रीगुरूंनी ''येथे प्लेग आहे, उगीच कशाला आला ?'' असे त्यांस विचारले. तेव्हां अप्पासाहेब यांनी श्रीगुरूंच्या चरणावर मस्तक ठेवून नमस्कार करून ''आपल्या दर्शनाकरतां आलो'' असे विनयपूर्वक सांगितले व त्या रात्री तेथेंच वस्ती केली. रात्री झोपण्यापूर्वी श्रीगुरूंनी अप्पासाहेब यांना ''अलीकडे दगदग फार झाल्यानें मनास कंटाळा आहे. श्रीरामरायाच्या कृपेने आतां माझा देह कृष्णा नदीत पडल्यास बरे होईल'' असे म्हटले. श्रीमंत अप्पासाहेब हे खरोखर तयारीचे होते. त्यांनी लागलीच श्रीगुरूंना ''आपल्यासारख्या परमपुण्य पुरुषांचा देह खरोखर जेथे पडेल ती पुण्यभूमीच होय'' असे सांगून टाकले.

श्रीगुरूंनी त्यावर हसत हसत ''छे, असे म्हणू नका. कृष्णा नदीची योग्यता भागीरथी नदीपेक्षा अधिक आहे. त्यापुढे पुण्यपुरुषांची काय कथा ?'' असे म्हटले व थोडा वेळ ते गप्प झाले. पुढें थोड्याच वेळांत श्रीगुरु अप्पासाहेबांना उद्देशून ''अवसेच्या दिवशी मी वेंकटापुरास जावयास निघावे म्हणतो'' असे म्हणाले. त्यावर अप्पासाहेबांनी श्रीगुरूंस ''अमावस्येच्या दिवशी येथून केव्हांही निघालात तरी प्रतिपदेस घटस्थापनेकरतां सकाळी वेंकटापुरास पोहोचणे कदापि शक्य होणार नाही'' असे म्हटले. त्यावर श्रीगुरूंनी ''त्याच दिवशी मी तेथें पोचले पाहिजे असे नाही. सर्व साहित्याची तयारी झालेलीच आहे व तेथील व्यवस्थापकांना सर्व माहिती देऊन ठेवलेलीच आहे. मी गेलो नाही तरी चालेल'' अशी पुस्ती जोडली व ते झोपले.

दुसरे दिवशीं म्हणजे भाद्रपद वद्य त्रयोदशीच्या दिवशीं सकाळीं श्रीगुरु यांनी अप्पासाहेब यांना ''आज धनुर्मासाची तयारी होऊ दे. पुष्कळ लोणी आणवा'' असे सांगितले. अप्पासाहेबांनी लगेच आपल्या दिवाणजींस

''श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे सर्व तयारी करा'' असे सांगितले. श्रीगुरु व अप्पासाहेब दोघे मिळून सकाळी दहाच्या सुमारास नवबागेत जाऊन पोंचले. भोजनांस थोडा अवधि होता. म्हणून श्रीगुरु तेथील एका रयताच्या घराच्या कट्ट्यावर टेकले. नंतर श्रीगुरु ''ही जागा फार उत्तम आहे. येथे तुम्हीं व आम्हीं मिळून काही दिवस रहावे असे मला वाटते. तरी तुम्हीं येथें एक घर बांधवा'' म्हणाले. त्यावर अप्पासाहेबांनी ''येथे घर बांधण्याचे कारणच पडत नाही. प्लेग वगैरे झाल्यास आम्हीं नेहमी मिरजेसारख्या दुसऱ्या गांवी राहण्यास जातो. सध्यां आपण तर वेंकटापूरला परत जाणार म्हणता. अशा स्थितीत सध्यां दोघांनी मिळून येथे राहणें कसे शक्य होणार ?'' असे श्रीगुरूंस म्हटटले. त्यावर श्रीगुरू सोडवणुकीदाखल ''दसऱ्याचा उत्सव झाल्यावर परत येतो. त्यानंतर राहू या. सध्या मला उलट्या व जुलाबाचा त्रास होत आहे. कॉलराबिलरा होणार आहे की काय न कळे'' असें म्हणालें. श्रीगुरूंचे हे बोल ऐकून अप्पासाहेब खिन्न झाले व त्यांनी श्रीगुरूंना ''सुंठीचा काढा करून देववूं काय ? लिंबें आणवूं काय ?'' असे विचारले त्यावेळी श्रीगुरूंनी ''नको, श्रीरामनाम हेंच फक्त माझे औषध आहे'' असे म्हटले व ते स्नानास उठले. भोजन वगैरे झाल्यावर त्यांनी थोडी विश्रांति घेतली व ते उठले. त्यावेळी सायंकाळचा साडेचार वाजणेचा सुमार झाला होता. श्रीमंत अप्पासाहेबांची मिरजेस परत जाण्याची सिद्धता झालेली पाहून, त्यांनी श्रीगुरूंना जवळ येऊन जेव्हा नमस्कार केला तेव्हां श्रीगुरूंनी अप्पासाहेब यांस फलमंत्राक्षता देऊन आशीर्वाद दिला.

अप्पासाहेबांनी त्यावेळी विनयानें ''आपण येथे रहात असतां माझ्या आजारामुळे मला आपल्या सेवेत हजर राहतां येत नाही. याबद्दल मला फार विषाद वाटत आहे'' असे म्हटले. त्यावर श्रीगुरूंनी पण ''छे, छे, तिळमात्रही तसा विषाद तुम्हीं मनाला वाटूं देऊं नका. मी तुमच्या घरातच असल्यासारखा आहे. तुमचे लोक माझी व्यवस्था सर्वतोपरी उत्तम रीतीनें ठेवीत आहेत. तुम्हीं कसलीही चिंता करूं नका'' असे बोलून त्यांचें समाधान करून त्यांस पाठविले.

श्रीगुरु कागवाडास आल्यास आजचा तिसरा दिवस होता. श्रीगुरूंच्या आगमनाची बातमी आसपास पसरण्यास वेळ लागला नाही. श्रीगुरूंच्या दर्शनार्थ सांगलीहून त्यांचे शिष्य गु. भ. हरीभाऊ हरदास व सांगली तालुक्याचे म्हैसाळास सरकारी कामानिमित्त आलेले गु. भ. काळे जमादार यावेळपर्यंत तेथें येऊन पोचलेंच होते. त्यांस गु. भ. रामराव हेब्बाळ यांना बरोबर घेऊन श्रीगुरू काळोख पडण्यापूर्वीच कागवाडास दाखल झाले. रात्रीं झोपतेवेळी श्रीगुरूंनी कारकून बाबूराव यांस बोलावून घेतले व त्यांस ''उद्या उपवांस आहे. तरी उद्या कागवाडास परत न येतां मी तुमच्याच झोपडीत झोपतो. शुक्रवारी मात्र धनुर्मासाप्रमाणे झोंपडीतच लवकर स्वयंपाक करवा'' असे सांगितले.

वास्तविक श्रीगुरूंनी अप्पासाहेबांना ''दोघे एकत्र राहूं या'' असे जे म्हटले होते, त्यामागील श्रीगुरूंची भावना श्रीमंत अप्पासाहेबांस कळली नाही असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. ती जर कळती तर अप्पासाहेब कदापि श्रीगुरूंना सोडून जाणे शक्य नव्हते. श्रीगुरूंनी कारकून बाबूरावांना जेव्हां उद्या कागवाडला परत न येतां मी तुमच्याच खोलीत झोंपतो असें सांगितले, तेव्हांही श्रीगुरूंस फार तकलीफ होत आहे हे त्यांनी जाणावयास पाहिजे होते. तसें घडले नाही. कसें कळणार ? जी गोष्ट श्रीमंत अप्पासाहेबांच्या ध्यानी येऊ शकली नाही तेथे गरीब बिचाऱ्या बाबूरावाचा काय पाड ? त्यांतून श्रीगुरूंच्या एकंदर हालचालींवरून, त्यांच्या स्पष्ट बोलण्यातून कांहीं अनिष्ट गूढार्थ सूचित केला जात आहे अशी बिलकूल कोणास शंका येत नव्हती.

''ईश्वरस्य माया दुरत्यया'' असे जे म्हटले जाते त्याचा भावार्थ एवढांच की ती माया ईश्वराखेरींज सर्व प्राण्यांना त्यात गुरफटवून टाकते. तद्वतच संतांचे आहे. संतांचे देवाशी ऐक्य झालेले असते. त्यामुळें संतांनी पसरलेल्या मोहजालाचा मतितार्थ कोणास समजत नाही. तो समजण्यास तितक्याच योग्यतेचा मनुष्य पाहिजे.

अशा रीतीनें श्रीगुरूंच्या सुखसमागमांत त्या लोकांनी त्रयोदशीचा म्हणजे बुधवारचा दिवस घालविला. दुसऱ्या दिवशीं गुरुवारी. म्हणजे भाद्रपद वद्य चतुर्दशीचे दिवशीं, श्रीगुरूंनी अरुणोदयापूर्वी उठून शौचमुखमार्जनादि देहकर्म उरकले. श्रीगजाननास नमस्कार केला व श्रीमन्महाराजांनी त्या गांवी स्थापन केलेल्या श्रीराममंदिराकडे ते गेले. तेथें जातांच प्रथम त्यांनी श्रीरामरायाचे दर्शन घेतले. क्षणभर तेथें बसले. त्यावेळी गु. भ. हरीभाऊ हरदास यांनी येऊन श्रीगुरूंस नमस्कार केला व ''उदईक घरी वडिलांचा पक्ष आहे. सांगलीस जावें म्हणतो'' असे म्हणून परवानगी मागितली.

यावेळी श्रीगुरूंनी त्यांस ''काहीं झाले तरी तुम्हीं आज सांगलीस जाऊं नका. पक्ष पुढें करता येतो. मी उद्या सकाळीं जात आहे. मला पाठवून मग तुम्हीं जा'' असें निक्षून सांगितले. ''काळे जमादार नोकरदार. त्यांस राहतां येणार नाही. गणूबुवा रामदासी यांचे घरी जेवण करून, दुपारच्या गाडींनें त्यांना तेवढे जाऊ दे'' असें सांगून काळे जमादारांस श्रीगुरूंनी जाण्यास परवानगी दिली. त्याप्रमाणें एकटे काळे जमादार सांगलीस गेले व गु. भ. हरिभाऊ हरदास व गु. भ. रामराव हेब्बाळ हे उभयतां श्रीगुरूंजवळ राहिले.

नंतर सकाळीं ९ वाजणेचे सुमारास श्रीगुरु धमणीतून नवबागेकडे जाण्यास निघाले. धमणी गाडी जुंपून आणणेस थोडा उशीर लागला. गु. भ. हरिभाऊ हरदास, गु. भ. रामराव हेब्बाळ, गु. भ. गणूबुवा रामदासी वगैरे मंडळींसह, श्रीगुरू श्रीदत्तमंदिरापाशीं धमणीची वाट पहात उभे होते. त्यावेळी श्रीगुरु गणूबुवांना ''ए रामदास, तूं नांवाला तेवढा रामदास बघ. उद्या तूं मेलास तर तुझी बायको, मुले ऊर पिटून रडतील. पण अकस्मात् मी मेल्यास रडणारे कोणी नाहीत. हे एका अर्थानें फार चांगलेच आहे'' असें म्हणाले व हरीभाऊंस ''हे पहा हरीभाऊ, उद्या यदाकदाचित् मी मेल्यास माझ्या देहाला अग्निस्पर्श होऊ देऊं नका. मी परमनैष्ठिक ब्रह्मचारी आहे. सुतक (अशौच) बाळगूं नका. क्रियाकर्म करूं नका. श्रीमन्महाराजांच्या कृपेने मी नित्यमुक्त झालो आहे. म्हणून या देहाला दगड बांधून श्रीकृष्णेच्या प्रवाहात 'रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम' असें प्रेमानें भजन करीत, त्याचे विसर्जन करा. श्रीमन्महाराजांचा देह २४ तास ठेवला गेला होता तसा माझा ठेवूं नका. मी देहात असत नाही. तरी या देहाचे तिळमात्र स्तोम माजवूं नका. त्याला बिलकूल महत्त्व देऊं नका. मी देह सोडल्यास तंतोतंत अशीच व्यवस्था करा. त्यांतून जगलोच तर वेंकटापुरास जातच आहे'' वगैरे सांगत असतांनाच धमणी गाडी तयार होऊन तेथें येऊन उभी राहिली.

प्रथम श्रीगुरु गाडींत चढले. नंतर बाकीची मंडळी चढली. गु. भ. गणूबुवाही नवबागेला जाण्याच्या इच्छेनें धमणीत चढूं लागलें. त्यावेळीं श्रीगुरूंनी ''आतां तुम्हीं येऊं नका. उद्या सकाळी श्रीरामरायाचे तीर्थ घेऊन लवकरच इकडे या'' असें सांगून गाडींत चढत असलेल्या त्यांना रोखले. सकाळचे दहाचे सुमारास धमणी, श्रीगुरु व सर्व मंडळी नवबागेत पोंचलीं. धमणींतून उतरतांक्षणींच श्रीगुरु थोडा वेळ तेथें असलेल्या झोंपडींत बसले. थोड्या वेळाने

बहिर्दिशेस जाऊन आले. हातपाय धूत असतां श्रीगुरूंनी आपल्या अक्षय पिशवीत असलेली रक्कम, तीन रुपये बारा आणे, एका फडक्यात गुंडाळली व तेथें जवळच असलेल्या पलंगावर ठेवली व ''परसाकडेस गेल्यावेळी पिशवी घाण झाली आहे. ती धुवून टाक'' असे जवळ असलेल्या बाबूरावांस सांगून त्यांचे हातीं श्रीगुरूंनी पिशवी दिली.

त्या दिवशीं गुरुवार होता. ''सर्व जण आज कृष्णास्नानास जाऊं या'' असे म्हणून श्रीगुरु सगळ्यांना घेऊन नदीच्या कांठाजवळच असलेल्या 'बाळेश्वर' या पुरातन शिवमंदिरापाशीं स्नानाकरितां गेले. तेव्हां दुपारचे बाराची वेळ झाली होती. तेथें जाताच श्रीगुरूंनी कांही काळ भजन करून श्रीमन्महाराजांची आरति केली. मग श्रीगुरूंनी आपली अक्षय पिशवी नदीत धुतली. तीन वेळा झाडली व ''आता या पिशवीचे काम संपले'' असे म्हणून ती कृष्णेत बुडवून टाकली.

स्नान करीत असलेल्या सर्वांस श्रीगुरूंनी संकल्प सांगितला व विनोदानें सर्वांकडे दक्षिणा मागितली. नंतर श्रीगुरूंनी स्नानास सुरवात केली. नदींत फार पाणी नव्हते. छाती इतकेच होते. श्रीगुरूंनी बाबूरावांस ''भोवऱ्याचा प्रारंभ कोठे आहे'' असे विचारून त्यांचेकडून त्याचा तपास करविला व तेथे हजर असलेल्या परिवारातील लोकांस ''कॉलरा होऊन कदाचित् मी आटोपल्यास याच भोवऱ्यांत मला आणून सोडा. याला जलसमाधि म्हणतात. चार गाडगी आणून ती तिरडीच्या चारी कोपऱ्यांस बांधून ठेवावीं. नंतर नदींत ती तिरडी सोडतांच त्या गाडग्यांत पाणी भरतांच ती भोवऱ्याच्या तोंडाला आणून पुढें ढकलल्यास ती तिरडी प्रेतासकट तळाला जाते व तळाला पोचतांच खालून वर बुडबुडे येतात. तुम्हांला माहिती असावी म्हणून उगीच सांगून ठेवतो'' असे सांगून श्रीगुरु स्नान करूं लागले.

श्रीगुरूंनी स्नान आटोपले. श्रीमन्महाराजांची आरति केली व सर्वांबरोबर ते नवबागेत परत आले. तेव्हां सुमारे दुपारचे तीन वाजले असावेत. श्रीगुरूंनी सगळ्यांना ''तुम्हीं जेवण करा. हा माझा शेवटचा गुरुवार आहे. अतएव मी आज श्रीमन्महाराजांच्या चरणतीर्थाखेरीज कांहीही घ्यावयाचे नाही असे ठरविले आहे'' असें सांगून कडकडीत उपास केला. सगळे जेवावयास गेल्यावेळीं श्रीगुरु विश्रांति घेण्यासाठी पलंगावर आडवे झाले.

सायंकाळी सहाचे सुमारास कारकून बाबूराव, गु. भ. हरीभाऊ हरदास वगैरे लोकांस बरोबर घेऊन श्रीगुरु मळ्यातून सगळीकडून हिंडून आले व मळ्यात असलेल्या मोठ्या चौकोनी विहिरीचें कांठावर येऊन बसले व ''अहो हरीपंत, ही विहीर किती उत्तम आहे पहा ! हजारों लोक जमले तरी पाण्याचा तुटवडा न पडण्याइतकी समृद्ध आहे'' असे म्हणाले. पुढें थोड्या वेळाने ''या मळ्याचे उत्पन्न काय आहे ?'' असे श्रीगुरूंनी कारकून बाबूरावांस विचारले व उत्तराची वाट न पाहतां लागलीच ''बाळेश्वर येथील नदीच्या पात्रांतील भंवरा कागवाडचे हद्दीत आहे की नाहीं'' असाही प्रश्न केला. पण तेवढ्यांत जोराचा पाऊस सुरु झाल्यानें श्रीगुरु सगळ्यांना घेऊन झोपडीकडे परत आले.

त्या झोपडीसमोर एक मोठे झाड होते. श्रीगुरूंनी बाबूरावांना ''हे कसलें झाड ?'' म्हणून विचारले. बाबूरावांस माहीत नसल्यानें त्यांनी विलायती झाड असे मोघमांत सांगितले. त्यावर ''खुळ्या हा कदंब वृक्ष आहे. पूर्णावतारी श्रीकृष्णपरमात्म्यानें भूभार नाहीसा करून अवतारकार्य संपताच ६० लाख यादव व १६००० बायकांचा त्याग करून एकट्यानेच कदंब वृक्षाखाली बसून देहत्याग केला. अवतारी पुरुषालादेखील अखेर देहत्याग करावा लागतो मग मनुष्याचा तेथे काय पाड ? असें असले तरी माणसाचा जगण्याचा हव्यास सुटत नाही'' असें श्रीगुरु त्याला म्हणाले.

पुढे थोड्या वेळानें श्रीगुरु स्वतः तांब्या घेऊन बहिर्दिशेला जाऊन आले. हातपाय धुवून संध्यावंदनास बसले. बाबूरावांना जवळ बसवून ''स्वयंपाकाची तयारी दुसरे दिवशी म्हणजे शुक्रवारी सकाळीं सूर्योदयाला झाली पाहिजे. धनुर्मासाप्रमाणें बेत झाला पाहिजे. नजीकच्या गणेशवाडीच्या ७-८ ब्राह्मणांस आमंत्रण द्या व त्यांस सूर्योदयांस येण्यास बजावा'' असे श्रीगुरु म्हणाले.

संध्यावंदन होतांच गु. भ. हरीभाऊंना बोलावून ''मरण म्हणजे काय ? याची तुम्हांस माहिती आहे काय ?'' असा श्रीगुरूंनी प्रश्न केला. हरीभाऊंनी 'नाही' एवढेच उत्तर दिले. त्यावेळी श्रीगुरूंनी 'तुम्हांला मरणांची भीति वाटते काय ?'' असाही प्रश्न केला. हरीभाऊ अवाक् झाले. श्रीगुरूंनी ''मरण म्हणजे दुसरे काही नाही. कोणत्याही प्राण्याच्या स्थूल देहामध्ये एक अंगुष्ठमात्र सूक्ष्म देह असतो. तो ज्यावेळी स्थूल देहाचा त्याग करून बाहेर निघून जातो तेव्हां मरण आले असें म्हणतात. जे सदा रामनामात लीन झालेले असतात त्यांचा तो सूक्ष्म लिंगदेह कोणत्याही प्रकारचे आयास न होता स्थूल देह सोडून जातो. याच्या उलट जे जे विषयासक्त होऊन अहंभावाने पछाडले जातात त्यांना मात्र फार दुःख होते. एवढ्यासाठीं अखंड रामनामांत लीन व्हा. अन्य विचार बाजूस सारून केवळ रामनामावर विश्वास ठेवा म्हणजे तुमची मरणबाधा टळेल. कोणीही मरणास भिण्याचे कारण नाही'' वगैरे उपदेश केला. पहा ! त्या दिवशीं श्रीगुरु भक्तांचे मनाचा आपल्या प्रयाणानें तोल सुटू नये, त्यांस दुःख झाले तरी ते सुसह्य व्हावे म्हणून परोपरीनें आपल्या निर्याणाची पदोपदी चाहूल देत होते.

नंतर सर्वांना जवळ बसवून घेऊन श्रीगुरूंनी स्वतः भजनास सुरवात केली. प्रिय गुरु बांधव हो ! श्रीगुरूंच्या जडदेहामार्फत केले गेलेले त्या दिवशींचे ते भजन अखेरचेच ठरणारे असल्याने अपूर्व झाले. त्या दिवशीं श्रीगुरूंचे मन श्रीरामाचें ठायीं तसेच श्रीमन्महाराजांचे ठायी तदाकार झाले होते. देहभावाचाच जणूं संपूर्ण लय झाला होता. आपले शेवटचे भजन श्रीमन्महाराजांच्या चरणी सर्वतः अर्पण करण्याच्या उद्देशाने 'श्रीराम संस्थान बेलधडी भजनपद्धति' या पुस्तकाप्रमाणें पहिल्यापासून शेवटपर्यंत क्रमाने श्रीगुरूंनी स्वतः भजन सांगितले. त्या भजन सोहळ्यास हजर असणारे भक्त खरोखर पुण्यवान होत.

भजन सांगतासांगता मधून मधून इहलोकीची नश्वरता वा क्षणभंगुरता, अनित्याच्या बाजूने उदासीनता, नित्याच्या बाजूस मन दृढ कसे करावें वगैरे तत्वे हजर असलेल्या लोकांच्या मनात बिंबतील, नव्हें हृत्पटलावर कायमची कोरली जातील अशा तऱ्हेने श्रीगुरूंनी निरूपणही केले. श्रीमन्महाराजांच्या अमानुषत्वाबद्दलही विस्तृत विवेचन केले. श्रीमन्महाराजांवर आपण स्वतः रचलेले अभंग ज्यावेळी गुरु सांगत होते त्यावेळची त्यांची स्थिति पाहण्यासारखी होती. श्रीगुरूंचा कंठ दाटून आला होता. सर्वांग रोमांचित होऊन देह थरथरत होता. नेत्रांतून अविरत आनंदाश्रू वहात होते. श्रीगुरूंची ती अवस्था पाहून तेथील भक्तांचीही तीच अवस्था झाली असल्यास काय नवल ? सर्वजण श्रीगुरूंचेठायी तन्मय झाले होते व श्रीगुरूंचेबरोबर नाचत भजन करून परमानंदसुखाचा आस्वाद अनुभवीत होते. खरोखर त्यावेळी त्या आनंदसुखात सहभागी झालेले भक्त निःसंशय परमधन्य होत. त्या रात्रीची श्रीगुरूंची ती अवस्था म्हणजे सद्गुरुनाथांनी श्रीगुरूंना प्राप्त करून दिलेल्या थोरवीसंबंधीच्या कृतज्ञतेची पावतीच होय असे मला वाटते.

अशा प्रकारे रात्रींचे ११ वाजेपर्यंत भजन चालले होते. तदनंतर अनुक्रमें श्रीरामाची व श्रीमन्महाराजांची आरति करून, ब्रह्मस्तुति, सद्‌गुरुपंचकस्तोत्र, तसेच गुरुपरंपरास्तोत्र म्हणून उच्चस्वराने 'राम, राम, राम' असा नामघोष काहीं काळ श्रीगुरूंनी सुरु ठेवला. नंतर श्रीगुरूंनी सर्वांना आपल्या हातानें तीर्थप्रसाद दिला. हा सर्व कार्यक्रम आटोपेपर्यंत रात्रीचे १२ वाजले.

त्या दिवशी सबंध दिवसभर श्रीगुरूंनी काही घेतले नव्हते. तसेंच गु. भ. हरीभाऊंनी काही घेतले नव्हते. ही गोष्ट श्रीगुरूंच्या नजरेतून सुटली नव्हती व अशा गोष्टी नजरेआड न होऊं देण्याइतकी श्रीगुरु नेहमी दक्षता बाळगीत असत. हाच त्यांच्या स्वभावातील विशिष्टत्वानें नजरेंत भरण्यासारखा अनुकरणयोग्य गुण होता. म्हणून तर त्यांनी गु. भ. हरीभाऊंना ''ए मास्तरा, थोडे दूध घे. तसाच निजूं नकोस'' असें प्रेमानें सांगितले. तसेंच बाकीच्या सर्वांस ''फराळ संपवून निजा'' असे सांगितले. सर्वांचा फराळ झाल्यावर श्रीगुरूंनी बाबूरावांस बोलावून घेतले व ''दरवाजासमोर मधल्या खणांत माझें अंथरूण घाला व त्यास पडदे बांधा. तसेंच उशाशीं पिण्याचे पाण्याने भरलेला एक तांब्या व त्यावर एक भांडे, पळी ठेवा. घशास कोरड पडते, त्यासाठी पाणी लागते'' असे सांगितले.

श्रीगुरूंच्या सांगण्याप्रमाणें दरवाजासमोरच्या मधल्या खणांत पलंग घालून, त्यावर श्रीगुरूंचे अंथरूण घालून, सभोवार पडदे बांधण्यात आल्यावर श्रीगुरु त्यावर जाऊन बसले. ''काय की, पायाला पेटके येताहेत. कोणीतरी थोडे रगडा'' असे श्रीगुरुंनी म्हणतांच बाबूराव व हरीपंत त्यांचे पाय चेपू लागले. त्यावेळी श्रीगुरूंनी त्यांना नरदेहाचे सार्थक करून घेण्यासंबंधी रामनाम हा कसा सुलभ उपाय आहे यावर विवेचन केले. झोंपण्यापूर्वी श्रीगुरूंनी लघवीस जाण्याची जागा विचारून घेतली. झोंपण्यासाठी म्हणून श्रीगुरु अंथरुणावर बसतांच सर्वांनी पायावर डोके टेकून नमस्कार केला. बायका ज्या वेळीं नमस्कार करूं लागल्या त्यावेळी ''धनुर्मासाचा स्वयंपाक तुम्हांला अगदी उजाडतां करावा लागतो. बायांनो, तुम्हांस त्रास पडतो'' असे श्रीगुरूंनी म्हणताच ''नाहीं महाराज, काहीं एक त्रास होत नाही'' असे त्या अत्यंत नम्रतेने म्हणाल्या. पुढें श्रीगुरु झोपले.

श्रीगुरूंनी दिवसभर कांही एक घेतलेले नाहीं. तेव्हां सूर्योदयापूर्वी स्वयंपाक तयार झालाच पाहिजे या आस्थेने सर्व भक्त पहाटे तीन वाजतांचा गजर लावून झोपले. पहाटें ४॥ वाजणेचे आंत श्रीगुरु अंथरुणावरून उठले, बाहेर जाऊन लघुशंका करून हात, पाय, तोंड धुवून आंत आले. तेवढ्यांत सर्व उठले व स्वयंपाकाच्या तयारीस लागले.

श्रीगुरु आंत आलेले पाहून बाबूरावांनी त्यांच्याजवळ येऊन नमस्कार केला व ''राधाबाई उठल्या असून आंघोळ करून स्वयंपाकास प्रारंभ करीत आहेत. सूर्योदयास वेळेवर स्वयंपाक होत आहे'' असे सांगितले. तें ऐकून श्रीगुरु मंदहास्य करीत ''एवढी गडबड कशाला ? ४–५ तास दिवस येईपर्यंत सर्व काही होतच आहे'' असे म्हणाले. त्यावर बाबूरावांनी ''महाराज, सर्व ब्राह्मणांस लवकर येण्यास ताकीद दिली आहे. ते सर्व सूर्योदयास येत आहेत. कालचा आपला उपवास म्हणून लवकर स्वयंपाकाची तजवीज केली आहे'' असें सांगितले. तेव्हा श्रीगुरु हसले व ''काहीं केले तरी उशीर हा होणारच'' असें म्हणाले. ते ऐकून बाबूरावांना ब्राह्मणांकडूनच विलंब होणार आहे असे भासले.

उजाडत्या शुक्रवारी श्रीगुरूंनी ब्राह्ममुहूर्त साधून आचमन केले. आपोनारायणाचे पान केले. श्रीगुरु अंथरुणावर उठून बसले. आपल्या मधुर वाणीने ''हरे राम. हरे राम, राम राम हरे हरे। हरे कृष्ण, हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण, हरे हरे ॥'' असे श्रीगुरूंनी ३-४ वेळा म्हटले व मग ''महाराज. महाराज'' असें म्हणत श्रीगुरु अंथरुणावर आडवे झाले व त्याच क्षणी त्यांस ऊर्ध्व लागला.

जवळच कारकून बाबूरावांचा धाकटा भाऊ झोंपला होता. त्यांस श्रीगुरूंच्या अंत:काळच्या श्वासाचा आवाज म्हणजेच घरघर ऐकू येऊ लागली. श्रीगुरूंनी आदले दिवशी अखंड उपवास केला होता. शिवाय त्यांचे पोटही झाडत होते. आदले रात्री श्रीगुरूंनी स्वत: फार वेळपर्यंत भजन केले होते व ते हैराण झाले होते. आतां बहुधा त्यांना गाढ झोंप लागली आहे व म्हणूनच ते सुखानें घोरत असावेत अशी त्याची समजूत झाल्यानें तो स्नानादि इतर व्यवसायांत गुरफटला. अर्थात् त्याचे तिकडे लक्ष गेले नाहीं.

अरूणोदय झाला. भगवान् सहस्त्ररश्मि उदयाचलावर विराजमान झाला. संपूर्ण जग जागें झाले म्हटले तरी चालेंल. अशा वेळी इकडे नवबागेतील ज्ञानभास्कर अस्ताचलाकडे प्रयाण करीत होता. तरी पण या परिस्थितीचा पूर्ण विसर पडून नवबागेतील सर्व भाविकभक्त आपापल्या कामात दंग झाले होते. श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणें सूर्योदयापूर्वी स्वयंपाकाची सर्व सिद्धता झाली पाहिजे याच ध्यांसात ते मग्न होते. सर्वांनी आपापली स्नाने आटोपली होती. पूजा-अर्चा आटोपून, नैवेद्याची सिद्धता करून प्रत्येकजण श्रीगुरूंच्या उठण्याची मार्गप्रतीक्षा करीत होता.

सात वाजले तरी गुरु उठेनात. त्यांचा घोर (घरघर) अति जोरानें ऐकू येत होता. तरीदेखील श्रीगुरूंना गाढ झोप लागली असून ते निवांत घोरत आहेत अशीच सर्वांची कल्पना दृढ झाली. बरें, श्रीगुरूंना उठवायचे तरी कसें व कोणी ? हा प्रश्न उपस्थित झाला. त्याच्यावर खल होऊन हरीभाऊ हरदास यांनी श्रीगुरूंस उठवावे असें सर्वानुमतें ठरले. अशा रीतीनें गु. भ. हरीभाऊ हे 'वासरांत लंगडी गाय शहाणी' या पदवीप्रत पोंचले. 'अंगावर आले की शिंगावर घेतले पाहिजे' अशी म्हण आहे. या न्यायाने गु. भ. हरीभाऊंनी ''योगी-मुनींची निद्रा व समाधी एकच असते. तुमच्या आमच्यासारख्या सामान्य लोकांनी तिचा भंग केल्यास समाधिभंगाचा दोष लागतो असे शास्त्रवचन आहे. अतएव आपण श्रीगुरूंचा निद्राभंग करण्याचे उसाभरीत पडणें बरें नव्हें. तरीपण आपण सर्वजण मिळून भजन करूं या'' असा युक्तिवाद करून तोडगा सांगितला. त्याप्रमाणें सर्वांनी हातात टाळ घेऊन ''रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम'' असें उच्चरवाने भजन करण्यास सुरवात केली.

सुमारे दीड तासपर्यंत भजन करूनही श्रीगुरूंच्या झोपेत काडीमात्रही फरक जाणवेना. जागृतीची चिन्हें दिसेनात. गणेशवाडीचे आमंत्रित सर्व ब्राह्मण आले. इतके होईपर्यंत दोन तास दिवस वर आला. इतक्या टाळांच्या गोंगाटाने देखील श्रीगुरूंना जाग येण्याचे चिन्ह दिसेना. तेव्हा मात्र सर्वांच्या तोंडचे पाणी पळाले. श्रीगुरूंचे आदल्या दिवशींचे एक एक बोल त्यांस आठवू लागले. धीर करून पण हलक्या हातानें गु. भ. हरीपंतांनी भोंवती बांधलेला पडदा दूर करून पाहिले. तेव्हां श्रीगुरूंचा श्वासोच्छवास व्यवस्थित चालला असल्याचे त्यांस दिसले. एकंदरीनें हें लक्षण बरें नव्हें असे ठरवून गणेशवाडी व कागवाड येथें निरोप पाठवून त्यांनी वैद्याला बोलावून घेतले. वैद्य येतांक्षणीच त्यांनी श्रीगुरूंची नाडी तपासली व ''सर्व नाड्या मंद झाल्या आहेत. त्यावरून त्यांचा निर्याणकाल अगदी

जवळ आला आहे'' असे निदान केले व सर्वांस सांगितले. कारण ''अपि धन्वन्तरिर्वैद्यः किं करो ति गतायुषि'' असें शास्त्रवचनच आहे.

वैद्यांचे हे निदान ऐकतांच सर्व भाविक भक्तांची स्थिति काय झाली असेल याची प्रत्येकानें आपल्या मनांत कल्पनांच केलेली बरी. त्याचे वर्णन करणे अशक्यप्राय आहे. सर्वांची तोंडे सुकली असल्यास व दुःखानलाने व्यापली गेली असल्यास नवल काय ? तरीपण कांही तासांपूर्वीच हंसत हंसत श्रीगुरूंनी केलेल्या उपदेशाची आठवण होऊन तिने मात्र विवेकावर मात केली. गदग येथे रहात असलेले श्रीगुरूंचे पुतणे गु. भ. श्री. भीमराव गाडगोळी व मिरजेस रहात असलेले श्रीरामभक्त श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन कागवाडकर यांना तात्काळ तारा करण्यात आल्या. इकडे गु. भ. हरीपंतांनी आदले दिवशी श्रीगुरूंनी आपल्यास केलेली आज्ञा आठवून, सर्वांना ''कोणीही डोळ्यांतून पाणी काढूं नये. सर्वांनी श्रीरामनामाचे स्मरण केले पाहिजे'' असे खिन्न वदनाने पण अश्रूपूर्ण नयनांनी विनंति केली. इतक्यांत कागवाडहून श्री. गणूबुवा रामदासी हे श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे श्रीरामरायाचे चरणतीर्थ घेऊन दाखल झाले. ते श्रीरामरायाचे चरणतीर्थ श्रीगुरूंच्या मुखात घालण्यात आले. त्याचप्रमाणें कानांत तुळशीपत्रेंही ठेवण्यांत आली. उशाजवळ भगवद्गीता ठेवली गेली. याप्रकारें लोकोपचाराची सर्व कामें गु. भ. हरीपंतांनी पार पाडली.

इतके होईपर्यंत १० वाजण्याचा सुमार झाला. त्यावेळी श्रीगुरूंना खाली निजविण्यासाठी प्रथम जमीन शेणानें सारवून त्यावर उत्तम रांगोळी घालून कांबळे अंथरण्यात आले. त्यानंतर श्रीगुरूंना त्यावर निजविण्यांत आले. डोक्याखाली एक तक्क्या ठेवण्यात आला. अदमासें १०॥ वाजतां श्रीगुरूंनी छातीवर ठेवलेले आपले दोन्हीं हात तेथून काढून खाली ठेवले. सर्व लोक दुःखाश्रू ढाळीत पण पापण्यांची उघडझाप न करतां एकटक श्रीगुरूंच्या मुखाकडे पहात न बोलता उभे होते.

पुढें २-३ सेकंदांतच्च श्रीगुरूंनी झोंपेतून जागे झाल्याप्रमाणें चांगले डोळे उघडून सभोवार उभ्या असलेल्या आपल्या भक्तपरिवाराकडे प्रेमपूर्ण दृष्टीने पाहिले. ते पाहून तेथे असलेल्या सर्व लोकांना श्रीगुरु जागे झाल्याचाच भास झाला. एकदम तें दुःखमय वातावरण कोठल्याकोठें पार नाहींसे झाले. कदाचित् आपण केलेल्या तयारीची क्षणभर सर्वांस खंतही वाटली असेल. इतक्यांत श्रीगुरूंनी हास्यवदन करून पुन्हा एकदां सर्वांकडे प्रेमपूर्ण कृपाकटाक्ष टाकला व एकदोन सेकंदातच मुखानें 'श्रीराम' असें म्हणून, प्राणवायूस बाहेर घालवून आपले तोंड व डोळे मिटले ते कायमचेंच. असे झाले तरीदेखील श्रीगुरूंची चर्या प्रफुल्लित होती. चेहऱ्यावर हास्याची छटा विलसत होती. खरोखर श्रीसद्गुरु ब्रह्मानंद महाराजांची आत्मज्योत श्रीरामरूप पावून, श्रीमन्महाराजांच्या स्वरूपांत लीन झाली हेंच सत्य होय. त्रिवार सत्य होय. श्रीगुरूंच्या अंतकाळी हजर असणारे व श्रीगुरूंनी सहजगत्या केलेला देहत्याग स्वतः डोळ्यांनी पाहणारे सर्व भाविक भक्त परमधन्य होत. यांत शंका नाही. यावरून 'शरण म्हणजे काय ते मरणांत पहावे' या अर्थाची कानडी भाषेतील म्हण खरोखर खोटी नव्हे हें पटल्याशिवाय रहात नाही.

अशा प्रकारे श्रीगुरूंनी शके १८४० कालयुक्ताक्षि संवत्सरी भाद्रपद वद्य अमावस्येचे दिवशीं सकाळी १० वाजून ४० मिनिटें या वेळी आपला जड देह टाकून श्रीरामरूपांत ऐक्य स्थापन केले. अशा या परमपरात्पर,

परब्रह्मस्वरूपी पुण्यपुरुषास सच्चिदानंद घन श्रीसद्‌गुरुनाथांचे चरणी या पामर लेखकाचा अनंतानंत नमस्कार असो. ''जय जय रघुवीर समर्थ'', ''अनंतकोटि ब्रह्मांडनायक श्रीसच्चिदानंदसद्‌गुरु श्रीब्रह्मानंद महाराज की जय''

नंतर सर्वांनी मिळून श्रीगुरूंच्या सूचनावजा बोलांचे स्मरण केले व जलसमाधीच्या तयारीस सुरवात केली. सर्व तयारी होईपर्यंत तोंडानें 'रघुपति राघव राजाराम, पतीत पावन सीताराम' असे अखंड भजन सुरुं ठेवलें. सामानाची सर्व तयारी होतांच श्रीगुरूंना त्याच मंचावर बसवून स्नान घालण्यात आले. कोरड्या धूत वस्त्राने त्यांचा देह पुसण्यात आला. कपाळाला गंध व कुंकू (पिंजर) याचे लेपन करण्यात आले. नवी कफनी व टोपी (गणेश टोपी) घालून गळ्यांत फुलांच्या माळा घालण्यांत आल्या. व गदगदलेल्या स्वरांत आरति करण्यात आली. आदले दिवशी श्रीगुरूंनी समक्षांत दिलेल्या सूचना दिल्याप्रमाणें मंचाच्या (तिरडीच्या) चारी कोपऱ्यांस प्रत्येकी एक याप्रमाणें चार मातीची मडकी बांधण्यात आली. अखेर श्रीगुरूंना फुलांचे आसनावर बसवून रामनाम घोषांत त्यांच्या अंत्ययात्रेस सुरवात झाली. यात्रा श्रीकृष्णा नदीचे रोखानें निघाली. श्रीकृष्णातटाकी असलेल्या वाळेश्वरच्या देवळासमोर येतांच श्रीगुरूंस खाली उतरवून पूर्वाभिमुख बसविणेत आले. सर्व भक्तांनी तेथे श्रीगुरूंची पूजा केली व त्यांच्या चरणांचे अखेरचे दर्शन घेतले. नंतर उच्चस्वराने नामघोष करीत श्रीगुरूंना, आदले दिवशी आंघोळ करताना त्यांना समक्षात दाखविलेल्या पात्रांतील वाळेश्वर भोवऱ्यापर्यंत नेण्यात आले. तेथें मंच जरा खाली दाबतांच मडक्यांत पाणी शिरूं लागले. मडकी पाण्याने भरतांच त्यासह श्रीगुरूंचा पार्थिव देह भोवऱ्यांत ढकलणेत आला. एक दोन निमिषांत तो जडदेह भोवऱ्याच्या तळास जाऊन पोंचला व त्याची पावती म्हणूनच कीं काय श्रीगुरूंनी आदले दिवशी सुचविलेप्रमाणे पाण्याचे बुडबुडे वर आले. तेव्हां सर्वांनी पुन्हां एकदां श्रीगुरूंचा मुक्त कंठानें जयघोष केला.

नंतर अंत्ययात्रेंस गेलेल्या सर्वांनी कृष्णामाईत स्नान केले व नवबागेतील त्या छपराकडे परतले. परत आल्यावर श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे आगाऊच तयार करण्यांत आलेल्या धनुर्मासाच्या स्वयंपाकाचे भोजन केले. मात्र तसें करीत असतांना सर्वांनाच आदल्या दोन दिवसांत श्रीगुरूंनी उच्चारिलेल्या गोष्टींचे राहून राहून स्मरण होत होते. 'आपल्या धड्डपणाला सीमा नाही. श्रीगुरूंच्या बोलण्याचा अर्थ न कळल्यानें फसलो. श्रीगुरूंनी स्पष्ट सांगितले होते तरी तरी आमच्या अज्ञानानें आम्हांस उमज आली नाही. श्रीगुरूंनी अगदीं सहजरीतीनें आम्हांस मोहजाळ्यांत अडकविले. आम्हींच कमनशिबी म्हणून आम्हांस बुद्धिभ्रंश झाला'' या व अशा तऱ्हेचे उद्‌गार काढून लोक हळहळत होते. वास्तविक श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन हे तयारीचे. पण त्यांचीही फसगत झाली व ते मिरजेस निघून गेले. निर्याणकाली तेही जवळ नव्हते. वास्तविक दोघांची भेट झाल्यावेळीं श्रीगुरूंनी हसत हसत त्यांस 'मी येथें राहिलो तर मला जेवावयास घालाल नां ?'' असे विचारले होते. किती सूचक व गूढ वाक्यार्थ यांत भरला आहे पहा.

श्रीगुरूंच्या समयसूचकतेचे व परिजनांस आपल्यासाठी त्रास होऊ नये म्हणून प्रेमयुक्त दक्षतेचे कौतुक करावें तेवढें थोडेच. आपल्या देहत्यागानें हजर असणाऱ्या लोकांना तिळमात्र त्रास होऊं नये या उद्देशानेच त्यांनी सूर्योदयापूर्वी स्वयंपाक करवून ठेवविला होता असेंच म्हणावें लागते. आपण देहत्याग करणार आहो याची स्पष्ट

जाणीव परिजनांस झाल्यास ते दुःखीकष्टी होत्साते किंकर्तव्यमूढ होऊन आपल्याभोवतीच बसून राहतील, त्यामुळे अखेरच्या क्षणीं आपली एकाग्रता कदाचित् भंगेल म्हणूनं सर्वांना धनुर्मासाप्रमाणे नैवेद्याच्या तयारींत गुंतवून, स्वतः ध्यानात मग्न होऊन श्रीगुरूंनी देह सोडला. केवढा दूरदर्शीपणा ! तसेंच नवबागेतील मळ्यांत अवघे ३-४ लोकच असल्यानें देहत्यागानंतरच्या जलसमाधीचे कार्य तेवढ्या लोकांकडून पार पडणे शक्य नाही. निदान त्यास ते सुकर होणार नाहीं हें जाणूनच की काय श्रीगुरूंनी गणेशवाडीच्या ७-८ ब्राह्मणांस आमंत्रण देवविले होते. केवढी चाणाक्षबुद्धि ! तसेंच आपल्या अंतकाली श्रीरामरायाचे चरणतीर्थ बरोबर वेळेला मिळावें म्हणून आदले दिवशी आपल्याबरोबर येऊं पाहणाऱ्या गणूबुवा रामदासी यांस बरोबर येण्यास प्रतिबंध करून दुसरे दिवशी सकाळी लवकर श्रीरामरायाचे चरणतीर्थ आणण्यास आज्ञापिले होते. केवढे हे दूरदर्शीपण ! असा बारीक विचार केला असतां अशा कितीतरी गोष्टी आढळून येतील.

श्रीगुरूंनी देह ठेवल्याची दुःखद वार्ता चारी बाजूंस पसरल्यावर तेथें महाराष्ट्र, कर्नाटक वगैरे भागांतून हजारों भाविक भक्तांची जणू कांही रीघच लागली. देह ठेवलेल्या जागी तात्काळ एक चौथरा बांधविण्यात आला. त्यावर श्रीगुरूंच्या पादुका स्थापण्यात आल्या. तेथेच श्रीगुरूंचा एक फोटो ठेवण्यात येऊन नित्य त्रिकाल पूजा, नैवेद्य, आरति वगैरे कार्यक्रमास सुरवात करण्यात आली. श्रीगुरूंचे वाक्य श्रीमंत अप्पासाहेब यांस आठवले व श्रीगुरूंच्या इच्छेप्रमाणे श्रीगुरूंच्या पूजाअर्चेची व नैवेद्यारतींची दैनंदिन सर्व व्यवस्था आपले शिरावर घेतली व त्याची कायमची तरतूद करून टाकली. नवव्या दिवसापासून नामस्मरणास सुरवात करून पांच दिवसपर्यंत अन्नसंतर्पणादि उत्सव करण्यात आला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे प्लेग व कॉलऱ्याचा शिलशिलाट आसपास असूनही त्या उत्सवास कोणत्याही प्रकारची कमतरता भासली नाही. हजारों लोकांच्या मेळाव्यात तो उत्सव भरघोसपणे पार पडला.

गु. भ. भीमराव गाडगोळी, श्रीगुरूंचे पुतणे यांना गदगला केलेली तार शुक्रवारी सायंकाळी मिळाली. दुसरे दिवशी म्हणजे शनिवारी ते गदगहून ताबडतोब निघाले व त्याच दिवशीं रात्रीं कागवाडला येऊन पोंचले. त्या दिवशींच सर्व हकीकत समजून घेऊन त्यांनी गदगला वृत्तांत कळविला. ते वृत्तांतपत्र रविवारी गदगला पोंचले. तेव्हां श्रीगुरूंनी समाधि घेतल्याचे अधिकृत वृत्त सर्वांस समजले व आसपासच्या गावींही जाहीर झाले.

वेंकटापुरातील नवरात्रोत्सव संपतांच विजयादशमीचे दिवशीं नामस्मरणांस प्रारंभ झाला व द्वादशीचे दिवशीं ते संपविणेत आलें. श्रीगुरूंची लौकिक उत्तरक्रिया श्रीगुरूंचे वडीलबंधू वे. श्रीगुरूभट्ट यांनी गदग येथें केली. ती सुद्धा द्वादशीसच संपली.

वास्तविक श्रीगुरूंच्या देहत्यागाने वेंकटापूर येथील नवरात्रोत्सवात व्यत्यय येण्याचा संभव होता. पण त्याची व्यवस्था श्रीगुरूंनी आधीच केली होती. कागवाडास श्रीगुरूंना पोंचविणेस आलेल्या मुडलेप्पा यास श्रीगुरूंनी परत पाठवितांना ''शनिवारी तू वेंकटापुरास जाऊन मी (गुरू) पंचमीचे आंत येत असल्याचे सांग'' असे सांगून पाठविले होते. त्याप्रमाणे त्याने शनिवारी न चुकतां वेंकटापुरास जाऊन श्रीगुरूंचा निरोप कळविला होता. त्यामुळे तेथील लोकांना प्रोत्साहन मिळाल्यासारखे होऊन त्यांनी नवरात्रोत्सवास सुरवात केली होती. मात्र शुक्रवारी अमावस्येचे

दिवशींसुद्धा श्रीगुरू वेंकटापुरास न आलेले पाहून तेथील कर्मचारी श्रीपादभट्ट हे मात्र मनांतून फारच अस्वस्थ झाले होते. मात्र त्याच रात्रीं श्रीपादभट्टांना स्वप्न पडल्याचे सांगतात. स्वप्नांत श्रीगुरूंनी त्यांना मंदहास्य करीत "भिऊ नकोस. मी तेथेंच (समाधीत) आहे. समाधीचे काम चालू ठेऊन, चिक्कहंदिगोळला भिक्षा करून समाधीचे आंतील काम संपीव. ते तूंच कर" असे सांगून श्रीगुरु अदृश्य झाले म्हणतात. यावरून जीवन्मुक्त झालेले श्रीगुरू सगुण रूपाचा त्याग करून निर्गुण रूपाने वेंकटापुरातच वास करीत आहेत अशी कर्नाटकातील भक्तांची दृढ श्रद्धा आहे. यावरून अन्य स्थानी त्यांचा वास नसतो असे म्हणणें सयुक्तिक होणार नाही. श्रीगुरु सर्वगामी असल्याने ते अमुक ठिकाणीच आहेत असे आग्रहानें प्रतिपादन करणें धाष्ट्यीचे ठरेल. मात्र नवबागेतील श्रीगुरूंचे समाधिस्थान हेंच एकमेव अस्सल समाधिस्थान होय हे कोणासही नाकारता येणार नाही.

श्रीगुरूंनी देह ठेवल्याची वार्ता जशी कर्नाटकांत सगळीकडे पसरली त्याचप्रमाणें महाराष्ट्रातही पसरली. मग ती गोंदावलेस पोचली नाहीं असे कसे होईल ? गोंदावल्यास पोंचलेली ही दुःखद वार्ता ऐकून श्रीआईसाहेबांना (श्रीमन्महाराजांच्या पत्नीस) कमालीचे दुःख झाले. त्या दुःखाने अत्यंत कळवळल्या व "पांच वर्षांपूर्वी आपल्यास समजू न देतां ते (श्रीमन्महाराज) निघून गेले. आपण अभागी म्हणून मागें राहिलों. तें दुःख अद्याप ताजे असतानांच, मुलगा म्हणून मानलेला माझा ब्रह्मानंदही कानगी लागू न देता मला सोडून निघून गेला. आता मी कोणाच्या आधारावर जगूं व मला आतां जगून तरी काय करावयाचे आहे ?" असे त्यांनी उद्गार काढले व त्या दिवसापासून त्यांनी अन्न वर्ज्य केले. लोकांच्या आग्रहास्तव फक्त थोडे दूध घेत असत. या दुःखानलांतच पुढें महिन्याच्या आतच आश्विनमासी अमावस्येला त्यांनी देह ठेविला.

शके १८४१ पासून भाद्रपद वद्य ८ ते वद्य अमावस्येपर्यंत समाधिस्थानीं नाम सप्ताह, अन्नदान, कीर्तन, प्रवचन, भजन वगैरे कार्यक्रमांनी युक्त असा उत्सव सुरू झाला. तो आजतागायत वाढत्या प्रमाणावर चालू आहे. अशाच प्रकारे श्रीक्षेत्र वेंकटापूर, बेटगिरी वगैरे ठिकाणींही उत्सव चालतात.

श्रीगुरूंच्या चरित्रवाचनाने आणि श्रवणाने सर्व श्रद्धावंतांच्या जीवनाचे मंगल होवो हीच श्रीगुरूंच्या चरणी नम्र प्रार्थना.

**॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# प्रकरण सत्ताविसावें

## बोधामृत

सद्गति मिळावी अशी पूर्ण इच्छा, खरा इरादा असणाऱ्यांनी सदासर्वदा अखंड रामनामाचे स्मरण केले पाहिजे. अहेतुक, अव्यभिचारिणी रामभक्ति करून कृतार्थ व्हावे. या घोर कलियुगांत भवसागरातून पार होण्यास भगवद्भक्ति - रामनामस्मरण याशिवाय दुसरा कोणताहि उपाय नाही.

आयुष्याचा भरवंसा नाही. शक्य तितक्या लवकर कृतार्थ होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. परमार्थाचे अव्वल साधन सत्संगति होय. साधूंच्या संगतीत असंख्य लोक पार होऊन गेले आहेत. साधूंच्या सहवासानें क्षमा, भूतदया, शांति, वैराग्य, समाधान, विवेक यांचा लाभ व निवृत्ति मार्गात शिरकाव वगैरे अनेक सन्मार्ग प्रयत्न न करतां अंगी बाणतात. कामक्रोधादि षड्रिपु परमार्थाला विघ्ने आणणारे असतात. ते व दंभ, अहंकारादि आपोआप लय पावतात. साधुसंगतीचा महिमा अगाध आहे. साधूंच्याकडे सदोदित भगवच्चर्चा , भगवद्गुणानुवर्णन, रामनामस्मरण, सदुपदेश अहोरात्र चालू असतो. तेथें वास करणाऱ्या वृत्ति, हे सर्व ऐकून, परमात्म्याचे ठायीं तदाकार बनते. परमात्म्याचे ठिकाणीं वृत्तीचा लय झाल्यास ते जीवन्मुक्त होतात.

विषयाकारवृत्तीनें बंधन प्राप्त होतें. परमात्म्याचे ठायीं वृत्ति तदाकार झाल्यास मोक्षप्राप्ति होते. वृत्ति विषयांशी जखडली जाणार नाही असें घडण्यास सदोदित भगवंताचे अनुसंधान ठेवणे हे मुख्य आहे. बसतां, उठतां, झोपतां, जाता येता, सदासर्वदा रामाचे ध्यान करीत राहिले पाहिजे. रामनाम सोडून वृत्तीला विषयाकडे जाण्यास सवड देतां कामा नये.

हे रामा, हे दयानिधे, माझा केव्हां उद्धार करणार ? तुझी सगुण मूर्ति मला केव्हां दिसेल ? रामा, मी अगाध पापी आहे. माझ्याइतका वाईट या जगांत कोणी नाही. हे दयासमुद्रा, लवकर मला या भवसागरातून पार कर. संतती, संपत्तीसारखी ऐहिक सुखे मला बिलकूल नकोत. तुझ्या पायाची दृढभक्ति दे. माझ्या जिभेवर तुझे 'राम' हे नांव सदा असू दे. कान तुझी रामनाम कथा सदा ऐकू देत. मस्तक तुझ्या रामचरणकमलावर साष्टांग नमन करूं दे. हातांनी तुझी पूजा, अर्चा, संमार्जनादि सेवा घडूं दे. पायांनी रामप्रदक्षिणा घडूं देत. रामा, मी अज्ञानी आहे. मला काही समजत नाही. रामा, तूंच माझ्या हृदयात उभा राहून तुझ्या रामचरणावर प्रेम निर्माण होईल असे कर. श्रीरामा ! तुझ्याशिवाय मला दुसऱ्या कोणाचा आधार नाहीं. तूंच माझी आई व बाप, भाऊबंद. हे कृपासागरा, श्रीरामा, अज्ञानध्वांत निवारणा, तूंच माझी गति, असें अनन्यभावानें शरण गेले पाहिजे.

सहसा पापमार्गाकडे प्रवृत्ति ठेवूं नये. खोट्या कामांत भाग घेऊं नयें. लोकांनी निंदा केल्यास विषाद मानू नये. कोणी स्तुति केल्यास आनंदून जाऊ नये. आपण दुसऱ्याची निंदा अगर स्तुति करूं नये. सर्वभूतांचे ठायी परमात्मा वास करतो हें पक्के ध्यानात ठेवावे. बायका, मुले, घर, शेत, संपत्ती वगैरे दृश्य मिथ्या आहेत. याची पक्की खूणगांठ बांधावी. देव एकटांच शाश्वत आहे असा निर्धार करून अहोरात्र रामभजनांत कालक्रमणा करावी.

काळ फार कठीण आहे, भयंकर आहे. लबाडी तर चहूंकडे बुजबुजलेली आहे. खरेपणाचा मुळींच पत्ता नाही. पापभीरुत्वाचे उच्चाटन झाले आहे. भीति कशी ती पार नाहीशी झाली आहे. सत्कर्माचा लोप झाला आहे. विश्वास तर मुळींच आढळत नाहीं. संसारसमुद्र कसा ओलांडावयाचा याची काळजी कोणालाही नाही. दृढभक्तिने श्रीराम चिंतन तर नाहींच नाही. सदाकपटाने द्रव्य संपादन करून उदरभरण करण्याकडे तुमची आमची सर्वांची प्रवृत्ति बनली आहे. नरदेह दुष्प्राप्य आहे. तरी श्रीसमर्थांच्या आज्ञेप्रमाणें आता तरी अखंड श्रीरामचिंतन करून पार होण्याची खटपट करावी.

अखंड रामनामस्मरणानें सत्संगति व सद्‌गुरुकृपा लाभते. व्रत निश्चयात्मक असावे. कोणत्याही गोष्टींविषयीं मनात संशयाला थारा देऊ नये. दुष्टांच्या संगतीत राहू नये. रामनामाशिवाय काहीही केले तरी ते सर्व व्यर्थ होय. तथापि लौकिक व्यवहार करावा. लाभ-अलाभाकडे डोळे लावू नयेत. अंतरंगात रामाची सगुणमूर्ति केव्हां पाहीन अशी उत्सुकता लागून राहिली पाहिजे. रामनामाविना क्षणभरदेखील काळ घालवू नये. चित्त रामाशिवाय दुसरीकडे गेल्यास पश्चात्ताप वाटावा. रामा ! इतका आयुष्याचा काल व्यर्थ गेला, तुझें नामस्मरण केले नाहीं. यापुढें माझें हातून तुझे स्मरण चुकतां कामा नये असे कर. या पलीकडे मला काही नको. असे म्हणून अनन्यभावाने त्यास शरण जावे. त्याची प्रार्थना करावी. नोकरी चाकरी सोडू नये. त्यावरील आसक्ति सोडावी. सर्व परमार्थ अंतरंगात असावा. बहिरंगात कधीहि प्रकट करू नये. कसलाही कठीण प्रसंग आला तरी रामाची भक्ति, रामनामस्मरण सोडू नये. हेच परमप्राप्तिचे मुख्य साधन आहे. 'सकल साधनाचे फल, रामनामचि केवल' अखंड श्रीरामचिंतनात मनोलय करून त्याला साक्ष ठेवून वर्तावे. जे जे घडते ते सर्व श्रीरामाच्या इच्छेने असे समजावे.

या कलियुगांत पार व्हावयाचे असल्यास श्रीरामसेवेखेरीज अन्य उपाय नाही. रात्रंदिवस भक्तिपूर्वक श्रीरामस्मरण करीत जावे. प्रपंच, धंदा सोडू नयें. त्याची आसक्तिही मुळीच ठेवू नये. विधिलिखित - ज्या ज्या वेळीं जे जे घडणार असते ते कदापि चुकणार नाही. मग व्यर्थ काळजी कां करावयाची ? अर्थात् त्याची बिलकुल काळजी न करतां श्रीरामनामस्मरण करावे. नरजन्म वारंवार मिळत नसतो. तो दुर्लभ असतो. तेव्हां श्रीसमर्थांच्या अभंगातील 'निरिच्छ सदा राही । श्रीराम राम गाई' हे व्रत अहोरात्र चालवून पार व्हावे. श्रीब्रह्मचैतन्य साक्षात् श्रीसमर्थांचा अवतार. त्यांनी मला माझा कुष्ठरोग नाहींसा करतो असे म्हटले. मी उलट त्यांना नको म्हणून प्रार्थना केली. अशा समर्थांचे दर्शन झाल्यावेळी आपल्या उद्धाराची मागणी करावयाची सोडून अशाश्वताची मागणी मी केली नाही. यांतच काय ते समजा.

वास्तविक विचार केला तर विषाच्या भांड्यात अमृत कधी तरी मिळेल काय ? मुळीच नाही. प्रपंच विषाच्या भांड्यासारखा आहे. 'विषकुंभं पयो मुखम्' असा संसार आहे. प्रपंचात सुख नाहीच. असल्याचा भास होतो एवढेच. समजूतदार लोक, ज्ञाते लोक प्रपंचाची विशेष आसक्ति बाळगीत नाहींत. कारण मरणकाल येतो, यमराज येऊन ज्यावेळीं ओढून नेऊं लागतो त्यावेळी आई, बाप, बायका, मुले, आप्तेष्ट, संपत्ती, कीर्ति कोणीही सोडविणेस येत नाही. एका रामनामाशिवाय ती शक्ति कशांतच नाही. सदा श्रीरामनामस्मरण करीत राहिल्यास आपल्याजवळ येण्याचे सामर्थ्य प्रत्यक्ष यमदेवातही नाही. म्हणून अहोरात्र श्रीरामनामाचे चिंतन करून जन्ममरणांतून पार होण्याचा विचार केला पाहिजे.

तीन तास रात्र असतांना उठावे. शौचमुखमार्जन करून आसनावर बसावे व चित्त एकाग्र करून मानसपूजा करावी. हृदयकमलात मनापासून मंडपरचना करून त्या मंडपात रत्नखचित सिंहासन आहे अशी कल्पना करावी. त्या सिंहासनावर श्रीराम बसले आहेत असे ध्यान करावे. जवसाच्या फुलाप्रमाणें शरीरकांति असलेली शामसुंदरमूर्ति पीतांबर नेसलेली किरीट, कुंडल, बाहुभूषण, कौस्तुभवनमाला गळ्यांत धारण केलेली, धनुष्यबाण हातांत घेतलेली, अशा श्रीरामाच्या मांडीवर श्रीसीतादेवी बसल्या आहेत, लक्ष्मण पाठीमागें छत्र धरून उभा आहे. भरत, शत्रुघ्न डाव्या उजव्या बाजूस उभे राहून चवऱ्या ढाळीत आहेत. वशिष्ठ, नारद, सनकादि ऋषि कीर्तन करीत आहेत. अशा प्रकारचे ध्यान करून मनापासून पूजा करावी.

श्रीराम देवाला सुवासिक तेल लावावें. भागीरथीच्या ऊन पाण्यानें स्नान घालावें. झुळझुळीत स्वच्छ वस्त्र घेऊन अंग पुसावे. पीतांबर नेसवावा. केशरी गंध लावावें. कस्तुरीमिश्रित अक्षता चिकटवाव्यात. अनेक प्रकारच्या सुवासिक फुलांच्या माळा घालाव्यात. तशाच तुळशीच्या माळाही घालाव्यात. किरीट, कुंडले वगैरे आभरणें चढवावीत. सीतादेवीला स्त्रियांचे अलंकार चढवावेंत. धूप, दीप दाखवावा. नंतर सोन्याच्या ताटांत पंचपक्वान्ने असलेला आपल्या पसंतीचा नैवेद्य वाढून रामदेवासमोर ठेवावा. श्रीरामदेव जेवण करताहेत अशी भावना करावी. रामाचे तोंड धुवून ते पुसावे. नतर रामदेवाच्या तोंडात तांबूल घालावा. 'जयदेव जयदेव जय सीता रामा' ही आरति करावी. प्रदक्षिणा घालून नमस्कार करावा. 'रामा ! दीनदयाळा ! उद्धार कर' अशी प्रार्थना करून त्याचे पाय घट्ट धरावेत.

श्रीरामदेवांनी आपला अभय हस्त डोक्यावर ठेवला आहे अशी भावना करावी. उठून उभे राहून श्रीरामदेवाचा हंसरा चेहरा पहावा. इकडे तिकडे मन जाऊं न देता उजाडेपर्यंत 'श्रीराम' 'श्रीराम' असें म्हणावे.

सूर्योदय झाल्यावर आपल्या उद्योगाला लागावे. स्त्रियांनी स्वयंपाक पाणी वगैरे करताना 'राम, राम' म्हणत रहावें. फुकट वेळ घालवूं नये. आपल्या स्नानानंतर प्रसन्न मनानें यथासांग पूजा करावी. पूजामंत्र, अभिषेकमंत्र वगैरे येत नसल्यास तोंडाने पूजा संपेपर्यंत अखंड 'राम' 'राम' म्हणावें. दुपारीं वैश्वदेव करावा. काकबली देऊन पाय धुवून अतिथीची थोडी वाट पाहून भोजन करावे. वामकुक्षीनंतर दासबोध, भागवत, भावार्थ रामायण वगैरे ग्रंथ वाचावेत. दिवसाकाठी ११००० जपसंख्या करावी. 'सायंकाळी राम, मारुति, शंकर वगैरे देवांचे दर्शन घ्यावे. घरीं येतांच पंचपदी, अष्टकें, सवाया वगैरे म्हणून आरती करावी. भोजनोत्तर स्तोत्रें म्हणावीत. भजन करावे. जप करावा. रात्री लवकर झोपूं नये.

सारांश सतत रामचिंतन करावे व जन्माचे सार्थक करून घ्यावे.

॥ श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥

# प्रकरण अठ्ठाविसावें

## उपसंहार

गुरुभक्त वाचक हो ! येथें श्रीसद्‌गुरुमहाराजांचे चरित्र संपले. संपले कसले ? यथामति संपविले. कारण संतांचे चरित्र अथांग सागरासारखे असते. सागराचा जसा कोणालाही व केव्हांही थांग लागणे शक्य नाही तसाच त्यांच्या चरित्राचा थांग लागणें शक्य नाही. जसें संतांचे चरित्र सागरासारखे विशाल असते, तद्वतच आकाशासारखे विस्तृत असते. आकाशाचा विस्तार जसा अफाट असतो तसेंच संतांच्या चरित्राचे आहे. अशा विशाल व विस्तृत संतचरित्राचा शोध घ्यावयाचा म्हटल्यास लेखकाची तितकी पात्रता पाहिजे. त्या पात्रतेचे अभावीं लेखकाने सदर चरित्र यथामति संपविले आहे असे म्हणणेच उचित ठरेल.

श्रीगुरूंनी आम्हां सर्वांना आदर्श जीवनाचे ध्येय कशा प्रकारचे असते हे दाखविले. ते दाखविण्यासाठी श्रीगुरूंनी जो मार्ग चोखाळला तो इतरेजनांस दुर्गम ठरणारा आहे. त्यांनी प्रत्यक्षांत केलेले साधन अशक्य कोटींतीलच आहे असे म्हटले तरी चालेल. असे जरी असले तरी आपल्या भक्तांना त्यांनी ज्या मार्गाने आचरण करण्याचा बोध केला, त्याचा क्रम अत्यंत सोपा आहे. आमच्यासारख्या विषयासक्त पामरांना मोक्षमार्गाकडे वळवावे या दयार्द हेतूनेच, त्यांचा मार्ग भिन्न असला तरी, जातां जातां त्यांनी खटपट केली. त्यांच्या चरित्रावरून बोध घेऊन, त्यांचे चरित्र लिहीत असताना कदाचित् बरोबर वठवितां न आल्यानें, दोष स्थळे बरीच राहून गेली असण्याचा संभव आहे. तरी वाचकांनी क्षमाशील दृष्टीनें तिकडे पहावें अशी विनंती आहे.

'पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना' या न्यायानें जगांत जितके भिन्न जीव तितकी त्यांची कर्मेही भिन्न असतात. कारण प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव भिन्न असतो. प्रत्येकजण मरणसमयीं आपल्या सुकृताचे व दुष्कृताचे गाठोडें मात्र आपल्याबरोबर घेऊन जात असतो. स्वभावभिन्नतेबाबत उदाहरणच द्यावयाचे झाल्यास एकाच आईच्या पोटी जन्म घेतलेल्या रावणाचे व बिभिषणाचे देता येईल. रावण रामद्वेष्टा होता व बिभिषण रामभक्त होता.

पृथ्वीतलावरील सर्व मानव, संसाराची चिंता व्यर्थ वाहतां वाहतां मरून जातात व पुन्हां जन्मास येतात. त्यांची इंद्रिये सवयीने बहिर्मुख झालेली असतात. त्यामुळे जन्मल्यापासून आम्ही विषयवासनेच्या कचाट्यात सापडून नाचूं लागतो. विषयसुख हाच सच्चिदानंद अशी आपली धारणा होते. साधुसत्पुरुषांची गोष्ट वेगळी असते. ते जीवन्मुक्त असल्यानें जन्मापासूनच वैराग्यवृत्ति धारण करून ईशचिंतनात काळ घालवितात. आम्हांला ते हंसतात. आमचा जन्म व्यर्थ जात असल्याचे पाहून ते हळहळतात. त्यांतून आमचा उद्धार करण्याच्या इराद्याने ते आम्हांस सुलभ असे 'राम, राम' म्हणा म्हणून बोध करतात. पण तेच आपल्यास कठीण वाटते. कारण आपले अज्ञान व अविश्वास. संसाररूपी मृगजळाला आम्ही पाणी समजून तोंड वासून [illegible] प्राशनासाठी झटपटत असतो.

[illegible] ज्याची तपश्चर्या असेल, पुण्यांश गांठी असेल तसा मानवास उच्च नीच योनीत जन्म घेतो. [illegible] घराण्यांत जन्म प्राप्त होण्यास खडतर तपश्चर्या गांठी असावी लागते. श्रीब्रह्मानंदगुरूंनी अनंत या

नांवाने ज्या घराण्यात जन्म घेतला ते वे. रामभट्ट गाडगोळी नांवाच्या श्रेष्ठ भगवद्भक्ताचे होते. संकटांत सांपडून जग अवनतीच्या मार्गावर असतां, त्याच्या उद्धारार्थ श्रीसमर्थ रामदासांनी अवतार घेतला तोही १२ पिढ्या जाज्वल्य सूर्योपासना चालत आलेल्या कुलकर्णी घराण्यांत. त्यांनी रामनामाचेच एकमेव बीज महाराष्ट्रभर पसरविले. पुढें त्या बीजाचे रोपण कसे काय झाले आहे, इष्ट फलनिष्पत्ती होणार आहे की नाही ? हे अजमावण्यासाठी पुन्हां त्यांनी श्रीब्रह्मचैतन्य स्वरूपांत गोंदावले क्षेत्रीं जन्म घेतला. तोहि पिढ्यान्पिढ्या श्रीविठ्ठलभक्ति चालत आलेल्या कुलकर्णी वंशात. सर्व महाराष्ट्रभर रामनामाचा महिमा फैलावण्याची मोठी कामगिरी त्यांनी पार पाडली. तेवढ्यानें समाधान न होऊन प्रति कल्याण पदवी भूषविणाऱ्या आपल्या कर्नाटक प्रांतीय सच्छिष्याची - श्रीब्रह्मानंदगुरूंची - कर्नाटक प्रांती रामनामाचा महिमा वाढविण्यासाठी त्यांनी रवानगी केली. त्यांचा जन्मही भगवद्भक्तांचे घराण्यातच झाला होता. असे साधूसंत महात्मे हे जीवन्मुक्तच असतात. त्यांना पुनर्जन्माची बाधा नसते. त्यांनी जो जन्म घेतलेला असतो तो आमच्यासारख्या अज्ञानी पामरांचा उद्धार करण्यासाठीच केवळ असतो.

पृथ्वीतलावर संत अवतार घेवोत अगर प्रत्यक्ष भगवान् अवतार घेवो, त्यांना लौकिक व्यवहार सांभाळावाच लागतो व तो सांभाळता सांभाळता आपल्या आचरणाचा आदर्श लोकांपुढे ठेवून त्यांना ज्ञानामृत पाजण्याची त्यांची कामगिरी असते. भगवान् श्रीकृष्णानें अवतार घेतल्यावर मानवाप्रमाणें क्रीडा करतां करतां आपले अतिमानवत्व जगाला पटवून दिले. नांवाला सांदिपनी गुरूंचे शिष्यत्व पत्करले. काय भगवान् श्रीकृष्णाला विद्या येत नव्हती ? पण शिष्यत्व पत्करून गुरुसेवा कशी केली पाहिजे याचा आदर्श त्यांनी जगापुढे ठेवला. त्याचप्रमाणें श्रीब्रह्मानंदगुरूंनीही केले. बाल्यावस्थेतच षड्शास्त्रांत पारंगतता मिळाली असतानांही केवळ लोकशिक्षणासाठीं गुरूंचा शोध करून श्रीब्रह्मचैतन्यांचा 'गुरु' म्हणून स्वीकार केला. महासाध्वी पतिव्रता पतिसेवा काय करील अशा तऱ्हेने त्यांनी गुरुसेवा केली. ज्ञानी होऊन जरी ब्रह्मानंदगुरू जन्मास आले होते तरी गुरूचा गुलाम झाल्याखेरीज मुक्ति कदापि मिळणार नाही. हेंच त्यांनी अत्यंत विनयानें जगापुढे मांडले.

एकदां श्रीब्रह्मचैतन्यांचे मनांत श्रीब्रह्मानंदगुरूंचे कोड नाहींसे करावे असे आले व त्यांनी त्यास ''तुझे कोड नाहींसे करू कां ?'' म्हणून विचारले. त्यावेळी श्रीब्रह्मानंदगुरूंनी नको म्हणून सांगितले. यांत त्यांना ''भोग हा भोगूनच संपविला पाहिजे. नाहींतर शिल्लक राहिलेला भोग भोगण्यासाठीं पुन्हा जन्माची आटाआटी करावी लागते. हेच तत्व प्रामुख्यानें पटवून द्यावयाचे होतें असे दिसते.

श्रीब्रह्मनंदगुरु श्रीमन्महाराजांना प्रत्यक्ष मारुतीचा अवतार मानीत असत व तसें पदोपदीं सर्वांस सांगत असत. हे ते उगीच सांगत नसत तर वस्तुस्थितीच तशी होती म्हणून सांगत असत. या संबंधात श्रीमन्महाराजांवरील त्यांचे पद बोधप्रद व हृदयंगम आहे. ते असे :

धन्य जगीं या गुरूवर्य हे मारुति अवतार ।
कांही नाहीं अणूमात्रही संशयासी थार ।। धृ. ।।

काय वर्णु मी गूण तयांचे न पुरे ही वाणी ।
ऋद्धि सिद्धि सदा तयांला जोडितात पाणि ।।

भाविकां, सेवकां, देती सुख फार ।
दवडिति त्यांचा प्रेमदृष्टीने दुरितांचा भार ।। १ ।।

दया सिंधु हे समर्थ वाटे रामदास येती ।
दीन दास ते उद्धाराया अवतार [illegible]
नारी नर हे अवघे [illegible]
[illegible] ।
[illegible]
[illegible] ।। २ ।।

[illegible] मुखीं विलसे ।
[illegible] चवथी तुर्यातीत असे ।।
[illegible] माझे गोंदावलेकर ।
[illegible] गेलिया दासा सुखकर ।।
[illegible], बोधिती, नाममंत्र सार ।
[illegible] हा चरणां वंदी जोडुनियां कर ।। ३ ।।

[illegible] आहेच पण याच्या रचनेत श्रीगुरूंनी आपले हृदयच ओतल्यामुळे की काय ते अति हृदयंगम [illegible] श्रीमन्महाराजांची यथार्थ कल्पना थोडक्यात करून देणारे असें आहे.

''सदा रामाचें ध्यान करा व कृपा करून माझी गोष्ट ऐका'' हेंच श्रीगुरु वारंवार आवर्जून सांगत असत. रामनामाच्या स्मरणांतील आनंद आगळा आहे. तो शास्त्राभ्यासानें मिळत नाही. ज्याप्रमाणें एखाद्या विख्यात शहराचे वर्णन वाचून ते शहर पाहिल्याचे समाधान होत नाहीं. उलट ते पाहण्याची जिज्ञासा वाढते. तद्वतच शास्त्राभ्यासानें देवाविषयींचे योग्य ज्ञान प्राप्त होते. तेवढ्यांने देव पाहिल्याचे समाधान कालत्रयीं होणार नाही. देव पाहणाराच देव दाखविण्यास समर्थ असतो. सद्‌गुरु देव दाखवू शकतात. तो पहाण्याची जिद्द ज्याचे मनांत असेल व त्यादृष्टीनें ज्याचे प्रयत्न चालू असतील तोच सच्छिष्य. आम्हां सामान्य मानवांत तशी जिद्द अभावानेंच असते. त्यामुळे एक तर आम्हांस सद्‌गुरु प्राप्ति होत नाही व चुकून झालीच तर त्याचा जास्तीत जास्त फायदा आम्हांस घेता येत नाहीं. म्हणून तर आमचें जास्तीत जास्त कल्याण विनासायासानें होण्यासाठी श्रीब्रह्मानंद महाराज 'रात्रंदिन राम चिंतन करा' असे सांगत असत.

शास्त्राभ्यास करणें मोठ्या प्रयासांचे. कर्ममार्ग दुर्गम कोटीत मोडणारा. योगमार्ग हा भोगमार्गाच्या परस्पर विरोधी. संसार म्हणजे काटेरी अंथरुणाप्रमाणें. दिवसेंदिवस कलीच्या वाढत्या प्रभावानें काळ कठीण होत चाललेला. म्हणून संसारातून तरून जाण्यासाठी रामनामाचे कवच धारण करणे हाच सुलभ उपाय असे श्रीगुरु सर्वांस सांगत असत आणि हेंच त्यांच्या जीवनाचे ध्येय होते असें म्हटले तरी चालेल.

दैनंदिन व्यवहारांत आपल्याला लहान मुलांकडून एखादें काम करवून घ्यावयाचे झाल्यास त्यास आमिष

दाखवून, पेपरमिंटाची गोळी देवून ते करवून घ्यावें लागते. जगाच्या व्यवहारातील आम्हां सर्व मुलांकडून श्रीगुरूंना रामनामस्मरण करवून घ्यावयाचे होते. त्याची गोडी कायमची आमच्यांत निर्माण व्हावी अशी त्यांची इच्छा असल्यानें मिष्टान्न भोजनांचें आमिष आमच्यापुढें ठेवून त्यांनी रामनाम वदविले. याचसाठी श्रीगुरूंनी ठिकठिकाणी १३ कोटी रामनामस्मरण करविले. तसेंच ठिकठिकाणी अखंड रामनामसप्ताह घडवून आणले व सामान्य जन रामनामस्मरणाकडे आकर्षिले जावे म्हणून सदासर्वदा अपरंपार मिष्टान्न भोजनेंही घातली.

प्रिय वाचक हो, यांत श्रीगुरूंचा स्वार्थ होता असे तुम्हांस वाटतें काय ? सर्वथा त्यांचा यांत स्वार्थ नव्हता हें केव्हांही तुम्हांस कबूल करावें लागेल. स्वार्थ असलाच तर तुमचें कल्याण साधणें हाच तो असू शकेल. श्रीगुरू जगाच्या कल्याणासाठी अहर्निश झटले. त्यांचे आपल्या सर्वांवर अनंत उपकार झाले आहेत. त्यांच्या उपकाराची फेड करावयाची इच्छा बाळगणाऱ्यांनी रामनामस्मरणास आपल्याला वाहून घेतले तरच ती अंशतः होण्याची शक्यता आहे. अन्य कोणत्याही उपायानें ती होणें शक्य नाही. रामनामस्मरणानें कोणतेही कार्य सफल होते. एवढेंच नव्हें तर त्याच्या वाटेस कोणी जात नाहीं. असा श्रीसमर्थ रामदासांनी 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे, असा सर्व भूमंडळी कोण आहे' असा ठणठणीत निर्वाळा दिला आहे. आम्हीं काया, वाचा, मनानें ·ामनामस्मरण केले तर आमची संकटे नाममात्रदेखील राहत नाहीत, राहणार नाहींत, यांत तिळमात्र शंका नाही. असें सांगूनदेखील आमच्या हातून यांतले कांहीच होत नाहीं यास काय म्हणावें ! हा केवळ दैवदुर्विपाकच नव्हें काय ? पण त्या दैवालाही माघार घ्यावयास लावण्याची किमया रामनामांत आहे. मात्र त्यावर विश्वास पाहिजे व अहर्निश खटपट केली पाहिजे.

श्रीब्रह्मचैतन्य महाराजांप्रमाणे श्रीब्रह्मानंदगुरूंनींही उत्तर हिंदुस्थानची यात्रा केली. सद्गुरुनाथांचा अनुग्रह मिळविला. त्यांना सद्गुरुनाथांनी स्वदेशी परत पाठविले. सद्गुरुनाथांना सोडून जाणेची त्यांची बिलकूल इच्छा नव्हती. निरुपाय होऊन सद्गुरुनाथांची आज्ञा उल्लंघावयाची नाही म्हणून ते गेले. कारण गुरूंची आज्ञा प्राणापलीकडे ते मानीत असत. गुर्वाज्ञेप्रमाणें श्रीगुरु मायदेशी गेले खरे. पण ते फक्त आत्मचिंतनातच गढून गेले. लोकसंग्रहाचे व लोकोद्धाराचे काम दृष्टीआड झाले. पण परमेश्वराला तसें होऊ द्यावयाचे नव्हते. श्रीब्रह्मचैतन्य महाराजांनी बेलधडीस जाऊन शोध सुरुं केल्यावेळी लोकांच्या दृष्टीला खुळे भासणारे श्रीगुरु समाधी लावून बसले होते. त्यावेळी श्रीमन्महाराजांनी श्रीगुरूंना बोध करून दिला. त्यांच्या अवतारकार्याची आठवण करून दिली. ''तू सर्व कांही मिळविले आहेस. आतां मिळवायचे कांहीच राहिले नाही. अष्टसिद्धी तुझ्या दासी आहेत. प्रसंगोपात त्यांचा उपयोग करून घे'' असे सांगितले. त्यावेळी बेलधडीच्या अज्ञ लोकांस ब्रह्मानंद ही अधिकारी व्यक्ति आहे अशी खात्री पटली.

त्यानंतर श्रीगुरूंनी लोकांत जागृति निर्माण केली. रामनामाची श्रेष्ठता पावलोपावली लोकांस पटवून दिली व त्यांना रामध्यानांत गुंतविले. अन्नदानासारखे दुसरे श्रेष्ठ दान नाहीं हे स्वतःच्या कृतीनें त्यांनी जगाच्या निदर्शनास आणून पटवून दिले. अन्नदानानें मनुष्य जेवढा तृप्त होतो तितका द्रव्यदानानें होत नाहीं. अन्नदान करताना गरीब, श्रीमंत असा भेदभाव नसावा यावर श्रीगुरूंचा कटाक्ष होता. म्हणून ते सगळ्यांना मिष्टान्नानें तृप्त करीत असत. त्यांतल्या त्यात गोरगरिबांस स्वतः आग्रहानें पोटभर खाऊं घालीत असत. दिवसा, रात्रीं त्यांना रामनाममंत्र

उच्चारावयास लावीत, संकटांचा परिहार करीत. संसार तापत्रय नाहींसा करीत. सारांश, भक्त म्हणून शरण आलेल्यांचे कोड पुरवीत व त्यांना रामनाम घेण्यास व ऐकविण्यास लावीत.

श्रीब्रह्मानंदगुरूंच्या चरित्राचे मंथन करूं गेल्यास त्यांतून असंख्य गुणांचे दर्शन घडेल. आणि तशा प्रत्येक गुणाचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यांतून कितीतरी नवनवीन तत्वें माहिती रूपानें नजरेसमोर उभी राहतील. त्यांस विचिकित्सक बुद्धीचा पण शांतपणें त्या चरित्रांत अवगाहन करणारा संयमी मनुष्य पाहिजे. वरवर पाहणाऱ्याचे ते काम नव्हे.

रामनवमीच्या उत्सवात नऊ दिवस उपास करणारे जगांत किती भेटतील, यदाकदाचित् काही असले तरी तिन्हीं त्रिकाळ यथेच्छ फलाहार घेणारेच असतील. श्रीगुरू रामनवमीच्या उत्सवांत पूर्ण उपवास करीत असत. उत्सवाच्या सर्व अंगोपांगात सकाळपासून सायंकाळपर्यंत भाग घेत असत. तोही उत्साहानें. ते कधींही गळलेले, कांतिहीन असे दिसत नसत. रात्रीचा सर्व कार्यक्रम यथासांग पार पडल्यानंतर फक्त एक वाटीभर फळांचा रस सेवन करीत असत. यावरून मानवजात म्हटली की, ती भोगी, इंद्रियाधीन असते हे सुस्पष्ट होते. श्रीगुरू संयमी, इंद्रियदमनी होते. इंद्रियावर त्यांनी जय मिळविला होता. हेंच साधणे कठीण.

श्रीगुरूंना शिस्तीची फार आवड होती. नव्हें, त्या बाबतीत त्यांचा कटाक्ष असे. अशा माणसांचा स्वभाव स्वाभाविकच कडक भासतो. पण खरें बोलावयाचे झाल्यास तसा तो नसतो. अशी माणसे उलट कोमल अंतःकरणाची असतात. आई मुलाला रागे भरते वा ताडन करते. त्या समयी तिच्या अंतःकरणात जो राग दृग्गोचर होत असतो तो वरपांगी असतो. मुलाला सन्मार्गास लावण्यासाठी तो उसना आणलेला असतो. कार्य संपताच तो लय पावतो, विरघळतो. तद्वतच, श्रीगुरु क्वचित प्रसंगी रागाचा आविर्भाव आणीत, हंसत खेळत शिव्याही देत. पण हृदय नेहमी सदय असे. अंतरंगी हळहळ असे. म्हणून तर काहीं वेळानें आपण होऊन जवळ जाऊन ते अंतःकरणपूर्वक त्यांचे सांत्वन करीत असत असे सांगतात. अशा कारुण्यपूर्ण गुरूंना ते कडक होते म्हणणें म्हणजे म्हणणाऱ्याला श्रीगुरूंची खरी परीक्षा झालीच नाही असे म्हणावें लागते.

श्रीगुरु त्रिकालज्ञानी होते. चरित्रांत अनेकवेळां याबाबत दाखले येऊन गेले आहेत. याचे उत्तम उदाहरण म्हणचे अश्वत्थपुरला जातानां वाटेंत 'मंडगड्डी' येथें मुक्काम असतानां बरोबरच्या लोकांस नदींतून पलीकडे नेऊन, जंगलातून वाट काढीत नेऊन, मांडव्य ऋषींच्या आश्रमाची जागा दाखवून त्यांचेसंबंधी माहिती दिली हे होय. तोपर्यंत कोणांस त्याची माहिती नव्हती व श्रीगुरूही त्या जागीं कधीं गेलेले नव्हते.

जशी भक्ति तसें फळ. जशी सेवा तसे फळ. असे म्हणण्याचा प्रघात आहे. परमात्मा भक्ताधीन असतो. श्रीब्रह्मानंद परमात्म्याचे भक्त होते असे म्हणण्यापेक्षा ते परमात्मस्वरूपच होते असे म्हणणें जास्त सयुक्तिक होईल. ते वस्तुस्थितीस मुळीच सोडून होणार नाही. परमात्मा अल्पसंतोषी आंहे. मात्र तो अर्पण करणाऱ्याच्या भावाची (भक्तीची) प्रचीति पहात असतो. सुदाम्याने भक्तिभावाने गोपालकृष्णास मूठभर पोहे अर्पण केले, भक्तिरसानें ओथंबलेले पोहे भगवंताने खाल्ले. संतृप्त झाल्याची भगवंताने ढेकर दिली व सुदाम्याला सुवर्णनगरी दिली. अश्वत्थपुरचे लोक पैशाने गरीब. त्यांनी श्रीगुरूंवर विश्वास ठेवून प्रत्येक उत्सवप्रसंगी विनावेतन

स्वयंपाक, पाणी भरणे, उष्टी काढणे वगैरेसारखी हलकी कामें अतिशय तळमळीनें केवळ श्रीगुरूंची सेवा म्हणून केली. श्रीगुरू संतृप्त होतांच त्यांनी त्यांस हाताशीं धरून आशीर्वादरूपी ढेकर दिली व तेव्हापासून ती जमात सुधारली, श्रीमंत झाली. वाचक हो ! श्रीमंती ही फार वाईट. ती माणसास उद्धट केल्याशिवाय रहात नाहीं आणि एकदां त्याचा प्रादुर्भाव झाला की, ऱ्हास व्हावयास वेळ लागत नसतो. तरी या कामी सावधानता बाळगणे अत्यावश्यक आहे.

श्रीगुरूंचा दुसरा घेण्यासारखा गुण म्हणजे सद्‌गुरुनाथांच्या आज्ञेखेरीज कोणतीही जबाबदारी अंगावर न घेणे, अगर घेतली असल्यास सदगुरुनाथांच्या संमतीनेच ती पार पाडणे हा होय. चरित्रांत याची अनेक उदाहरणें ठिकठिकाणी विखुरलेली आहेत. अश्वत्थपुरला श्रीराममंदिर बांधण्यात आले. मूर्तीच्या प्रतिष्ठापनेस लोकांनी श्रीब्रह्मानंदगुरूंना पाचारण केले. त्यांनी श्रीमन्महाराजांकडे त्या मंडळींस पाठविले. तेव्हां श्रीमन्महाराजांनी ''मी म्हणजे ब्रह्मानंद व ब्रह्मानंद म्हणजे मी. माझा बोल तोच त्यांचा बोल'' असा लोकांस संदेश दिला व श्रीब्रह्मानंदगुरूंसही अश्वत्थपुरच्या मंडळींची मनोकामना पूर्ण करण्याची आज्ञा केली. सद्‌गुरुनाथांकडून अशा गौरवांस पात्र होणे हे सोपें काम नाही. एवढेंच काय प्रसंगोपात श्रीमन्महाराजांनी लोकांना 'ब्रह्मानंदास हलका समजू नकां. मी त्याचा गुरू असलो तरी तो माझ्या फार पुढें गेला आहे' असे सांगितल्याचे लेखकानें स्वत: ऐकले आहे. धन्य तो गुरु व धन्य तो शिष्य.

थोडक्यात म्हणजें उनाड अनंत, अनंतशास्त्री झाला. अनंतशास्त्र्याचा ब्रह्मानंद झाला व ब्रह्मानंदाचे ते श्रीब्रह्मानंदगुरु बनले. अगम्य महिमा त्यांनी जगास दाखविला व ते जगद्वंद्य झाले. श्रीरामनामाचे बीज त्यांनी महाराष्ट्रात व कर्नाटकात पेरले. अनाथांचे नाथ बनले, दु:खितांचे कल्पतरू बनले, याचकांची कामधेनू बनले, शरणागतांचे संरक्षक बनले, मुमुक्षूंचे मार्गदर्शक बनले. ते एका जागीं स्थिर कधींच नसत. बहिर्जीप्रमाणें क्षणात इकडे तर क्षणात दुसरीकडे असा त्यांचा संचार असे. ते कधीहीं कोणाचे हातीं लागत नसत. पण त्यांचेवर भक्तिभावानें प्रेम करणाऱ्यांचा ते कधीही हात सोडीत नसत, सोडला नाही व पुढेही सोडणार नाहींत याची प्रत्येकानें मनोमन खात्री बाळगावी.

सेवा करा असा नुसता उपदेश करून कोणी सेवेला स्वत: वाहून घेत नाहीं हे श्रीगुरूंना चांगले माहीत असल्यानें त्यांनी कोणत्याही बाबतीत पोकळ उपदेश केव्हांही कोणाला केला नाहीं. प्रत्येक वेळेस ते स्वत: काम करणेस उभे रहात. त्यामुळे त्यांचे अनुकरण करावें असें लोकांस वाटून ते तसें करीत असत. परमेश्वर व सामान्य मानव यांना जोडणारा गुरु हा एक दुवा आहे. सद्‌गुरु हे सामान्य जनांस प्रथम भक्तिमार्गास लावतात. कालांतराने त्यांचे मनोरथ पूर्ण करतात व त्यांस परमात्म्याच्या कायम, भजनीं लावतात.

''यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानम् धर्मस्य संभवामि युगे युगे ।।'' या श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील उक्तीप्रमाणें अवतारी पुरुषांचे अवतार होत असतात. पुराणांतरी जे अवतार झाले ते असुर प्रवृत्तींचा नाश करण्यासाठी झाले. त्यावेळी त्या अवतारी पुरुषांना असुरांचा प्रत्यक्ष नाश करावा लागला. कलीयुगांत जो नाश करावयाचा असतो तो व्यक्तींचा नसून दुष्ट लोकांच्या दुष्प्रवृत्तींचा करावयाचा असतो. हे काम परमात्म्याचे अंश असलेले सद्‌गुरु करतात. त्यांचा मार्ग म्हणजे दुष्प्रवृत्तींच्या लोकांना ईश्वरभजनी

लावण्याचा असतो. गुरुची थोरवी फार मोठी. गुरु म्हणजे ब्रह्मा, गुरु म्हणजे विष्णू, गुरु म्हणजे साक्षात् परब्रह्म असे वचन आहे. गुरु हे परमात्म्यापेक्षा कांकणभर श्रेष्ठ असतात. असे श्रीगुरूचरित्रांत वर्णन आहे. त्यांत 'हरौ रुष्टे गुरुस्त्राता, गुरौ रुष्टे न कश्चन' असे स्पष्ट म्हटले आहे. परमेश्वर कोपल्यास गुरु तारील. पण गुरु कोपल्यास मात्र त्याचा कोणी वाली नाहीं. पण सद्‌गुरु कधीच कोपत नाहींत. कृतककोप करतील पण तो तेवढ्यापुरताच. तर मग अशा सद्‌गुरुंच्या सत्संगात सदा आपण रहावे हेंच बरें. त्यांचे वाक्य हे वेदवाक्य मानले पाहिजे. सद्‌गुरुंना म्हणजे त्यांच्या बोलांना हृदयांत जागा करून दिली पाहिजे. म्हणजे आपले बरेंचसे काम अनायासे होईल. कारण 'जतियंते मति, मतियंते गति' असा वाक्प्रचार आहे. म्हणजे सोबती तसे विचार व विचार तसे फल असा वाक्प्रचाराचा अर्थ आहे, सद्‌गुरुंच्या उपदेशाची जर सोबत संगत केली तर आपले विचारही चांगलेच असणार आणि विचार सुष्ट झाले की त्याचे फलही उत्तमच मिळणार.

बरे, श्रीगुरूंनी तरी आपल्यावर भलतेंच ओझे कोठें लादले आहे ? ते फक्त शक्य तितका वेळ रामनामांत रहा हेंच सांगतात. मग त्यात अवघड ते काय ? अवघड एवढेंच की ते मनापासून तळमळीने घेतले पाहिजे. पुष्कळ लोक खिशात हात घालून माळेचे मणी ओढत असतात. पण त्यात ओलाव्याचा भाग नसल्यानें तो दंभच ठरतो. श्रीमन्महाराजांनी कोट्यानुकोटी लोकांस रामनाम जपण्यास सांगितले. असंख्य लोक आपण अहर्निश नामांत दंग असतो असा दावा सांगतात. पण श्रीमन्महाराजांच्या अनुग्रहातीत ब्रह्मानंद एकच निपजले यावरूनच काय ते ओळखावें.

आम्हीं रामनाम तोंडाने म्हणतो पण त्यावेळी मन निर्विकल्प नसते. त्यामुळे मनाची व रामाची भेट केव्हांही होत नाही. मनाच्या द्वारे जेव्हां रामाची प्रतिष्ठापना हृदयमंदिरात होईल, जेव्हां सदा आत्मारामाचा आठव होत राहील, तेव्हां रामाची आपली प्रकट भेट होईल व त्याची आपल्यावर कृपा होईल. हेंच ब्रह्मानंदगुरूंनी परोपरीने सांगितले. गुरूंची थोरवी मातापित्यापेक्षा जास्त आहे. मातापिता फक्त आपल्यास जन्म देतात व सुकृत अगर दुष्कृताचरणाचा मार्ग आपल्याला मोकळा करून देतात. गुरु हे दुष्कृतापासून परावृत्त करून सुकृताच्या मार्गावर नेऊन सोडतात व पुन्हां जन्मच येणार नाहीं असे करतात.

श्रीब्रह्मानंदगुरूंचे चरित्र अगाध आहे, अफाट आहे, अगम्य आहे. तरी पण प्रयत्नांनी ते सुगम्य होणारे आहे. आजदेखील गुरु नाहींत असे कोणी मानू नये. त्यांची समाधी नवबागेत त्यांनी देह विसर्जन केल्याजागी बांधली आहे. तेथें ते आहेतच. वेंकटापुरात त्यांनी आपल्या समाधीची जागा आधीच बांधून ठेवली होती. तेथेंही ते आहेतच. एवढेंच काय भक्तांच्या घरोघरींही ते आहेतच. त्यांचे सगुणरुप दर्शन नाहींसे झाले आहे एवढेंच. पण निर्गुणरूपाने ते सर्वत्र आहेत. त्यांच्या वचनावर विश्वास ठेवून त्यांनी दाखवून दिलेल्या मार्गाचा अवलंब केल्यास आपल्या मदतीस ते धांवून आल्याशिवाय राहणार नाहींत. श्रीगुरु स्वतः तर दर्शन देतीलच एवढेंच नव्हें तर श्रीरामरायाचे दर्शनदेखील करवून देतील हा विश्वास बाळगा.

विश्वासाचें साधन करा. साधन करताना संशयाला बिलकूल थारा देऊ नका. घागरभर दूध नासण्यास मिठाचा एकच खडा पुरे होतो. तद्वतच यत्किंचित संशयाला वाव दिला तर सर्व साधनेचे वाटोळे व्हावयास एक निमिषसुद्धा लागणार नाहीं. प्रयत्नांचे महत्त्व फार आहे. तो सर्वश्रेष्ठ आहे. अंती परमेश्वरप्राप्तीही होऊ शकते.

आजवर अनेकांना अनेक अनुभव आलेले आहेत. त्याचा विचार करा. धीर सोडू नका. प्रथम अंधारातून चाचपडत कदाचित जावे लागेल. कदाचित ठेचकळण्याचा प्रसंगही येईल. तरी त्याने न घाबरता नेटाने पुढे पुढे चला. श्रीगुरूंचे चरित्र वाचा. त्याची पारायणे करा. त्यातील भाव व मर्म समजून घ्या, म्हणजे चरित्रवाचनाची सार्थकता तर होईलच त्याचबरोबर तुमची उन्नति होऊन तुमचा उद्धार होईल.

श्रीगुरूंच्या देहावसानानंतर तीस वर्षांनी गांधीवधोत्तर जाळपोळ व लुटालुटीचा तडाखा सगळीकडे बसला. त्यांतून श्रीगुरूंचे समाधिस्थानही वगळले गेले नव्हते असा उल्लेख इतरत्र आला आहेच. त्यावेळची जी प्रचीति काहीं लोकांस आली त्याचे माझ्या वरील विधानाच्या पुष्ट्यर्थ अनुभवादाखल उदाहरण देऊन मी हे प्रकरण आटोपतें घेण्याचे ठरविले आहे. त्यावेळीं गुंडांनी नवबाग समाधि मंदिरांतील चीजवस्तू, भांडीकुंडी चोरून एका गुंड पुढारी माणसाच्या घरीं नेऊन ठेविली. चमत्कार असा झाला की, दुसऱ्याच दिवशीं त्याचा मुलगा मेला. त्याने काय तो बोध घेतला व गुंडांची समजूत घालून मठाचे सर्व सामान त्याने परत आणून दिले. असा गुरूंचा महिमा आहे. श्रीगुरु आजन्म ब्रह्मचारी होते. श्रीगुरूंची समाधी हे कडक स्थान आहे. तेव्हां त्याच्याशी प्रतारणा करून चालणार नाही.

श्रीगुरूंचे चरित्राविषयीं जितके लिहावें तेवढें थोडेच. तृप्ती म्हणून होत नाही. ऐकावे तेवढेंही थोडेच. कारण त्यात अवीट गोडी आहे. कितीही स्मरण केले तरी अपुरेच वाटते. कोठेतरी शेवट हा केलाच पाहिजे. कारण ते श्रीबजरंगबलीच्या शेपटाप्रमाणें वाढतेच आहे. म्हणून त्यांचेकडून मळल्या गेलेल्या वाटेने जाऊन आपण अहोरात्र रामनामाचे पठण करूं या. त्याची पूजा करू या व आनंद मिळवूं या. यांतच श्रीगुरूंची तृप्ति व आम्हा पामरांची शांति आहे. ॐ तत्सत् .

अखेर श्रीगुरूंनी आम्हां पामर भक्तांवर कृपादृष्टि ठेवावी. त्यांच्या बोधाप्रमाणें आचरण करण्याची आम्हांस बुद्धि द्यावी व धैर्य द्यावे व सर्वांचेच कल्याण करावे अशी प्रार्थना करून हे प्रकरण संपवितो.

**॥ श्री सद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

## परिशिष्ट – १

### श्रीसद्‌गुरु ब्रह्मानंद महाराजांचे हस्ताक्षर

ब्रह्मानंद कृत अनेक आशीर्वाद
क्षेम विशेष ।। आज रोजी श्री मरा
वगाड गुरुजी यांचे कडीअपण पाठ
विलेले पत्र पोहचून मजकूर स
मजला ।। एक महिना खाली हरि
पंत सांगलीकर यांचे बरोबर
सर्व हकीकत सांगून पाठविले
आहे ते अद्याप तुम्हाला भेटून ह
कीकत कळविलेली नाहि आश्चर्य
आहे ।। एक वर्षापासून मी आजा
र आहे अंगात अगदी शक्ती ना
हि ।। हरिपंत सांगलीकर हे सम
क्ष बघून गेले आहेत

(श्री. गणेश महादेव दामले यांना श्री ब्रह्मानंद महाराजांनी पाठविलेल्या पत्रातील काही भाग)

# परिशिष्ट – २

## समाधिस्थानाचा साद्यंत इतिहास

इ. स. १९१८ या सालीं म्हणजे शके १८४० या वर्षी श्रीब्रह्मानंदगुरूंनी जड देहाचा त्याग करून जलसमाधी घेतली वगैरेबाबत विस्तृत वृत्तांत मागील निर्याण प्रकरणीं येऊन गेलाच आहे. श्रीब्रह्मानंदगुरूंनी ज्या छपरांत देहत्याग केला, सगुण रूपातून बाहेर पडून निर्गुणरूप धारण केले त्याजागी कट्टा बांधून त्यावर लाकडी पादुकांची स्थापना करून नित्य त्रिकाल पूजा, नैवेद्य, आरति वगैरे कार्यक्रमाची सुरवात श्रीमंत आप्पासाहेब पटवर्धन यांनीं केली. देखरेख व सर्व खर्च श्रीमंत आप्पासाहेब पटवर्धन करीत असत. कारण श्रीब्रह्मानंदगुरु श्रीमंतांचे पाहुणे म्हणून आले व त्यांनी तेथें कायमचा वास केला. यजमान या नात्यानें आप्पासाहेबांस सर्व करणें प्राप्तच होते. शिवाय श्रीब्रह्मानंदगुरूंनी श्रीमंत आप्पासाहेब व त्यांचे कुटुंबीय यांच्या क्षेमासाठीच तेथे वास केला होता. तोही श्रीमन्महाराजांच्या आज्ञेवरून. गुर्वाज्ञेस श्रीब्रह्मानंदमहाराज प्राणापलीकडे जपत असत, हे आतापर्यंतच्या चरित्रावरून भाविक भक्तांना कळून चुकलेच आहे. म्हणून तर गुर्वाज्ञेचे पालन करण्याच्या इराद्यानें कृष्णातटाकीं हिंडण्याचे लौकिक ढोंग करून श्रीब्रह्मानंदगुरूंनी वाळेश्वराचा डोह, ही जलसमाधीची जागा ठरविली व नवबागमळाही निर्याण कालीन समाधीची जागा ठरविली. श्रीब्रह्मानंदगुरूंना श्रीमन्महाराजांनी श्रीमंत आप्पासाहेबांचेकडे वास करण्याची आज्ञा का दिली याचा विचार करता असें दिसून येते की आप्पासाहेब हे श्रीब्रह्मचैतन्य महाराजांचे अनुग्रहीत. आप्पासाहेबांच्या पूर्वजांना एका संन्याशाचा शाप बाधत होता, तो संन्याशी कोण व तो त्यांस कां बाधा करीत होता या खोलात न शिरतां, आपल्या भक्ताची, आप्पासाहेब व त्यांचे कुटुंबीय यांची बाधा दूर व्हावी व ती श्रीब्रह्मानंदगुरूच दूर करतील या विश्वासानें श्रीमन्महाराजांनी तशी आज्ञा केली होती व त्याचे अखंड पालन आपले हातून व्हावें या सदिच्छेनें श्रीगुरूंनी नवबागेत देह ठेवला.

पूजे-अर्चेची व्यवस्था होती, पण त्या कामीं विशिष्ट व्यक्तीची नेमणूक नव्हती. कधीं कोणी, कधीं कोणी, या तऱ्हेनें ती व्यवस्था राबविली जात होती. बरेच दिवस कागवाडचे गणूबुवा रामदासी पूजाअर्चा दररोज मनोभावानें करीत असत. दरसाल आराधनोत्सव होत असे. भक्त जमत असत, वर्गणी शक्त्यनुसार देत असत व उत्सव पार पडत असे. कमी पडल्यास श्रीमंत आप्पासाहेब व तेरदाळचे श्री. विष्णुपंत मरळीकर पदरचे घालून तूट भरून काढीत असत. अशा तऱ्हेने चार वर्षे परिपूर्ण झाली तरी छपराचे व समाधिस्थानाचे रूप पालटेना व त्या स्थानीं देवस्थानाची कळा येईना.

इ. स. १९२२ सालचे उत्सवाचे वेळीं वेंकटापुराहून श्री. दत्तोपंत जोगळेकर श्रीब्रह्मानंद महाराजांचे कट्टर शिष्य कागवाडास आले. त्यापूर्वी ते वेंकटापुरासच सेवेसाठी राहिले होते. पण तेथील सर्वाधिकारी वे. गुरुपादभट्ट यांचेशी त्यांचे जमेनासे झाले होते. तेव्हां कागवाडास आल्यावेळीं त्यांनी आप्पासाहेबांजवळ आपली कायम सेवेस राहण्याची मनीषा असल्याचे सांगितल्यानें त्यांनी अत्यानंदानें त्यांस संमती दिली व त्यांस तेथें आग्रहानें आदरानें राहवून घेतले. श्री. दत्तोपंत जोगळेकर तेथें राहू लागल्यापासून त्या स्थानाचे रूप पालटू लागले.

श्री. दत्तोपंत हे निरलस वृत्तीचे गृहस्थ होते. ते जातीनें सर्व कामें करीत. उपासना अत्यंत शुद्ध अंतःकरणानें व बेलधडी व वेंकटापूर पद्धतीप्रमाणें म्हणजेच श्रीब्रह्मानंदगुरूंनी घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणे यथासांग करीत. स्वतः सोवळ्याने स्वयंपाक करून, नैवेद्य, आरति करीत असत. पहाटें ४ वाजतां उठून सेवेस सुरवात झाली म्हणजे सर्व व्यवस्थित आटोपून भोजनांस त्यांना दुपारचे २-२॥ वाजत असत. भोजनोत्तर दुपारीं ३ ते ४ विश्रांति घेऊन सायंकाळी ४ वाजतां भजन, वाचन वगैरे कार्यक्रमास सुरवात होई. नंतर अष्टकें, सवाया, पंचपदी, आरती, मंत्रपुष्प वगैरे कार्यक्रम आटोपण्यास त्यांस रात्रीचें ९-९॥ वाजत असत. त्यानंतर दुग्ध प्राशन करून ते रात्रीं १० वाजतां झोपत असत. रात्रीं ते भोजन करीत नसत.

श्री. दत्तोपंत हे निष्ठावंत आणि श्रद्धावान होते. हयगय त्यांस बिलकूल खपत नसें. देवाच्या उपचारांस लागणारें सर्व जिन्नस नेहमीं त्यांचे संग्रही असत. वेळीच खबरदारी घेऊन कोणताही जिन्नस संपण्यापूर्वी ते आगाऊ निरोप पाठवून आणवीत असत. त्यांची टापटीप व दक्षता पाहून श्रीमंत आप्पासाहेब त्यांचेवर खूष होते व त्यांनी त्यांची बडदास्त उत्तम ठेविली होती. यामुळे दत्तोपंतांचा वचकही चांगला बसला होता. ते विनोदीही होते व आल्यागेल्याशी खेळीमेळीनें वागत असत.

याच दत्तोपंतांनी समाधिस्थानाबद्दल उचल खाल्ली व इतकी वर्षे झाली तरी तुम्हीं समाधिस्थानाकडे लक्ष देत नाही, ती बांधून काढीत नाही. कसले भक्त तुम्हीं असे सर्वांजवळ उद्‌गार काढण्यास त्यांनी सुरवात केली. त्याचा परिणाम होऊन आप्पासाहेब पटवर्धन, अंताजी लिमये (लेखकाचे वडील) व बळवंतराव पागा फडणीस - श्री महाराजांचे शिष्य व श्रीब्रह्मानंदगुरूंनी नेमलेले गोंदावले क्षेत्राचे पंच यांनी दत्तोपंतांची गोष्ट मनावर घेतली व पुढाकार घेऊन चौथऱ्याभोवती विटाचे भिंतीची एक घुमटी तयार केली व छप्पर काढून टाकले. इतके होईपर्यंत १९२३ साल उजाडले.

देवस्थानचे कायम व्यवस्थेचे तत्व श्रीमंत आप्पासाहेब यांस पटून त्यांनी प्रथम हल्ली देवस्थानाकडे असलेल्या स्वसंपादित जमिनीचा तुकडा देवस्थानास दान दिला. या नंबरास श्रीब्रह्मानंदसंस्थान असें नांव दिले व तशी सरकारी रजिस्टारांत नोंदही करून घेतली. स्वसंपादित तुकडा देवाकडे वाहण्यास आप्पासाहेबांनी खरोखरच धोरणीपणा दाखविला. त्यांस बहुधा वडिलोपार्जित जमिनीतील तुकडा देवास दिल्यास तो पुढें देवस्थानाकडे राहील कीं नाहीं अशी शंका वाटली असावी. देवाचा दैनंदिन खर्च चालविण्यासाठी उगार येथील एक जमीन त्यांनी देवाकडे देऊन टाकली त्याचा सालीना आकार तीनशे रुपयें येत असे. त्यापैकी २०० रु. श्रीब्रह्मानंद संस्थानास व १०० रु. श्रीगोंदावले संस्थानास द्यावा अशी त्यांनी विभागणी करून ठेविली. त्याप्रमाणे चालत असे. पण जमिनीच्या कर्द्यानें कूळ कायद्याप्रमाणें जमीन बळकावण्याच्या इराद्यानें गेली चार वर्षे खंड न दिल्यानें व म्हैसूर प्रांतात देवस्थानाचें जमिनीस कूळकायदा लागू नसल्याचें समजल्यानें सध्याच्या पंचाच्या विद्यमानें कर्द्यावर अथणी कोर्टात दावा दाखल करण्यात आला असून जमिनीचा कबजाही मागण्यात आला आहे. त्याचप्रमाणें देवस्थानच्या व्यवहारावर लक्ष ठेवण्यासाठीं व उत्सवादिचे वेंळीं पुढाकार घेऊन काम करण्यासाठी व अडचणीचे वेळी सल्लामसलतीसाठी म्हणून त्यावेळी पंचांची नियुक्ती करण्यात आली. त्यातील पंचांची नावे खालीलप्रमाणे -

१) श्री. भीमराव गुरुभट गाडगोळी, रा. गदग, २) श्री. बळवंत नारायण घाणेकर, रा. बेळगांव, ३) श्री. त्रिंबक गणेश

उर्फ आप्पासाहेब पटवर्धन, रा. कागवाड, ४) श्री. विष्णू अनंत मरळीकर देशपांडे, रा. तेरदाळ, ५) श्री. आत्माराम नरसिंह कुलकर्णी, रा. कागवाड.

पंचांत जरी आप्पासाहेबांचे नांव असले तरी त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव रावसाहेब हेच सर्व व्यवस्था पहात असत व हिशेबही ठेवीत असत. कालमानाप्रमाणें यांतील पंच जसजसे कालवश झाले तसतशी त्यांच्याजागीं नव्या पंचांची नियुक्ति करावयास पाहिजे होती पण तसे घडले नाहीं. प्रथम प्रथम श्री. विष्णुपंत मरळीकर तेरदाळहून ७-८ मंडळी बरोबर घेऊन येऊन आराधनोत्सव साजरा करीत असत. आपल्या पदरचा खर्चही बराच करीत असत. कांही कारणामुळें एके वर्षी श्री. विष्णुपंतांनी 'मी पुन्हा कागवाडास येणार नाही' अशी शपथ घेतली व त्या उत्सवानंतर ते जे तेरदाळास गेले ते पुन्हा कागवाडास फिरकले नाहींत. त्या हट्टानें त्यांनी पुढचे वर्षापासून तेरदाळ येथील श्रीदत्तमंदिरात प्रौष्ठपदीस सप्ताह करण्यास सुरवात केली. तरी पण तेरदाळचे ८-१० मंडळींचा ताफा समाप्तीचे आदले दिवशी नवबागेत येऊन सायंकाळचे ६ वाजल्यापासून सकाळचे सहा वाजेपर्यंत आळीपाळीनें अखंड १२ तास भजनाचा गजर सुस्वर कंठानें तालबद्धतेने करीत असत. अद्यापही ५-६ मंडळी आदले दिवशी येतात, पण पूर्वीप्रमाणें १२ तास भजनाचा गजर न करतां पहाटें २ ते सकाळी ६ पर्यंत चार तासच पहारा करतात पण तो इतका सुरेल करतात की बरींच भक्त मंडळीं, तो ऐकण्यास झोपेंतून उठून बसतात.

१९२२ ते साधारण १९३० पर्यंत समाधिस्थानीं बांधकामाचे दृष्टीनें नवीन काही घडले नाही. पण १९३० सालीं कर्नाटकांतील गृहस्थ श्री. नारायणराव कुंदापूर यांनी येऊन समाधिस्थानीं जी उत्तम गर्भगुडी दिसते तिचे बांधकाम केले. ते त्यांनी आपल्या हिमतीवरच केले. देवस्थानाच्या डाव्या हातास जे स्वयंपाकघर आहे ते बापूसाहेब साठे, श्रीमन्महाराजांचे अनुग्रहीत, यांच्या देणगीने बांधण्यात आले. ती कामगिरीही कुंदापूर यांच्या देखरेखीखालीच झाली. हल्लीची कोठीची खोली व बागेकडील बाजूची आडवी भिंतही त्यांनीच बांधून दिली. देवस्थानचे उजवे हातास कोपऱ्यात जी खोली आहे ती श्री. गजाननराव करमरकर यांस त्यांचे खर्चानें पण आपले देखरेखीखाली श्री. कुंदापूर यांनीच बांधवून दिली. हल्लीचा जो सभामंडप आहे त्याकामीं मात्र श्रीमंत आप्पासाहेब व श्री. बळवंतराव फडणीस व श्री. अंताजीपंत लिमये यांनी पुढाकार घेऊन मेहनतीने व द्रव्य खर्चून तयार करून घेतला. मात्र त्या सभामंडपाच्या उजवीकडील व डावीकडील भिंती कशा कुणास ठाऊक पण वरपर्यंत भिडलेल्या नव्हत्या. वरील आच्छादनाच्या पत्र्यांचा सर्व खर्च श्री. अंताजीपंत लिमये यांनी केला. ही झाली इमारतीची हकीकत. आता थोडें पूजा-अर्चा या विषयाकडे वळू.

श्री. दत्तोपंत जोगळेकर हे १९२३ सालापासून समाधीची पूजा-अर्चा करूं लागले असा मजकूर पूर्वी येऊन गेलाच आहे. श्री. जोगळेकर हे तेव्हांपासून १९४८ सालापर्यंत म्हणजे गांधीवधोत्तर जाळपोळीपर्यंत जवळजवळ २५ वर्षे अव्याहत अत्यंत नेकीनें ती कामगिरी बजावीत आले. १९४८ साली उसळलेल्या दंगलीचा प्रसाद देवस्थानाला मिळाला. समाधीस्थानातील चीजवस्तू लुटली गेली. श्री. दत्तोपंत यांस बेदम मार बसला. त्यांचे अंथरूण-पांघरूण व इतर कपडेही लांबविण्यात आले. एक चांगली गोष्ट झाली की, फक्त लुटीवर भागले. तेथे जाळपोळ झाली नाही. मग मात्र श्री. जोगळेकर आजारी पडून वैतागून जे तेथून गेले ते मरेतोपर्यंत पुन्हा परत म्हणून तेथें आले नाहींत. पण श्री. अप्पा पाटणकर यांस १९४८ सालापूर्वीच गोंदावल्याहून नवबागेत धाडण्यात

आले होते. जोगळेकर जातांच श्री. पाटणकर पूजा-अर्चा करीत होते. ते डोळ्यानें अधू होते. तरीपण गणेशवाडीस जाऊन मधुकरी भिक्षान्न घेऊन येऊन त्यावर उदरनिर्वाह करीत असत.

त्यानंतर थोड्याच दिवसांत श्री. गजाननराव करमरकर हे तेथे कायम येऊन राहिले. त्यांचा मुलगा शिवराम हा सहकुटुंब तेथे येऊन राहिला व ही मंडळी समाधीच्या नैवेद्याची व्यवस्था पहात असत. अर्थात् त्यांस नैवेद्याचा शिधा कागवाडचे रावसाहेब पटवर्धन यांचेकडून मिळत असे. त्यामुळें तीही गैरसोय दूर झाली. तशीच व्यवस्था परवांपर्यंत चालू होती. श्री. अप्पा पाटणकर यांनी जवळ जवळ १९५५ अखेरपर्यंत म्हणजे सुमारें १८ वर्षे पूजाअर्चा केली. त्यांस श्री. गजाननराव करमरकर यांची हरघडी मदत होत असे. अप्पा पाटणकर नवबागेतच वारले. त्यानंतर लगेच गु. भ. श्री. वामनराव जोशी शाळाखात्यातून रिटायर झालेले शिक्षक संसारभार आपल्या मुलांवर सोपवून केवळ सेवा करण्यासाठी तेथे जाऊन राहिल्यास सुमारे तीन वर्षे होऊन गेली. ते स्वतः स्वयंपाक करीत नाहींत व मधुकरी भिक्षान्नासही जात नाहींत. त्यांनी आपली जेवणाची सोय करमरकर कुटुंबात धान्य देऊन करून घेतली आहे. आतां पूजाअर्चादि उपासना श्री. जोगळेकरांप्रमाणे अतिशय पद्धतशीरपणें चालली आहे.

सन १९४८ सालीं जाळपोळींत श्रीमंत पटवर्धन यांच्या वाड्यांतही अतोनांत लुटालूट झाल्यानें त्यासालीं आपल्यास नामसप्ताह निभणार नाही व खर्चही झेपणार नाहीं असे रास्त वाटू लागल्यानें त्यांनी फक्त पुण्यतिथी थोड्याशा भजनानें व अन्नदानानें साजरी करण्याचा निर्णय घेतला. हें श्री. जोगळेकर यांस पसंत न पडल्यानें त्यांनी श्री. करमरकर व श्री. गोपाळराव फडके बुधगांव यांस पत्रें लिहून आराधना उत्सव तुम्ही अंगावर घेऊन करा असें सुचविलें. श्री. करमरकर व श्री. फडके एकत्र जमले. विचारविनिमय झाला. काहीं झालें तरी उत्सव सात दिवस करावयाचा असा त्यांनी निश्चय केला . पण श्री. पटवर्धनांच्या परवानगीशिवाय कसा करता येईल अशी शंका निघून ते दोघेही कागवाडस रावसाहेब पटवर्धन व बापूसाहेब पटवर्धन यांचेकडे गेले. त्यांनी त्यांना तुम्ही यंदाचा उत्सव सात दिवस न करता एका दिवसांत गुंडाळणार असल्याचे कळते. खरे काय ? अशी पृच्छा केली. होकार देतांच तर मग तो उत्सव आम्हीं सात दिवस येथें केल्यास तुमची हरकत आहे काय ? असा दुसरा प्रश्न केला. त्यास त्यांनी तसे होत असल्यास आपली बिलकुल हरकत नाहीं असें सांगितल्यानें त्याची संमती त्यांनी उभयतां पटवर्धनांचे तोंडून त्रिवार वदविली व तेथून ते जे उठले ते सांगलीस आले व त्यांनी श्री. गुंडोपंत सहस्रबुद्धे यांस गांठले. श्री. गुंडोपंत हे श्रीब्रह्मानंद महाराजांचे निस्सीम भक्त. वास्तविक जाळपोळीचा तडाखा त्यांसही जबर बसला होता. तरी त्यांनी कंबर कसली व तो आराधनोत्सव या त्रयीनें दरसालाप्रमाणें व्यवस्थित पार पाडला.

श्री. गोपाळराव फडके हे दुसऱ्या उत्सवापर्यंत न वाचल्याने मरणसमयीं त्यांनी श्री. गुंडोपंतांस बोलावून घेऊन कोणत्याही परिस्थितीत उत्सव सोडणार नाहीं. तो पार पाडीन असें वचन घेतले व प्राण सोडला. तेव्हांपासून आजवर श्री. सहस्रबुद्धे हे पुढाकार घेऊन उत्सव पार पाडीत आले आहेत. त्यांच्या वीस वर्षांच्या सेवेंत समाधिस्थानी काय काय सुधारणा झाल्या याचा थोडासा आढावा घेणे क्रमप्राप्त आहे.

श्री. सहस्रबुद्धे यांनी सूत्रें हातीं घेतल्यावेळी समाधीस्थानची गर्भगुडी व भोंवतालचा सभामंडप, समोर देवस्थानची बाग, उजवे बाजूचे कोपऱ्यातील श्री. करमरकर यांची खोली, डावे बाजूचे स्वयंपाकघर, भोजनगृह व कोठीची खोली व जुजबी भांडीकुंडी एवढेंच होते. सभामंडपाची भिंत दोन बाजूस पत्र्यापर्यंत टेकलेली नव्हती.

पत्र्याखालीं १ ।। फुटापर्यंतच होती. ती वरपर्यंत पूर्ण करून घेण्यात आली. श्री. करमरकर यांचे खोलीचे डावे अंगास अनुक्रमें (१) अनंत आत्माराम कुलकर्णी, रा. सांगली (२) त्यालगत श्री. उडपी यांची (३) त्यांचे डावे बाजूस श्री. बापूसाहेब यांची खोली व त्यालगत (४) श्री. बापूसाहेबांचे श्वशुरांची खोली (५) त्याचे दक्षिणेस श्री. सहस्रबुद्धे, रा. सांगली अशा खोल्या बांधविणेत आल्या आहेत. पैकी श्री. कुलकर्णी व श्री. उडपी यांच्या खोल्यांचे कामी संस्थानाला देणगीबाहेर खर्च झाल्यानें पदरची रक्कम घालावी लागली आहे. चालू साली स्वयंपाकघराची उंची वाढवून घेण्यात आली असून ते दक्षिणेस १० फूट वाढवून प्रशस्त करून घेण्यात आले आहे व ते दोन फूट उंचही करून घेण्यांत आले आहे व त्यांस लागून दक्षिणेस दोन स्नानगृहें बांधण्यात आली आहेत व तेथे एक पाण्याचा मोठा हौदही बांधण्यांत आला आहे. स्वयंपाकघरातही एक मोठा हौद पाण्याच्या साठवणीसाठी बांधण्यात आला आहे. पूर्वीच्या स्वयंपाकघराच्या पश्चिमेस एक खोली होती. त्यावरील छप्पर कोसळल्यानें तेही दुरुस्त करण्यात आले आहे. तसेंच श्री. सहस्रबुद्धे यांचे खोलीचे दक्षिणेस तीन खणीं एक प्रशस्त यज्ञशाळा बांधण्यात आली आहे. चालूं साली सुवर्ण महोत्सवानिमित्त पवमान स्वाहाकार व रुद्रस्वाहाकार आयोजित केला गेल्यानें ती यज्ञशाळा बांधविण्यात आली. त्यास गं. भा. बनूताई आपटे यांचे नांवाची पाटी लावण्यात आली आहे. देवस्थानचे पाठीमागें दक्षिणेस पुण्याचे श्री. मिजार यांनी स्वखर्चानें विहीर बांधून दिली आहे. कर्नाटकस्थ मंडळींनी देवस्थानाबाहेरील पटांगणात सभोवार फरशी करून दिली आहे. तुळशीकट्ट्याच्या चौकात उजेडासाठी एक खांबावरील कंदील यज्ञशाळेसमोर लावण्यात आला आहे. त्यामुळे आता चौफेर उजेडाची सोय झाली आहे. सभामंडपातही ज्या ठिकाणी फरशी नव्हती तेथें ती करण्यात येऊन पूर्तता करण्यात आली आहे. उत्सवप्रसंगी भांडी कमी पडत असत. बरीच लहान भांडी भक्तांच्या देणगीद्वारा उपलब्ध झाली आहेत व कांही मोठी भांडी संस्थेने खरेदी केली आहेत. संस्थेने मोठ्या सतरंज्या, पालपट्ट्या वगैरे सामानही घेतले आहे. सतरंज्या देणगीदाखल मिळाल्या आहेत.

श्रीमंत आप्पासाहेब पटवर्धन निवर्तल्यावर पूर्वीच्या पंचांपैकी श्री. गाडगोळीच फक्त हयात असल्याचे दिसून आले. ते गदग येथे रहात असल्यानें व त्यांचे इकडे येणे-जाणेंही क्वचितच असल्यामुळे १३ मार्च १९५६ रोजी नवी पंचकमेटी स्थापन करण्यात आली. त्यांत (१) श्री. गोविंदराव गाडगीळ, रा. सांगली, (२) श्री. जगन्नाथपंत आठवले, रा. मुळगुंद, (३) श्री. रावसाहेब पटवर्धन, रा. कागवाड, (४) श्री. गुंडो चिंतामण सहस्रबुद्धे, रा. सांगली व (५) श्री. लक्ष्मण दत्तात्रय कुलकर्णी, रा. सांगली यांची नावे आहेत. असे जरी असले तरी बहुधा सर्वच व्यवहार श्री. गुंडोपंत यांचे मार्फतीनेच चालत असे. यांत काम करणारे एकटे श्री. गुंडोपंतच असत. त्यांना हरघडी मात्र श्री. करमरकर यांची फार मदत असे व अद्याप होत आहे. असा स्थितीत त्यांनी श्री. लिमये (स्वत: लेखक) व श्री. कुपवाडकर यांना पंचात सामील करून घेतले. ते बहुधा १९५७ सालचे सुरवातीस घडले असावे.

श्री. लिमये त्यांत सामावले जातांच त्यांनी सर्व पंचाची महिन्यातून एकदा बैठक घ्यावी. त्यांत गेल्या महिन्यांत काय काम झाले याचा आढावा घेऊन पुढील महिन्याच्या कामाची रूपरेखा आखण्यांत यावी. अशा तऱ्हेने पद्धतशीर काम चालवावे. असा आग्रह धरल्यानें तो सर्वांस पटून त्याचा प्रत्यक्ष अंमल १२-५-५७ रोजी होऊन त्या दिवशी पहिली सभा झाली. पुढे २९-७-५७, ४-९-५७, १०-११-५७, ९-३-५८ व १-६-५८ अशा पद्धतशीर सभा झाल्या. पण एकंदरीत असें दिसून आले की श्री. सहस्रबुद्धे व श्री. पटवर्धन यांचेमध्ये विचारविनिमयानें मतभेद

मिटून मतैक्य न होता मतभेद वाढू लागले. विकोपास जाऊं लागले. याबाबतच्या कागाळ्या परमपूज्य गु. भ. तात्यासाहेब केतकर यांचेकडे गेल्याने ते श्री. आठवले यांस घेऊन १९५८ सालचे आराधनोत्सवास हजर राहिले. त्यावेळी त्यांचेसमक्ष वाटाघाटी होऊन साधकबाधक विचारांत एक पंच कमिटी स्थापन केली, ती खालीलप्रमाणें – (१) श्री. गणेश त्रिंबक उर्फ रावसाहेब पटवर्धन, रा. कागवाड, (२) श्री. गुंडो चिंतामण सहस्रबुद्धे, रा. सांगली, (३) श्री. लक्ष्मण दत्तात्रय कुलकर्णी, रा. सांगली, (४) श्री. भास्कर अनंत लिमये, रा. सांगली, (५) श्री. महादेव गोपाळ कुलकर्णी उर्फ बंडोपंत कुपवाडकर, रा. सांगली (हल्ली तासगांव)

त्यांत कांही स्पष्ट खुलासा करण्यात आला होता, तो असा -

श्री. रावसाहेब पटवर्धन यांचेकडे १२ महिन्याची व्यवस्था सोपविण्यात आली होती. त्यांत पूजासामान, नैवेद्यास शिधा, नंदादीपास तेल, झाडलोट, अतिथींची सोय भोजनासह, यांचा अंतर्भाव करण्यात आला होता. व खर्चाचा तपशील वर्षांतून एकदां आराधनोत्सवापूर्वी त्यांनी पंचकमेटीस सादर करावा असें ठरले होते. पण थोड्याच दिवसांत हे माझे हातून होत नाही म्हणून त्यांनी अंग काढून घेतले.

आराधनोत्सवाची सर्व जबाबदारी श्री. सहस्रबुद्धे यांचेकडे होतीच ती तशीच ठेवण्यात आली व उत्सवाचे जमाखर्चाचा हिशेब त्यांनी एका महिन्यांत पंचकमेटीस सादर करावा असे ठरले.

इमारत, बाग, यांवर श्री. लिमये यांनी लक्ष पुरविणेचे आहे. रिपेअर व नवीन बांधकामाचाही त्यात समावेश होतो. बागेचा खर्च उत्सव व्यवस्थेतून व्हावा असेंही ठरले.

विनायक त्रिंबक उर्फ बापूसाहेब पटवर्धन यांनी सर्वांवर देखरेख करून सुरळीतपणें सर्वांकडून कामें करवून घ्यावींत असे ठरले.

या नव्या व्यवस्थेच्या पहिल्या सभेनंतर ८-११-५८, १२-६-५९, २-१०-५९, ११-११-५९ अशा पद्धतशीर सभा झाल्या. २-१०-५९ चे सभेत श्री. रावसाहेबांनी आपला राजीनामा स्वीकारण्याची विनंती केली. पण ती मानणेंत आली नाहीं. श्री. अण्णासाहेब गाडगीळ यांस पंचांत घेण्यासंबंधी वाटाघाटी झाल्या पण प्रत्यक्ष कांही घडले नाहीं.

यानंतर श्री. लिमये परगांवी नोकरीस गेल्यानें सभा घेण्याचा पायंडा मोडला तो अद्याप सुरू झालेला नाही. याच वेळी परमपूज्य गु. भ. तात्यासाहेब केतकर यांनी श्रीब्रह्मानंदबुवांचे समाधिस्थानीं मारुतीची स्थापना व्हावयास पाहिजे असे सुचविलें होते. ते काम मनावर घेऊन पार पाडले. त्या कामी सुमारें २००० रुपये खर्च आला. त्यापैकी देणगीरूपानें १६०० पर्यंत रुपये जमले व भरतीस लागणारे ४०० रुपये त्यांनी स्वखुषीनें पदरचे घातले. काम पूर्ण होतांच परमपूज्य गु. भ. तात्यासाहेब केतकर यांस कळविणेत आले. त्यांनी पूर्ण समाधान व्यक्त केले. लगेच कांही महिन्यांत त्यांनी इहलोकीची यात्रा संपविली. परमपूज्य गु. भ. तात्यासाहेबांच्या सूचनेप्रमाणें त्यांचे हयातीतच त्याचा अंमल झाल्याने सर्वांस समाधानही लाभले. परमपूज्य गु. भ. तात्यासाहेब हयात असेपर्यंत घटकोघटकी त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ सर्वांस मिळत असे.

चालू साल श्रीब्रह्मानंदगुरूंच्या समाधीचे सुवर्णमहोत्सवी साल होते. पवमान स्वाहाकार व रुद्र स्वाहाकार करण्याचे ठरले होते. सुवर्णमहोत्सवास भक्तांची रीघ लागणार हे दिसतच होते. खर्च अफाट होणार याची जाणीव होती. खर्चाची रक्कम जमविण्यासाठी कै. गुंडोपंत सहस्रबुद्धे यांनी जीवापाड मेहनत घेतली. त्यांनी पुणे, मुंबई, बेळगांव, कोल्हापूर, कर्नाटक अशा वाऱ्या केल्या. पुण्यामुंबईस चांगली साथ मिळाली. बेळगांव, कोल्हापूरला थोडी मदत झाली. कर्नाटकाची वारी मात्र फुकट गेली. उत्सवातहीं देणगी बरी मिळाली म्हणून तर जिकीर न होतां खर्च वेच भागला व काहीं रक्कम शिल्लक राहिली. चालू साली ८००० रुपयें जमा झाले व इमारत खर्च व उत्सव खर्च मिळून ६४०० रुपये खर्च आला. गेल्या साली ३९ रुपये तूट आली होती, ती कै. सहस्रबुद्धे यांनी पदरची मेळ घालून टाकल्यानें शिल्लक पूज्य होती.

पवमान स्वाहाकार व रुद्रस्वाहाकार हे दोन्हीं कार्यक्रम सांगलीचे वे. दत्तभटजी टिळक यांचे नेतृत्वाखाली समाधानकारकरीत्या पार पडले. अन्नदान भरपूर झाले. तीन दिवस तर हजार पान झाले व एकंदर पात्रसंख्या ५००० च्या पुढे गेली.

चालू सालचा विशेष म्हणजे सुवर्णमहोत्सवसाली प्रसिद्ध करण्याच्या इराद्यानें श्री. भा. अं. लिमये पंच यांनी दोन वर्षे खपून, माहिती जमवून श्रीब्रह्मानंदगुरुंचे चरित्र लिहिले व तो सांगलीच्या चिंतामणी छापखान्यातून छापूनही घेतले. त्याकामींदेखील बराच खर्च आला. त्याकामीं श्री. सहस्रबुद्धे यांनी ५०० रु., श्री. गाडगीळ (तूपवाले) यांनी ५०० रु. व अहमदाबादचे श्री. गोखले यांनी १००० रु. बिनव्याजी दिल्यानें ती कामगिरी पुरी होण्यास फार मदत झाली.

या सर्व चांगल्यांत संस्थेचे दृष्टीनें वाईट एवढेंच झाले की आजारामुळे श्री. सहस्रबुद्धे यांना उत्सवास येतां आले नाहीं. एवढेंच नव्हें तर उत्सवानंतर दहाच दिवसांत ते स्वर्गवासी झाले.

यापुढे उत्सवास चिरस्थायित्व येण्यासाठी कायम निधी जमविणेची योजना पंचांच्या विचाराधीन आहे. त्या निधीच्या व्याजातून सर्व काहीं व्यवस्थित चालावें अशी इच्छा आहे. ती इच्छा पूर्ण करण्यास श्रीब्रह्मानंदगुरु समर्थ आहेत. आमचा सर्व भार श्रीगुरूंवरच आहे व त्यांच्या कृपेशिवाय आमचे हातून कांहीच होणार नाही, याची आम्हां पंचांस पूर्ण जाणीव आहे.

कै. सहस्रबुद्धे यांचे जागी कोणी तरी नवा पंच लवकरच घेतला जाईल. त्यांची सरपंचांची जागा सर्वानुमतें भरून काढण्यांत येईल. त्यांचे कार्य जसें ठळकपणें नजरेंत भरते त्याच प्रकारची कामगिरी त्यांचे पश्चात् दुप्पट उत्साहानें व्हावी व श्रीगुरूंनी आपल्या कृपाकटाक्षाच्या पाठबळावर सर्वांस हिंमत द्यावी व त्यांच्याकडून कामगिरी करवून घ्यावी अशी श्रीगुरूंचे चरणी प्रार्थना करून हा इतिहास संपवितो.

**॥ श्री सद्‌गुरु ब्रह्मानंदार्पणमस्तु ॥**

# परिशिष्ट – ३

## श्रीब्रह्मानंदांची काकड आरती

॥ श्रीराम समर्थ ॥

काकड आरती बेळगुवे ब्रह्मानंद गुरुनाथा । ब्रह्मानंद गुरुनाथा ।
वेंकटपुरदोळु संतत नेलसिद ।
बेलधडिपुरदोळु संतत नेलसिद दीनानाथा ॥ ध्रु० ॥
उदयकालदोळु यद्दु सद्गुरु देवन पूजिसि । श्रीगुरु देवन पूजिसि ।
सद्भावदिंद काकड बेळगुवे चरणके वंदिसि ॥ १ ॥
नित्यनिराकार निर्गुण सगुण रूपनिगे । सुंदर सगुण रूपनिगे ।
अत्यानंददिंद पूर्वपरंज्योतिगे ॥ २ ॥
भुक्तिमुक्तिदायक नित्यानंदमूर्तिगे । नित्यानंदमूर्तिगे ।
भक्तिप्रेमदिंद व्यंकटेशप्रियनिगे ॥ ३ ॥

## श्रीब्रह्मानंदांची आरती

॥ श्रीराम समर्थ ॥

**मराठी आरती**

श्रीगुरु ब्रह्मानंद । जय जय ब्रह्मानंद ॥ ध्रु० ॥
गोंदवलेकर श्रीसद्गुरुच्या । गोंदवलेकर श्रीसद्गुरुच्या ।
चरणाब्जी तू मिलिंद ॥ १ ॥
त्या चरणाची लावुनि गोडी । त्या चरणाची लावुनि गोडी ।
सोडवि विषयच्छंद ॥ २ ॥
श्रीरामचि ते, रामदूत तू । श्रीरामचि ते, रामदूत तू ।
महाभागवत मंद ॥ ३ ॥

आरति गुरुवर ब्रह्मानंदा वेंकटपुरवासी ।
भक्तमुकुट कल्पद्रुम ।
भक्तमुकुट कल्पद्रुम कर्नाटकि रमसी ॥ ध्रु. ॥
असतां कृतपुरि ईशकृपेने वैराग्य धरिसी ।
वेंकटप्रेरित सद्गुरुचरणी अनन्य होसी ।
राहुनि गुरुगृहि मनोभावे कृपा लाधसी ।

पूर्ण ब्रह्मचैतन्य सगुण ।
पूर्ण ब्रह्मचैतन्य सगुण गोंदावले–प्रभुसी ॥ १ ॥
घेउनि सद् गुरु निजजनसंगे स्वस्थाना येसी ।
स्थापुनि रामा बेलधडिग्रामी भक्ति वाढविसी ।
कलिमल उडवुनि जनवृन्दासी भजनी लाविसी ।
बाला अबला वृद्धा तरुणा ।
बाला अबला वृद्धा तरुणा नामी रत करिसी ॥ २ ॥
दास रामाचा कल्याण तुम्ही दीनदास याची ।
आस होती म्हणोनि भक्ति आत्मनिवेदनाची ।
कास धरुनि मी निर्भय रमतो सद्गुरुमाहेरी ।
याचक किंकर हात जोडुनी ।
याचक किंकर हात जोडुनी लोळे पायासी ॥ ३ ॥

**कानडी आरती**

श्रीगुरु ब्रह्मानंद समर्था बेळगुवे नारतिया ।
योगिवर्य श्रीब्रह्मचैतन्यसुकरुणार्जितमाया ॥ ध्रु० ॥
जगदोद्धारा भवभयदूरा गुणपारावारा ।
जगदोळु कामक्रोधादिगळुनु जयसिदि गंभीरा ।
बगे बगे इंदलि धरयोळु बेळसिदि रामनामसारा ॥ १ ॥
नरपुर रथपुर वेणुपुर दल्ली नाम यजनवन्नु ।
जरुगिसि करुणादि उद्धरि सिदि नि पातकिजनरन्नु ।
स्मरिसुव जनरिगे इष्टार्थव पूरिसि माडिदि धन्यरन्नु ॥ २ ॥
इंदिरेशन सुंदर मंदिर वेकंटपुर रोळगे ।
छंददि निर्मिसि आनंदव गोळिसिदि सुरनर मुनिगळिगे ।
इंदु सच्चिदानंद तेनयु कोडु किंकर वेंकटगे ॥ ३ ॥

# परिशिष्ट – ४

## श्रीब्रह्मानंदांचे श्रीगोंदवलेकर महाराजांविषयीचे अभंग

१) साष्टांग वंदूनी सद् गुरुरायासी । चिंतावी मानसी गुरुमूर्ति ।। १ ।।
गुरुराव माझे ब्रह्मचि साकार । केला उपकार धरुनि देह ।। २ ।।
नाही निराकार नाही हो साकार । ऐसा गुरुवर माझा आहे ।। ३ ।।
अनिर्वाच्य ब्रह्म चैतन्यासि आले । दुष्टहि तरले दर्शनयोगे ।। ४ ।।
सकल निगमागम नेणती महिमा । नाही दुजी उपमा सद्‌गुरुसी ।। ५ ।।
दीन ब्रह्मानंद प्रार्थीतसे भावे । मन लय व्हावे रामरूपी ।। ६ ।।

२) माझे सद्‌गुरुराव मारुति–अवतार । कोणी हो संदेह धरू नये ।। १ ।।
दया ती पहावी सद्‌गुरुनाथांची । समर्थांचि परी शोभतसे ।। २ ।।
नारी–नर ज्याला झाले रामरूप । नाही नाही भेद तिळप्राय ।। ३ ।।
कोट्यनुकोटी उद्धरीले लोक । रामनाम एक बोधूनिया ।। ४ ।।
करुनी व्यवहार परी नाही लिप्त । पंकांतूनि गगन तैसे जाणा ।। ५ ।।
सच्चिदानंद स्वरूपी निमग्न । रामरूप सत्य सत्य जाणा ।। ६ ।।
तुर्यातीत अवस्था आहे निरंतर । ब्रह्मानंद खूण सांगतसे ।। ७ ।।

३) जेथे दिसे सद्‌गुरुचरण । तेचि आम्हां गोकर्ण ।। १ ।।
गोकर्णीचे महेश्वर । सद्‌गुरुनाथ खरोखर ।। २ ।।
माणगंगेचिया तीरी । लोळताती मुक्ति चारी ।। ३ ।।
गोंदावले ऐसे भुवन । सद्‌गुरुंचे जन्मस्थान ।। ४ ।।
गोंदावले ऐसे क्षेत्र । सोडुनि जावे का इतरत्र ।। ५ ।।
ब्रह्मानंद सांगू किती । सद्‌गुरुविण नाही गती ।। ६ ।।

४) ऐसी करी सद्‌गुरुआई । आपुले स्मरण वसो हृदयी ।। १ ।।
नावडो हे विषयध्यान । रामनामी लागो मन ।। २ ।।
देहबुद्धि उकरून । लावी रोप समाधान ।। ३ ।।
पळवी माझी दुजी भ्रांति । वासना जाळुनि देई शांति ।। ४ ।।
बहु बळकट चिज्जडग्रंथी । सोडुनि दावा दाशरथि ।। ५ ।।
ब्रह्मानंदी आशा फार । करी दीनाचा उद्धार ।। ६ ।।

५) शंभुकैलासीचा राजा । त्यासी नमस्कार माझा ।। १ ।।
अंकी शोभे ही पार्वती । पुढे नाचे गणपति ।। २ ।।
गळा भुजंगाची माळा । रामनामावाचुनि भोळा ।। ३ ।।
ब्रह्मानंद पावे शमन । रामकृपे, विषय वमन ।। ४ ।।

६) रामनाम ज्याचे वाचे । ब्रह्मसुख तेथे नाचे ।। १ ।।
रामरूप ज्याचे डोळा । ब्रह्मसुख तेथे लोळे ।। २ ।।
रामकथा ज्याचे कर्णी । त्याचा महिमा देव वर्णी ।। ३ ।।
रामनामी दृढ विश्वास । ब्रह्मानंद त्याचे दास ।। ४ ।।

## परिशिष्ट – ५

## श्रीब्रह्मानंद पुण्यतिथि (भाद्रपद अमावस्या)

### गुलाल अभंग

नारायण विधि वसिष्ठ राम । रामदास कल्याण धाम ।।
बाळकृष्ण चिंतामणि राम । कृष्ण तुकाई सद्‌गुरुधाम ।।
सद्‌गुरु ब्रह्मचैतन्य । दास घाली लोटांगण ।।

अभंग – १
राम गावा राम घ्यावा । राम जीवीचा विसावा ।। १ ।।
मंगलाचे जे मंगल । राम कौसल्येचा बाळ ।। २ ।।
कल्याणाचे जे कल्याण ।। रघुरायाचे गुणगान ।। ३ ।।
सकल तीर्थे एक्या तीर्थी । जेथे राघोबाची मूर्ति ।। ४ ।।
राम कैवल्याचा दानी । रामदास अभिमानी ।। ५ ।।

अभंग – २
महाराजांसमान नाही त्रिभुवनी । आनंदाची खाणी गुरुराव ।। १ ।।
गुरुराव माझे रामचि केवळ । वासनेचे मूळ दूर केले ।। २ ।।
दूर केला भव कृपादृष्टिपाते । मायापाशभूते पळविली ।। ३ ।।
पळविली भ्रांति राहोनिया चित्ती । ब्रह्मानंद स्तुति काय करू ।। ४ ।।

अभंग – ३

साष्टांग वंदूनी सद्‌गुरुरायासी। चिंतावी मानसी गुरुमूर्ति ॥ १ ॥
गुरुराव माझे ब्रह्मचि साकार। केला उपकार धरुनि देह ॥ २ ॥
नाही निराकार नाही हो साकार। ऐसा गुरुवर माझा आहे ॥ ३ ॥
अनिर्वाच्य ब्रह्म चैतन्यासी आले। दुष्टहि तरले दर्शनयोगे ॥ ४ ॥
सकल निगमागम नेणती महिमा। नाही दुजी उपमा सद्‌गुरुसी ॥ ५ ॥
दीन ब्रह्मानंद प्रार्थीतसे भावे। मन लय व्हावे रामरूपी ॥ ६ ॥

अभंग – ४

कृपाळु सज्जन तुम्ही संतजन। हेचि कृपादान तुमचे मज ॥ १ ॥
आठवण तुम्ही द्यावी पांडुरंगा। कींव माझी सांगा काकुळती ॥ २ ॥
अनाथ अपराधी पतित आगळा। परी पायावेगळा नका करू ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी। मग मज हरि उपेक्षीना ॥ ४ ॥

(यानंतर गुलाल उधळून आरती करावी.)

**श्रीब्रह्मानंदांची अक्षय पिशवी**

गोंदवले येथील समाधीमंदिराची सर्व व्यवस्था आखून दिल्यावर श्री ब्रह्मानंद महाराजांनी आपल्याजवळील बटवा गोंदवले येथील कोठीत ठेवला होता. ह्या बटव्यात तीन रुपयांची जुनी नाणी आहेत. ही बटव्याची पिशवी जोपर्यंत आहे तोपर्यंत कोठीत कशाची उणीव भासणार नाही असे श्रीब्रह्मानंदांनीच सांगितले आहे.

श्री गोंदवलेकर महाराजांच्या प्रत्येक पुण्यतिथी उत्सवाचा प्रारंभ कोठी पूजनाने होतो. त्यावेळी श्रीब्रह्मानंदांनी ठेवलेल्या 'अक्षय पिशवी' ची व त्यांच्या प्रतिमेची पूजा करतात. त्यानंतर आरती करून प्रसाद वाटप होते. उत्सव सुरु झाल्याचा आनंद सर्वांच्या चेहऱ्यावर दिसत असतो.